# मराठा सरदार होळकरांचे प्रशासन: एक चिकित्सक अभ्यास




स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.

मानवविद्याशाखे अंतर्गत इतिहास विषयातील

पीएच. डी. (आचार्य) पदवीसाठी सादर करण्यात आलेला

**शोध-प्रबंध**


**संशोधक**

**प्रा. सत्यपाल पांडुरंग बनसोडे**

इतिहास विभाग प्रमुख

एम.ए. (इति., अर्थ., राज्य), बी. एड., एम. एड.

जिल्हा परिषद कनिष्ठ महाविद्यालय ढाणकी, ता. उमरखेड, जि. यवतमाळ

**मार्गदर्शक**

**प्रा. डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले**

इतिहास विभाग प्रमुख

आदर्श महाविद्यालय हिंगोली.

**संशोधन केंद्र**

सामाजिक शास्त्र विभाग

स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड.


**फेब्रुवारी २०१९**




प्रमाणित करण्यात येते की, **श्री. सत्यपाल पांडुरंग बनसोडे** यांनी स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड येथे सादर केलेल्या **'मराठा सरदार होळकरांचे प्रशासन: एक चिकित्सक अभ्यास'** या शोध प्रबंधासाठी केलेले संशोधन माझ्या मार्गदर्शनाखाली झालेले आहे. शोधप्रबंध लेखनात ज्या संदर्भ साहित्यांचा आधार घेण्यात आलेला आहे. त्याचा अवश्यक तेथे येथोचित निर्देश केलेला आहे.

**श्री. सत्यपाल पांडुरंग बनसोडे** यांनी हा शोध प्रबंध स्वतंत्र रित्या लिहिला असून तो इतर कोणत्याही विद्यापीठात अन्य पदविसाठी अथवा प्रमाणपत्रासाठी सादर केलेला नाही. सदर शोधनिबंधाच्या इतिहास विषयातील पीएच.डी. पदवीसाठी सादर करण्यास माझी अनुमती आहे.

**मार्गदर्शक**

प्रा. डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले

इतिहास विभाग प्रमुख

आदर्श महाविद्यालय हिंगोली




मी **सत्यपाल पांडुरंग बनसोडे** प्रतिज्ञापूर्वक निवेदन करतो की, **'मराठा सरदार होळकरांचे प्रशासन: एक चिकित्सक अभ्यास'** या विषयावरील शोध प्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड मानव विद्याशाखे अंर्तगत इतिहास विषयातील पीएच. डी. (आचार्य) पदवीसाठी सादर केला आहे.

हा शोधप्रबंध मी स्वत: माझे संशोधन मार्गदर्शक **प्रा. डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले** सरांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपुर्वक लिहिलेला आहे. त्यातील सर्व मजकुर माझ्या अभ्यासावर व संशोधनवर आधारलेला आहे. कुठल्याही प्रकाशित अथवा अप्रकाशित संशोधन साहित्याची नक्कल केलेली नाही.

मी सदर शोधप्रबंध या व्यतिरिक्त इतर कोणत्याही विद्यापीठात अथवा संस्थेत कोणत्याही पदवीसाठी सादर केलेला नाही.

दिनांक  /०२/२०१९

स्थळ: ढाणकी

संशोधक

**श्री सत्यपाल पांडुरंग बनसोडे**




मी **सत्यपाल पांडुरंग बनसोडे** प्रतिज्ञापूर्वक निवेदन करतो की, **'मराठा सरदार होळकरांचे प्रशासन: एक चिकित्सक अभ्यास'** या विषयावरील शोध प्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड मानव विद्याशाखे अंर्तगत इतिहास विषयातील पीएच. डी. (आचार्य) पदवीसाठी सादर केला आहे.

हा शोधप्रबंध मी स्वत: माझे संशोधन मार्गदर्शक **प्रा. डॉ. राजाराम रामा पिंपळपल्ले** सरांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपुर्वक लिहिलेला आहे. त्यातील सर्व मजकुर माझ्या अभ्यासावर व संशोधनवर आधारलेला आहे. कुठल्याही प्रकाशित अथवा अप्रकाशित संशोधन साहित्याची नक्कल केलेली नाही.

मी सदर शोधप्रबंध या व्यतिरिक्त इतर कोणत्याही विद्यापीठात अथवा संस्थेत कोणत्याही पदवीसाठी सादर केलेला नाही.

दिनांक  /०२/२०१९

स्थळ: ढाणकी

संशोधक

**श्री सत्यपाल पांडुरंग बनसोडे**

## ऋणनिर्देश

छत्रपती शिवाजी महाराजांच्या मराठी स्वराज्य विस्ताराची धुरा खंबीरपणे पेलवणारे होळकर घराणे हे एकमेव होय. निष्ठावंत व कर्तबगार होळकर शासकांनी कर्तव्यनिष्ठेने विस्तारीत केलेली मराठी सत्ता ही इतिहासाला कलाटणी देणारी ठरली. होळकर शासकांनी स्वकर्तृत्वाच्या बळावर मराठी राज्याच्या सत्तेला आधार स्तंभ मिळवून दिला. होळकर शासकांनी मराठी सत्तेला स्थैर्य व विकास ह्या त्यांच्या उत्कृष्ट प्रशासन व्यवस्थेने मिळवून दिला. या शासन व्यवस्थेमुळे त्यांनी जनतेच्या मनावर अधिराज्य गाजविले. अशा या मराठी साम्राज्यविस्तारामध्ये सिंहाचा वाटा असलेल्या होळकर घराण्याच्या प्रशासनाचा संशोधन करण्याचे ठरविले. या संशोधनाच्या कार्यात दीपस्तंभासारखे मार्गदर्शन करणारे गुरूतुल्य **मार्गदर्शक मा. डॉ. पिंपळपल्ले राजाराम रामा** सरांचे सखोल ज्ञान, अनुभव व योग्य असे मार्गदर्शन अनमोल ठरले त्यांचा मी प्रथमतः ऋणी आहे. त्यांच्या सहकार्यामुळेच मला मराठा सरदार होळकरांचे प्रशासन या विषयावर चिकित्सकपणे अभ्यास करण्यास मदत झाली.

माझ्या संशोधन केंद्राचे संचालक डॉ. शेख सर व डॉ. येळणे सर यांच्या सहकार्यामुळे हा प्रबंध मला वेळेत सादर करण्यास मदत झाली. त्यासाठी मी त्यांचा आभारी आहे. तसेच या कार्यात माझे गुरुतुल्य डॉ. गणेश मतकर इंदौर, डॉ. अरविंद नवले उदगीर, प्रा. बाबासाहेब दुधभाते पुणे, डॉ. यशपाल भिंगे नांदेड, डॉ. सदाशिव दंदे लातूर, डॉ. प्रशांत कुलकर्णी, डॉ. मनोरमा दांडगे या सर्व गुरुचे माझ्या संशोधन कार्यासाठी अनमोल मदत व सहकार्य लाभले. त्यामुळे मी त्यांचा ऋणी आहे.

तसेच या संशोधन कार्यासाठी मला माननीय ग्रंथपाल, देवी अहिल्या विश्वविद्यालय इंदौर, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, सावित्रीबाई फुले विद्यापीठ जयकर ग्रंथालय पुणे, डॉ. राठोड सु. ही. महाराष्ट्र विभागीय ग्रंथालय पुणे, ग्रंथालय अंबादेवी वाचनालय अमरावती, नगर वाचनालय अमरावती, शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, संत गाडगेबाबा विद्यापीठ अमरावती, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ नागपूर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद, अहिल्यादेवी वाचनालय औरंगाबाद, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड, यशवंत महाविद्यालय नांदेड, गो. सी. गावंडे महाविद्यालय उमरखेड इत्यादी ग्रंथालयातील ग्रंथपाल व त्यातील सहाय्यकांचे मोठे सहकार्य लाभल्यामुळे मला संशोधन कार्य पूर्ण करण्यास मोलाची मदत झाली. एखादे काम यशस्वी होण्यासाठी अनेक व्यक्ती मदत करत असतात. असे न मागता ही मार्गदर्शन करून उंच शिखरावर पोहचण्यास प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत करणाऱ्या सर्वांचा मी आभार आहे.

तसेच माझ्या जि. प. कनिष्ठ महाविद्यालयाचे प्राचार्य श्री. काळे सर, प्रा. राठोड सर, व सर्व माझे सहकारी शिक्षक बंधु यांचीही मदत मिळाली त्यामुळे मी त्यांचाही ऋणी आहे. माझे सर्व बंधु मित्र श्री नादरे सर, श्री कर्नेवाड सर व श्री खंदारे सर यांचे सहकार्य लाभले त्याबद्दल मी त्यांचेही आभार व्यक्त करतो. तसेच माझे बंधु प्रा. डॉ. कुमार बनसोडे प्रा. शिवाजी इंदूरे, सुधाकर बागडे व दयानंद बनसोडे यांची या संशोधन कार्यात मदत झाली. मी त्यांचेही ऋण आहे. माझी अर्धांगिनी प्रा. डॉ. अनिता वरवटकर यांची संशोधन कार्यास मोलाची मदत झाली. तसेच मुलगी श्रेया व मुलगा यश यांनीही मला पुरेपूर मदत केली त्याबद्दल मी त्यांच्या ऋणात राहणे पसंत करतो.

**संशोधक**

**श्री सत्यपाल पांडुरंग बनसोडे**

# अनुक्रमणिका

**प्रस्तावना—:**

मध्ययुगीन भारतीय इतिहासामध्ये मराठी कालखंडास महत्वपूर्ण स्थान आहे. छत्रपती शिवरायांनी मराठी माणसामध्ये एक नवचैतन्य निर्माण करून वंशपरंपरेला प्राधान्य न देता गुणवंताला न्याय देण्यासाठी हिंदवी स्वराज्य स्थापन केली. या स्वराज्य स्थापनेमध्ये छत्रपती शिवरायांना अनेक राजघराण्यानी समर्थन व अनेकांनी विरोध दर्शविला होता. शिवरायाच्या इ. स. १६८० निधनानंतर मराठी स्वराज्य छत्रपती संभाजी महाराजांनी सांभाळले. (इ.स. १६८०—१९८९) त्यांच्या वधानंतर मराठी स्वराज्याची धुरा शिवरायांचे धाकटे चिरंजीव राजाराम यांनी नेतृत्व सांभाळले. पण त्यांच्या अकाली निधनाने (इ.स. १७००) मराठी स्वराज्याचा वारसा कोण पुढे नेणार हा नियतीपुढे फार मोठा यक्ष प्रश्न उभा होता. कारण मराठा स्वराज्याचा वारसदार छत्रपती शाहू व महाराणी येशूबाई मोगलांच्या कैदेमध्ये होते. त्यावेळी मराठी स्वराज्य कोणी सांभाळावे या प्रश्नांचे उत्तर तयार नव्हते; पण या सर्वांचे उत्तर सोडविण्याचे काम छत्रपती शिवरायांची धाकटी सून महाराणी ताराबाईने मराठी पताका आपल्या हाती घेऊन मराठी स्वराज्य जीवंत ठेवण्याचा प्रयत्न केला. मराठा स्वराज्याच्या सिमा नर्मदा नदीपर्यंत घेऊन जाण्याचा प्रयत्न केला.

छत्रपती शिवाजी महाराजांच्यानंतर सहज हिंदवी स्वराज्य जिंकण्यासाठी मोगल बादशहा औरंगजेबाने दक्षिण मोहीम हाती घेतली. बादशहाने सतत पंचेवीस वर्ष प्रचंड फौजेनिशी दक्षिणेत जातीने हजर राहून देखील छत्रपती संभाजी महाराजांना, छत्रपती राजाराम महाराजांना व ताराबाई यांच्याशी सतत सामना करून देखील हिंदवी स्वराज्य जिंकता आले नाही. कारण जाबाज मराठा सरदार व सेनापतीच्या सहाय्याने दिल्लीच्या बादशहाला गनिमी काव्याने लढा देऊन हिंदवी स्वराज्याचे रक्षण करण्यात यशस्वी झाले होते. औरंगजेबाच्या मनात या गोष्टीचा सल सतत चालू असतानाच त्याला आपल्या राजधानीत सुद्धा परत जाता आले नाही. अहमदनगर येथे २० फेब्रुवारी १७०७ ला मृत्यू झाला. तेव्हा दक्षिणेचा मोगल सुभेदार बादशहाचा दुसरा मुलगा आझमशहानेच औरंगजेबावर अंत्यसंस्कार करुन ५ मार्च १७०७ ला स्वत: दिल्लीचा मुघल बादशहा म्हणून घोषित करुन दिल्लीकडे निघाला.[१] कारण जो पर्यंत त्यांचा थोरला भाऊ शहाआलम यांचा कायमचा बंदोबस्त केल्याशिवाय बादशहा बनता येणार नव्हते. उत्तरेकडे आग्रास जाताना त्यांच्या सोबत कैदेत असलेले शाहू महाराज, येशूबाई व इतर दोनशे मराठे होते. तेव्हा आझमशहा उत्तरेकडे जाताना सोबत बहिण झिनतउन्नीसा बेगम व सेनापती झुल्फीकारखान हे ही होते. भोपाळ जवळील दोरहा येथे ८ मे १७०७ ला एकट्या शाहूची सुटका केली.[२]

आलमशहाने शाहूची सुटका करण्याचा हेतू वेगवेगळा होता. जवळपास अठरा वर्ष मोगलाच्या कैदेत राहून तो स्वराज्यात प्रथमच येत असल्याने ताराबाईचे राजपद जाते, म्हणून तो कोणीतरी 'तोतया' आहे. असे जाहीर करुन जनतेत व सरदारात संभ्रम निर्माण केला.

त्यामुळे शाहू महाराज खाली येताच मराठे सरदार व मुत्सद्दी यात दोन पक्ष झाले.[३] पण या अगोदरच पुर्वी पासून बाळाजी विश्वनाथ भट हे शाहू कैदेत असतानाच दोघांत पत्र व्यवहार चालत असल्याने सुटका होताच ते जाऊन मिळाले. एवढेच नव्हे तर शाहू हाच स्वराज्याचा खरा वारस आहे. हे बाळाजी विश्वनाथ यांनी मराठा सरदाराना पटवून शाहूच्या पक्षात अनेक सरदांना वळवून घेण्यात यश मिळविले. ताराबाईने शाहूचा बिमोड करण्यसाठी प्रतिनिधीच्या नेतृत्वाखाली फौज पाठविली. खेड येथे दोन्ही सैन्यात युद्ध होऊन ताराबाईच्या सैन्याचा पराभव झाला. तेव्हा शाहूने विजय मिळवल्यानंतर सरळ साताऱ्यावर चालून आल्याने ताराबाई यांनी सातारा सोडून कोल्हापूरला पलायन करून कोल्हापूर येथे मराठ्यांची दुसरी गादी निर्माण केली. त्यामुळे सातारा व कोल्हापूर अश्या दोन गाद्या प्रस्थापित झाल्या. १२ जानेवारी १७०८ रोजी सातऱ्यात छत्रपती शाहू महाराजांनी स्वत:चा राज्याभिषेक करुन घेऊन पेशवेपदी बहिरोपंत पिंगळे, सेनापती पदी धनाजी जाधव यांची नियुक्ती केली.[४]

छत्रपती शिवाजी महाराजांनी मध्यवर्ती सत्तेतील छत्रपतींचे स्थान सर्वोच्च करून 'राजा' हा राज्यकारभाराचा मुख्य कणा केला. त्यांनी प्रधान मंडळाचा उदय व विकास केला. हेच स्वरूप पुढे संभाजी महाराज, राजाराम महाराज व शाहू महाराजांनी चालू ठेवले; पण पुढे छत्रपती पदाचे वारस खंबीर वा शूरवीर नव्हते. त्यामूळे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांनी रणमैदान गाजवून उत्तरेत विजयाची मोठी घोडदौड मारून आपले वर्चस्व सर्वत्र निर्माण केले. त्यामूळे आपोआप मराठी सत्तेची सर्व सत्तासुत्रे त्यांच्या हाती आले. तसेच पेशव्यांनी आपल्याच हाती सत्तेची सुत्रे राहावी यासाठी मंत्रीमंडळाचे नुतनीकरण करून फक्त अष्टप्रधान मंडळातील सचिव व सेनापती हे पद कायम ठेऊन बाकीचे सर्व पदाचा कारभार आपल्या हाती घेतला.

छत्रपती शिवरायाने मराठी स्वराज्य स्थापन करताना जी आदर्श तत्व निर्माण केली. ती पुढे महाराणी ताराबाईने स्वराज्य जीवंत ठेवण्यासाठी सरंजामदारी पद्धतीचा अवलंब केला. त्यानुसार त्यांनी आपल्या सरदारात नवचैतन्य जागृत करून मोगलांचा जो प्रदेश जिंकण्यास प्रेरणा दिली. इ. स. १६९०—१७१० हा काळ म्हणजे मराठी इतिहासातील उज्वल काळ होय. कारण कोणतीही परकीय सत्ता एकवटलेल्या महाराष्ट्रीयन समाजास चिरडून टाकू शकली नाही.

### १.१ मराठा मंडळाचा उगम:

छत्रपती राजाराम महाराज यांनी मराठी राज्याचे अस्तित्व टिकविण्यासाठी स्वराज्यात खऱ्या अर्थाने आपल्या शुभ चिंतकाशी सल्लामसलत करुन मराठा मंडळाची निर्मिती केली. त्यानुसार परसोजी भोसले यांस गोंडवन व वऱ्हाड भागातून चौथाई व सरदेशमुखी वसूलीचा अधिकार दिला. निंबाळकरांना गंगथडीचा अधिकार दिला. दाभाडे यांना गुजरात व खानदेशाचा अधिकार दिला. तर काहीना अवश्यक ते सैन्य उभारुन मोगलांच्या प्रांतातून मराठा राज्याच्या वतीने चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याच्या सनदा बहाल केल्या. इ. स. १६९९ मध्ये

मराठा मंडळाच्या अंतर्गत छत्रपती राजाराम महाराजांनी दाभाडे यांना बालगण, शिंदेना खानदेश, भोसलेंना वऱ्हाड व निंबाळकरांना गजळाडीच्या प्रांताची कायमची सनद बहाल केली.

मोगल बादशहा औरंगजेबाच्या मृत्यूनंतर खऱ्या अर्थाने मोगलांचे दुबळे वारसदार निघाले. तसेच मोगलाचे सुभेदार वा सरदार ही आपापल्यात भांडत बसून स्वत: स्वतंत्र राजा समजून स्वहितासाठी शत्रूच असलेल्या मराठ्यांची मदत घेतली जाऊ लागली. पेशवे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांचे साम्राज्यविस्ताराचे धोरण राबवून थेट दिल्लीच्या बादशाही पदावर आपल्या मर्जीनुसार बादशहा बनविण्याची ताकत मराठ्यांच्या हाती आलेली होती. म्हणजेच दिल्लीच्या बादशहाचे संरक्षण करण्याचे व मोगली साम्राज्याचेही संरक्षण करण्याची जबाबदारी मराठेशिवाय संपूर्ण हिंदुस्थानात घेणारे दुसरे कोणी नव्हते. बाळाजी विश्वनाथ यांनी खंडेराव दाभाडे याला 'सेनापती' हा किताब देण्यात आला. परसोजी भोसले याला 'सेनासाहेब सुभा' हे पद देऊन शाहू राज्याच्या त्यास अधीन आणले. उदाजी पवार यांना माळवा व फत्तेसिंग भोसले यास अक्कलकोटची जहागिरी दिली. हिंदुराव घोरपडे यास दक्षिणेकडे जहागिरी दिली. जेंव्हा बाळाजी विश्वनाथ यांनी बादशहाकडून सनदांची प्राप्ती केली. तेंव्हा पासून मराठा मंडळास कायदेशीर स्वरुप प्राप्त झाले. पूढे याच मराठामंडळाच्या अधीन दिल्लीचा बादशहा देखील आला होता.

शिवाजी जर मराठी राज्याच्या संस्थापक म्हणावयाचा तर बाजीराव त्यांचा साम्राज्य संस्थापक समजला पाहिजे. मराठी साम्राज्य स्थापन करण्याची शक्यता ज्याला दिसली असेल असा पहिला राजकारणी पुरुष पेशवा बाजीराव होय [५]. असे सरदार पण्णीकर म्हणतात. या बाजीरावांच्या साम्राज्य विस्तारास मल्हारराव होळकर राणोजी शिंदे व उदाजी पवार यांचाही तेवढाच मोठा सहभाग होता.

छत्रपती हे पद फक्त पेशव्यांना 'पेशवे पदाची वस्त्रे' देण्यापुरतेच मर्यादित राहिले. संपूर्ण राज्यसत्तेचे हस्तांतरण करून नवतरूण सरदाराच्या कार्यकर्तृत्वास नामी संधी उपलब्ध करून दिली. यासाठी त्यांनी 'मराठामंडळ' निर्माण केले. या मराठामंडळाच्या जोरावर केंद्र सत्तेचा सर्व राज्यकारभार 'छत्रपती' ऐवजी 'पेशवा' यांच्याकडेच राहील अशी यंत्रणा निर्माण केली. तसेच अष्टप्रधान मंडळाचेही सर्व अधिकार स्वत:कडेच ठेवले. या सत्तेचा पुरेपूर वापर करण्यासाठी व स्वत:ची प्रतिष्ठा वाढविण्यासाठी श्रीमंत बाजीराव पेशव्यांनी प्रधान मंडळाचे नुतनीकरण करण्याऐवजी नव्या सरंजामदाराकडे स्थानिक प्रशासनाचे काम सोपविले. याच धोरणामूळे मराठ्यांची मध्यवर्ती सत्ता छत्रपती ऐवजी पेशव्यांकडे राहिल्याने घटक सत्ताही सरंजामदारात विभागली गेली. याचा अर्थ असा की, पेशव्यांनी मराठी राज्याची पूर्वीची एकसंघ राज्यव्यवस्था नष्ट करून छोटे छोटे सत्ताधीश अस्तित्वात आणले. मराठा सरदारांना वेगवेगळ्या भागाचे कुलमुखत्यार पद देण्यात आले. मिळालेल्या चौथाईतून स्वत:चा खर्च कापून मध्यवर्ती

तिजोरीत भरण्याचे निश्चित करण्यात आले. छत्रपतीस लष्करी मदत गरजेनुसार पुरवण्याचे बंधन या सरदारांवर घालण्यात आले.[६]

मराठा 'प्रथम पेशवा' बाळाजी विश्वनाथाने दिल्ली सत्तेकडून १२ जानेवारी १७१९ रोजी चौथाई व १५ मार्च १७१९ रोजी सरदेशमुखीच्या सनदा मिळवून मोगलावर आपले वर्चस्व राखण्यात यश मिळविले.[७] थोरले बाजीरावांने नर्मदा नदी ओलांडून उत्तर भारतावर आपली पताका फडकविली. व अनेक मोगली प्रदेश हिंदवी स्वराज्यास जोडले. ज्या प्रांतावर मराठी सत्ता स्थापन केली. त्या प्रांताकरिता चार सरदार नियुक्त केले. मराठी स्वराज्याचे साम्राज्यात रूपांतर करतांना पहिल्या बाजीराव पेशव्यांनी उत्तरेत त्या सरदारांना स्वातंत्र्य बहाल केले होते. यामध्ये पवार, होळकर व शिंदे यांनी माळव्यावर तर गायकवाड गुजरातवर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. म्हणजेच ते राज्यधारक सरदार बनले. यात विशेष म्हणजे हे तिघेही कोणत्याही राजघराण्यातील नव्हते, उदाजी पवार खानदानी मराठा कुटुंबातील, मल्हारराव होळकर धनगर कुळातील, तर राणोजी शिंदे कुलबी कुळातील होते.[८]

इ.स. १७१० नंतर मराठी स्वराज्य पुनः स्थापित झाले होते. मराठी स्वराज्यामध्ये पेशव्याचा उदय घडून आला होता. पेशव्यांनी मराठा सरदाराच्या पराक्रमास वाव देऊन मराठी स्वराज्याचे मराठा साम्राज्यात रूपांतर केले. त्यामध्ये होळकर घराण्याचे अतुलनीय योगदान आहे. मल्हारराव होळकरांचे मराठा स्वराज्य विस्तार करण्यात सिंहाचा वाटा असूनही इतिहासकारांनी त्यांचे व त्यानंतर आलेले होळकर शासकांचे कार्य दुर्लक्षित ठेवलेले आहे. सदरील संशोधनाचा हेतू हा होळकर घराण्यातील सरदारांच्या कार्यकर्तृत्वावर व प्रशासनावर प्रकाश टाकणे हा होय. होळकर घराण्याचे संस्थापक मल्हारराव होळकर हे अत्यंत शूर व मुत्सद्दी सरदार बाजीराव पेशव्याच्या काळात होते. मल्हारराव होळकरानंतर या घराण्यामध्ये अहिल्याबाई, तुकोजीराव पहिला, यशवंतराव, तुकोजीराव दुसरा या होळकर शासकासारख्या कर्तबगार व्यक्तीने होळकर घराण्याची सत्ता सांभाळली व विस्तारित केली. या घराण्याने राज्य करतांना फक्त राजकीय सत्ता चालविण्यापुरतेच कार्य केले नाही, तर आपल्या राज्यकारभारच्या काळात लोककल्याण हे राजकल्याण हा मूलमंत्र हाती धरून राज्यकारभार केला.

होळकर संस्थानातील सर्वच संस्थानिकांनी आपला राज्यकारभार चालवितांना, लोककल्याण करतांना आपली एक विशिष्ट प्रशासकीय चौकट निर्माण केली.

'प्रजेच्या सुखात राजाचे सुख आहे, आणि प्रजेच्या हितात राज्याचे हित आहे.
राजाचे सुख हे सुख नसून प्रजा सुखी राहण्यामध्येच राजाचे सुख आहे.'[९]

अशा प्रकारचे होळकर संस्थानच्या शासकांचे प्रशासन होते. म्हणून मध्ययुगीन भारताच्या इतिहासामध्ये मराठी कालखंडास महत्त्वपूर्ण स्थान आहे. होळकर राज्ययंत्रणेत कायदेशीर स्वरूप प्राप्त करून देऊन सामान्य रयतेस माणूस म्हणून जीवन जगणे जगता आले.

होळकर संस्थानातील सर्वच शासकांनी आपला राज्यकारभार चालविताना, लोककल्याण करताना आपली एक विशिष्ट प्रशासकीय चौकट निर्माण केली होती. त्याचा अभ्यास प्रस्तुत संशोधनामध्ये शोधकर्त्यानी केलेला आहे. मूळात होळकरांची प्रशासकीय व्यवस्था ही व्यापक समाज व्यवस्थेचाच एक भाग असल्याने प्रशासकीय व्यवस्थेला सामाजिक व्यवस्थेपासून वेगळे करून त्या व्यवस्थेच्या शुद्धीकरणाचा विचार होळकर शासकांनी केला. होळकरांचे प्रशासन हे नैतिक मूल्यावर आधारित होते. विशेषत: त्यांच्या प्रशासनास सामाजिक मूल्यांचीही किनार होती. अहिल्याबाई होळकर यांनी तर आपल्या रयतेवर 'पुत्रवत' प्रेम केले. शिवाय होळकर शासक हे प्रशासकीय व्यवस्थेत उत्तरदायित्वाची भावना त्यांच्या अंगी ठेऊनच राज्यकारभार करीत, म्हणूनच संस्थानांतील रयतेत होळकर शासकबद्दल आदरयुक्त प्रेम होते. हे होळकरांच्या आदर्श प्रशासनाचेच यश आहे. मात्र सध्याच्या प्रशासनामध्ये अशा प्रकारची उत्तरदायित्वाची भावना फारच अत्यल्प प्रमाणात दिसून येते. होळकरांच्या प्रशासनाची तुलना आधुनिक काळातील प्रशासनाशी केली तरीही होळकरांचे प्रशासन हे एक आदर्श प्रशासन होते असेच वास्तवात दिसून येते. भ्रष्टाचार हा सुशासनाचा सर्वात मोठा शत्रू आहे. हे अहिल्याबाई होळकर यांनी वेळीच ओळखूण त्याचे पूर्णत: निर्मुलन केले. भ्रष्टाचार निर्मुलन झाल्याशिवाय आपल्या राज्यात सुशासन प्रस्थापित होऊ शकत नाही. त्याबद्दल त्यांनी तात्काळ व कठोर पावले उचली होती. शिवाय होळकर शासकांनी रयतेच्या किंवा सरकारी पैशाचा वापर स्वत:च्या खाजगी कामासाठी उपयोग न करता उलट स्वत:च्या खाजगी संपत्तीचा विनियोग सामान्य रयतेच्या कल्याणकारी कामासाठी केला. खाजगी संपत्तीचा विनियोग सामान्य जनतेच्या वापरासाठी वापरणारे व प्रत्यक्ष कृतीत उतरविणारे एकमेव होळकर प्रशासक होते. हा आदर्श एकेविसाव्या शतकातील शासकांसाठी निश्चितच दिशादर्शक व मार्गदर्शक ठरणारे आहे. म्हणूनच प्रस्तुत संशोधनात संशोधकांनी होळकर शासकांच्या प्रशासनाचा एक आदर्श नमुना होता. हे निदर्शनास आणण्याचा प्रयत्न केलेला आहे.

### १.२ संशोधन विषयाचे महत्व:

प्रस्तुत संशोधनात होळकर संस्थानाच्या प्रशासनाचे महत्व म्हणजे संपूर्ण देशातील काय जगातील प्रशासकांना सुद्धा लोककल्याणकारी योजना राबविण्यासाठी प्रेरणा देणारे आहे. त्याचे महत्व पुढील प्रमाणे सांगता येते.

१ सध्याच्या न्यायव्यस्थेत सुधारणात्मक बदल करण्यासाठी होळकर शासकांच्या न्यायव्यस्थे प्रमाणे मोफत व जलद न्याय देण्याची व्यवस्था होती.

२ भारतीय शासकांना प्रशासन करताना होळकर शासकाच्या लोककल्याणकारी योजना राबविताना सरकारी खजिना वापरण्याऐवजी स्वत:ची खाजगी संपत्ती वापरण्यासाठी प्रेरणादायी ठरू शकते.

३ अठराव्या शतकातील होळकर संस्थानांचे प्रशासन हे लोकाभिमुख असलेले प्रशासन हे एकेविसाव्या शतकातील प्रशासनकर्त्यास लोकाभिमुख प्रशासन करण्यास उपयोगी पडणारे आहे.

४ सर्वसामान्य रयतेवर करांचा बोझा पडणार नाही. हे होळकर शासकांचे सूत्र सध्याच्या शासनकर्त्यास आपले आर्थिक धोरण व योजना ठरविताना मार्गदर्शक ठरणारे आहे.

५ होळकर प्रशासनातून किमान आजच्या नेत्यांनी वा शासकांनी स्वत:ची संपत्ती रयतेच्या कामासाठी नाही वापरली तरी, किमान रयतेच्या घामातून कर रूपाने जमा झालेला सरकारी तिजोरीतील पैशांचा प्रत्येक योजनेच्या माध्यमातून भ्रष्टाचार करून स्वत:ची तिजोरी भरू नये. एवढा तरी धडा घेऊन जनकल्याणाची कामे इमान इतबारे करण्यासाठी होळकरांचे प्रशासन उपयोगी पडणारे आहे.

**१.३ संशोधनाचा उद्‌देश:**

होळकरांचे इन्दौर संस्थानातील प्रशासन हा प्रस्तुत विषय निवडण्यामागील संशोधनाचा उद्‌देश म्हणजे होळकरांनी माळव्यात आपले स्वत:चे राज्य स्थापन करून आपल्या राज्यात सर्व धर्मियांना व जाती पंथांच्या लोकांत सर्वत्र शांत्ता व भरभराट निर्माण केली. या सर्वांच्या बुडाशी होळकर संस्थानच्या उत्कर्षात प्रभावी व सुनियोजित प्रशासन होते. त्यांचे हे प्रशासन मध्ययुगातील इतर राज्यापेक्षा निश्चितच एक आदर्श प्रशासन होते. तसेच मराठा राज्य मंडळात असलेल्या मंडळापैकी होळकर हे संस्थान त्त्कालीन परिस्थितीमध्ये एक आदर्श व शक्तीशाली संस्थान म्हणून ओळखले जात होते. हे प्रस्तुत संशोधनातून संशोधनकर्त्यास दिसून आलेले आहेतू.

१ होळकर संस्थानातील प्रमुख शासकांच्या मुलकी प्रशासनाचा अभ्यास करणे..

२ होळकर शासकांच्या धर्मनिरपेक्ष न्यायव्यवस्थेचा अभ्यास करणे.

३ होळकर संस्थानांचे प्रशासन हे लोकाभिमुख प्रशासन होते हे ज्ञात करणे.

४ होळकर घराण्यांच्या प्रशासनातील लोकशाही त्तवाचे शोधन करणे.

५ होळकर संस्थानाच्या प्रशासनातील जनकल्याणम् या त्तवाचे शोधन करणे.

६ होळकर संस्थानातील प्रमुख शासकांच्या लष्करी प्रशासनाचा अभ्यास करणे.

७ होळकर व त्त्कालीन इतर संस्थानांच्या प्रशासनाची तुलना करणे.

**१.४ संशोधन पद्धती:**

मराठा कालखंडातील प्रमुख असलेल्या होळकर राज्यामध्ये प्रशासन, जनकल्याण व लोकशाही तत्वे अवलंबविली आहेत. हे ज्ञात करण्यासाठी संशोधन करतांना वर्णनात्मक व विश्लेषणात्मक संशोधन पद्धतीचा अवलंब केलेला आहे. मराठा सरदार होळकरांचे प्रशासन या विषयाचा अभ्यास करताना प्राथमिक साधने, दुय्यम साधने व तत्कालीन अस्सल साधनांचा तसेच अप्रकाशित व प्रकाशित साधनांचा प्रस्तुत संशोधनात वापर केलेला आहे. त्याकरिता

अवश्यकतेनुसार होळकरांची पहिली राजधानी इन्दौर व होळकरांची दुसरी विशेषत: अहिल्याबाई होळकर यांची महेश्वर या राजधानीतील अनेक ठिकाणासह उज्जैन, सितामाऊ, मंदसौर, बडोदा, नागपूर व पुण्याचे भारत इतिहास संशोधक मंडळ, पेशवाई दप्तर या ठिकाणास भेट देऊन प्रस्तुत विषयाच्या संशोधन विषयाचा अभ्यास करण्यासाठी ग्रंथालयातील संदर्भ साधनांच्या सहाय्याने प्रस्तुत विषयास पूर्णत्वास नेण्याचा पूर्ण प्रयत्न केलेला आहे.

## १.५ संशोधन विषयाची व्याप्ती:

प्रस्तुत विषयाच्या संदर्भाने संशोधन करतांना संशोधनकर्त्यास या विषयाची तत्कालीन अस्सल कागदपत्रांचा अभ्यास करताना होळकर घराण्यातील शासकांच्या प्रशासनाची व्याप्ती बरीच मोठी आढळून आली. मराठाकालीन प्रमुख असलेल्या होळकर संस्थानाचा अभ्यास हा सामाजिक, राजकीय, आर्थिक व धार्मिक या दृष्टिकोनातून करता येवू शकतो. प्रस्तुत संशोधनात होळकर घराण्यातील प्रशासन या घटकांपुरताच अभ्यास केलेला आहे.

१ सदरील संशोधनात इन्दौरच्या होळकर घराण्यातील मल्हारराव, गौतमाबाई, हरकुॅवरबाई, भारमलदादा, खंडेराव, अहिल्याबाई, मालेराव, तुकोजीराव, काशीराव, मल्हारराव दुसरे, विठोजी, यशवंतराव, मल्हारराव तिसरे (दुसरे), भिमाबाई (बुळे), मार्तण्डराव (दत्तक), हरिराव, खंडेराव (दत्तक), तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, सवाई तुकोजीराव (तृतीय) व द्वितीय यशवंतराव इत्यादीबद्दलच्या संक्षिप्त इतिहासचा अभ्यास केलेला आहे.

२ प्रस्तुत संशोधनात पेशवेकालीन मराठा मंडळातील प्रमुख सरदारांपैकी होळकर घराण्यातील मल्हारराव, मालेराव, अहिल्याबाई, तुकोजीराव, काशीराव, प्रथम यशवंतराव, मल्हारराव दुसरे, मार्तण्डराव (दत्तक), हरिराव, खंडेराव (दत्तक), दुसरे तुकोजीराव, शिवाजीराव, सवाई तुकोजीराव (तृतीय) व द्वितीय यशवंतराव इत्यादी प्रमुख शासकांच्या कारकिर्दीचा अभ्यास केलेला आहे.

३ प्रस्तुत संशोधनात इन्दौर संस्थानच्या होळकरांच्या मुलकी प्रशासनाचा अभ्यास केलेला आहे.

४ प्रस्तुत संशोधनात होळकर संस्थानच्या लष्करी प्रशासनाचा अभ्यास केलेला आहे.

५ प्रस्तुत संशोधनात इन्दौर संस्थानच्या होळकरांच्या न्यायव्यवस्थेचा अभ्यास केलेला आहे.

## १.६ संशोधन विषयाची मर्यादा:

मराठ्यांच्या इतिहासात होळकर घराण्याचा विविध अंगाने अभ्यास करता येतो. पण प्रस्तुत विषयाच्या संदर्भाने संशोधन करताना संशोधकाने होळकर घराण्यातील प्रमुख शासकांच्या फक्त प्रशासनाचा अभ्यास केलेला आहे. म्हणजे होळकर घराण्यातील शासकांच्या प्रशासनाचा आढावा प्रस्तुत संशोधनात घेतलेला आहे.

### १.७ संशोधनाची गृहीतके:

प्रस्तुत संशोधनात संशोधन कर्त्याने पुढील गृहीतके गृहीत धरून संशोधन कार्य पूर्ण केलेले आहे.

१ होळकर शासकांचे मुलकी व लष्करी प्रशासन हे एक आदर्श प्रशासन होते.

२ होळकर संस्थानातील राज्यकर्त्याचा हेतू जनकल्याणम् हाच होता.

३ होळकर संस्थानचे प्रशासन हे लोकाभिमुख असल्याने आधुनिक प्रशासनास मार्गदर्शक ठरणारे आहे.

४ होळकर संस्थानचे प्रशासन हे आधुनिक प्रशासनातील विविध बाबतीत प्रेरणा देणारे आहे.

५ होळकर संस्थानच्या प्रशासनातील न्यायव्यवस्था ही मोफत, जलद व नि:पक्षपाती होती.

### १.८ साहित्य परीक्षण:

प्रस्तुत संशोधनाच्या संदर्भात मागील संशोधकांनी केलेल्या संशोधनाचा आढावा घेण्याचा प्रयत्न संशोधकाने केलेला आहे. होळकर घराण्याच्या संदर्भात खालील संशोधकांनी आपल्या संशोधन शीर्षकाखाली आपले संशोधन कार्य पूर्ण केलेले आहे. पण होळकराचे प्रशासन यासंदर्भात कोणत्याही संशोधकांनी संशोधन केलेले नसल्यामूळे संशोधकाने या दुर्लक्षित पण महत्वपूर्ण घटकाची निवड करून संशोधन कार्य पूर्ण केलेले आहे.

१ **'अहिल्याबाई होळकर आणि त्यांचे धार्मिक कार्य'** या संशोधनात सुलोचना अशोक पाटील यांनी केवळ अहिल्याबाई होळकर आणि त्यांचे धार्मिक कार्यापुरतेच संशोधन केलेले आहे. म्हणजेच त्यांनी होळकरांची प्रशासन व्यवस्थेविषयीचा अभ्यास केलेला नाही.

२ **'अहिल्याबाई होळकर १८ व्या शतकातील भारतीय महिला शासनकर्त्या एक अभ्याास'** या संशोधनात मनोरमा दांडगे यांनी आपल्या सशोधनात केवळ अहिल्याबाई होळकर १८ व्या शतकातील भारतीय महिला शासनकर्त्यापुरतेच संशोधन केलेले आहे. म्हणजेच यांनीही इतर होळकर शासकांच्या प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

३ **'अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास'** या संशोधनात विक्रम नारायण पाटील यांनी अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास या विषयापुरतेच आपले संशोधन केलेले आहे. पण यांनीही इतर होळकर शासकांच्या प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

४ **'तुकोजी होळकर आणि त्यांचा काळ'** या संशोधनात सौ. निता रामटेके यांनी केवळ तुकोजी होळकर यांच्या काळाविषयीचे संशोधन कार्य करून होळकरांच्या प्रशासनाकडे दुर्लक्ष केलेले आहे. यांनीही इतर होळकर शासकांच्या काळाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

५ **'तुकोजी होळकरांचा इतिहास व प्रशासन'** या संशोधनात कु. कल्पना शर्मा यांनी केवळ तुकोजी होळकर इतिहास व प्रशासन या विषयापुरतेच म्हणजेच फक्त तुकोजीराव होळकर यांच्या पुरतेच संशोधन कार्य केलेले आहे. यांनीही इतर होळकर शासकांच्या इतिहासाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

६ **'देवास राज्याचे प्रशासन'** या संशोधनात कु. सुलोचना जोशी यांनी केवळ देवास राज्याच्या प्रशासनाविषयीच माहिती दिलेली आहे. यातही होळकरांचे प्रशासन आलेले नाही. यांनीही होळकर शासकांच्या प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

७ **'होळकर सामंत रामचंद्रराव भाऊसाहेब रेशमवाला व्यक्तीमत्व आणि कर्तत्व'** या संशोधनात गणेश सोलकी यांनी केवळ होळकर सामंत रामचंद्रराव भाऊसाहेब रेशमवाला यांच्याविषयीच संशोधन केलेले आहे. यांनीही होळकर शासकांच्या राज्यकर्त्यांच्या व्यक्तीमत्व आणि कर्तत्वाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

८ **'होळकर राजवंश के प्रमुख महिलांए और उन्का कर्तृत्व'** या संशोधनात रत्नलाल गर्जे यांनी केवळ होळकर राजवंशातील प्रमुख महिला व त्यांचे कर्तत्व याविषयीच संशोधन केलेले आहे.

९ **'होळकर राज्य में खाजगी जहागीर'** या संशोधनात एम. एस. शैलबाला वर्मा यांनी केवळ होळकर राज्याची खाजगी जहागीर याबद्दलची माहिती दिलेली आहे. म्हणजेच होळकर राज्याची प्रशासन व्यवस्था याविषयीचे संशोधन यात झालेले नाही.

१० **'होळकर राज्यातील शिक्षण आणि सांस्कृतिक विकास'** या संशोधनात गोपाळ प्रसाद तिवारी, यांनी केवळ होळकर राज्यातील शिक्षण आणि सांस्कृतिक विकास या अंगानीच संशोधन केलेले आहे. यांनीही इतर होळकर राज्यातील शासकांच्या इतिहासाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

११ **'होळकर राज्यात औद्योगिक आणि राष्ट्रीय आंदोलनाचे क्रमिक विकास'** या संशोधनात श्रीम. चित्रा पारिख यांनी केवळ होळकर राज्यातील औद्योगिक आणि राष्ट्रीय आंदोलनाचे क्रमिक विकासाविषयीच संशोधन केलेले आहे. यांनीही होळकर राज्यातील इतिहासाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१२ **'होळकर राज्याचे संस्थापक मल्हारराव होळकर'** या संशोधनात बाळकृष्ण पुंजाबी यांनी केवळ मल्हारराव होळकर यांच्याविषयीच माहिती दिलेली आहे पण होळकरांचे प्रशासन. याबददल काहीही संशोधन केलेले नाही. यांनीही इतर होळकर शासकांच्या इतिहासाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१३ **'होळकर राज्याचा संक्रमण काळ (१८११—१८४४)'** या संशोधनात मुलचंद रैकवार यांनी केवळ .होळकर राज्याचा संक्रमण काळ या विषयीच माहिती दिलेली आहे. यांनीही

होळकर राज्याचा काळाचा चढउतार याविषयीचा अभ्यास केलेला आहे. पण होळकर शासकांच्या प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१४ **'होलकर राज्य में प्रथम स्वाधिनता संग्राम'** या संशोधनात राखी यादव यांनी केवळ होळकर राज्याचा पहिला स्वाधिनता संग्राम याविषयीच संशोधन केलेले आहे. यांनीही होळकर शासकांच्या समग्र इतिहासाचा व प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१५ **'होळकर कालीन आर्थिक विशेषत:'** या संशोधनात शिवसिंग मुझिलदा यांनी केवळ होळकर काळातील आर्थिक विशेषत: या विषयीच संशोधन केलेले आहे. म्हणजेच त्यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास पूर्णपणे केलेला नाही.

१६ **'मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ'** या संशोधनात यादव गुजर यांनी केवळ मल्हारराव होळकर यांच्याविषयीच संशोधन केलेले आहे. म्हणजेच यांनी होळकरांच्या प्रशासन ही महत्वपूर्ण बाजू मांडलेली नाही.

१७ **'मराठा कालखंडातील पराक्रमी महार सरदार: एक अभ्यास'** या संशोधनात प्रकाश वाघमारे यांनी केवळ महार सरदाराविषयीच माहिती दिलेली आहे. होळकर सरदाराविषयी संशोधन झालेले नाही. म्हणजेच त्यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१८ **'मराठ्यांच्या कारकिर्दीतील होळकर संस्थानची ऐतिहासिक राजकीय व आर्थिक स्थिती १७३०—१९०३'** या संशोधनात बंडे शारदा गोंविदराव यांनी होळकर संस्थानची ऐतिहासिक राजकीय व आर्थिक स्थिती याविषयीच संशोधन केलेले आहे. म्हणजेच यांच्या संशोधनात होळकरांचे प्रशासन या अंगाचा समावेश केलेला नाही. म्हणजेच यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

१९ **'मराठ्यांच्या इतिहासात तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळ १७६६—१७९७'** या सशोधनात तेजस्विनी उत्तमराव पाटील यांनी केवळ तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळाविषयीच संशोधन केलेले आहे. म्हणजेच यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

२० **'महाराजा शिवाजीराव होळकर आणि त्यांचे योगदान (१८८९—१९०३)'** या संशोधनात पदमाकर दत्तात्र्य सावे यांनी केवळ महाराजा शिवाजीराव होळकर यांचे योगदान याविषयापुरतेच संशोधन केलेले आहे. म्हणजेच त्यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

२१ **'मध्यकालीन इतिहासातील तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळ १७६६—१७९७'** या संशोधनात मध्यकालीन इतिहासातील तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळ याविषयीच माहिती दिलेली आहे. म्हणजेच त्यांनीही होळकरांची प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला नाही.

२२ **'होळकर राज्य में भू-राजस्व प्रशासन** (१७७६-१८८६)' या संशोधनात श्रीमती यशवन्तीसिंह यांनी होळकर राज्याचे भू-राजस्व प्रशासन या एका घटकाविषयी संशोधन केलेले आहे. पण त्यांनीही होळकराचे मुलकी, लष्करी व न्यायविषयक प्रशासनाचा समावेश नाही.

२३ **'इ. सन १७२८ ते सन १९४८ या कालखंडातील होळकर राज्यकर्त्यांच्या रियासतीतील वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्याचा चिकित्सक अभ्यास.'** या संशोधनात गणेश शं. मतकर यांनी होळकर राज्यकर्त्यांच्या रियासतीतील केवळ वाङमयीन व सांस्कृतिक कार्याच्या अभ्यासावर भर दिलेला आहे. पण त्यांनीही होळकरांचे प्रशासन या मुख्य बाबीचा समावेश केलेला नाही.

२४ 'हो**ल्कर राज्य मे राज्योपाध्या ब्राह्मणो की भूमिका'** या संशोधनात सुमेश सिंह सोलकी यांनी होळकर राज्यातील राज्योपाध्या ब्राह्मणांची भूमिका याबद्दल आपल्या संशोधनात संशोधन केलेले आहे म्हणजेच त्यांच्याही संशोधनात होळकराच्या प्रशासनाचा अभ्यास यांनीही केलेला नाही.

२५ **'इन्दौर होल्कर राज्य में साहित्य एंव लंलित कलाओं का विकास एका अध्यापन १७२८—१९४८'** सखाराम भुरिया यांनी इंदौर होळकर राज्यात साहित्य व ललित कलांचा अभ्यास करून आपले संशोधन केलेले आहे. म्हणजेच होळकर राज्याचे मुलकी, लष्करी व न्यायविषयक प्रशासनाचा अभ्यास त्यांनीही केलेला नाही.

२६ **'होळकर राज्य के प्रमुख सरदार एवं अधिकारी उनका व्यक्तिमत्व तथा कर्तव्य ई १७९९ ते १८८६ तक'** या संशोधनात श्री राजु भायक यांनी होळकर राज्यातील प्रमुख सरदार एवं अधिकारी यांचे व्यक्तिमत्व व कर्तव्याबद्दल आपल्या संशोधनात संशोधन केलेले आहे. म्हणजेच त्यांच्याही संशोधनात होळकराच्या प्रशासनाचा अभ्यास यांनीही केलेला नाही.

२७ **'होळकर राज्य में गांधी युग १९२० —१९४७ राजनितीक जागृती एवं विकास कम'** या संशोधनात रेणु जाटवा यांनी आपल्या सशोधनात केवळ होळकर राज्यातील होळकर राज्यातं गांधी युग १९२०—१९४७ राजनैतीक जागृती व त्याचा विकास कमाबद्दल अभ्यास करून संशोधन केलेले आहे. पण यांनी होळकरांचे मुलकी, लष्करी व न्यायीक प्रशासन याविषयीचा अभ्यास यांनीही केलेला नाही.

२८ **'होळकर राज्य में जन जीवन सामाजिक सांस्कृतिक विकास में १८४४ —१९४७'** कर्मकाश सिंह को हरबंस सिंह यांनी आपल्या सशोधनात केवळ होळकर राज्यातील जन जीवन सामाजिक सांस्कृतिक विकासाचा इ.स. १८४४ —१९४७ मधील कालावधीच्या जन जीवन सामाजिक सांस्कृतिक विकासाचा अभ्यास करून संशोधन केलेले आहे. पण यांनी होळकरांचे मुलकी, लष्करी व न्यायीक प्रशासन याविषयीचा अभ्यास केलेला नाही.

२९ **'होळकर राज्य के प्रधानमंत्री सर सिरेमल बापन की प्रशासन का अध्ययन'** या संशोधनात श्रीमती रिना शर्मा यांनी होळकर राज्याचे प्रधानमंत्री सर सिरेमल बापनकि यांचे प्रशासन या

एका घटकाविषयी संशोधन केलेले आहे. पण होळकर राज्याचे मुलकी, लष्करी व न्यायविषयक प्रशासनाचा अभ्यास यांनीही केलेला नाही.

३० **'होळकर राज्य में भू. राजस्व प्रशासन १७८६—१८८६'** श्रीमान यशवती सिंह यांनी आपल्या सशोधनात केवळ होळकर राज्यातील जमीन महसूल प्रशासनाचा १७८६—१८८६ मधील कालावधीच्या प्रशासनाचा अभ्यास करून होळकर काळात महसूल व्यवस्थेबद्दलचे प्रशासन याविषयी संशोधन केलेले आहे. पण यांनी होळकरांचे मुलकी, लष्करी व न्यायीक प्रशासन याविषयीचा अभ्यास यांनीही पूर्णपणे केलेला नाही.

३१ **'पेशवे कालीन महसूल प्रशासन एक अभ्यास'** या संशोधनात राजेद्र चव्हाण यांनी आपल्या सशोधनात केवळ पेशवे कालीन महसूल प्रशासनाचा अभ्यास करून पेशवे काळात महसूल व्यवस्थेबद्दल आपले संशोधन केलेले आहे. पण यांनी होळकरांचे प्रशासन याविषयीचे मुलकी प्रशासन व इतर प्रशासन याविषयीचा अभ्यास केलेला नाही.

वरील सर्व संशोधनाचा आढावा घेतल्यानंतर संशोधकास असे निदर्शनास आलेले आहे की, अहिल्याबाई होळकर १८ व्या शतकातील भारतीय महिला शासनकर्त्या, होळकर घराण्यातील प्रमुख महिला व त्यांचे कर्तत्व, देवास राज्याचे प्रशासन, संस्थापक मल्हारराव होळकर, शिक्षण आणि सांस्कृतिक विकास, महाराजा शिवाजीराव होळकरांचे योगदान, होळकर राज्याचा संक्रमण काळ, औद्योगिक आणि राष्ट्रीय आंदोलनाचे क्रमिक विकास, खाजगी जहागीर, आर्थिक विशेषत, पहिला स्वातंत्र संग्राम, तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळ, अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास, ऐतिहासिक राजकीय व आर्थिक स्थिती, अहिल्याबाई होळकर आणि त्यांचे धार्मिक कार्य, तुकोजी होळकरांची कामगिरी आणि त्यांचा काळ, होळकर संस्थानचे वाङमयीन व सांस्कृतिक कार्य व मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ या सर्व अंगाने वा अनुशंगाने संशोधन कार्य आतापर्यंत पूर्ण झालेले आहे. पण प्रस्तुत संशोधनात 'होळकरांचे प्रशासन' या शीर्षकाखाली संशोधन केलेले आढळून आलेले नाही. त्यामुळे संशोधकाने 'मराठा सरदार होळकरांचे प्रशासन एक चिकित्सक अभ्यास' हा विषय निवडलेला आहे.

मराठा हे शक्तीशाली होते. ते समोरच्या शत्रूंना मारत होते किंवा रणांगणावर लढता लढता स्वत: मरुन शत्रूस सामोरे जात होते. यामूळेच मराठ्यांना मर+हटा= मरहटा – मरहठा – मराठा म्हणून म्हणटले जाई.[१०] त्याचप्रमाणे मराठा हा शब्द जातिवाचक म्हणून वापरला जात नसून तो एक विशिष्ट प्रदेशातील लोक याअर्थाने वापरला जातो. प्राचीन काळापासून राजे महाराजाचे वा सत्ताधीरा आपल्या राज्यातील प्रजेच्या हितासाठी वा कण्ल्याणासाठी आपले धोरण राबवितात. त्यास प्रशासन असे म्हणटले जाते. प्रशासन हा शब्द प्र+शास् या संस्कृत धातूपासून निर्माण झालेला आहे.[११] प्र हा उपसर्ग जोडल्याने शासनाचे विशेष कार्य असा

त्यातून अर्थबोध होतो.[१२] शास् म्हणजे राज्य करणे, सत्ता चालविणे होय. एखादा हेतू साध्य करण्यासाठी अनेक व्यक्तीचे संचालन, संयोजन व नियंत्रण करणे म्हणजे प्रशासन होय.

Administration या शब्दाची उत्पत्ती Ad + ministrare या लॅटीन शब्दापासून झाला आहे. प्रशासनचा अर्थ व्यवस्था करणे, सेवा करणे, देखरेख करणे, सांभाळ करणे असा आहे.[१३]

ब्रिटानिका विश्व कोषात —

Administration – The perform once or management of affairs.

प्रशासन हे कार्यपूर्तीचे साधन मानले जाते. प्रशासन हे सार्वत्रिक व सर्वव्याप्ती प्रक्रिया आहे.

'समान उद्देश साध्य करण्यासाठी माहिती आणि भौतिक साधनांचे संघटन आणि संचालन करणे यास प्रशासन असे म्हणतात.' —हर्बर्ट सायमन[१४]

लोककल्याणाच्या हेतूने राज्यसंस्थेकडून जी कार्ये केली जातात ती कार्य प्रशासकीय स्वरुपाची असतात. होळकरांचे प्रशासन अभ्यासत असतांना तत्कालीन महसूल व्यवस्था, न्याय व्यवस्था व लष्करी व्यवस्था या अनुशंगाने अभ्यास करण्यात आलेला आहे. प्रशासन या शब्दाची व्याप्ती खूप मोठी आहे त्त्कालीन मोगलांचे, शिवाजी महाराजाचे, पेशव्यांचे, शिंदेचे व निजामाचे प्रशासन चालत असतांना प्रशासन अभ्यासताना असे आढळून आले की मराठा सरदार होळकरांचे प्रशासन हे यापेक्षा विभिन्न आहे. तत्कालीन इतिहासात होळकरांचे प्रशासन हे न्यायी व तात्काळ सुप्रशासन म्हणून प्रसिद्ध आहे.

## १.२ प्रकरण दुसरेः होळकर घराण्याचा संक्षिप्त इतिहासः

### १.२.१ होळकर घराण्याचा उदयः

प्रस्तुत संशोधन कार्यातील या दुसऱ्या प्रकरणामध्ये होळकर घराण्याचा संक्षिप्त इतिहासामध्ये या घराण्याची पूर्वपिठिका व उदय, होळकर घराण्याचे मूळ वस्तीस्थान, त्या घराण्याची वंशावळ, या घराण्यातील कर्तबगार व्यक्तींचे पूर्वचरित्र त्यात मल्हारराव होळकर, गौतमाबाई, हरकुॅवरबाई, भारमलदादा, खंडेराव, मालेराव, अहिल्याबाई, तुकोजी, काशीराव, प्रथम यशवंतराव, मल्हारराव दुसरे, भिमाबाई (बुळे), मार्तण्डराव (दत्तक), हरिराव, खंडेराव (दत्तक), तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, सवाई तुकोजीराव (तृतीय) व द्वितीय यशवंतराव इत्यादींच्याबद्दल माहिती दिलेली आहे.

मल्हारराव होळकरांचे पूर्वज हे पहिले पुणे प्रांतातील वाफगावचे मूळ रहिवासी असून ते नंतरच्या काळात फलटन परगण्यातील नीरा नदी काठी असलेल्या 'होळ' या गावी स्थायिक झाले. त्यावरून त्यांचे आडनाव 'होळकर' असे पडले.[१५] खंडोजी विरकर यांचा सामान्य कुटुंबातील एका धनगर जातीतील होते.[१६] खंडोजी विरकर यांचा विवाह 'जिवाई' या भोजराज बाळगळ या खानदेशातील तळोदेकर यांच्या बहिणीशी झाला. खंडोजी वीरकर हे होळ गावचे प्रतिष्ठित चौगुले होते.[१७] खंडोजी होळकर यांचा इ.स. १६९६ ला मृत्यू झाला.[१८]

### १.२.२ मल्हारराव होळकर:

मराठेशाहीतील उज्जवल इतिहास घडविणास युग पुरूष मल्हारराव होळकर यांचा जन्म खंडोजी वीरकर व जिवाई यांच्या पोटी इ.स. १६९३ साली ता. १९ माहे मार्च रोजी झाला. हे होळास राहत म्हणून होळकर नावांने प्रसिद्ध आहेत.[१९] अशा महान रत्नाचे वडील खंडोजी वीरकर हे होळ गावचे प्रतिष्ठित चौगुले म्हणजे पाटलाच्या हाताखाली दुय्यम अधिकारी होते. मल्हारी तीन वर्षाचा असतानाच म्हणजे बाल वयातच वडिलांचा इ.स. १६९६ ला मृत्यू झाल्याने विधवा पत्नीस म्हणजे मल्हारीच्या आईस भावकीने व इतर नातेवाईकांनी संपत्तीच्या वारसा व मालकी हक्कामुळे वादांग सुरू झाल्याने बराच मोठा त्रास होऊ लागला. त्यात खंडोजीची सर्व संपत्ती व घरदार भावकीने व इतरांनी बळकावल्याने त्यात जिवाईचे काहीही चालत नसल्याने आपल्या चिमुकल्या मुलाचे व आपले भविष्यात काही बरेवाईट होऊ शकते, या कायमच्या भीतीपोटी जिवाई पतीच्या निधनानंतर सासर सोडून ती आपल्या मुलासह आपल्या माहेरी कायमची राहायला आली. भोजराज बारगळ हे नंदुरबार जिल्ह्यातील तळोदे गावचे एक सधन शेतकरी व चौगुले होते.[२०]

मल्हारी जसजसा मोठा होवू लागला तसतसा तो आपल्या मामाच्या कामात मदत करू लागला. मामाच्या घरची मेंढरे सांभाळू लागला. पण एके दिवशी तो मेंढरे चारण्यासाठी गेला असता त्यास बसल्या ठिकाणी झोप लागली. त्याच्या चेहऱ्यावर सूर्याचे किरण पडत असल्याचे पाहून शेजारच्या बिळातून एक नाग येवून सावली साठी आपाला फणा काढून धरला. हे घरून येणाऱ्या आईच्या दृष्टीस पडले; तेव्हा ती तात्काळ मल्हारीच्या जवळ जाताच तो नाग आपल्या बिळात गेला. लगेच आपल्या मुलास जवळ घेऊन काही ईजा झालेली आहे का? पाहून गावात परतल्यावर एक ब्राह्मणाकडे जाऊन हा प्रकार सांगितला. तेव्हा तो जिवाईस म्हणाला की, ‘बाई, हा मूल पृथ्वीपति होईल. त्यास दहा वर्षाचा होई तावत्काल फार सांभाळावे. पुढे हा पृथ्वीस संभाळून तुला पृथ्वीपतीची आई म्हणवील!’[२१] हे मामानी ऐकल्यानंतर भाचा मल्हारीचे मेंढ्या राखण्याचे काम बंद करून त्यानी त्यास आपल्या पागेत घोड्याची निगा राखण्याची जबाबदारी सोपविली. त्यामुळ मल्हाररावांच्या सैनिकी शिक्षणास सुरूवात झाली. मामा भोजराज यांनी आपल्या पत्नीचा विरोध बाजूला ठेऊन आपली एकुलती एक मुलगी गौतमाबाई हिच्याशी त्यांचे लग्न लावून दिले.[२२]

मल्हाररावांनी मामाच्या सहकार्याने कदमबांड्याच्या सैन्यात एक बारगीर म्हणून कार्य सुरू केले. आपल्या अंग मेहनतीने व शौर्याने मोठी मजल व पराक्रम गाजविताना पेशवे बाजीरावांनी पाहून त्यास आपल्या सैन्यात मानाचे पाचशे स्वारांचे प्रमुख पदी नियुक्ती करून आपल्या पराक्रमाची वाढती कमान पाहून बाजीरावांनी त्यास सरंजामासाठी एकामागून अनेक प्रदेश वा परगाणे बहाल केले. शिवाय केवळ होळकरांना खाजगीची जहागिर देऊन सुभेदारांच्या पराक्रमाचा सार्थ गौरव केला. थोड्याच काळात ‘सैनिक’ पदापासून ‘सुभेदार’ पदापर्यंत मजल

मारून छत्रपती शिवाजी महारजांचे स्वप्न पूर्णत्वास नेऊन उत्तरेत आपले वर्चस्व निर्माण करून पार दिल्लीच्या बादशहास मराठ्याचे पूर्ण अंकित करून त्यांच्या संरक्षणासाठी मराठे हे एकमेव तत्कालीन सत्ताधीश आहेत हे दिल्लीच्या बादशहास देखील खात्री पटलेली होती. म्हणून दिल्लीच्या बादशहाने इराणचा बादशहाच्या व अंतर्गत शत्रूपासून संरक्षण करण्याची जबाबदारी सोपविली याबदल्यात मराठ्याना मोगल बादशहानी आपला बराच मोठा प्रदेश बहाल केला. त्यामुळ बाह्य व अंतर्गत शत्रूचा बंदोंबस्त करण्यासाठी राघोबादादा व सुभेदार मल्हारराव यांनी मोहिम हाती घेऊन लाहोर येथे जाऊन मराठ्यांचा जरीपताका अटकेपार स्वराज्याचे झेंडे फडकावले. असे स्वराज्याचे कार्य करीत असताना अलमपूर येथे कानाची व्याधी होऊन २० मे १७६६ ला मंगळवारी सुभेदारांस देवाज्ञा झाली.[२३]

### १.२.३ गौतमाबाई होळकर:

तेजस्वी गौतमाबाई या खानदेशातील तळोदे गावच्या साबाजीबाबा बारगळ चौगुले यांची नात होती. तर गौतमाबाईच्या बापाचें नांव भोजराज व आईचें नांव मोहिनीबाई बारगळ असे होते.[२४] आई मोहिनीबाई यांच्या पोटी तेजस्वी कन्या 'गौतमाबाई' यांचा जन्म १६ जून १६९४ ला झाला.[२५] त्यांचा विवाह मल्हारराव होळकर यांच्याशी झाला. गौतमाबाई या धैर्यवान, साहसी, चतुर, स्पष्ट वागणारी, हुशार, दयाळू व राज्यकारभाराची जाणीव असलेली बुद्धीमान स्त्री होती. पत्नी गौतमाबाई यांच्या नावे पेशव्यांकडून खाजगी जहागिरीची सनद इ. स. १७३४ ला बाजीरावाने आपल्या अनेक सरदारापैकी केवळ एकमेव होळकर संस्थानांतील मल्हारराव होळकर यांनाच खाजगी जहागीर दिली. त्याचे उत्पन्न सात लाख रूपये आहे.[२६] सुभेदार मल्हाररावांस सतत विविध युद्ध मोहिमावर गेल्यास इन्दौर राज्याचा खाजगी व सरकारी कारभार गौतमाबाईच पाहत असत. अहिल्याबाईनाही गौतमीबाईने आपल्या तालमीत तरबेज केले होते. त्याचप्रमाणे अहिल्याबाईला आदर्श प्रशासिका बनविण्यात गौतमीबाईचा व सुभेदार मल्हारराव या दोघांचा सिंहाचा वाटा होता. परगणे इंदूरी मौजे पिंपळयाराव येथे सौभाग्यवती गौतमीबाईचा २१ सप्टेबर १७६१ काळ झाला.[२७]

### १.२.४ हरकुॅवरबाई होळकर:

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी अवंती नगरातील क्षिप्रा नदीच्या काठची हरकुॅवरबाई यांना मोहिमे दरम्यान पाहिले असता त्यांना ती आवडली. त्यामुळ श्रीमंत बाजीराव पेशव्यांनी या हरकुॅवरबाईचे मल्हाररावांच्या तलवारीशी लग्न लाऊन दिले. हरकुॅवरबाई या नेहमी सुभेदारासोबत युद्ध मोहिमावर जात असत. या राजपूत स्त्रीचा 'खांडराणी'[२८] म्हणून मल्हाररावांनी स्वीकार केला.[२८] त्यांना सुभेदार यांच्यापासून भारमलदादा हा मुलगा झालेला होता. या आई व मुलाने होळकर घराण्यात अनेक वर्ष जीवन मिळाल्यामुळे त्यांचा होळकर कुटुंबात मान व आदर होता. त्यांना सर्वजण 'मावशीबाई' म्हणत.[२९] होळकर दौलतीविषयी सर्वजण त्यांच्याशी सल्ला मसलत करीत असत. शिवाय

त्या सर्वाशी मोठ्या सहकार्याने व प्रेमाने वागत असत. त्यांचा अहिल्याबाईला खूप मोठा आधार होता. कारण त्यांनी गौतमाबाई पासून यशवंतराव होळकर पर्यंतच्या सर्व राज्यकर्त्यांचा कारभार पाहिला असल्यामुळे त्यांनी सर्व होळकर शासकांना मदत केली. त्यांच्या प्रदीर्घ अनुभवाचा फायदा होळकर संस्थानाच्या शासकांना प्रशासनात झाला.

### १.२.५ भारमलदादा होळकर:

सुभेदार मल्हारराव होळकर व हरकुँवरबाई यांच्या पोटी भारमलदादा यांचा जन्म झाला. अहिल्याबाईचे हे नात्यांनी दीर असल्याने देवपुजेची सर्व तयारी दररोज करीत असत. यांनी होळकर दौलतीवरील सर्व संकटाचा सामना करण्यासाठी त्या त्या शासकांना भरीव अशी मदत केलेली आहे. भारमलदादा यांनी सुभेदार मल्हारराव होळकर, गौतमाबाई, हरकुँवरबाई, खंडेराव, मालेराव, अहिल्याबाई, तुकोजीराव, काशीराव, मल्हारराव दुसरे, विठोजी, प्रथम यशवंतराव, मल्हारराव तिसरे (दुसरे), भिमाबाई (बुळे), मार्तण्डराव (दत्तक), हरिराव, खंडेराव (दत्तक), यासर्वाच्या सोबत आपले आयुष्य घालविल्याने हे एकमेव होळकर घराण्यातील दीर्घायुष्य जीवन लाभल्यामुळे त्याना सर्वजण 'दादा' म्हणून संबोधत असत. शंभराव्या वर्षी सन १८२८ ला निधन झाले.[३०]

### १.२.६ खंडेराव होळकर:

सुभेदार मल्हारराव व गौतमाबाई यांच्या पोटी खंडेरावाचा जन्म अश्विन शुद्ध १० संवत १७८० म्हणजेच २ जानेवारी १७२३ रोजी झाला होता.[३१] त्यानंतर चिरंजीव खंडेराव होळकर यांचा विवाह झाला ता. २१ मार्च सन १७३८ रोजी.[३२] अहिल्याबाईंशिवाय खंडेरावांना दहा बायका होत्या. इंदौर येथे सुभेदार मल्हारराव होळकर व सासू गौतमीबाई यांच्या प्रेमळ मार्गदर्शनाखाली व पती खंडेराव यांच्याशी अहिल्याबाईचा भावी सुखी संसार सुरू झाला.

अहिल्याबाई व खंडेराव यांना दोन अपत्य होती. सन १७४५ मध्ये अहिल्याबाईना मुलगा झाला. मल्हारराव यांनी त्याचे नाव 'मालेराव' असे ठेवले. सन १७४८ मध्ये त्यांना मुलगी झाली. तिचे नाव 'मुक्ताबाई' असे ठेवले.[३३] वीर खंडेराव हे एक योद्धा, वीर सैनिक व चांगलेच तलवार बहाद्दर होते. त्यांचा पराक्रम पाहून श्रीमंत पेशवे बाजीराव यांनी १५ ऑगस्ट १७३६ मध्ये उंचवडीची व कोरेगावची जहागिरी व १८ तोळ्याचे सोन्याचे कडे भेट म्हणून दिले. तर २६ जानेवारी १७४० ला शिलेदारीची वस्त्रे प्रदान केली.[३४] शिवाय उमेदसिंगजीने 'परगणे लाखेरी' येथील सनद खंडेरावाच्या नावावर केलेली होती. म्हणजेच खंडेराव हे रणांगणांवर जाताच शत्रूंना भारी पडणारे होते. जयपूरचे वारसा युद्ध सुरू झाल्याने मल्हारराव होळकर यांनी वीर खंडेरावांस माधोसिंग जगतसिंग यांच्या मदतीसाठी पाठविले. ती कामगीरी फत्ते करण्यासाठी त्यावेळी त्यांच्याकडे ४००० घोडेस्वारांच्या एका तुकडीने दिल्लीजवळ येऊन किसनदासाच्या तळ्याजवळ २१ नोव्हेबरला तळ ठोकला.[३५] तेथून ते पुढे राघोबादादा हे दत्ताजी शिंदे व मल्हारराव होळकरांचे पुत्र खंडेराव यास बरोबर घेऊन अजमीर प्रांती गेले.[३६] वीर

खंडेराव २६ डिसेंबर १७५३ ला दिल्लीच्या बादशहास भेटीसाठी गेले. १७५४ ला बादशहा व वजीर सफदरजंग यांच्यात संघर्ष सुरू झाला. परत येताना जाटाचे बंड सुरू झाल्याने त्याही बंडाचा ८ जानेवारी १७५४ ला बिमोड केला. कुंभेरीच्या किल्लेदार सुरजमल जाटने मराठा शत्रूला मदत केली. त्यामुळे राघोबादादाच्या आदेशाने वीर खंडेराव व इतर मराठा सैन्यांनी कुंभरीच्या किल्ल्याला दोन महिने निकराच्या वेढ्याचे काम चालू असतानाच एके दिवशी म्हणजे १७ मार्च १७५४ या दिवशी खंदकाची तपासणी करण्याकरिता तो आपल्या नेहमीच्या धुंदीच्या स्थितीत होता. अशावेळी किल्ल्यातून तोफांचा मारा सुरू होऊन जंबरूकचा एक गोळा लागून तो मारला गेला.[३७] तेव्हा त्यांच्या सोबत दहा बायका सती गेल्या पण सासरे मल्हारराव यांच्या विनंतीवरून राज्यासाठी व रयतेच्या कल्याणासाठी अहिल्याबाई सती गेल्या नाहीत. बादशहाच्या चाकरीत असतांना खंडेरावांचा मृत्यू झाला म्हणून बादशहाने अहिल्याबाईंना वेरूळ परगणा दिलेला होता.

**१.२.७ अहिल्याबाई होळकर:**

भारतीय इतिहासात ज्या शूरवीर स्त्रियांची गाथा वर्णन केली जाते, त्यात अहिल्याबाईचा उल्लेख आवर्जून करावा लागतो. अशा या थोर अहिल्याबाईंचा जन्म शके १६४७ (१७२५) चौंडी गावी झाला.[२८] महाराष्ट्रातील पुर्वीच्या बीड व सध्याच्या अहमदनगर जिल्ह्यातील जामखेड तालुक्यातील सीना नदीकाठच्या छोट्याशा 'चौंडी' या गावी धनगर कुटुंबात जन्म झाला.

अहिल्याबाईचा स्वभाव अतिशय प्रेमळ, करारीपणा व कर्णाचे औदार्य असले तरी अहंकार व सुडबुद्धी अजिबात कधीही त्यांच्या अंगी नव्हते. त्यांचे राहणीमान हे अत्यंत साधे व सोजवळ होते. पती निधनानंतर त्यांच्या अंगावर पाढरी साडी, डोक्यावर पदर, कपाळावर पांढरा गोल गंध व दागिन्यांचा तर त्यांनी त्यागच केलेला होता.[३९] त्यांच्या अंगी हिंदू स्त्रियांचा मुर्तिमंत आदर्श दिसून येतो. सासऱ्यांनी अतिशय काटकसरीने कमावलेला सोळा कोटी रूपयाचे त्यांना अजिबात मोह नव्हता. अहिल्याबाईंचा आहार बेताचा असून तोही शुद्ध शाकाहारी स्वरूपाचा होता. अहिल्याबाईंचा विवाह खंडेराव यांच्याशी शाही वातावरणात श्रीमंत बाजीराव पेशवे यांच्या उपस्थित पुणे येथे पार पडला. अहिल्याबाई व खंडेराव यांना दोन अपत्य होती. मुलगी मुक्ताबाईचा विवाह यशवंतराव फणसे याच्याशी लावून दिला. दुर्भाग्य नियतीने अहिल्याबाईच्या डोळया समोर सासू, पती, सासरे, मुलगा, सुना, जावाई, मुलगी, व नातू व नात सुना गेल्याचे आभाळा एवढे दु:ख त्यांनी सहन करून जनहिताला प्राधान्य देऊन अख्ये आयुष्य खर्ची लावले. वयाच्या ७१व्या वर्षी श्रावण वद्य १४ रोजी म्हणजेच त्यांचा मृत्यू १३ ऑगास्ट १७९५ झाला.[२९]

### १.२.८ मालेराव होळकर:

सरदार खंडेराव व अहिल्याबाई यांच्या पोटी मालेरावाचा जन्म १ डिसेंबर १७४५ मध्ये झाला. मल्हारराव यांनी त्याचे नाव मालेराव असे ठेवले.[३०] मालेराव हा अतिशय चंचल पण खोडकर स्वभावाचा होता. त्यांचा विवाह मैनाबाईशी सन १७५६ ला व दुसरा विवाह हा पाराबाईशी झाला.[४२] त्यावेळी दोघींचेही वय सुमारे ८ वर्षाचे होते. पण मानसिक परिणाम होऊन ता. ३—६—१७६७ मालेराव होळकर मृत्यू पावले.[४३]

### १.२.९ तुकोजीराव होळकर:

तुकोजी होळकर यांचा जन्म २६ जुलै १७२४ ला झाला.[४४] त्यांचे वडील तानुजी हे सुभेदार मल्हाररावांच्या नात्यातील होते. तुकोजीस महादजी व संताजी भाऊ होते. अहिल्याबाईंचे ते समकालीन असून ते लहानपणापासून मल्हाररावांच्या हाताखाली व सोबत मोहिमांवर जात असे. तुकोजीरावांस रखमाबाई, दुसऱ्या रखमाबाई, कृष्णाबाई व यमुनाबाई उर्फ राधाबाई या चार बायका होत्या.[४५] रखमाबाई प्रथम पासून तुकोजीस काशीराव व मल्हारराव हे दोन पुत्र झाले. तर राधाबाई यापत्नी पासून विठोजी व यशवंतराव हे दोन पुत्र झाले. सुभेदार मल्हाररावांचे तुकोजीवर अधिकच विश्वास व प्रेम होते. मल्हाररावांच्या मृत्यू नंतर माधवराव पेशव्यांच्या आदेशानुसार होळकर राज्याचा सर्व मुलकी राज्यकारभार अहिल्याबाईच पाहत होत्या. व तुकोजीराव सर्व लष्कराचे सेनापती म्हणून काम पाहत होते. तसेच सुभेदार मल्हाररावांचे तुकोजी होळकर हे मानसपुत्र म्हणून सर्वत्र वावरत असत. तुकोजीरावांचा दत्तक विधान कधीही झालेला नसला तरी, त्यास अहिल्याबाईंनी कधीही हरकत घेतलेली नव्हती. तुकोजीरावांच्या हयातीतच सुभेदारीपदावरून संघर्ष वाढतच चालला. तेव्हा वडील तुकोजीरावास थोरला मुलाने (काशीरावानी) दौलतीचे मालक बनावे व धाकट्या (मल्हाररावानी) त्यांचे मुखत्यार रहावे असे वाटत होते.[४६] तुकोजी होळकर यांचा मृत्यू श्रावण वद्य ८ मंगळवार १५ ऑगस्ट १७९७ ला झाला.[४७]

### १.२.१० काशीराव होळकर:

काशीराव होळकर यांचा जन्म २० फेब्रुवारी १७५० तुकोजीराव होळकर व रखमाबाई यांच्या पोटी झाला.[४८] काशीराव होळकर हा थोरले असले तरी शारीरिक सक्षम नसल्यामूळे तो सुभेदारीस लायक नव्हता. व मल्हारराव होळकर दुसरे काशीरावांचे धाकटे बंधू हे शूरवीर होते; पण हे ही आडदांड व अविवेकी होता. त्यामूळे दरबारातील कारभाऱ्यांना सुद्धा सुभेदारीचे वस्त्रे कोणास द्यावीत हा प्रश्न निर्माण झाला. त्यावेळी सुभेदार तुकोजी हे मृत्यूच्या शय्येवर पडल्यामुळे त्याचा कोणावरही प्रभाव पडत नव्हता. याच संधीचा फायदा काशीराव व इतरांनी घेतला. नाना फडणीस, यशवंतराव होळकर व इतरांना वाटत होते की, सुभेदारीची वस्त्रे काशीराव हा वडील असला तरी; तो वेडसर व तेवढा शूरवीर नसल्याने त्याऐवजी मल्हारराव होळकर यांस द्यावीत. पण दौलतराव शिंदे, बापू होळकर व पेशवे यांनी

स्वतःच्या स्वार्थासाठी या वारसा प्रश्नी थोरले काशीरावाच्या बाजूने हस्तक्षेप करून थोरल्या मुलासच गादी मिळावी असा आग्रह धरला. यामुळे १७९६ च्या अखेरीस होळकरशाहीत भाऊबंदकी सुरू झाली. होळकरशाहीत काशीराव, चुलते बापू होळकर, चुलतभाऊ संताजी होळकर, चिमाजी बुळे व रघुपंत खंडेराव हा एक गट बनला. तर मल्हारराव दुसरे, विठोजी होळकर, नाना फडणीस, पेशवे अमृतराव व यशवंतराव होळकर यांचा दुसरा गट बनला. दोन गटात १५ सप्टेबर १७९७ ला भांबुर्डयाची लढाई झाली. काशीराव होळकर यांचा मृत्यू १५ फेब्रुवारी १८०८ ला झाला.[४९]

### १.२.११ मल्हारराव होळकर दुसरेः

मल्हारराव होळकर दुसरे यांचा जन्म तुकोजीराव होळकर व रखमाबाई यांच्या पोटी झाला. यांचा विवाह जयाबाई यांच्याशी झाला. यांच्या अंगी सुभेदार मल्हारराव होळकरांसारखी धमक व चमक होती. मल्हारराव होळकर दुसरे काशीरावांचे धाकटे बंधू हे शूरवीर होते; पण हे आडदांड व अविवेकी असल्याने अहिल्याबाईचा खूप आवडता असूनही त्यांना खूप त्रास देत असल्याने अहिल्याबाईचा नाइलाज झाल्याने त्यांस डयुडरनेक या फ्रेंच सरदारमार्फत पकडून बिजागडच्या किल्ल्यात कैदखान्यात ठेवले.[५१] पण तुकोजीने आपल्या मुलाच्या प्रेमापोटी व त्याच्या पत्नीने सुटका करण्याची गयावया केल्यामुळे अहिल्याबाईंनी त्यांची सुटका केली. दोघा भावंडात सुभेदारीसाठी स्पर्धा लागली. काशीराव शिंदेच्या गोठात गेला. पेशव्यांनी सुभेदारीची वस्त्रे दौलतराव शिंदेच्या सांगण्यावरून काशीरावांस दिली. तेव्हा मल्हाररावांनी सवता सुभा करून खानदेशात आपला स्वतंत्र अमंल सुरू केला. पण पेशवे, शिंदे व बापू होळकर यांस मल्हारराव नको होते. तसेच दरबारातील दौलतराव शिंदेनी १४ सप्टेबर १७९७ ला झालेल्या भांबुर्ड्याच्या लढाईत मल्हारराव होळकर दुसरे यांच्या छावणीवर अचानक हल्ला केला. त्या चकमकीत मल्हारराव होळकर दुसरे हे शिंदेच्या मुजफरखानाने ठार मारले.[५२] ही जी मल्हाररावावर गर्दी झाली, हिला होळकरशाहीच्या इतिहासांत 'मल्हार गर्दी' असे म्हणतात.[५३] एवढेच नाही तर शिंदेनी होळकरांचा कुंटुंब कबिलाही आपल्या ताब्यात घेऊन कैदेत टाकले. यासर्वांची सुटका पुढे म्हणजे पाच वर्षानी यशवंतराव होळकर यांनी हडपसरच्या लढाईत शिंदेचा पराभव करूनच केली.

### १.२.१२ विठोजी होळकरः

विठोजी होळकर यांचा जन्म तुकोजी होळकर व यमुनाबाई यांच्या पोटी २१ फेब्रुवारी १७७० ला झाला.[५४] यांना नर्मदाबाई, रमाबाई व रेवाबाई या तीन बायका होत्या.[३९] त्यांना हरिराव हा मुलगा होता. भांबुर्ड्याच्या लढाईत पेशवे, शिंदे व काशीराव यांनी मल्हारराव, विठोजी व यशवंतराव यांच्या गोटावर अचानक रात्रीच्या वेळी हल्ला केल्याने दोन्ही गटात झालेल्या लढाईत मल्हारराव दुसरा मारला गेला. तर विठोजी व यशवंतराव दोघेही जख्मी होऊन जीव वाचवून पळून गेल्याने होळकरांचा सर्व कुंटुंब कबिलाही आपल्या ताब्यात घेऊन

कैदेत टाकले. विठोजीने पुढे सोलापूरची पेठ लुटून तेवीस हजार खंडणी वसूल करून पुण्याजवळील वाफगावी मुक्काम ठोकला. विठोजीने पेशव्यांच्या मंगळवेढा, पंढरपूर, करकंब व टेंभुर्णी भागात सरशी मारून आपली हुकूमत बसविली. पेशव्यांनी पाठविलेले बाळकृष्ण गंगाधर बावनपागे व सरदार पटवर्धनाचा विठोजीने पराभव केला. बाजीराव पेशव्यांनी शेवटी कर्नाटक येथून पेशव्याचा सेनापती बापू गोखले यास बोलावून त्यांनी विठोजीवर पुण्याच्या जवळ हल्ला करून जख्मी विठोजीस हत्तीच्या पायाला बांधून शनिवारवाडयात आणले. दौलतराव शिंदे यांनी स्वार्थहीत समोर ठेऊन काशीरावास आपलेशे करून कट रचून मराठेशाहीत 'ध' चा 'मा' दुसऱ्यांदा केला. या कटाचे सुत्रधार बापू होळकर हे होते. पेशव्यांनी विठोजी होळकरांना अविचारी, अहंकारी वृत्तीने शनवारवाडयातील पुढच्या चौकात १६ एप्रिल सन १८०१ रोजी स्वत:च्या डोळया देखत हत्तीच्या पायी दिले.[५६]

**१.२.१३ प्रथम यशवंतराव होळकर:**

यशवंतराव होळकर यांचा जन्म ०३ डिसेंबर १७७६ ला तुकोजीराव प्रथम व यमुनाबाई यांच्या पोटी झाला.[५७] त्यांचा विवाह हा लाडाबाई यांच्याशी झाला. यांना भिमाबाई ही कन्या झाली. यशवंतराव होळकर हे शिंदे, पेशवे व काशीरावांशी भांबुर्डयाच्या लढाईत पराभूत झाल्याने ते जेजुरीस आले. तिथे 'आगलावे' आडनावाचा पुजारी होता. त्यापुजाऱ्याकडूनच एक घोडी व चारशे रूपये घेऊन नागपूरच्या भोसल्याकडे गेले.[५८] त्यांना विधवा तुळसाबाईची ओळख झाल्याने आजीबा साधुने दोघांचा विवाह लावून दिला. यावेळी पहिली पत्नी लाडाबाई ही शिंदेच्या कैदेत होती. दुसरा विवाह देऊबाईशी तर त्यांचा तिसरा विवाह हा केशर ऊर्फ कृ ष्णाबाई या नर्तकेशी झाला. यांच्यापासून त्यांना मल्हारराव तिसरा मुलगा झाला. यशवंतराव होळकर ह्यांचे निधन कार्तिक शुद्ध ११ रविवार संमत १८६८ शके १७३३ ता.२७ ऑक्टोबर सन १८११ इ. रोजी झाला.[५९]

**१.२.१४ मल्हारराव होळकर (तिसरे) दुसरे:**

मल्हारराव होळकर तिसरे यांचा जन्म १ मे १८०७ ला यशवंतराव होळकर व केशर उर्फ कृष्णाबाई यांच्या पोटी झाला.[६०] वडील यशवंतराव होळकर यांच्या निधनानंतर तुळसाबाईनी सहा वर्षाच्या मल्हारीला गादीवर बसवून राज्यकारभार केला. याना बहीण भीमाबाईची मोठी साथ मिळाली. श्रीमंत मल्हारराव दुसरे हे ता. २७ ऑक्टोबर १८३३ ला कैलासवासी झाले.[६१]

**१.२.१५ भीमाबाई होळकर (बुळे):**

झुंजार सेनानी यशवंतराव होळकर व लाडाबाई यांच्या पोटी भीमाबाईचा १७ सप्टेबर १७९५ ला जन्म झाला.[६२] दौलतराव शिंदेनी भांबुर्ड्याच्या लढाईत पराभूत होळकरांचा सर्व कुटुंब कबिलाही आपल्या ताब्यात घेऊन पाच वर्ष कैदेत टाकले. त्यात तीन वर्षाची लहान भीमाबाई सुद्धा होती. तिचे बालपण तिथेच गेले. तिचा विवाह धार घराण्याचे गोविंदराव

यांच्याशी ३ मार्च १८०९ ला इन्दौर येथे शाही थाटात पार पडला.[६३] सोळाव्या वर्षी वडीलांचा तर एकेवीसाव्या वर्षी ऐन तारूण्यात पती गोविंदरावांचे निधन झाल्याने तिने उर्वरित आयुष्य मोहरमध्येच होळकर दौलतीच्या रक्षणासाठी इंग्रजाशी अनेक मोहिमामध्ये पराभूत करून सळो की पळो करून सोडले. या संघर्षातच नोव्हेंबर १८५८ भीमाबाईचा मृत्यू झाला.[६४]

**१.२.१६ मार्तण्डराव होळकर (दत्तक):**

बापू होळकर हे होळकर कुटुंबातील होते. बापू होळकरांचा मुलगा मार्तण्डराव होता. सुभेदार मल्हारराव होळकर द्वितीय यांच्या निधना अगोदर काही जीव होता ते समयी बापू होळकर यांचा पुत्र आणून महाराजांचे मांडीवर दिल्हा.[६५] त्यानंतर मल्हररावांचे निधन झाल्यावर बापू होळकर यांनीच त्यांचे उत्तरकार्य पार पाडले. मार्तण्डरावांचे दत्तक विधान झाले, पण गौतमाबाईची या दत्तकास आतून अनुकूलता नव्हती. तरीही त्यांनी दत्तक घेऊन होळकर गादीवर बसविले. त्यांचा मृत्यू १८ जानेवारी १८३४ ला झाला.[६६]

**१.२.१७ हरिराव होळकर:**

विठोजीराव होळकर यांचा हरिराव हा मुलगा असून त्यांचा जन्म १८०९ झाला.[६७] यांना सकुबाई ही मुलगी होती. मल्हारराव होळकर द्वितीय यांनी आपली प्रकृती ठीक नसल्यामुळे मृत्यू अगोदरच आप्पाजी कृष्णराव यांस कल्पना दिली होती की, महेश्वरी कैदेत विठोजीचा मुलगा हरिराव होळकर आहे. माझ्यानंतर त्यांना गादीवर बसवावे.[६८] संस्थान महेश्वर येथें श्रीमंत हरिराव होळकर अटकेंत होते त्यांनी कारस्थान करुन अप्पाराव यांजकडील मंडळी अनुकूल करुन कांही बाहेर निघण्याचा उद्योग केला.[६९] त्यांची कैदेतून सुटका केली. होळकर गादीवर रितसर बसविण्यात आले. म्हणजेच त्यांना पण मार्तण्डरावांच्या नंतर गादीवर बसावे लागले. यांचा मृत्यू २५ ऑक्टोबर १८४३ रोजी झाला.[७०]

**१.२.१८ खंडेराव होळकर (दत्तक):**

बापू होळकर यांच्या खंडेराव मुलाचा जन्म १८१२ ला झाला.[७१] फणसे यांच्या मदतीने खंडेराव यांचा होळकरांच्या दत्तक विधानचा सोहळा पार पाडून होळकर गादीवर बसविले. यांचा माघ वद्य १४ ता. ८ फेब्रुवारी सन १८४४ रोजीं देहावसान झालें.[७२]

**१.२.१९ दुसरे तुकोजीराव होळकर (दत्तक):**

दुसरे तुकोजीराव होळकर यांचा जन्म ०३ मे १८३५ ला झाला.[७३] यांचा पहिला विवाह गिरगुणे यांची कन्या रूख्माई, दुसरा विवाह हा येशवंतराव खिल्लारी यांच्या कन्येशी झाला. तर त्यांचा तिसरा विवाह ही झालेला होता.[७४] म्हणजेच यांना तीन बायका होत्या. २७ जून १८४४ ला मातोश्री कृष्णामासाहेब यांचे मांडीवर मुलगा बसविला. त्यांचे नाव तुकोजीराव होळकर असे ठेवण्यात आले.[७५] यांचा मृत्यू १७ जून १८८६ रोजी झाला.[७६]

### १.२.२० शिवाजीराव होळकर:

शिवाजीराव होळकर यांचा जन्म ११ नोव्हेंबर १८५९ ला झाला.[७७] यांचा मृत्यू १३ ऑक्टोबर १९०८ रोजी झाला.[७८]

### १.२.२१ सवाई तुकोजीराव होळकर (तृतीय) :

सवाई तुकोजीराव होळकर (तृतीय) यांचा जन्म २६ नोव्हेबर १८९० ला झाला.[७९] यांचा मृत्यू २१ मे १९७८ रोजी झाला.[८०]

### १.२.२२ हिज हायनेस द्वितीय यशवंतराव होळकर :

होळकर घराण्यातील शेवटचे सुभेदार यशवंतराव द्वितीय यांचा जन्म ०६ सप्टेंबर १९०८ रोजी झाला.[८१] तर यांचा मृत्यू ०५ डिसेंबर १९६१ रोजी झाला.[८२]

## १.३ प्रकरण तिसरे: होळकर घराण्यातील प्रमुख शासक:

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी इंदौर संस्थानची स्थापना केली. श्रीमंत पेशवे यांच्या प्रमुख सरदारापैकी एक पराक्रमी सरदार मल्हारराव होळकर होते. यांनी आपल्या कर्तबगार सुनेस युद्ध मोहिमेवरून परतल्यावर अहिल्याबाईचे गुण ओळखूण राजनीतीचे व युद्धाचे तसेच राज्याचा कारभाराचे वेळोवेळी शिक्षण व प्रशिक्षण दिल्याने अहिल्याबाईने व्यवस्थिपणे आत्मसात केले.

प्रस्तुत प्रकरणामध्ये होळकर घराण्यातील चौदा प्रमुख संस्थानिकांने या प्रदेशावर दोनशे वीस वर्षे बावीस दिवस आपले अधिराज्य गाजविले आहे. त्यांच्या राजकीय कारकिर्दीचा संक्षिप्त आढावा या प्रकरणामध्ये घेतला असून त्यात प्रामूख्याने सुभेदार मल्हारराव होळकर यांनी होळकरशाहीची स्थापना २६ मे १७२८ ला केली.[८३] त्यांनी आपल्या कारकिर्दीमध्ये केलेल्या विविध क्षेत्रातील संक्षिप्त कार्याचा अंतर्भाव या प्रकरणामध्ये केलेला आहे.

### १.३.१ सुभेदार मल्हारराव होळकर: (२१ मे १७२८ ते २० मे १७६६)

भोजराज बारगळ या मामाच्या सैन्यात सैनिकी शिक्षण घेऊन मल्हारराव होळकर, कंठाजी कदम बांडे यांच्या सैन्यात शिलेदार म्हणून असताना त्यांनी माळव्यात प्रवेश केला होता. ज्यावेळी बाळाजी विश्वनाथ यांनी उत्तर मोहीम हाती घेऊन दिल्लीमध्ये सैय्यद बंधूच्या मदतीला मराठ्यांचे सैन्य गेले असता त्यात मल्हाररावाचा समावेश होता. नंतर मल्हाररावांनी एकामागून एक अशा अनेक मोहिमा माळवा व उत्तरेततील अचाट पराक्रम केले. तसेच रणांगनावरील कामगिरी यशस्वी केल्याचे पहावून तसेच पेशव्याचे एकनिष्ठ सेवक म्हणून इन्दौर संस्थान मल्हाररावांस जहागिरी बक्षिस म्हणून दिली. श्रीमंत पेशव्याकडून मल्हाररावांस पाचशे स्वारांची मनसब नंतर अकरा जिल्हयाचे सरंजामदार बनविले. सन १७२८ ला इन्दौर, पुण्याच्या पेशव्याच्या छत्राखाली पण स्वत्रंतपणे आपल्या राज्यकारभारची सुरूवात केली. होळकर घराण्याचे संस्थापक मल्हारराव होळकर बनले. माळवा प्रांतातील सरदेशमुखी आणि चौथाई

वसुलीचे पूर्ण अधिकार मल्हाररावांना मिळाले. सन १७३० ला माळव्यातील सर्वोच्च अधिकारी म्हणून स्वत्रंतपणे मल्हाररावांची नेमणूक पेशव्यांनी केली. सुभा मल्हारराव होळकर दिम्मत पंतप्रधान असा उल्लेख मल्हारराव होळकर यांचा होऊ लागल्याने खऱ्या अर्थाने मल्हारजी सुभेदार झाले. इ. स. १७३५ ला होळकरशाहीचा प्रारंभ झाला. यानंतर दुसरी जहागिरीची सनद सन १७६४ त मिळाली.[८४] मल्हारराव होळकरांना मराठी राज्यांचा पंतप्रधान होण्याची खूप मोठी इच्छा होती. पण ते शक्य नसल्याने त्यांनी स्वत:चे राज्यच निर्माण केले. सुभेदार मल्हाररावांनी आयुष्यभर सतत युद्ध मोहिमेवर जाऊन बाळापूरच्या युद्धापासून ते बक्सारचे युद्धा पर्यंत अशा बावन मोहिमांवर विजय संपादन केले. या युद्ध मोहिमेवर पर राज्यात गेल्यावर तिथल्या लोकांना चाहूल लागताच नुसते 'आया मल्हार'[८५] असे म्हणून शत्रू सैरावैरा जीव वाचविण्यासाठी पळत असत. असे आडोतीस वर्षे सतत शौर्य गाजवीत असताना आलमपूर येथे त्यांचे अल्पशा आजाराने निधन झाले.

### १.३.२ **मालेराव होळकर:** (२१ मे १७६६ ते २७ मार्च १७६७)

मल्हाररावांनी पुत्र मालेरावास युद्धाचे व राज्यकारभाराचे शिक्षण देऊन तरबेज केले. सन १७६५ ते १७६६ च्या लढाईत त्यांनी आपल्या पराक्रमाची चांगलीच चुणूक दाखविली. मल्हाररावांच्या मृत्यू नंतर पुत्र मालेरावास इन्दौर गादीवर बसवून स्वत: अहिल्याबाई राज्यकारभार पाहू लागल्या. मालेरावांनी आपल्या अल्प कारकीर्दीमध्ये अनेक परक्रम केले. माडंवगढची सनद मिळवली. सोनगीर व कोपाटणेची जहागिरी मिळवली, बंबडचा महाल मिळविला, सुलतानपूरची जप्ती उठविली, सदाशिव बारगळास तंबी दिली, जवाहर सिंगाचा बंदोबस्त केला. महादजी शिंदे यांच्या बरोबर उत्तरेच्या लढाईवर जाऊन पराक्रम गाजविला, आजोबा मल्हारराव यांच्या निधनाच्या वेळी युद्ध मोहिमावर सोबत होते. साधारणत: दहाच महिने त्यांना राजकीय कारकीर्द लाभली.

### १.३.३ **अहिल्याबाई होळकर:** (२८ मार्च १७६७ ते १३ ऑगस्ट १७९५)

अठराव्या शतकात संपूर्ण जगात अखंड अठ्ठावीस वर्षे आदर्श राज्य करणारी राजमाता अहिल्याबाई होळकर ही पहिली महिला होऊन गेली 'सुभेदारची मी सून आहे'[८६] असे अहिल्याबाई होळकर नेहमी म्हणत असत. आपल्या मुलुखाचा विस्तार करण्यासाठी परमुलुखावर त्यांनी कधीही डोळा ठेवला नाही. अहिल्याबाईना उत्तम माणसांची पारख फारच चांगली होती. अहिल्याबाईना खाजगीचा सगळा कारभार स्वत:कडे ठेऊन बाहेरचा कारभार तुकोजीरावांकडे सोपविला होता. दिवाणजी गंगाधर पंताच्या कुटटीर कारस्थानास चोख उत्तर, राघोबादादांची फटफजिती यश, तुकोजीस चोख कानउघाडणी, स्त्रियांची फौजेची उभारणी, भिल्ल व पेढाऱ्यांचा बदोबस्त, शिंदेचे पूर्ण पारिपत्य करण्यासाठी तात्काळ तुकोजीस रवाना केले. रामपुरा संस्थानात बंडाळी माजवणाऱ्या चंद्रावत राजपुत्रांचा पराभव, राजपूत चंद्रावंताचा

दुसऱ्यांदा पराभव, महेश्वर शहराची राजधानी म्हणून निवड व स्थलांतर केले, चंद्रावंताचा सेनापती सौभाग्यसिंहाला तोफेस दिले.

आपले वैयक्तिक जीवन अतिशय साध्या पद्धतीने जगत असताना मात्र जनतेसाठी अहोरात्र अनेक कार्य केले म्हणून त्यांना पुण्यश्लोक या उपाधीने गौरविले आहे. अहिल्यादेवींनी आपल्या प्रजेवर पुत्रवत प्रेम केले. एक आदर्श माता, कन्या, पत्नी, सून व प्रशासक म्हणून संपूर्ण भारत वर्षात त्यांच्या हयातीतच त्यांचा देवी, लोकमाता, पुण्यश्लोक या विशेष नावांनी लोक उल्लेख करू लागले. अहिल्याबाईंचा दरारा इतका होता की, तिच्या राज्याकडे वाकड्या नजरेने पाहण्याची आसपासच्या कोणाही राजाची छाती केव्हाही झाली नाही. उलट अहिल्याबाईंच्या तेजापुढे सर्व राजे नमून वागत असत. सर्व आप्तइष्टांच्या दु:खद आठवणी इन्दौरमध्ये असल्याने त्यातून थोडी शांती व व्यवस्थीतपणे राज्यकारभार करता यावा यासाठी १७६७ ला इंदौरहून महेश्वरला त्यांच्याच खाजगी वाड्यात नर्मदा नदी काठी राजधानीचे स्थलांतर केले.[८७] प्रजेची सेवा हीच मार्तन्डाची सेवा असे मानून सतत अठ्ठाव्वीस वर्षे रयतेच्या कल्यासाठी आपली प्रशासनावरची पकड मजबूत ठेवली. म्हणून मराठा मातबर सरदार व पेशवे अहिल्याबाईना आदराने 'मातोश्री' म्हणत असत.[८८]

**१.३.४ सुभेदार तुकोजीराव होळकर:** (१४ ऑगस्ट १७९५ ते १५ ऑगस्ट १७९७)

अहिल्याबाईंनी मल्हारराव यांच्या मृत्यूनंतर अल्पवयीन पुत्र मालेरावास इन्दौरच्या गादीवर बसवून स्वत: राज्यकारभार पाहू लागल्या. पण मालेरावांची अल्प कारकिर्दीनंतर इन्दौरच्या गादीचा वारस तुकोजी असल्याची भावना सर्वत्र होती व तसा व्यवहारही चालत असे पण त्यांचा यथाविधी दत्तक विधान मात्र कधीही झालेले नसले तरी अहिल्याबाईच्या विद्यमाने तुकोजी होळकर यांनी 'श्रीम्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजीसुत' असा प्रशासनासाठी शिक्का तयार करून वापरला जात होता.[८९] राघोबादादा व चंद्रचुड यांनी होळकरशाहीचे स्वामी होण्याचे दिवास्वप्न पाहून उज्जैनपर्यत येताच तुकोजीरावांनी राघोबास निरोप पाठविला. अहमदनगर जिल्हयातील कोळयांनी केलेल्या बंडाचा बिमोड, उत्तरेत नवलसिंग व त्याचा फ्रेंच सेनापतीचा पराभव, फत्तरगढचा विजय, कलकत्याचा ब्रिटीश सेनपती गोडार्डला परत फिरविले. टिपू सुलतानशी तह व रजपुतांचा पराभव असे महान पराक्रम गाजवित संपूर्ण आयुष्य शत्रूंशी लढाय्या करत तीस वर्ष रणांगणावरच गेले. पण सुभेदार तुकोजीरावांच्या पश्चात भावाभावांत कलह सुरू झाले.

**१.३.५ काशीराव होळकर:** (१६ ऑगस्ट १७९७ ते १६ नोव्हेंबर १७९८)

सुभेदार तुकोजीराव होळकर यांना पुणे मुक्कामी असताना जेष्ट पुत्र काशीराव यांस जानेवारी १७९७ ला सुभेदारीची वस्त्रे दिवाण, फडणीस वगैरे यांच्या समक्ष बहाल केली. तर पेशव्यानी ती वस्त्रे ता. २९ सन १७९७ दिली.[९०] नाना फडणीसांना सुभेदारीची वस्त्रे काशीराव हा वडील असला तरी तो वेडसर व तेवढा शूरवीर नसल्याने त्याऐवजी मल्हारराव होळकर

यांस द्यावीत असे वाटत होत. पण बाजीराव व शिंदे यांस मात्र होळकरशाहीवर आपले वर्चस्व असावे या स्वार्था पोटी त्यांनी सुभेदारीची वस्त्रे काशीरावांकडेच ठेऊन होळकर घराण्याचे बशिगिरी म्हणजे सैन्याचा अधिकार बापू होळकर यांस दिले. यामूळे सन १७९६ च्या अखेरीस होळकरशाहीत भाऊबंदकी सुरू झाली.[९१]

**१.३.६ प्रथम यशवंतराव होळकर:** (१७ नोव्हेंबर १७९८ ते २७ ऑक्टोबर १८३३)

पेशवाईच्या अखेरच्या पर्वातील मराठा सरदार यशवंतराव होळकर यांना ओळखले जाते.[९२] यशवंतराव शिंदे, पेशवे व काशीारावांशी भांबुडर्याच्या लढाईत पराभूत झाल्याने ते जेजुरीस मार्गे नागपूरचे रघुनाथराव भोसले यांच्याकडे आश्रयास गेले. शिंदे व पेशव्यानी पाठलाग सुरू केला तेव्हा बापू विठठल प्रभू सल्ल्याने यशवंतराव पुढे जाताना भवानी शंकरची भेट झाल्याने दोघे खानदेशात पोहचले. तेथेही पेशव्याने सैन्य चालून येत असल्याचे पाहून यशवंतरावांनी तेथून्ही पळ काढला. पाठलाग चुकवून ते धारच्या आनंदराव पवार यांच्याकडे आश्रयास गेले. तिथल्या राजेसाहेब व त्यांचे दिवाण रंगराव ओढेकर यांत संघर्ष झाला त्यांत यशवंतरावांनी धारच्या राजास मदत करून संघर्ष मिटविला. नंतर त्यांनी महेश्वर ताब्यात घेऊन १२ जानेवारी १७९९ मध्ये स्वत:चा राज्याभिषेक करून घेतला. व मल्हारराव दुसरे यांचे सुपुत्र खंडेराव शिंदेंच्या कैदेतून सुटे पर्यत त्यांच्या नावाने गादी चालविण्यास सुरूवात केली.[९३] ब्रिटीशाना सळो की पळो करून सोडले. जोपर्यत यशवंतराव घोडयावर असेपर्यत होळकरशाहीच काय? पण सारे जग माझेच आहे असे त्यांना वाटत होते. यशवंतरावांनी २५ ऑक्टोबर १८०२ रोजी १४४००० सैन्यानिशी हडपसर येथे शिंदेच्या फौजेचा सपाटून पराभव केला.[९४] पुण्याभोवती चौक्या बसवल्या आपल्या बाजुच्या नाना फडनीस व त्यांचे समर्थकांना कैदेतून सुटका केली.

**१.३.७ मल्हारराव दुसरे होळकर:** (२८ ऑक्टोंबर १८११ ते २७ मे १८३३)

यशवंतराव होळकर यांच्या निधनानंतर मुलगा मल्हारराव होळकर तिसरे हे २८ ऑक्टोंबर १८११ गादीवर आले.[९५] तेंव्हा ते सहा वर्षाचे होते. पण तुकोजीराव होळकर यांचा मुलगा मल्हारराव होळकर दुसरा हा पदावर आलेला नव्हता. त्यामुळे यशवंतराव होळकरांचा मुलगा मल्हारराव तिसरा हा पदावर आल्याने सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या नंतर हा पदावर दुसरा येतो म्हणून यांना मल्हारराव होळकर दुसरा म्हणून ओळखले जातात. कारभारी तात्यांनी नतंरचे कारभारी अप्पाजी कृष्णराव यांनी व मंदसौरच्या तहाने राज्याची घडी नीट बसल्याने शांतता प्रस्थापित झालेली होती.

**१.३.८ मार्तण्डराव होळकर (दत्तक):** (१७ जानेवारी १८३४ ते २८ १७ मे १८३४ )

व्दितीय मल्हारराव होळकरांचा सत्तावीसाव्या वर्षी अल्पशा आजाराने मरण पावले. तत्पुर्वीच बापु होळकर यांनी ते निपुत्रिक असल्याने गौतमाबाईने केसरबाईच्या मदतीने

विठोजीराव होळकरांचा पुत्र मार्तण्डराव यांस १७–१–१८३४ गौतमाबाईंच्या मांडीवर देऊन, दत्तविधान करून गादीवर बसविले.[९६]

**१.३.९ हरिराव होळकर: (२९ जानेवारी १८३४ ते ६ ऑगस्ट १८४३)**

राजे मार्तण्डराव होळकर हे निष्क्रिय निघाल्यामूळे राजदरबारातील लोकांच्या विरोधामूळे वीर विठोजीराव होळकरांचा मुलगा हरिराव यांना २९ जानेवारी १८३४ होळकरांच्या गादीवर बसविले.[९७] पण नऊ वर्षेच राज्य करून ते अल्पशा आजाराने निधन पावले.

**१.३. १० खंडेराव होळकर (दत्तक): (०६ ऑगस्ट १८४३ ते ३१ ऑक्टोंबर १८४३)**

बापू होळकर यांच्या खंडेराव मुलाचा २ जुलै १८४१ ला दत्तक विधान झाले.[९८] राजे हरिरावांची पत्नी भगिरथबाईने हरिरावांनंतर ६ ऑगष्ट १८४३ ला खंडेरावांस गादीवर बसविले.[९९] पण तो लहान असल्यामुळे दिवाणजी राजाभाऊ पानेस यांनी पुरेपुर गैरफायदा घेतला.

**१.३.११ दुसरे तुकोजीराव होळकर: (९ नोव्हेबर १८४३ ते ३१ ऑक्टोबर १८८५)**

खंडेराव होळकर यांच्या नंतर होळकर शासक पदी २७ जून १८४४ रोजी तुकोजीराव होळकर दुसरे हे होळकरांच्या गादीवर बसले.[१००] इंग्रजांना शह देण्यासाठी तोफा व बंदुकाचे कारखाने काढून लढा दिला. तसेच त्यांनी अनेक सुधारणा घडवून आणल्या.

**१.३.१२ शिवाजीराव होळकर: (३० ऑक्टोबर १८८५ ते १३ जून १९०२)**

तुकोजीराव दुसरे होळकरांच्या नंतर ३० ऑक्टोबर १८८५ रोजी शिवाजीराव होळकर हे होळकर शासक म्हणून होळकर गादीवर आले.[१०१]

**१.३.१३ सवाई तुकोजीराव (तृतीय): (१४ जून १९०२ ते १० जुलै १९२५)**

शिवाजीराव होळकरांच्या नंतर तुकोजीराव होळकर तिसरे हे होळकर शासक म्हणून १४ जून १९०२ रोजी होळकर संस्थानच्या गादीवर आले.[१०२]

**१.३.१४ हिज हायनेस द्वितीय यशवंतराव होळकर: (११ जुलै १९२५ ते १६ जून १९४८)**

तुकोजीराव होळकर तिसरे यांच्या नंतर द्वितीय यशवंतराव होळकर हे होळकर शासक म्हणून ११ जुलै १९२५ ला गादीवर आले.[१०३] ते १६ जून १९४८ पर्यत होळकर गादीवर बसले. ते होळकरशाहीचे शेवटचे शासक ठरले.[१०४]

**१.४ प्रकरण चौथे: होळकर संस्थानाचे मुलकी प्रशासन:**

या प्रकरणामध्ये होळकर संस्थानामध्ये होऊन गेलेल्या अनेक सुभेदारांनी अथवा संस्थानीकांनी आपला राज्यकारभार करतांना मूलकी प्रशासन व्यवस्था निर्माण केली. होळकर राज्याच्या सुभेदारांना पुण्याचे पेशवे इतर सुभेदाराप्रमाणे सुभेदारीचे वस्त्रे देत असत. होळकर राज्यातील शासकांनी आपला राज्यकारभार चालवितांना लोककल्याण करतांना आपली एक विशिष्ट प्रशासकीय चौकट निर्माण केली होती. त्याचा अभ्यास प्रस्तुत संशोधनामध्ये शोधनकर्त्याने जाणून घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. प्रजेच्या हितासाठीच राज्याची निर्मिती

असते. राजा व प्रजेचा संबंध म्हणजे आई मुलाच्या संबंधाप्रमाणे असतो, असे होळकर राज्यातील शासकांनी आपला राज्यकारभार करीत असताना सांगत असत. व स्वत: त्याप्रमाणे वागत ही असत. अहिल्याबाई नेहमी म्हणत, मी आज जें कांहीं सामर्थ्याच्या व सत्तेच्या बळावर करीत आहें त्याचा मला परमेश्वरापाशीं जाब द्यावा लागेल.[१०५]

कायद्याचे राज्य, नियोजनबद्ध कार्यक्रम, समाज हिताची पुरेपुर जाण, प्रजेच्या कल्याणावर भर, राजकारणातील अत्यंत अचूक मार्मिक निर्णय, अत्यंत बिकट परिस्थितीतही त्वरित व योग्य निर्णय, अधिकार शक्तीचा अत्यंत कुशलतेने वापरण्याची कला व गोब्राहमण प्रतिपालकत्व हे विशेष गुण होळकर शासकांच्या जीवनात प्रामुख्याने आढळतात. अहिल्याबाईंचे प्रशासन हे राजकेंद्री नसून समाजकेंद्री होते.[१०६]

मराठेशाहीतील प्रमुख सरदार मल्हारराव होळकर यांनी स्वत:चे सैन्य उभारणे, राजचिन्ह, निशान व वेगळी नाणी पाडण्यास अनुमती मिळालेली होती. त्याप्रमाणे यांनी स्वत:ची राजमुद्रा बनविली होती. त्या राजमुद्रेत छत्र, सूर्य, बैल, घोडा, भाला, तलवार, गहू व अफू इत्यादींचा समावेश होता.[१०७]

**१.४.१ होळकर राज्याचा खजिना:**

होळकर राज्यामध्ये साधारणत: सव्वाशेच्या घरात परगणे होते. खाजगी व दौलत असे दोन प्रकार पडत होते. म्हणजेच होळकरांच्या खजिन्याचे दोन भाग पडत होते.

**१.४.१.१ खाजगी जहागीर:**

मराठ्ठ्याच्या अनेक सुभेदाररापैकी फक्त मल्हारराव होळकर यांनाच खाजगी जहागिरी २० जानेवारी १७३४ ला श्रीमंत पेशवे बाजीराव यांच्याकडुन गौतमीबाईना मिळाली होती. हा मान फक्त होळकरशाहीसच आहे. त्या जहागिरीचे सूरूवातीस उत्पन्न २९९०१/—होते. ते वाढत जाऊन मल्हाररावांच्या जीवनाच्या अंतिम समयी या कोषभांडारामध्ये जवळ जवळ सोळा कोटी रूपये जमा झाले होते.[१०८]

**१.४.१.२ सरकारी जहागीर:**

सरकारी जहागीरी अथवा दौलत म्हणजे सरकारी संपत्ती होय. सुभेदार मल्हारराव होळकर यांना चौऱ्याहत्तर लाख पन्नास हजार उत्पन्नाचा प्रदेश जहागिर म्हणून मिळालेला होता. तो पुढे वाढत गेला. सरकारी खजिन्यातील पैसा हा फक्त सैन्याच्या खर्चासाठी व प्रजेच्या कामासाठी वा कल्याणासाठी खर्च करावा लागत असे या तत्वाचे किंवा नियमांचे अहिल्याबाई पूर्णपणे पालन करीत असत.

**१.४.२ केंद्रीय मुलकी प्रशासन:**

मराठा मंडळापैकी मल्हारराव होळकर हे एक माळवा प्रांताचे सुभेदार होते. माळव्याचे होळकर हे पेशव्यांच्या अधीन राहून आपला राज्सकारभार करीत असत. माळव्याच्या सुभ्याचे सर्व अधिकार सुभेदार मल्हाररावास होते. होळकर राज्यामधील शासक सतत युद्ध मोहिमावर

जावे लागत असल्याने राज्याची मुलकी प्रशासन व्यवस्था खंबीरपणे सांभाळयाचे काम त्या त्या शासकांच्या राणीस करावे लागे. सुभेदार मल्हारराव यांच्या कारकिर्दीमध्ये गौतमाबाई व त्यानंतर अहिल्याबाईनी केंद्रीय व चांगल्याप्रकारे सांभाळत असत. अठराव्या शतकात होळकर शासकांनी पंचायतराज स्थापन केले होते. त्यानुसार होळकर राज्याचे परगणा/ जिल्हा व महाल/ तालुका असे भाग पाडले. प्रत्येक विभागावर योग्यताधारक अधिकाऱ्याची नेमणूक करून यांच्या मार्गदर्शनाखाली ग्रामपंचायतीचे कामकाज नि:पक्षपातीपणे आणि नि:स्वार्थीपणे होत असे.

**१.४.२.१ होळकर राज्याचे प्रशासकीय विभाग:**

होळकर शासकांनी अंतर्गत शांततेसाठी व सूरक्षिततेसाठी सर्व प्रथम ठग व दरोडोखोरांचा कांयमचा बंदोबस्त करून त्यांचीही शक्ती राज्याच्या कामात यशस्वीपणे उपयोगात आणून राज्याची नीट घडी बसविली. होळकर राज्यामध्ये साधारणत: सव्वाशेच्या घरात परगणे होते. त्यानंतर त्यांनी आपल्या महसूल व्यवस्थेच्या सोयीस्करतेसाठी होळकर राज्याचे तीन विभाग पाडले.

१ **उत्तर विभाग:** यात इन्दौर, तराना व राजपुतांच्या काही भागाचा समावेश होतो. हाच सर्वात मोठा विभाग होता. यातून मोठ्या प्रमाणात चौथाई वसूल होत होती.

२ **मध्य विभाग:** या विभागात महेश्वर व त्यांच्या जवळपासच्या भागाचा समावेश होता.

३ **दक्षिण विभाग:** या तिसऱ्या विभागात सातपुडा पर्वताच्या दक्षिण भागातील प्रदेशाचा समावेश होता.

रयतेचे हित समोर ठेऊन तत्कालीन परिस्थितीचा विचाार करून प्रशासकीय कामे केली जात होती. रयतेचे हित हाच होळकर शासकांचा प्रमुख हेतू होता.

**१.४.२.२ होळकर राज्याचे कारभारी:**

होळकरांच्या कारभाऱ्याची नियुक्ती ही पुण्याच्या पेशव्याकडून केली जात होती. होळकर राज्यात चार कारभारी आहेत. एक मुकुंदराव नारो गणेश यांचे भाचे. ते दिवाण संरजाम महाल आहेत. त्यांचा कारभार त्यांजकडे. दुसरे छोटे मुकुंदराव. ते नारोपंत गानू. ते खासगत देशीं महाल खेडी आहेत, त्यांचा हिशेब व खाजगत खर्च, जमाखर्च ते पाहतात. चौथे बाळाजीपंत दप्तरदार तेही आहेत. कुल अख्त्यार आपला ठेविला आहे. जे करणें व देणें तें आपल्या परवानगीश्विाय होत नाही.'[१०९] गंगोबा तात्या चंद्रचुड, अन्याबा पळशीकर, छोटे मुकुंदराव, रामजी यादव, गणेश विठ्ठल, पारशर दादाजी, अप्पाजी जगदेव, राजाराम रणछोड, रावजी महादेव, विसाजी शामराज, केसो भिकाजी, गोविंदपंत गानु, नारो गणेश रांझेकर व बाळाजीपंत दप्तरदार या सारख्या कारभाऱ्याच्या मदतीने होळकर सत्ताधीशांनी आपले प्रशासन सूरळीत चालविले. पण काही कारभाऱ्यांनी त्रासही देण्याचा प्रयत्न केला परंतु होळकर शासकांपुढे त्यांचे काहीही चालले नाही.

### १.४.२.३ होळकर राच्याच्या दरबारातील अधिकारी:

होळकर राज्याचा फार मोठा विभाग होता त्यास सरकार म्हणत यात ३० ते ४० जिल्ह्यांचा समावेश होता याच सरकारास परगणा किंवा महाल असेही म्हणतात. या महालात ३०० खेड्याचा समावेश होत होता. होळकरशाहीत सर्वोच्च पद होते ते म्हणजे दिवाण होय.

१ **होळकर राज्यात सरंजामी सरदार:** होळकर संस्थानात सरंजामी सरदार ही मोठ्या प्रमाणात होते. त्यात राजश्री गोंविंदराव बुळे, वाघ, नारायण बारगळ, यशवंत फणसे बाबुराव वाघमारे, गोविदराव महाडिक व भागवत खटके यासारखे होते.

२ **दिवाण:** दिवाणची नियुक्ती ही पुण्याच्या पेशव्याकडून केली जात होती. होळकर राज्यातील दिवाण या सर्वोच्च पदी गंगाधर चंद्रचूड, परशरपंत व नारो गणेश शौचे, रामजी यादव पळशीकर व रामराव नारायण यांनी काम केलेले आहे.[११०]

३ **कमाविसदार:** हा परगण्याचा मुख्य अधिकारी असे यांच्याकडे जमाखर्च, त्यांचे अंदाजपत्रक, वार्षिक खर्च व उरलेल्या पैशाची व्यवस्था पहाणे. तसेच परप्रांतात राजस्वाचे प्रमुख अधिकारी म्हणून कमाविसदार ओळखले जात. त्यांचे वेतन हे राजस्वाच्या चार टक्के एवढे होते.

४ **कानूगो:** परगण्यातील जमीन मोजणे महसून गोळा करण्याचे कामे करावे लागत असे.

५ **मुजुमदार:** प्रत्येक महालनिहाय यांची नियुक्ती राज्याकडून केली जात असे.

६ **दप्तरदार:** या अधिकाऱ्याचे कार्य राज्यकराचे ताळेबंद व त्याची छाननी करणे हे होते.

७ **फडणीस:** हे कोषाध्यक्ष म्हणून राज्याचे सर्व कर एकत्र करून त्याचा ताळेबंद ठेवत असत.

८ **कुलकर्णी:** हा गावाच्या लोकांच्या जमिनीचे हिशोब ठेवण्याचे कार्य करण्याचा अधिकार होता.

९ **पाटील:** यास सरपंच पटेल किंवा गावचा मुखिया असेही म्हणत. गावाचा हा प्रमुख असल्याने त्यांस गावचे मुलकी व फौजदारी प्रशासन प्रमुख म्हणून कामे करीत असे.

१० **चौकीदार:** गावातील जनतेस सूचना व मार्गदर्शक तसेच गावाच्या सिमेवर कोणी आक्रमण केल्यास त्याचा साक्षीदार म्हणून कार्य करावे लागत असे.

### १.४.२.४ होळकर राज्यातील प्रांत व परगणे:

| | **प्रांत** | **परगणे** |
|---|---|---|
| १.४.२.४.१ | **माळवा प्रांत** | इंदौर, देपाळपूर, रामपूरा, पिढावे, मल्हारगड, जावरे, झाबुवे, हसलपूर, महत्पुर, पाटण, जिरापूर, देवळे, सिरोज, पिंपळदा, कोंच, झार्डा, कंजरडा, नंदवाई, रायपूर, संधारा, बेटमे, सुंदरशी, निंबाहेडा कोंटे व कायथे |
| १.४.२.४.२ | **दक्षिण प्रांत** | मानपूर, करही, तराणे, नेमावर, कासेगाव, नंदूरबार, सूलतानपूर व वेरूळ |

| १.४.२.४.३ | **स्वदेश प्रांत** | अंबाड, सुलतानपूर नंदुरबार अडावद, रावेर, कोरहाळे, शेगांव, चांदवड, गाळणे, उतरण, वडेल व थाळनेर |
|---|---|---|
| १.४.२.४.४ | **हिंदुस्थान प्रांत** | इंदूर, देपाळपूर सावेर कसेरीया चारूपिंपळी.तराणा, नेमावार व करहइ |
| १.४.२.४.५ | **नेमाड प्रांत** | कानसूळ, अंबे, सेंधवे, नागलवाडी, बागदारा, कोठडा, ब्राहम्णगाव, बिजागड व महेश्वर.[१११] |

**१.४.२.५ होळकर राज्याचे प्रधान मंडळः**

शिवाजी महाराजांनी अष्टप्रधान मंडळाच्या जोरावर हिंदवी स्वराज्याची स्थापना केली हे गमक होळकर शासकांनी ओळखूण आपलेही प्रधान मंडळ स्थापन केले. अहिल्याबाईच्या दरबारात गोविंद गानू हे होळकर राज्याच्या खाजगीचे कारभारी होते. विसाजी शामराज देशपांडे, नारो शंकर रांझोकर, शिवाजी गोपाल, मुकुंदरव व भारमलदादा होळकर यासारखे मंत्री होते. यांच्या मदतीने अहिल्याबाईने राज्यकारभाराची घडी बसविण्याचा प्रयत्न केला.

**१.४.२.६ होळकरांचे शासकांचे परराष्ट्र धोरणः**

अहिल्याबाईनी परराज्य संबंध व्यवस्थीत राहवे यासाठी अयोध्या, उदेपूर, कोटा, ग्वाल्हेर, जयपूर, डूरंगपूर, दिल्ली, देवळे, प्रतापगड, नागपूर, पुणे, भोपाळ, लखनौ व हैद्रबाद या राज्यात वा संस्थानात आपले वकील नियुक्त केलेले होते. यावरून त्यांचे आणि शेजारील राज्याचे संबंध मित्रत्वाचे होते हे स्पष्ट होते.

**१.४.२.६.१ परराज्यात होळकरांचे वकीलः**

आयोध्या—खंडो जगदेवराव, उदेपूर—भगवंतराव जगताप, कोटा—बापूजी आनंदराव, ग्वाल्हेर—यमाजी मोरेश्वर, जयपूर—मार्तंडराव अप्पाजी, डुरंगपूर—व्यंकोजी शिवाजी, दिल्ली—बहादूर सिंग, देवळे प्रतापगड—विनायक सदाशिव, नागपूर—व्यंकोजी कृष्णराव, पुणे—आप्पाजी जखदेव, भोपाळ—जिवाजी गिरमाजी, लखनौ—मनोहर खंडेराव व हैद्राबाद—माधवराव लक्ष्मण हे वकील होते.

**१.४.२.६.२ इतर राज्याचे वकील होळकरशाहीतः**

पुणे, शिंदेंच्या, भरतपूर, जयपूर, उदेपूर, सातारा, मारवाड या सर्व राज्यांचे वकील होळकर दरबारात होते.

**१.४.२.७ टाकसाळः**

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी चांदवडच्या किल्ल्यात टाकसाळ घातली होती. चांदीचे नाणे पाडण्यात येत होती. तर अहिल्याबाई यांनी इन्दौर येथे टाकसाळ सुरू केलेली होती.

### १.४.२.८ शेतीसाठी सुधारणा:

नैसर्गिक आपत्तीच्यावेळी शेतकऱ्यांस शेतसारा वसूलीत सूट दिली जात होती. शेतकऱ्यांना मजुरांचा पगार व पुढील वर्षाचे बियाने यासाठी धान्य काढल्यावर राहिलेल्या धान्यातून निम्मा किंवा चौथा हिस्सा सरकारात कर रूपाने द्यावा लागे याला बटाई महसूल म्हणत. शेती सुधारणेतच राज्याची सुधारणा असून, प्रजेच्या जगण्याचे प्रश्न शेती उत्पन्नातूनच सुटत असतात. शेती व्यवसाय हा राजा आणि प्रजेचा आधारभूत पाया आहे.

### १.४.२.९ कर पद्धतीत अचूक सुधारणा:

आपल्या प्रजेला भरावा लागणारा कर सुखासमाधानाने भरता यावा अशी होती. शेतकऽयाच्या शेती उत्पन्नावर कर आधारीत होता. तसेच गावे भाडेपटटीने देण्याची पद्धत बंद केली. महसूल वसूलीचे अधिकार पाटील पटवारी यांना दिले. जमीनदार व शेतकरी यांना त्यांच्या हक्काच्या जमिनी मिळवून दिल्या. महसूल पद्धतीत बदल केला. शेतीच्या विकासावर देशाचा विकास अवलंबून असल्याने शेती व्यापारावर विशेष भर दिला व्यापाऱ्यांना प्रोत्साहन व मदत दिली. अहिल्याबाईनी आपल्या राज्यात कर रचना सौम्य व समानतेच्या तत्वावर ठेवली होती.

### १.४.२.१० राज्याच्या उत्पन्नाचे साधने:

शेतसार संस्थानातील रयतेकडून कमीत कमी दराने सारा वसूल केला जात होता. सायर म्हणजे जी गावे किंवा जमीन इनाम म्हणून दिलेल्या भागात जो महसूल वसूल करणे होय. खंडणी म्हणजे युद्ध मोहिमेचा एकूण खर्च शत्रूकडून दंडासहीत वसूल केलेली रक्कम होय. विविध कर आयात—निर्यात केल्या जाणाऱ्या वस्तू व व्यापाऱ्याकडून वसूल केलेला करांचा समावेश होतो. तसेच जप्ती व दंड हे होळकर राज्याच्या उत्पन्नाचे साधने होती.

### १.४.२.११ जमीन महसूल व्यवस्था:

होळकर संस्थानची आर्थिक तिजोरी ही अतिशय भक्कम स्वरूपाची होती. होळकर संस्थानामध्ये बटाई, मोकासा, घुगरी, जब्ती, दान व कणवार या जमिन महसूल पद्धती होत्या. शेती महसूल वसूल करताना शेतकऱ्यांना प्रत्यक्षात होणाऱ्या उत्पादनावर महसूल वसूली केली जाई आपल्या राज्यातर्गत येणारा महसूल हा रोख स्वरूपांत प्रत्येक बिघ्याला सव्वा रूपया कर वसूल केला जाई. तर इतर राज्यात वा संस्थानात हाच दर चार रूपये होता. 'सत्ता म्हणजे भोग नसून तो एक महान योगायोग आहे.' हे अहिल्यामाता जाणून होत्या.[११२]

### १.४.२.१२ होळकर राज्यातील इतर सुधारणा:

होळकर प्रशासकांनी आपल्या राज्यात शिक्षण मंडळाची स्थापना, सायर खात्याची पुनर्घटना, नवीन टाकसाळी, टपालसेवा, जमीन मोजणी व प्रतवारी, दवाखाने, पाटबंधारे, तलाव, विहिरी, इन्दौर शहरात म्युनिसिपालिटीची स्थापना, रस्ते व लोहमार्ग काढुन दळणवळणच्या साधनात वाढ मोठ्या प्रमाणत करून जन कल्याण साधण्याचा प्रयत्न केला.

राज्यात अनेक सामाजिक सुधारणा घडवून आणल्या होत्या. तसेच राज्यात नर्मदा, चंबल, क्षिप्रा, गंभीर, खान, छोटी काली सिंध व मोठी काली सिंध या नद्यांच्या पाण्याचा जलसिंचनासाठी वापर केला.

### १.४.३ परगणा मुलकी प्रशासनः

होळकर संस्थानामधील शासक सतत युद्ध मोहिमावर जावे लागत असल्याने राज्याची मुलकी प्रशासन व्यवस्था खंबीरपणे सांभाळयाचे काम त्या त्या शासकांच्या राणीस करावे लागे. सुभेदार मल्हारराव यांच्या कारकिर्दीमध्ये गौतमाबाई व त्यानंतर अहिल्याबाईनी केंद्रीय व परगण्याचा कारभार चांगल्या प्रकारे सांभाळत असत.

### १.४.४ ग्राम मुलकी प्रशासनः

स्थानिक मुलकी प्रशासन व्यवस्था नगर कोतवालीचे पद निर्माण केले. त्याच्यामार्फत हेरगिरी करणे, गुन्हेगारांना आर्थिक दंड देणे ही कामे सोपविलेली होती.

## १.५ प्रकरण पाचवेः होळकर राज्याचे लष्करी प्रशासन

प्रस्तुत प्रकरणामध्ये होळकर राज्याच्या शासकांनी जनकल्याणाचे कार्ये करताना आपल्या राज्याच्या सिमा सुद्धा वाढविलेल्या आहेत. राज्याचे लष्कर उभा करतांना लष्करांची सुसूत्रता कशी होती, लष्करामध्ये आधुनिक लष्करातील काही बाबांचा अंतर्भाव होता. या बाबी या प्रकरणात संशोधनकर्त्याने स्पष्ट केलेल्या आहेत. कारण पेशवाईत होळकराचे लष्कर म्हणजे बलाढय लष्कर होते. त्याचा पेशवाईत एक प्रमुख दरारा होता. त्याची कारणे व शृंखला या प्रकरणात शोधलेली आहेत.

### १.५.१ केंद्रीय लष्करी प्रशासनः

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून लष्करी मोहिमामध्ये योग्य प्रशासन राबविल्यामुळेच शत्रूंना धुळ चारण्यात यश मिळाले. त्याचप्रमाणे लष्करी मोहिमातील होळकर राज्याच्या शासकांनी युद्धनिती, शस्त्रास्त्रे तोफखाना, गनिमी काव्याचा यशस्वी वापर, कवायती फौजे संचलन, जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावणे, लष्करातील शिस्त व जलद हालचाली याबाबतीतील अचूक प्रशासन हेच होळकरांच्या लष्करी मोहिमांचे गमक होते. 'इंग्रजांनी वसई घेतली म्हणजे देशात उपद्रव करतील. मग पुणे कसे राहील.'[११३]

### १.५.१.२ सैन्य व्यवस्थाः

शत्रूवर मात करण्यासाठी युद्धाविषयीची सर्व व्यवस्था पाहिली जाते त्यात युद्ध साहित्य तयार करणे, युद्ध साहित्यांची साठवणूक करणे, युद्ध विषयक साहित्यांची खरेदी करणे, जलद व नियमित रसद पुरवठा करण्याविषयीची यंत्रणा. सैन्याची भरती सैन्यातील विविध स्तरावरील अधिकाऱ्यांची नेमणूक करणे इत्यादी बाबीचा समावेश होत होता.

### १.५.१.२.१ लष्कराचे भागः

होळकर लष्करात पायदळ, घोडदळ व कवायती असे भाग होते.

**१.५.१.२.२ पायदळ:**

होळकर संस्थानात पायदळास घोडदळाच्या तुलनेने कमी महत्व दिलेले होते.

**१.५.१.२.३ घोडदळ:**

होळकर राज्यात घोडदळास अतिशय महत्वाचे स्थान दिलेले होते. तत्कालिन परिस्थितीमध्ये घोडदळास अत्यंत महत्व होते. 'मराठ्यांच्या खालून घोडा ज्या दिवशी निघून गेला त्या दिवशीच त्यांचे राज्य गेले.' असे एकाने म्हणटलेले आहे.[११४]

१ **बारगीर:** बारगीर म्हणजे सरकारी घोडा व युद्ध साहित्य असलेला नोकरदार होय.

२ **शिलेदार:** शिलेदार म्हणजे स्वत:च्या खाजगी मालकीचा असलेला घोडा व युद्ध साहित्य असणारे सैन्य होय.

**१.५.१.२.३ कवायती:** होळकर शासकांनीही पाश्चिमात्यांची कवायती फौजेचा स्विकार करून डयुडेन्स यास कवायती फौजेचा अधिकारी म्हणून नेमले. याशिवाय लष्करात हत्तीदळ व उंटदळ ही होते.

**१.५.१.३ सेनापतीचे कार्य:**

होळकर राज्यातील सेनापतीस सैन्याविषयाची सर्व व्यवस्था पाहण्याचे कामे करावी लागत होती. अंतर्गत शांतता प्रस्थापित करणे व अंतर्गत विरोधी शक्तीना पायबंद घालण्यासाठी ठिकठिकाणी छावण्या उभारणे, दारूगोळा काढण्याचे व शस्त्र तयार करण्याचे तसेच त्याची कारखाने काढण्यास प्रोत्साहन देणे सैन्यास आळशी बनू न देणे अशी अनेक कामे सेनाप्रमुख म्हणून पार पाडावी लागत होती.

**१.५.१.४ किल्ल्यांचे प्रशासन:**

होळकर राज्यात महेश्वर, चांदवड, सेंधव, अशीरगड, गाळणा, कुशलगड व हिंगलाजगड या सात किल्ल्यांच्या समावेश होता.[११५] सेनापती तुकोजी होळकर यांच्या नेतृत्वाखाली आपल्या सैन्याचे नीट संचलन करता यावे व सूरक्षितता लक्षात घेऊन त्याचे राज्याचे संरक्षण, किल्याचे संरक्षण, स्वत:चे संरक्षण व अंतर्गत संरक्षण करण्यासाठी असे चार भाग केले.

**१.५.१.५ पोलीस प्रशासन:**

होळकर राज्यात सुभेदार होळकरांनी जी पोलीस यंत्रणा मराठ्यांचया पद्धतीसारखीच होती. पोलीस हे इन्दौर व इतर शहरात कायदा व सुव्यवस्थेचे काम पाहत असत. नगर पोलीस व देहाती पोलीस असे पोलीस यंत्रणेचे भाग पडत होते. शिवाय परगण्यामध्ये कमाविसदार हा कायदा व सुव्यवस्थेचे काम पाहत असे. तर गावात चौकीदार हा पोलीस व्यवस्थेचा प्रमुख म्हणून कार्य करीत होता.

### १.५.२ परगणा लष्करी प्रशासनः

परगणा पातळीवर लष्करी प्रशासन कमाविसदार यांच्या अखत्यारीतील अधिकाऱ्याकडे जबावदारी होती.

### १.५.३ ग्राम लष्करी प्रशासनः

ग्राम पातळीवर लष्करी प्रशासन स्थानिक अधिकाऱ्याकडे सोपविलेले होते. त्यात गावचा पाटील, देशमुख व देशपांडे यांचा समावेश होतो.

## १.६ प्रकरण सहावेः होळकराचे संस्थानाचे न्यायिक प्रशासन

होंळकर राज्यात हे न्यायप्रिय शासकांचे राज्य म्हणून संपूर्ण हिंदुस्थान भर प्रसिद्ध होते. होळकरांची न्याय व्यवस्था ही तत्कालिन शिंदे, गायकवाड पवार, भोसल व पेशवे यांसर्वाच्या न्यायव्यसस्थेपेक्षा निश्चितच लोकप्रिय होती. होळकर राज्यात अहिल्याबाईच्या नि:पक्षपातीपणाबददल, नि:स्पृहतेबददल व न्यायीपणाबददल त्यांची ऐवढी ख्याती होती की, त्यांना अन्यायाबददल प्रचंड चीड होती. सर्वांना समान न्याय मिळाला पाहिजे अशी त्यांची धारणा होती. अन्याय करणारी व्यक्ती कितीही मोठी असली तरी त्याला शिक्षा देताना कधीही मुलाहिजा बाळगला नाही. पुण्यश्लोक अहिल्यादेवी म्हणजे त्या काळातील सर्वोच्य न्यायालय होते. तत्कालीन राजे, राजवाडे, सरदार, दरबारी व अधिकारी वर्गात तंटे उपस्थित झाल्यास उभयपक्षी लवाद म्हणून निकाल देण्याचे कार्य दोन्ही पक्ष मोठ्या आनंदाने व विश्वासाने अहिल्याबाईकडे सोपवित असत. म्हणूनच पुणे दरबारी देखील त्यांच्या शब्दाला अत्यंत मान होता. एवढेच नव्हे तर इतर राज्यातील अन्यायग्रस्त व्यक्तिही अहिल्याबाईकडे न्याय मागण्यासाठी येत असत. इतका विश्वास दोन्ही पक्षांकडील लोकांचा होळकर शासक अहिल्याबाईवर होता.

### १.६.१ केंद्रीय न्याय व्यवस्थाः

होळकर शासक अहिल्याबाईच्या काळात म्हणजेच १३ मार्च १७६७ ला राज्यात जागोजागी न्यायालयाची स्थापना करून न्याय दानासाठी न्यायाधीशांची नेमणूक केली.[११६] स्वत:च्या पतीस तात्काळ दंड दिला. 'दिवाणजी! दरबाराचा रिवाज न पाळणाऱ्यास तसेच संस्थानाची पुजनीय अशी जमाखर्चाची वही भिरकावून देणाऱ्यासपंचेवीस मोहरा दंड करा व तो दंड त्यांच्या वैयक्तिक उत्पन्नातून वसूल करावा.'[११७] अशा समान न्यायामूळे होळकर घराण्याचे प्रशासन हे तत्कालीन राज्यव्यवस्थेत आदर्श होते.

### १.६.२ फडणीसांचे कायदेः

होळकर राज्याच्या अर्थ विभागात प्रजेचे कल्याण साधण्यासाठी फडणीसांचे कायदे तयार करण्यात आलेले होते. या कायद्यांची अमलबजावणी केली जात असल्याने कोणत्याही अधिकाऱ्यास कसल्याही प्रकारची अफरातफर करता येत नव्हती.

**१.६.३ परगणा न्यायव्यवस्था:**

होळकर राज्यातील सर्व परगणा स्तरावर कमाविसदार हा अधिकारी न्यायदानाचे काम पाहत असे. या स्तरावर जनतेचे समाधान नाही झाले तर, तो सरळ होळकर सत्ताधीशांकडे न्याय मागत येत होता.

**१.६.४ ग्राम न्यायव्यवस्था:**

होळकर राज्यात होळकर शासकांनी ग्राम पातळीवर पंचायतीची स्थापना केली. व प्रजेला विनाविलंब न्याय मिळवण्याची व्यवस्था होळकर शासक अहिल्याबाईंनी केली. न्याय व्यवस्था अत्यंत साधी व सोप्या भाषेत चालत असे. या न्याय व्यवस्थेत एखाद्याला आणखीन अन्यायच झाला आहे असे वाटत असेल, किंवा खरा न्याय मिळालाच नाही असे वाटले, तर तो सरळ होळकर शासक अहिल्याबाईकडे अंतिम न्याय मागता येत असे. 'प्रजेच्या हितासाठीच राज्याची निर्मिती आहे. राजा आणि प्रजेचा संबंध म्हणजेच आईपुत्राच्या संबंधाप्रमाणे असतो.'[११८] होळकर राज्यामध्ये लोकमातेने सुख—शांतीचे बंधुभावाचे, न्याय प्रिय राज्य निर्माण केले होते.

होळकर राज्यात सुभेदारांकडे सर्व सत्ता एकवटलेली होती. होळकर राज्याच्या प्रत्येक परगण्यात कमाविसदार न्यायदानाचे काम करीत होते. होळकरांची स्थानिक न्यायव्यवस्था म्हणजे गाव पातळीवर गावचे पाटील हे न्यायदानाचे काम करीत होते. प्रसिद्ध **पंडित कवी मोरोपंत** यांनी होळकर शासक अहिल्याबाईच्या न्यायाविषयी म्हटले आहे.

'देवी अहिल्याबाई झाालीस जगत्रयात तू धन्या
न न्याय—धर्म—निरता अन्या, कलिमाजी ऐकली कन्या.'[११९]

पुण्यश्लोक राजमाता अहिल्याबाई होळकर यांची रामशास्त्री प्रभुणे यांच्या सारखीच न्यायबुद्धी जागृत व निस्पृह होती. या दोघांच्याही न्यायबुद्धीला मानवतेची बैठक होती. ती अशी की, निपुत्रिक विधवांच्या मिळक्ती जप्त न करता दत्तक विधानान्वये त्यांची विल्हेवाट करता यावी असे निवाडे अहिल्यादेवीने दिलेले आहेत. म्हणून जॉन माल्कन यांनी होळकर शासक अहिल्याबाईबद्दल म्हणटले आहे की, 'अहिल्यादेवी सारख्या न्यायाधीश पुन्हा होणे मुस्कील.'[१२०]

## संदर्भ सूची


१ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.२९७

२ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशन, पुणे, द्वितीय आवृत्ती, २०१५. पृ.७५

३ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१७.

४ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.२९९

५ प्रा. सौ. मोरे अरुणा, डॉ. नवथर भारती, डॉ. काळभोर स्वाती, मराठ्यांचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, २०१० पृ.२०३

६ शूरनर गोविंदराव, लोकमाता राजमाता महाराणी अहिल्याबाई होळकर, अहिल्या प्रकाशन, नांदेड. १९९९, पृ.३०.

७ मधुसुदन राव, यदुवंशी धनगर ग्वाली समाज का इतिहास, बुकमैन प्रिंटर्स, दिल्ली, २००८ पृ. ८९

८ प्रा. पाटील बी.बी., लोक प्रशासन, फडके प्रकाशन, कोल्हापूर, २००४, पृ.२

९ प्रा. बंग के. आर., प्रशासकीय सिध्दांत, विद्या बुक्स पब्लिशर्स औरंगाबाद ,२००४, पृ.१

१० डॉ. होळकर मधुसूदन राव, होलकरों का इतिहास, अखिल भारतीय होलकर महासंघ प्रकाशन दिल्ली, द्वितीय संस्करण, २०००, पृ.८९

११ डॉ. भोगले शांताराम, लोक प्रशासन सिध्दांत व कार्य पध्दती, कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद, जुलै २०१६, पृ.१

१२ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे, १९५४, पृ.१

१३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१३.

१४ केळकर य. न., होळकरांची कैफियत संशोधन व टीपा, सदाशिव लक्ष्मण कोकाटे हनुमान प्रकाशन, पुणे, १९५४, पृ.२

१५ खरे ग. हा. आणि कुळकर्णी अ. रा., (संपा.), मराठयांचा इतिहास, खंड—३ (१७६१ —१८१८) कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, ३०, प्रथमावृती १९८६, पृ. ४३०

१६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१३३

१७ कित्ता, पृ.१

१८ कित्ता, पृ.१३३

१९ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड—७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १५

२० ठाकूर वा. वा. ,(संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर. १९४६, पृ.१५

२१ कोळेकर हरिभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, बार्शी, २०१३, पृ.१३१.

२२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४,. पृ.१

२३ कित्ता, पृ.७४

२४ कित्ता, पृ.१

२५ जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग–१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई, १९९०, पृ.३१४

२६ राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड–७, डॉ. प्र.न.देशपांडे राजवाडे संशोधक मंडळ प्रकाशक, धुळे, २००६, नवीन आवृती, पृ.९४

२७ जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग–१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई, १९९०, पृ.३१८

२८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर ,१९४४. पृ.१

२९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१५

३० कोळेकर हरीभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१३, पृ.१३१

३१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२९३

३२ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड—७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १३

३३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२९३

३४ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड—७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १३

३५ जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग—१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं.मंडळ, मुंबई, १९९०, पृ.३१४

३६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.६

३७ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकर सरकार पुस्तकमाला पुस्तक १६वे होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने पत्र व्यवहार पूर्वार्ध खंड—१ला, इतिहास लेखक व संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२४, पृ.१२४

३८ पोटे देवीदास, (संपा.), कुलकर्णी के.पी. पद्यरूप अहिल्याबाई होळकरणीचे चरित्र, मुंबई, १९८४, पृ.१४३

३९ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर ,१९४६,, पृ.२९३

४०  शूरनर गोविंदराव, आद्य क्रांतीकारी राजे यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन, नांदेड, २०१०, पृ.१४.

४१  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर १९४६,, पृ.२०

४२  कित्ता, पृ.१५०

४३  कित्ता, पृ.२४४

४४  सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशन, पुणे, २०१५, पृ.१९८.

४५  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर ,१९४६,, पृ.२४४

४६  कित्ता, पृ.२४४

४७  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७

४८  ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर ,१९४६,, पृ.५

४९  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७

५०  कित्ता,, पृ.१२५

५१  डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशनः इन्दौर, १९८७, पृ.११

५२  कित्ता, पृ.७.

५३  कित्ता, पृ.८

५४  भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७, पृ. ३२

५५  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.०८

५६  कित्ता, पृ.२४४

५७  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७२

५८  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१३३.

५९  ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१५०

६०  गायकवाड चंद्रशेखर, पुरोगामी विचारांची जीवनधारा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, ओम प्रकाशन, अकलुज, २०१०, पृ.२७.

६१ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशनः इन्दौर, १९८७, पृ.७.

६२ प्रा. बेडदे धनंजय प्रभाकर, परिवर्तनाची गौरवगाथाः लोकमाता अहिल्याबाई होळकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, २०००, पृ.११६

६३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१३५

६४ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशन, पुणे, २०१५, पृ.१९८.

६५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२४४

६६ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

६७ यादव शिवनारायण, होलकर राज्य का प्रशासनः विकास का इतिहास, मानक पब्लिकेशन्स प्रा. लि. दिल्ली, प्रथम संस्करण, १९९४, पृ.१५

६८ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, पुणे, चतुर्थावृत्ती, २०१६, पृ.४८

६९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२४४

७० कित्ता, पृ.२७४

७१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.२३५

७२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७

७३ केळकर य. न., होळकरांची कैफियत, संशोधन व टीपा सदाशिव लक्ष्मण कोकाटे, हनुमान प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ति, १९५४, पृ.3

७४ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१, पृ.४३—४४

७५ आयुक्त, पुरातत्व एवं संग्रहालय मध्यप्रदेश, इन्दौर, भण्डारी ऑफसेट प्रिंटर्स, भोपाळ १९९२, पृ.६

७६ कित्ता, पृ.६

७७ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

७८ कित्ता, पृ.१३१

७९ कित्ता, पृ.१३१

८० कित्ता, पृ.१३१

८१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.३२

८२ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

८३ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.१७—१८

८४ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.९६—९७

८५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७

८६ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशनः इन्दौर, १९८७, पृ.७.

८७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१५२

८८ पोटे देवीदास, (संपादन), अकृअहिल्याबाईचा, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, २०१४, पृ.४१

८९ डॉ. बंडे शारदा गोविंदराव, मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००९, पृ.२१६

९० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.४

९१ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशन, इन्दौर, १९८७, पृ.११

९२ प्रा. जोशी सु. ह., डॉ. कुलकर्णी म. रा., डॉ. शेळके रघुनाथ, कुलकर्णी शिल्पा, दांडेकर सुनिता, डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड पब्लिकेशन, पुणे, प्रथम आवृत्ती, २००९. पृ.३८१

९३ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, पुणे, चतुर्थावृत्ती, २०१६, पृ.२६

९४ आपटे द. वि., ओतूरकर. रा. वि., महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे, प्रथमावृत्ती, १९४१. पृ.२१९

९५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२७१

९६ कित्ता, पृ.२४८

९७ कित्ता, पृ.१२४८

९८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२७१

९९ कित्ता, पृ.२७५

१०० कित्ता, पृ.२७८

१०१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.२९४

१०२ यादव शिवनारायण, होलकर राज्य का प्रशासनः विकास का इतिहास, मानक पब्लिकेशन्स प्रा. लि. दिल्ली, प्रथम संस्करण, १९९४, पृ.१६

१०३ कित्ता, पृ.१६

१०४ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशन, इन्दौर, १९८७, पृ.७.

१०५ कित्ता, पृ.८

१०६ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखाना, इदौर, १९८७, पृ.३२.

१०७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.०८

१०८ ओक प्र. ग. (संपा.), पेशवे घराण्याचा इतिहास, केसरी प्रकाशन, पुणे, १९७५, पृ.१२५.

१०९ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—२ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०. पृ.४

११० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२७२.

१११ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१३३.

११२ नजन ओमप्रकाश वसंत, अहिल्याबाई होळकर, साकेत प्रकाशन, पुणे, पाचवी आवृत्ती, २०१६, पृ.६७

११३ गायकवाड चंद्रशेखर, पुरोगामी विचारांची जीवनधारा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, ओम प्रकाशन, अकलुज, २०१०, पृ.२७.

११४ केळकर नरसिंह चिंतामणी, १९१६, मराठे व इंग्रज संबंध, मॉडर्न बुक डेपा प्रकाशन: पुणे, पृ.२११.

११५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२०७

११६ कोळेकर हरीभाऊ, होळकर राज्य संस्थापक मल्हारराव होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५,पृ.७

११७ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.५.

११८ शूरनर गोविंदराव, लोकमाता राजमाता महाराणी अहिल्याबाई होळकर, प्रबोधन प्रकाशन, नांदेड, तृतीयावृत्ती, २०१५, पृ.३६

११९ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशन, इन्दौर, १९८७, पृ.७.

१२० प्रा. बेडदे धनंजय प्रभाकर, परिवर्तनाची गौरवगाथा: लोकमाता अहिल्याबाई होळकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, २०००, पृ.११६

**प्रस्तावना—:**

होळकर घराण्याची ख्याती ही त्यांच्या कर्तृत्वाने, दातुर्त्वाने, वास्तुशिल्पाने, न्यायाप्रियतेने, प्रजाहित दक्षतेने, मुत्सुद्यीपणाने, आदर्श शासन प्रणालीने कन्याकुमारी ते हिमालयापर्यंत पसरलेली होती. होळकर घराणाने हे एक असे एकमेव घराणे आहे. ज्यांनी शून्यातून विश्व निर्माण करुन इतिहासात आपली अद्वितीय ओळख निर्माण केली. होळकर घराणे हे इतिहासात परिवर्तन व अभुतपूर्व इतिहास बदलविणारे घराणे ठरले. त्यांच्या ह्या अभुतपूर्व कर्तृत्वाचा ठेवा हा तत्कालीन ब्रिटिश मुत्सद्यांनाही पडला होता. अशा ह्या महान राजघराण्याने काळाला अनुरूप राहून योग्यवेळी योग्य निर्णय घेऊन मनाशी ध्येय बाळगून मोठ्या धाडसाने आपले कर्तृत्व सिध्द केले. अशा या कर्तृत्वान राजघरण्याचा उदय व त्यांची वंशावळीवर दृष्टीक्षेप टाकणे गरजेचे आहे. याकरीता सदरील प्रकरणामध्ये होळकर घराण्याचा उदय, वंशावळ व संक्षिप्त इतिहास मांडला आहे. होळकर घराण्यात अनेक कर्तबगार व्यक्ती होवून गेले.

प्रस्तुत संशोधन कार्यात या घराण्यातील कर्तबगार व्यक्तींचे पुर्वचरित्र त्यात मल्हारराव होळकर, गौतमाबाई, हरकुॅवरबाई, भारमलदादा, खंडेराव, अहिल्याबाई, मालेराव, तुकोजीराव, काशीराव, मल्हारराव दुसरे, विठोजी, प्रथम यशवंतराव, मल्हारराव (तिसरे) दुसरे, भिमाबाई (बुळे), मार्तण्डराव (दत्तक),, हरिराव, खंडेराव (दत्तक), तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, सवाई तुकोजीराव (तृतीय) व द्वितीय यशवंतराव इत्यादींच्याबद्दल पुर्वचरित्राचा संक्षिप्त आढावा पुढीलप्रमाणे घेतलेला आहे.

## २.१ होळकर घराण्याचे मुळ वस्तीस्थानः

होळकरांचे वंशवृक्ष अनेक ठिकाणातून आलेले आहेत. वंशापैकी अनेक शाखा दूरवर पसलेल्या दिसतात. यांच्या वसाहती मथुरा, राजपूताना, खानदेश, नाशिक व अहमदनगर येथे स्थायिक होत होत आज राजघराणे इंदूरास नांदत आहे.[१] होळकर घराणे हे मुळचे मथुरेचे नंतर त्यातील काही शाखा दक्षिण भारतात पसरल्या त्यातील काही होळकरांचे पूर्वज पूर्वी उत्तर प्रदेशातील मथुरा येथील मुळ रहिवाशी होते नंतर राजकीय अस्थिरतेमुळे ते मथुरेतून चितोड नंतर दक्षिणेला औरंगाबाद नंतर महाराष्ट्रातील वाफगाव येथे स्थाईक झाले.[२] आपल्या घराण्याच्या दूर दूर पसरलेल्या शाखांतून व्यक्तिशः निवड करुन पांच बंधूंस त्यांनी इंदूरांत स्थायिक केले. ही मंडळी पंचभैया होळकर या नावानें ओळखली जाते.[३]

होळकर घराण्याच्या वंशावळीत अनेक व्यक्तींचा सामावेश होता. त्यात सुभेदार मल्हारराव होळकर ते यशवंतराव होळकर यांचा समावेश होता.

## २.२ होळकर घराण्याचा उदय:

मल्हारराव होळकरांचे पूर्वज हे दक्षिण भारतातील वाफगावचे मुळचे राहणारे होते.[४] तर मल्हाररावांचे पुर्वज काही काळ 'वीर' या गावी राहत होते. म्हणून हे घराणे काही काळ

'वीरकर' या कुल नावानेही ओळखले जात असे.[५] त्यानंतर मल्हाररावांचे वंशज पुण्याजवळ असलेल्या फलटन परगण्यातील नीरा नदी काठच्या 'होळ' या गावी स्थायिक झाले.[६] त्यामुळे त्यांना त्यांच्या 'होळ' या गावावरून त्यांना वीरकर ऐवजी 'होळकर' या नावाने ते ओळखले जाऊ लागले.[७] मल्हारजीच्या वडिलांचे नांव खंडूजी. खंडोबा हे श्रीमल्हारीमार्तंडांचे दुसरे नांव होय.[८] खंडोजी वीरकर सामान्य कुटूंबातील होते. त्यांचा साधारण शेतीवर उदरनिर्वाह चालत होता. तसेच ते 'होळ' गावचे प्रतिष्ठित चौगुले म्हणजेच ग्रामधिकारी होते. 'खंडोजी वीरकर हे जातीने खुटेकर धनगर होते.'[९]

त्यास खानदेशातील तळोदे तालुक्यातील सुलतानपूर येथील भोजराजजी बारगळ यांची बहीण जिवाई दिली होती.[१०] म्हणजेच खंडोजी वीरकर यांचा विवाह खानदेशातील मौजे तळोदे परगणे सुलतानपूर येथील साबाजीबाबा बारगळ या चौगुले यांची कन्येशी तर भोजराज बारगळ यांच्या बहीणीशी झाला. खंडोजी होळकर यांचा इ. स. १६९६ ला मृत्यू झाल्याने मल्हारी व त्याची आई जिवाई अनेक संकटाना सामना करावा लागला.

## २.३ होळकर राज्य:

होळकर राज्य हे २१°२२′ ते २४°४०′ उत्तर अक्षांश आणि ७४°२२′ ते ७७°३′ पुर्व रेखांशामध्ये होळकर राज्याचा विस्तार झालेला होता. होळकर राज्याला नैसर्गिक सिमा लाभलेल्या नव्हत्या. होळकर राज्याच्या शेजारील राज्य पुढीलप्रमाणे होती.

१. उत्तरेस कोटा व उदेपूरची सीमा लागून होती.

२. दक्षिणेस ग्वाल्हेर, धार, बडवानी, निजाम व पेशव्यांचे राज्य होते.

३. पूर्वेस ग्वाल्हेर, देवास, धार व भोपाळ

४. पश्चिमेस बडवानी व डूंगरपूर

५. उत्तर पूर्वेस झालवाडा अशी संस्थाने होती.

या राज्याच्या दरम्यान होळकर राज्याचा प्रसार झालेला होता.[११]

### २.३.१ मल्हारराव होळकर:

मराठेशाहीचा उज्जवल इतिहास घडविणाऱ्या युग पुरूष असणाऱ्या मल्हाररावांचा जन्म खंडोजी वीरकर व जिवाई यांच्या पोटी इ. स. १६९३ साली ता. १६ माहे मार्च रोजी झाला.[१२] त्यांचे जन्म नाव 'कुरबा वीर मल्हारी' असे होते. तो सामान्य घरातील जातील कुटूंबातील होते.[१३] अशा महान रत्नाचे वडील खंडोजी वीरकर हे होळ गावचे प्रतिष्ठित चौगुले होते. मल्हारी तीन वर्षाचा असतानाच बाल वयातच वडीलांचा मृत्यू झालेला होता. तेव्हा जिवाईस सासरमध्ये विधवेचे जीवन जगताना भावकीने व इतर नातेवाईकांनी संपत्तीच्या वारसा व मालकी हक्कामुळे बराच मोठा त्रास होऊ लागला. खंडोजीची सर्व संपत्ती घरदार भावकीने व इतरांनी बळकावल्याने त्यात जिवाईचे काहीही चालत नसल्याने आपल्या चिमुकल्या मुलांचे व आपले भविष्यात काही बरेवाईट होऊ शकते. या कायमच्या भितीपोटी जिवाईने पतीच्या

निधनानंतर सासर सोडून ती आपल्या बाल मल्हारीस घेऊन आपल्या माहेरी कायमची राहायला आली.

मल्हारी जसजसा मोठा होवू लागला तसतसा तो आपल्या मामाच्या कामात मदत करू लागला. मामाकडे असताना मल्हारराव मेंढपाळी करत होते. एके दिवशी मल्हारी मेंढरे राखताना बसल्या ठिकाणी दोन प्रहरीं एका वृक्षाखाली झोंपी गेले होते. त्यांची मातुश्री भाजीभाकर घेऊन येत होती, तो लांबून तिला असे दिसलें कीं एका नागाने आपली फडा मल्हारजीचे डोक्यावर उभारलेली आहे तिची गाळण उडाली व ती तशीच गांवात गेली. थोडया वेळाने ती परतून येते आणि पाहते तों नाग तेथे दिसेना. मुलास कांही एक इजा झाली नाही, हे पाहून तिचे जिवांत जीव आला.[१४] गावातील ब्राम्हणास घडलेला प्रसंग सांगितला तेव्हा तो म्हणाला की, ‘बाई, हा मूल पृथ्वीपति होईल. त्यास दहा वर्षाचा होई तावत्काल फार सांभाळावे. पुढे हा पृथ्वीस संभाळून तुला पृथ्वीपतीची आई म्हणवील!’[१५]

**२.३.१.१ मामा भोजराज बारगळः**

अहिल्याबाईच्या आईचे नाव मोहनाबाई तर वडीलांचे नाव साबाजी असे होते. मामा भोजराज बारगळ हे नंदुरबार जिल्ह्यातील तळोदे गावचे एक सधन शेतकरी व चौगुले होते. तसेच भोजराज बारगळ हे सरदार कंठाजी कदमबांडे याच्याकडे सेवेत होते.[१६] तर कंठाजी कदम बांडे हे सेनापती दाभाडे याच्याकडे सरदार होते. भोजराज बारगळ हे कदमबांड्यांच्या फौजेत एका पथकानिशी मोहिमेवर जात असत. म्हणजेच भोजराज बारगळ हे कदमबांडेच्या पंचवीस स्वारांचा प्रमुख होता.[१७] मल्हारराव तेरा वर्षाचे असताना आई जिवाईचा मृत्यू झाल्याने वडीलाविना असलेल्या मल्हारी हा आता आईच्या प्रेमालाही मुकला यामुळे मल्हारीस फारच दु:ख झाले. मामांने आई वडील विना पोरके झालेल्या मल्हारीस आई वडीलाची उणीव कधीच भासू दिली नाही. मामा भोजराज बारगळ यांनी भाचा मल्हारकडील मेंढ्या राखण्याचे काम काढून आपल्याकडील पागेतील घोड्याची व्यवस्था पाहण्याची जवाबदारी सोपवली. त्यास आपल्या घरच्या घोड्याची देखरेख करण्याकरीता ठेवल्याने मल्हारीस मल्हारीस लहानपणापासूनच तलवार चालविणे. दांडपट्टा चालविणे, घोड्यांवर बसणे, भाला फेकणे, घोड्याची निगा राखणे, घोड्यावर बसुन फेरफटका मारणे, घोडा भरदाव फेकणे, भाला फेकणे व निशाण मारणे अशा अनेक प्रकारचे सैनिकी प्रशिक्षण चांगल्या प्रकारे देऊन चांगलेच पारांगत केले. म्हणजे मामानी त्यांचा गुरू व सासऱ्याची ही भूमिका त्यांनी पार पाडली. मल्हाररावांनी मामाच्या सैन्यात प्रवेश करून सैनिकी जीवनास सुरूवात केली. मामा हे कदमबांड्यांचे एक सरदार असल्याने अप्रत्यक्षपणे मल्हारराव हे कदमबांड्यांचे एक सैनिक वा अनुयायी ठरतात.

### २.३.१.२ कदम बांडेच्या लष्करात नोकरी:

छत्रपती शाहू महाराजांनी व पेशवे यांनी खंडेराव दाभाडे योना गुजरातकडे पाठवून बराच मुलूख आपल्या वर्चस्वाखाली आणला. त्या मोगली मुलूखातील मोगलांची ठाणे उठवून तेथे आपला बंदोबस्त ठेवला. त्यात कदमराव बांडे वडगांवकर दक्षिणेस २०० स्वारासह दाभाडेकडे चाकरीस होते. कदमराव बांडे यांसी मोकासा परगणे, नंदूरबार महाल निम्मे, व परगणे सुलतानपूर महाल दरोबस्त नेमून दिला.[१८] मामा भोजराज बाळगळ हे कदम बोंडे या सरदाराकडे बारगीर म्हणून कामास होते. त्यामुळे मामाकडे बरेच मोठे सैनिक नोकरीस होते. त्यावेळी तापीकांठ, विंध्याद्रीपर्वत, सातपुडा डोंगर पूर्व—पश्चिम आहेत तेथे राउळाच व भिल्लाचा उपद्रव बहुत झाला.त्याचा बंदोबस्त करण्यासाठी निजाम—उल—मुल्क यांनी कदमरावांस आज्ञा केली, मवास, राऊळ, कोळी, भिल्ल आहे त्यांचे पारिपल्य करावे. म्हाणजे तुम्हास सरकारातून गांव इनायत होईल.[१९]

तेव्हा कदमराव बांडे यांनी तीन हजार फौजेनिशी भिल्लांवर हल्ला चढवून त्यांचा बंदोबस्त करून त्याठिकाणी आपला अंमल बसविला. त्यावेळी त्यासैन्यात भोजराज बारगळ हे सहभागी होते. नंतर भोजराज बारगळांनी आपल्या सैन्यात वाढ करून ती वीस हजारावर पोहचली होती. त्यांनी भिल्ल कोळी यांचा सामना करीत नर्मदा ओलांडून रेवा, गुजरात पर्यंत मजल मारली पावागड येथील लढाई जिंकून त्यांना पानेरचा किल्ला जिंकला.

मराठा सरदार त्रिंबकराव दाभाडे हे कधी गुजराथवर तर कधी माळवा स्वाऱ्या करीत असत. यांच्या कधी दाभाडेंबरोबर गुजराथ स्वाऱ्या तर कधी संताजी जाधवबरोबर माळव्यावर कदमबांडे स्वाऱ्या करत होते. गुजराथ व माळवा मुलूख तसा संपन्न असल्यामुळे यावर शूर सरदारांची दृष्टी या प्रांताकडे नेहमी असल्याने दाभाडे व कदमबांडे हे कधी एकत्र तर कधी स्वतंत्रपणे या प्रांतावर हल्ले करत असत. सन १७०७ पर्यंत त्रिंबकराव कदमबांडे हयात होते.

मल्हारी मोठा झाल्यावर मामा भोजराज बारगळ यांनी त्यास एक घोडा देऊन कंठाजी कदम बांडे याच्या हवाली करून भाचा मल्हारीला त्यांच्याकडे नोकर म्हणून सेवेत रूजू केले. म्हणजेच मल्हारराव हे पंधरा वर्षाचे असताना बारगीर म्हणून कदम बांड्यांच्या चाकरीस लागले. मल्हारजीच्या आयुष्यक्रमातील पहिली शाळा बांडे यांचे हाताखाली सुरु झाली.[२०] मल्हारराव नंतर स्व पराक्रमाच्या जोरावर सैनिक पदापासून कदमबांडे यांच्या फौजेतील पंचेवीस स्वारांचे प्रमुख बनले. त्यानंतर मल्हाररावांनी आता दिडशे स्वारांचे पथक तयार केलेले होते. मल्हाररावांनी एका सैनिकापासून आपल्या राजकीय कारकिर्दीस करून कदम बांडे यांच्या सैन्यात शिलेदार म्हणून काम केले. माळव्यात त्यांचा सुसंघटित प्रवेश इ. स. १७२१ त झाला. मल्हाररावांच्या इ. स. १७१८ पुर्वीपासूनच माळव्यावर स्वतंत्र स्वाऱ्या करीत असत. [२१]

बाळाजी विश्वनाथ भट यांनी इ. स. १७१९ उत्तर मोहीम हाती घेतली. मल्हाररावांचे शौर्य व कर्तृत्व पेशव्यांनी पाहिलेले होते. त्यामुळे त्यांनी मल्हाररावास या मोहिमेत सहभागी

करून घेतलेले होते. मोगली प्रदेशात घुसून गोदावरी नदीपर्यंत मजल मारून त्यांनतर उत्तरेची दुसरी स्वारी हाती घेऊन पवार धनगर मराठा मंडळी जमा करून गोदावरी नदी पार करून स्वारी केली. मराठे परमुलखात स्वारीस जात त्यावेळी तरूण तडफदार तरूणास मोहीमेस सामावून सहज घेतले जाई. त्यांनी स्वत:चे शस्त्र व घोडा घेऊन काढलेल्या मोहिमेत पराक्रम घडवून घेंण्यास मदत होई अशा लोकांना शिलेदार असे म्हणत. त्यांना स्वारीत सरदारांच्या हुकूमाप्रमाणे शत्रुवर तुटून पडावे लागे. तसेच स्वारीत वा मोहीमेत शिलेदारांना जी लूट सापडली त्याचा ठराविक हिस्सा सरकारात जमा करून बाकीची लूट त्यानांचा ठेवून घेण्याचा अधिकार असल्याने शिलेदार म्हणून सेवा करण्यांस तत्पर असत. पण तेव्हांचे सरदार पगारी सैनिक फारसे कोणी पदरी ठेवत नसे; तर स्वारीच्या वेळेस सोबत घेत जी काही लूट मिळेल ती घ्यायची मुभा देत असत.

पेशवे आपल्या सर्व फौजेसह दिल्लीच्या आसपास पोंचल्यानंतर तेथील एका महालकऱ्याशी त्यांचा खंडणीचा ठराव झाला. त्याशीं ठरलेल्या करारांत असें एक कलम होतें की, पेशव्यांच्या फौजेनं त्या महालांतील उभ्या पिकास इजा पोहचू नये. परंतु मल्हारराव होळकरांच्या घोड्यांस वैरण वा चारा नसल्यामुळें त्यांनीं आपल्या स्वारांकडून शेजारील शेतातील पीक कापून आपल्या घोड्यापुढे आणून टाकले. ही घटना पेशव्यांच्या कानी गेली. तेव्हा बाजीराव स्वत: हे कृत्य कोणी केले ते पाहण्यासाठी पुढे सरसावले त्यावेळी ते घोडे व ती वैरण दिसली. तेव्हा बाजीरावांनी मल्हाररावांच्या एका बारगीरास काठी मारली. तेव्हा मल्हारराव आपल्या राहुटीच्या तोंडाशी चऱ्हाट वळीत बसलेले होते. त्यांनी हे पहाताच त्यांना राग अनावर न झाल्याने कशाचीही पर्वा न करता तेथूनच शिव्या देत; रानातील मातीचा ढेकुळ बाजीरावांच्या दिशेने भिरकावित म्हणाले की, 'आम्हास काय रोजमुरे देऊन भागलास म्हणून काठया मरतोस.'[२२]

बाजीराव काहीही न बोलता ते सरळ आपल्या राहुटीकडे निघून गेले. बाजीराव आपल्या वडीलांस हा सारा प्रकार सांगत म्हणाले की, 'परदेशांत आपली फौज जर अशी बेबंद व बेहूकमी वागूं लागली तर पुढें कसा परिणाम व्हावा?'[२३] त्यावर दोघांत विचार विनिमय होऊन उद्या सकाळी मल्हारराव होळकरास लुटण्याचे ठरविले. हे वृत्त मल्हारराव समजताच त्यांनी आपल्या सर्व बारगीरांस बोलावून आपल्याविरोधी होत असलेल्या कार्यवाहीबद्दल सांगून म्हणाले की, 'ज्याला मजबरोबर राहून मरावयाचें असेल त्यानें येथें रहावें, व ज्यास हें पसंद नसेल त्यानें आतांच निघून जाऊन आपला बचाव करावा.'[२४] त्यावेळी काही बारगीर मल्हाररावांस सोडुन निघून गेले. तर बाकीचे वीस–बावीस स्वार मल्हाररावासोबत राहून लढा देण्यास तयार झाले. त्यानंतर पुढचा कट केला. त्यानुसार त्यांनी आपल्याकडील घोडी होती ती लष्करात सोडून दिल्ही. खोगिरे राहूटया वगैरे जाळून, अंगास राख लावून, ढाल, तरवारीनिशी, मागे टेकडी होती त्या टेकडीवर जाऊन बसले.[२५] त्यावेळी

एक सरदार मल्हाररावास आधार देण्यासाठी गुप्त संदेश पाठविला की, 'हिंमत सोडूं नको, तूं खुटेकर आणि मी हटकर दोघेही धनगरांचे बीज आहों, आज तुझी वाट तीच उद्यां माझी वाट, सबब मी तुला सामील आहें,'[२६] काही मराठा सरदार पेशव्यांकडे जावून सल्ला मसलत चालु होती त्यातील एका सरदाराने पेशव्यास म्हणाले की, 'आपण सरदारी करुं पहातां आणि पदरच्या शिपायांची बरदास्त तर या प्रकारची! त्यांच्या घोड़यांस ना दाणा ना वैरण! बरें त्यांनीं स्वत: मिळविली, तर त्यांस शिक्षा करितां, आणि लुटून घेण्याचा विचार करितां! वा:! अशानें वेल कसे मांडवास जातील? जो तुम्हांस ढेंकूळ मारावयास चुकला नाहीं, तो तुमच्या शत्रूचा प्राण घ्यावयास चुकेल काय? ह्या त्याच्या अंगच्या साहसाची योग्यता जाणून त्याची बूज करावयाचें सोडून उलटा त्यास लुटून घेण्याचा विचार केलात? अहो, आपल्या फोजेंतील पांच पंचवीस स्वार लुटून घेण्यात लैकिक आहे, किंवा त्यांची चांगली बरदास्त राखून त्यांच्याकडून शत्रूस लुटवून घेण्यांत लौकिक आहे, हा तरी कांहीं विचार करा! एरव्हीं तो (मल्हारराव होळकर) तर मरावयास सिद्धच झाला आहे! कदाचित् त्याचे इतर जातवाले धनगर जर त्यास सामील झाले तर मग कसा परिणाम होईल?'[२७]

पेशवे बाळाजी विश्वनाथ यांना त्या सरदारचे म्हणणे पटले. तेव्हा त्यांनी मल्हाररावास लुटण्याचा निर्णय रद्द करून तो धनगर सरदार म्हणजेच पांढरे सरदार यांच्या मध्यस्थिने पेशव्यांनी जे जे अंगास राख लावून बसले होते त्या रागावलेल्या सोबत्यांची समजुत काढून तितक्यास वस्त्रे देऊन घोडी ज्या ज्या गोटांत गेली होती. तेथून जमा करुन मल्हारजीच्या स्वाधीन केली.[२८] या शिवाय मल्हाररावांना संरजामा करीता वीस हजार रूपये दिले. या रूपयातून त्यांने पंचेविस घोडे स्वारावरून सव्वाशे घोडे स्वारांचे पथक तयार केले. म्हणजेच आपल्या टोळीत दिल्लीस जाताना फक्त २५ घोडयांचा मालक आता त्यात भर पडून ५०० घोडयांचा स्वामी बनला होता.[२९] मल्हारराव होळकर यांनी युध्दात मिळालेल्या सरंजामानिशी घरी पत आल्यावर मामा भोजराजकडे ती सादर केली ऐवढा मोठा परक्रम पाहुन भोजराज खुष झाले. कंठाजी कदम बांडे यांच्याकडे पंचविस घोडे स्वाराचे मनसबदार बनले. वयाच्या सतराव्या वर्षी खानदेशातील अणकाईचा किल्ला जिंकताना पराक्रम दाखविला.[३०]

**२.३.१.३ विवाह:**

मामा भोजराज बारगळ यांनी पुढे काही काळात स्वत:ची मुलगी गौतमबाईचा विवाह मल्हाररावांसोबत करण्याचे ठरविले. पण पत्नी मोहिनाबाईने त्यास नकार दिला तरीही भोजराजनी पुढील भविष्याचा विचार करून स्वत:च्या पत्नीच्या विरोध बाजूला ठेवून स्वत:ची एककुलती एक लाडकी मुलगी गौतमाबाईचा विवाह भाचा मल्हारीशी लावून दिला. त्यांचे लग्न, जेष्ठ शुद्ध १३ झाले होते.. वधूचें नाव गौतमाबाई. वधुवराचे वयांत सव्वा वर्षाचे अंतर. वराचें वय ८ वधूचें वर्षे ६ महिने ९.असे होते.[३१] तसेच मल्हाररावांना गौतमाबाई शिवाय इतर तीन बायका होत्या. म्हणजेच गौतमाबाई, व्दारकाबाई, बनाबाई व हरकुबाई अशा चार बायका

होत्या. गौतमाबाई या धैर्यवान, साहसी, चतूर, स्पष्ट वागणारी, हूशार, दयाळु व राज्यकारभाराची जाणीव असलेली बुध्दीमान स्त्री होती.

**२.३.१.४ बढवणीच्या संस्थानिकांकडे नोकरी:**

भाच्यांशी आपल्या मुलीचा विवाह सोहळा पार पाडला. तरीही या विवाहास भोजराज यांच्या पत्नीचा मोठा विरोध होता. शिवाय विवाह नंतर या रोजच्या कटकटीस कंटाळुन व मल्हारराव होळकरांचा स्वभाव हा तापट व स्वाभिमानी असल्याने कदमबांडेशी पटेनाशी झाले. मामा भोजराज बारगळ व कदमबांडे यांच्या संमतीने मल्हाररावाने बडवनीचा शासक मोहनसिंग यांची नोकरी पत्करली. नर्मदा नदी काठी असलेले रांगड सस्थांनिक बढवणीकर याच्या पदरी मल्हारराव होळकर नोकरी स्विकारली. इ. स. १७२० ते १७२१ च्या दरम्यान मल्हारराव होळकर आपल्या फौजेच्या उदरनिर्वाहासाठी मोहनसिंग राणे या बढवणीच्या संस्थानिकांकडे गेले होते. तिथे गेल्यावर त्यां संस्थांनिकांनी आपल्या बडवणी संस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी सोपविलेली होती. त्यावेळी मोहनसिंग व बाजीराव यांत संघर्षाचा वातावरण निर्माण झाले. तेव्हा मराठयांनी मोहिम हाती घेऊन ते बडवणीच्या दिशेने निघाले. त्यावेळी पेशव्यांने बढवणीला वेढा दिला असता सुमारे दीड हजार फौजेनिशी मल्हाररावांनी पेशव्याच्या फौजेचा धुव्वा उडवला. मल्हारजीमुळे लढाईचा शेवट लौकर होईना.[३२] तेंव्हा शेवटी बाजीरावाने मल्हाररावास पत्र पाठवून उभयपक्षी तहाची मुखत्यारी मल्हाररावांस दिली. ‘उभयपक्षीं मुखत्यारी तुमचीच आहे! खंडणीचा ठरावा करुन फौजेची रवानगी करुन द्यावी.’[३३] असे पत्र आल्याने मल्हाररावानी पुढाकार घेऊन मल्हारजींनी पेशव्यांचे वर्चस्व राखून दोन्ही पक्षास मान्य होईल असा तह घडवून आणला. त्यानुसार दोघांतील मतभेद मिटविले. मल्हाररावांनी या तहातून यापुर्वीच्या पेशव्यांच्या सेवेतील ऋणाची फेड म्हणून त्यांनी मालक बडवणीकर व पेशवे यांच्यात मध्यस्थी करण्याचे मान्य करून चालाखीने पेशव्यांचे वर्चस्व मान्य करून त्यांस युध्दचा खर्च व खंडणी देण्याचा उभयतामध्ये यशस्वी तोडगा काढल्याने मल्हारावावर पेशवे खुश झाले.

मल्हररावांनी तसा तह करुन घेतला व पेशव्याच्या फौजेची रवानगी केली. ही मल्हाररावांची कर्तबगारी पेशव्यांचे नजरेंत भरली आणि पेशव्यांनी बहुमानाने त्यास आपलेकडेस वळविले.[३४] ती मल्हाररावांची चतुराई पाहुन बाजीराव पेशवे यांनी मल्हाररावांस स्वराज्याचे सरदार व्हावे असे सुचविले. म्हणजेच बाजीराव व मल्हारराव यांच्यातील हा उभयपक्षी करार होता. याचा अर्थ मल्हारराव होळकर हे इ. स. १७२५ पर्यंत माळव्यात स्वतंत्रपणे आपल्या सैन्यासह वावरत होते. मल्हारराव होळकर हे पेशव्यांच्या नोकरीत सामील झाले.

### २.३.१.५ पेशव्यांच्या लष्करात प्रवेशः

मल्हारराव होळकरांनी बडवणी येथे केलला करार व दाखविलेला हुशारी व पराक्रम पाहुन स्वत: बाजीरावास मल्हाररावांसारखा हुशार व कर्तबगारीचा मोहरा आपल्या दौलतींत असला पाहिजे. असे वाटू लागले. तेव्हा त्यांनी मल्हाररावोस पत्र पाठवून कौतुक करून मल्हाररावास निरोप पाठवून आपला मनोदय कळविला. 'तुम्हांस पदरीं ठेवण्याचा आमचा उद्देश आहे! व त्या संबंधानें बोलावयाकरितां तुम्हांकडील एकादा मुखत्यार कारकून पाठवून द्यावा,' असा संदेश खास हेरामार्फत पाठविला. तेव्हा मल्हाररावांनी पेशव्याना कळविले की, 'आम्ही आमचे मामा बारगळ यांचे अंकित आहों, आपण त्यांजपासून आम्हांस मागून घेतल्यास आम्ही आपली सेवा करण्यास हजरच आहें.'[३५] तेव्हा बाजीरावांनी बाळोजी बाबा प्रभु सारख्या मोठ्या शहाण्या व इभ्रतदार कारकुनास मामा भोजराजकडे पाठवून मागून घेतले.

मल्हारराव होळकर व पेशवे बाजीराव हे दोघेही अतिशय बाणेदार स्वभावाचे होते. त्यात मल्हारराव कडक शिस्तीचे व अत्यंत उदार मनाचे सर्वांशी मिळते जुळते घेणारे एक मायाळू सुभेदार होते. अशा या शूर सरदाराने जे राज्य मिळवले. ते स्वत:च्या तलवारीच्या जोरावर! मल्हाररावांच पेशव्यांच्या दरबारात मानाचं स्थान होतं. दरबारात त्यांची वचक होती. पेशव्यांना ते घरातील वडिलधाऱ्या माणसांसारखे वाटायचे. काही उघाडणी केल्याचे इतिहासात अनेक पूरावे मिळतात.

### २.३.१.६ पाचशे घोडेस्वारांचा प्रमुखः

उत्तरेत स्वराज्याचा विस्तार करायचा असेल तर मल्हाररावासारख्या दूरदृष्टीच्या मुत्सद्दी सरदारचा मोठ उपयोग होईल अन्यथा स्वत: मल्हाररावच उत्तरेत स्वतंत्र बस्तान बसवेल असे बाजीरावाला वाटत होते. कारण बाळाजी विश्वनाथांच्या उत्तर स्वारीत मल्हारराव स्वतंत्र पथक म्हणून सामील झाले होते. मल्हाररावांच्या लग्नानंतर बाजीरावाने त्यांना स्वत:च्या सैन्यात सामील करून घेतले. मराठा पेशवा यांनी मल्हाररावांस पाचशे घोडेस्वारांचा प्रमुख बनले. बाळाजी विश्वनाथाच्या कारकीर्दीच्या अखेरीस मल्हाररावाने उदाजी पवार यांच्या मदतीने माळव्याचे राजकारण सुरू केले होते.

पेशवेपदी बाजीरावांस नियुक्त करू नये. यासाठी दरबारातील वयस्क व मातब्बर मंडळीने विरोध केला. तेव्हा भट घराण्याच्या सेवेचा विचार करुन बाजीराव बल्लाळ यांस पेशवे पदाची वस्त्रे १७ एप्रिल, १७२० रोजी छत्रपती शाहु महाराजांकडून दिली गेली.[३६] पेशवे बाजीरावांनी सर्व जुन्या सरदारांचे कायमचे उच्याटन करण्यासाठी जाणीवपुर्वक नव्या समविचारी, पराक्रमी व एकनिष्ठ असणाऱ्या नव्या तरून सरदारांस व सुभेदारांस आपल्या भोवती जमा केले. त्यात मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, उदाजी पवार होते. मल्हाररावासारखा धाडसी, पराक्रमी स्वाभिमानी स्पष्ट वक्ता असलेला पेशव्यास एक चांगला हिरा मिळाला. जो की पेशव्यांचा उजवा हात मल्हारराव होळकर व डावा हात राणोजी शिंदे हे

लाभलेले होते. एवढेच नव्हे तर चिमाजी अप्पाच्या प्रत्येक स्वारीत मल्हारराव होळकर नेहमी राहत असत.

**२.३.१.७ मल्हाररावांची बढती:**

श्रीमंत बाजीराव पेशवे यांच्या सेवेत आल्यानंतर पहिली मोहिम निघाली खानदेशावर हल्ला करून अजीमउल्लाखानचा सरदार दाऊदखानचा दारून पराभव केला.. या युध्दात मल्हाररावांनी पराक्रम गाजवुन ही मोहिम फत्ते करून परत आले. इ. स. १७१७ च्या स्वारींत दिलेलें वचनही पूर्ण केलें पाहिजे असें बाजीरावांस वाटून त्यांनी मल्हाररावांस छत्रपती शाहू महाराजांच्या परवानगीनें इ.स. १७२५ त चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वंशपरंपरा वसूल करण्याविषयीं व मोकास बाबीपैकीं अर्धा महसूल सेनाखर्चाकरितां घेण्याविषयींची सनद करुन दिली.[३७] त्यानुसार मल्हारराव माळव्यात इ. स. १७२८ पर्यत हा हक्क वसूल करीत तेथेच राहीले. असे यावरून स्पष्ट होते.

'स्वराज्याचे कार्य करीत असताना अलमपूर येथे कानाच्या व्याधी होवून २० मे १७६६ ला मंगळवारी सुभेदारांस देवाज्ञा झाली.[३८] पेशवे माधवराव यांनी २ जून १७६६ रोजी सुभेदारांच्या पश्चात त्यांच्या छत्रीसाठी दिलेली सनद— मालजी होळकर यांजकडे छत्रीचे खर्चाकरितां इनाम गांव दिल्याबददल सनद बार आहे. छत्री मौजे मल्हारनगर उर्फ अलंमपूर परगणे बेरछा येथे आहे तेथें सदावर्ताचे वगैरे खर्चाबदल इनाम गांव.

१७५०१ परगणे बेरछा पैकी गांवे ११

७,००० परगणे दतियापैकी गांव ३

३,००० परगणे भांडरपैकी एक गांव १

.............. ,

२७५०१

नूतन इनाम दरोबस्त कुलबाब कुलकानू म्हणोन सनद.[३९]

सुभेदार मल्हारराव होळकरांचा बांधा भारदस्त पाणीदार डोळे, सरळ नाक, रुंद छाती असलेले शरीर यष्टीचे होते. त्यामुळे भव्य चेहरा व दिसण्यास गंभीर वाटत होते. मल्हारी लहान वयात असतानाच अतिशय चपळ व तलक होते. आजोळी राहून मामांचे मेंढरे रानात चारायला घेऊन जात असताना तो मामाच्या पागेत घोडयाची देखरेख करुन आपले जीवन सुरु केले, बघता बघता सैन्यात नोकरी करीत करीत जाऊन सुभेदार पदापर्यंत पराक्रमाने पदे हस्तगत केले. एवढेच नाही तर मेंढरे रानात राखता राखता त्यांना मनगटाच्या जोरावर उत्तरेत दिल्ली बादशहावर वर्चस्व निर्माण करुन अटकेपार झेंडे लावण्या ऐवढे अफाट शौर्य दाखविले. मल्हाररावानी चार पेशव्याची प्रदीर्घ जवळपास पन्नास वर्ष म्हणने अर्धे शतकभर तळपत्या तलवारीची साथ देऊन पाहिलेली होती.

## २.३.२ गौतमाबाई होळकर

तेजस्वी गौतमाबाई या खानदेशातील तळोदे गावच्या भोजराज बारगळ चौगुले यांची कन्या होती. म्हणजेच गौतमाबाईच्या वडीलांचे नाव भोजराज बारगळ व आईचे नाव मोहिनीबाई बारगळ असे होते.[४०] आई मोहनाबाई यांच्या पोटी तेजस्वी कन्या 'गौतमाबाई' यांचा जन्म १६ जून १६९४ ला झाला.[४१] त्यांचा विवाह मल्हारराव होळकर यांच्या झाला. गौतमाबाई या धैर्यवान, साहसी, चतुर, स्पष्ट वागणारी, हुशार, दयाळु व राज्यकारभाराची जाणीव असलेली बुध्दीमान स्त्री होती.

मराठा राज्यात एकमेव होळकर घराण्यात वा होळकर शाहीतच खाजगी स्वरुपाच्या संपत्तीचा अधिकार पेशव्यांनी बहाल केलेला होता. बाकीच्या मराठा सरदारांना वा सुभेदारांना केवळ सरंजामी संपत्तीचा अधिकार देण्यात आलेला होता. होळकर राज्यात या खाजगी संपत्तीवर केवळ त्या घराण्यातील कर्त्यापुरूषाच्या पत्नीचा अधिकार होता. धनगरी रितीरिवाजानुसार जी काही दिवसभराची कमाई होईल, त्यापैकी ठराविक हिस्सा पत्नीस खास स्त्रीधन म्हणून दिले जाई. आपले बरेवाईट झाले तर कुटुंब उघड्यावर पडू नये ही दूरदृष्टी ठेवून मल्हाररावांने पेशव्याला विनंती करुन पत्नीच्या नावाने जहागीर मिळविली. ही जप्त होण्याची शक्यता नव्हती.[४२]

बाजीराव पेशवे यांनी मल्हारराव होळकरांचे युद्ध मोहिमातील धडाडीचा पराक्रम पाहून चिमाजी अप्पानी शिफारस केल्यानुसार केवळ होळकर घराण्यातील सुभेदारांच्या पत्नीस वंशपरंपरागत देऊन योग्य सन्मान केला. पत्नी गौतमाबाई यांच्या नावे पेशव्यांकडून 'खाजगी जहागीरीची सनद' इ. स. १७३४ ला बाजीरावाने आपल्या अनेक सरदारापैकी केवळ एकमेव होळकर संस्थानांतील मल्हारराव होळकर यांनाच खाजगी जहागीर दिली.[४३] त्याचे उत्पन्न सात लाख रूपये आहे. खाजगीची जहागीरी देण्यासाठी खास पत्र पाठवून सौ. गौतमाबाईना इनाम देण्यासाठी सनद व मानाची कपडे पाठवून दिले. ते पत्र पुढील प्रमाणे आहे.

...तुम्हास लिहिण्यांत येतें की तुमचे ताब्यांत खाजगी व दौलत असे दोन्ही पथक कायम करुन तुमचे कुटुंब सौभाग्यवती गौतमाबाईचे नावे इनाम देऊन सनद व कपडे पाठविले आहे तरी खाजगीकडेस इनामी तालुके निरंतर चालविणे तपशील येणें प्रमाणे :—

| | |
|---|---|
| २६३००० | प्रगणे महेश्वर, चोळी व प्रगणे इंदूर, प्रगणे हरसोला, प्रगणे सावेरपैकी बरलाई तालुका परगणे देपाळपूरपैकी तालुके हातोद परगणे महदपूरपैकी तालुके जगोठी व करंज माकडोन वगैरे बरहुकूम यादी मखलसीची. |
| ३६०१०-१०-० | दक्षिणप्रांती चांदवडपेकी गांवे व अबांडपैकी कोरेगांव वगैरे मोंगलाई कडील बरहुकूमयाद. |
| २९९०१०-१०-० | एकूण इनाम कुलबान कुलकानुगांवे दरोबस्त खासगीकडेस नेमून दिले |

आहे. तरी निरंतर उपभोग घेऊन नवीन सनदेची अक्षेप न घेणे जाणिजे.[४४]

श्रीमंत पेशव्यांनी २० जानेवारी १७३४ मध्ये मल्हाररावांच्या विनंतीला मान देऊन गौतमाबाईना एका सनदेद्वारे तीन लाख रुपयांचा प्रदेश कायमचा इनाम म्हणून वंशपरंपरागत दिलेला होता. त्यामुळे खाजगी कोषाचीही स्वतंत्र व्यवस्था केली. महाराष्ट्रातील चांदवड नासिक अंबाड, कोरेगांव, धुळे, अजिंठा तर माळव्यातील इंदौर, महेश्वरी, चोळी, देवालपूर, महिदपूर, महरोन, हरसोल वगैरे तालुक्यांची जहागिरी दिली. त्यांची व्यवस्था त्यांनी उत्तम ठेवली. तसेच दिल्लीच्या बादशहाकडुन खंडेरावास व गौतमाबाईच्या नावे सनद दिलेल्या होत्या. १ परगणे वेरुळ येथील पातशाही फरमान सौ. गौतमाबाई यांचे नावें आलमगीर— शाही सनद...[४५] सुभेदार मल्हाररावांस सतत विविध युद्ध मोहीमावर गेल्यास इन्दौर राज्याचा खाजगी व सरकारी कारभार गौतमाबाईच अहिल्याबाईच्या मदतीने पाहत असत. खंडेराव या एकलत्या एक मुलाने आपल्या पित्याप्रमाणे शूरवीर व्हावे व आपला नाव लौकिक मिळवावा असे वाटत असे. सौभाग्यवती गौतमाबाई होळकर यांनी वेरुळ येथील श्रीघृष्णेश्वर या ज्योतिलिंगाचे मंदिराचा जिर्णोध्दार केला.[४६]

तसेच त्या पुरुषाला उपस्त्रिया असतील तर, त्यांना ही मिळलेला धर्म ह्या खाजगीत आपोआप आले. या व्यतिरिक्त मकरसंक्रांत व दसरा इत्यादी सणाच्या निर्मीत्ताने अहिल्याबाईंना प्रत्येक वर्षी चोळीसाठी म्हणून एक लाख तेरा हजार आठशे रुपये मिळत होते. हे सर्व स्त्री धनाचाच भाग होता. म्हणून ते सुध्दा खाजगीतच जमा केले जात होते. तर खाजगी दौलत स्त्रीधनाचाच भाग व संपत्ती असल्याने त्याचा विनियोग हा स्त्रीच्या इच्छेप्रमाणे केला जात होता. पुढे या खाजगी दौलतीस 'अहिल्याबाईची गादी' म्हणून ओळखले जात होते.[४७]

होळकर राज्यातील या दोन प्रकारच्या कोशाचे स्वतंत्र व चोख हिशोब ठेवला जात होता. संरजामी संपत्तीचा उपयोग हा पेशव्यांची दौलत, व फौज सांभाळण्यासाठी खर्च केला जात होता. तत्कालीन मोडी लिपीमध्ये खाजगीचा हिशोब ठेवला जात होता. त्याच खाजगीच्या उत्पन्नातून मातोश्री अहिल्याबाईंनी संपूर्ण भारतभर मंदिर, घाट, विहीरी, सदावर्ते व छत्री उभारुन जनकल्याण साधण्याचा प्रयत्न केला.

त्यांनी आपल्या नव सूनेवर आपल्या मुलीप्रमाणेच प्रेम करीत होत्या. त्यांनी आपल्या सुनेला सर्व बाबींची शिकवण दिली. गौतमीबाईने अहिल्याबाईनां आपल्या तालमीत तरबेज केले. त्याच प्रमाणे अहिल्याबाईला आदर्श प्रशासिका बनविण्यात गौतमीबाईचा व सुभेदार मल्हारराव या दोघांचा सिंहाचा वाटा होता. त्याचप्रमाणे गौतमाबाई मल्हाररावांच्या पाठीमागे समर्थपण उभ्या होत्या. त्यांनी समर्थपणे त्यांना साथ दिली राज्य कारभारात युद्ध मोहिमात, युद्ध मोहिमात आणि कौटुबिक सुख—दुःखाच्या प्रसंगी त्यांनी खांद्याला खांदा लावून मल्हाररावांना आधार दिला. प्रत्येक प्रसंगात हिम्मत आणि ताकद दिली. आयुष्यात भिती हा शब्द माहित नसणाऱ्या मल्हाररावांना प्रचंड धाडस दिले. अनेक संकट विमोचनाप्रसंगी

मल्हाररावांना महत्वाचे सल्ले दिले. परगणे इंदूरी मौजे पिंपळयाराव येथे सौभाग्यवती गौतमीबाईचा २१ सप्टेबर १७६१ काळ झाला.[४८]

### २.३.३ हरकुॅवरबाई होळकर:

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी अवंती नगरातील क्षिप्रा नदीच्या काठची हरकॅुवरबाई मोहिमे दरम्यान पाहिले असता त्यांना ती आवडली. त्यामुळे श्रीमंत बाजीरावा पेशव्यांनी या हरकुॅवरबाईचे मल्हाररावांच्या तलवारीशी लग्न लावून दिले. या रजपुत स्त्रीचा ‘खांडराणी’ म्हणून मल्हाररावांनी स्विकार केला.[४९] सुभेदार मल्हारराव होळकर यांना हरकॅुवरबाईपासून भारमलदादा नावाचा पुत्र झाला.[५०] स्वत: हरकुॅवरबाई या नेहमी सुभेदारासोबत युद्ध मोहिमावर जात असत. शिवाय त्या सून अहिल्याबाई च्या दैनंदिन देवपुजा कार्यात भारमलदादासह मोलाची मदत करीत असत. तसेच हरकुॅवरबाई व मुलगा भारमलदादा यांनी होळकर शासकांना व कुटुंबातील तुकोजीराव, यशवंतराव यांच्या कारकिर्दीपर्यत मोलाची मदत केली. त्यांना सर्वजण ‘मावशीबाई’ म्हणत.[५१] होळकर दौलतीविषयी सर्वजण त्यांच्याशी सल्ला मसलत करीत असत. शिवाय त्या सर्वाशी मोठया सहकार्याने व प्रेमाने वागत असत. त्यांचा अहिल्याबाईला खूप मोठा आधार होता. कारण त्यांनी गौतमाबाईपासून यशवंतराव होळकर पर्यतच्या सर्व राज्यकर्त्यांचा कारभार पाहिला असल्यामुळे त्यांनी सर्व होळकर शासकांना मदत केली. त्यांच्या प्रदीर्घ अनुभवाचा फायदा होळकर संस्थानाच्या शासकांना प्रशासनात झाला.

### २.३.४ भारमलदादा होळकर:

सुभेदार मल्हारराव होळकर व हरकुॅवरबाई यांच्या पोटी भारमलदादा यांचा जन्म झाला. भारमलदादा हे दासीपुत्र असल्याने राजधराण्यांत प्रवेश झाला. त्याने अहिल्याबाईचा आपल्या सचोटीने विश्वास संपादन केला. धार्मिक कृत्यात व व्रतात उजवा हात बनून देवपुजेची अनेक कामे करण्यात पटाईत असे. अहिल्याबाईचे हे नात्यांनी दीर असल्याने देवपुजेची सर्व तयारी दररोज करीत असत. त्याचप्रमाणे तो शूरही होता. यांनी होळकर दौलतीवरील सर्व संकटाना सामना करण्यासाठी त्या त्या होळकर शासकांना भरीव अशी मदत करीत असत. अहिल्याबाईच्या कारकिर्दीमध्ये चोर व लुटारुनी गावे उध्वस्त करून सामान्य रयतेस मोठा अन्याय सहन करावा लागत होता. तेव्हा मातोश्रीने यांस पाठवून दिले असता त्यांचा उपद्रव थांबवून तेथे शांतता स्थापन करुन लोकांची भरपाई करुन दिली. अहिल्याबाईने घरातील सर्व लहानापासून ते मोठ्या माणसांची व्यवस्था पाहण्याची जबाबदारी याच्यावर सोपविली. तसेच नातू नथ्याबाच्या आजारात यांनी व भारमलदादांने मानवी उपाय आपल्या जबाबदारीवर केले. होळकर कुटुंबातील व्यक्तीचा तो दादा होता. महेश्वर येथील राजकारभाराचा सुत्रधार होता. गृहकलहात न गुंतता आपली काम साभाळीत असत. यशवंतरावाने नेमाड जिल्ह्याचे काम सोपविले. तेव्हा मालकाचा विश्वास व प्रजेचे प्रेम

संपादन केले. महेश्वर येथे कमाविसदाराचे काम करीत होते. इ.स. १८१८ मध्ये ब्रिटिशांशी तह झाला. तेव्हा माल्कमला पुरातन व ऐतिहासिक माहिती पुरविली होती. शंभर वर्षाच्या काळात कोठेही फटका न लागता अखेरपर्यंत सुरक्षित राहून शंभराव्या वर्षी सन १८२८ ला निधन झाले.[५२]

### २.३.५ खंडेराव होळकर:

सुभेदार मल्हारराव व गौतमाबाई यांच्या पोटी खंडेराव होळकरांचा जन्म अश्विन शुद्ध १० संवत १७८० म्हणजेच इ.स. ०२ जानेवारी १७२३ झाला.[५३] त्याचे लग्न अहिल्याबाईशी संवत् १७९४ त झाले. म्हणजेच ता. २१ मार्च सन १७३८ रोजी. त्यावेळी वधूचे वय ८ आठ वर्षाचें.[५४] खंडेरावांना अहिल्याबाईंशिवाय दहा बायकां होत्या. म्हणजेच खंडेरावाचे अहिल्याबाई सोडून अनेक बायकांशी लग्न झालेले होते. हे इ.स. १७५५ च्या पत्रावरून हे स्पष्ट होते. त्यां स्त्रियां व नाटकशाळा व त्यांची माहेरची नावे पुढीलप्रमाणे आहेत.

**३ लग्नाच्या बायका व त्यांची नांवे,**

१ अहिल्याबाई शिंद्याची कन्या

१ पार्वतीबाई गावडयाची कन्या.

१ सुरत कुंबरबाई आलीमोहन राजाकडील,

**७ उपस्त्रिया, नाटकशाळा, खांडाराण्यावगैरे,**

१ पोपाबाई, १ राजकुंबरबाई, १ प्रेमकुंबरबाई, १ रामकुंबरबाई, १ सुंदरबाई,

१ गंगाबाई, १ कुंबारवाई, १ साहेब कुंबर रामजनी, १ नाखूबाई दिल्लीची.

एकूण बाराजणी, हयापैकी अहिल्याबाई खेरीजकरुन अक्राजणी सती गेल्या. कुत्री गुलबदन चिंतेंत उडी टाकून मेली.[५५]

मल्हारराव व गौतमीबाई या दोघासारखा अहिल्याबाई व खंडेराव यांचा जोडा नव्हता. इंदौर येथे सुभेदार मल्हारराव होळकर व सासू गौतमीबाई यांच्या प्रेमळ मार्गदर्शनाखाली व पती खंडेराव यांच्याशी अहिल्याबाईचा भावी सुखी संसार सुरू झाला. अहिल्याबाई प्रेमळ, नम्रता, विनयता, सदगुणी, सुस्वाभावी व कुशाग्र बुध्दीमतेचे वरदान लाभलेली होते. पण खंडेराव थोडेसे स्वच्छंदी जीवन जगणारे होते. लहानपणापासून खंडेराव रंगरंगणावर वाढल्यामुळे त्यांना युद्धाचे डावपेच चांगले जमत होते. वीर खंडेराव हे एक योध्दा, वीर सैनिक व चांगलेच तलवार बहाद्दर होते. खंडेराव यांना अहिल्याबाईपासून दोन अपत्य झालेली होते. **इ. स** १७४५ मध्ये मुलगा झाला**.** मल्हारराव यांनी त्याचे नाव 'मालेराव' असे ठेवले. तर सन १७४८ मध्ये त्यांना मुलगी झाली**.** तिचे नाव 'मुक्ताबाई' असे ठेवले.[५६]

#### २.३.५.१ उंचवडीची जहागिरी:

खंडेरावाच्या पराक्रमामुळे पेशव्यानी रा. मल्हारजी होळकरांचा पुत्र खंडेराव होळकर सीतसलासीन मयादअलफ, (राजमंडळ पुणें)

१ खंडेराव होळकर यांस जाहगीर मोकासा दिल्याबद्यल पत्रें:—

१ सनद, मौजे कोरेगांव तालुके पाबळ प्रांत जुन्नर.

१ सनद मौजे उचवडी तालुके सांडस प्रांत पुणे येथील मोंगलाई बाबती, व सरदेशमुखी व साहोत्रा, कुलबाब कुलकानु दरोबस्त सालमजकुर पानोस.[५७]

श्रीमंत पेशवे बाजीराव यांनी १५ ऑगस्ट १७३५ रोजी खंडेरावांना त्यांच्या शौर्याचा गौरव म्हणून कोरेगाव उचवंडी या गावाची जहागीर मोकास व सरदेशमुकी हे अधिकार श्रीमंत पेशव्यांनी बहाल केले व अठरा तोळयाचे सोन्याचे कडे भेट म्हणून दिले. या पत्रावरून असेही स्पष्ट होते की, मल्हारराव होळकर यांचे सुपुत्र खंडेराव होळकर यांस वरील जहागिरी देऊन त्यांच्या पराक्रमाचा उचित सन्मान केलेला होता. तसेच २६ जानेवारी १७४० ला मध्ये खंडेरावास शिलेदाराची वस्त्रे दिली.

शिवाय इ.स. १७४४ साली बुंदी राजांच्या प्रकरणात मल्हाररावासोबत खंडेरावांनी मदत केल्यामुळे उमेदसिंगानी बक्षिस म्हणून परगणे लाखेरी येथील सनद खंडेरावाच्या नावावर केलेली होती.[५८] म्हणजेच खंडेराव हे रणांगणांवर जाताच शत्रूंना भारी पडणारे होते. यावरून खंडेरावांच्या अंगी शूरत्व असल्याशिवाय बाजीराव त्यांचे असे कौतुक केलेले नसते. फक्त त्यांना वाईट संगतीने ते बिघडलेले होते.

### २.३.५.२ जयपूरचे वारसा युध्दः

ईश्वसिंग व दुसरा माधोसिंग त्याच्यात जयपूरचे वारसा युद्ध सुरू झाल्याने मल्हारराव होळकर यांनी वीर खंडेरावांस माधोसिंग जगतसिंग यांच्या मदतीसाठी पाठविले दिले. वारसा हक्काबद्दल भांडणे सोडविण्याची ऐपत पुत्र खंडेराव यांच्याकडे होती. म्हणजेच वीर खंडेराव होळकर हे सारासार विचार करून वर्तन करणारे होते. हेच यातून दिसून येते. ईश्वरसिंगाने लढाईची तयारी केली तेव्हा ईश्वरसिंगाचा सेनापती नारायणदास याने तडजोडीचा सल्ला दिला. राणाजीचा निभाव लागणार नाही. मराठयांशी वैर करू नये. खंडेरावांनी जरी वडीलांच्या सांगण्यावरून माधोसिंगाची बाजू घेण्यासाठी या वारसा युध्दात प्रवेश केला असला तरी त्यांनी हा प्रश्न सोडविलेला होता.

२३ जून १७५३ रोजी दामोदर महादेव यांना खंडेराव होळकर यांनी हे पत्र पाठवून कळविले की, राजश्री विजेसिंग खत्री यांसी श्रीकाशीस राजश्री बळवंतसिंग राजे यांजकडे पैक्याच्या तहसिले निमित्य पाठविले आहेत. त्यास तुम्हापासी येतील. तरी नबाब मनसूरअल्ली याजकडील रोजिन्याचें दस्तक यांस करवून देवविणें आणि खावंदचाकरी जलदीनेंकरुनयेत तो अर्थ करणे.[५९]

### २.३.५.३ दिल्ली बादशहाकडून बक्षीसः

जयपूर वारसा प्रश्न निकालात काढल्यानंतर मल्हाररावांनी खंडेरावाना दिल्लीच्या स्वारीवर पाठविले. त्यानुसार खंडेराव होळकर यांनी दिल्लीकडे आपला मोर्चा वळविला.

बादशहाने दिल्लीस लुटीपासून वाचविण्यासाठी खंडेरावांकडे विनंती केली. त्यामुळे १ मार्च १७४७ ला दिल्लीच्या बादशाहाच्या भेटीसाठी खंडेराव गेले. बादशहाच्या वतीने वजीराने खंडेरावांना खिल्लत मानाचे वस्त्रे नजराना व बावीस हजार सोन्याच्या अशर्फी पाठविल्या त्या नाकारून बादशहानी मला खिलत द्यावी. असा मी काही त्याचा नोकर नाही...[६०] असे सांगून खंडेरावाने तो नजराना परत पाठविला. यावरून असे स्पष्ट होते की, खंडेरावाचा स्वभावात बाणेदारपणा होता. तेव्हा इमादलाच खंडेरावांची मनधरणी केली. त्यामुळे खंडेरावाची २६ डिसेंबर १७५३ ला दिल्लीच्या बादशहाबरोबर भेटीची तारीख निश्चित झाली. १७५४ ला बादशहा व वजीर सफदरजंग यांच्यात संघर्ष सुरू झाला.

दिल्लीच्या बादशहाकडून खंडेरावास व आजी गौतमाबाईच्या नावे सनद दिलेल्या होत्या. त्यापुढीलप्रमाणे

| | |
|---|---|
| १ | परगणे लाखेरी येथील सनद राबराजा उमेदसिंगजी बुंदीवाले यांनी खंडेरावजी यांचे नांवे करुन दिली...१७४४ |
| १ | परगणे वेरुळ येथील पातशाही फरमान सौ. गौतमाबाई यांचे नावें आलमगीर— शाही सनदा १६—६—१७५४ |
| १ | श्री खंडेराव होळकर पातशाही हुकुमशाही कुंभेरकर सुरजमल जाट यांचे लढाईत कामास आले. सबब परगणे अंबाड हा महाल मालेराव होळकर यांचे नांवे दिला... २४—७— १७५६.[६१] |

खंडेरीराव परत येताना जाटाचे बंड सुरू झाल्याने त्याही बंडाचा ८ जानेवारी १७५४ ला बिमोड केला.

कुंभेरीच्या किल्लेदार सूरजमल जाटने मराठा शत्रूला मदत केली. त्यामुळे राघोबादादाच्या आदेशाने वीर खंडेराव व इतर मराठा सैन्यांनी कुंभरीच्या किल्ल्याला दोन महिने निकराच्या वेढयाचे काम चालु होते. सूरजमल ४० लाखची खंडणी देण्यास तयार झाला. पण पेशवे राघोबादादा एक कोटी रूपये मागत होते.[६२] त्यामुळे युद्धाचा निकाल लागेना. तिथं तीन चार महिने गेले. कुंभेरीचा वेढा सुटत नव्हता. यामोहिमेवर होळकरांचा सर्व कुटुंबकबिला सोबत होता. १७ मार्च १७५४ रोजी दुपारी भोजन करून खंडेराव मोर्चाच्या कामाची पाहणी करण्यासाठी खंदका जवळ गेले. त्यावेळी किल्ल्यावरून एकाएकी तोफांचा मारा सूरू झाला. एक जेजालाचा गोळा येऊन त्यांच्या मानेवर पडला. जागीच खंडेराव गतप्राण झाले.[६३]

मल्हाररावांना आपल्या एकुलत्या एका मुलाच्या मरणाची वार्ता समजली. तेव्हा ते बेभान होऊन उघडे बोडकेच पळत सूटले. अनेक लहान थोर सरदारांनी मल्हाररावांचे सांत्वन करण्यांचा प्रयत्न केला. पण मुलगा सोडून जाण्याचं दु:ख त्यांना कसे सहन होणार? तळतळून मल्हारराव उद्गारले. 'सुजरमलाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमूनेत टाकीन, नाही तर

प्राण त्याग करीन''[६४] मल्हाररावाचा अवतार मनी–मल्ल दैत्याला मारणाऱ्या खंडोबा देवासारखा झाला. तेव्हा शेवटी सूरजमलने घाबरून दत्ताजी शिंदेना पगडीभाई मानून त्यांच्या मार्फत ६० लाख खंडणी देऊन मराठ्याशी तह केला.

मुलाच्या मरणामुळे वेडे झालेले मल्हारराव सूनेची सती जाण्यास तयारी पाहून अधिकच दु:ख कष्टी झाले. हाताला आलेला मुलगा काळाने घेऊन गेला. नातू तर लहान आहे. राज्यकारभाराची धूरा सांभाळणारी गुणवान आज्ञाधारक सून, लाडकी बूद्धीमानी शिष्या व प्रजेचे भावी आधारस्तंभ अशी ती अहिल्याबाई तीही सती जाण्याची तयारी करत आहे. हे सर्व पाहूण मर्द मराठा असलेले सुभेदार गाईसारखे दीन बनले.

गूडघ्यात मान घालून खाली बसून डोळ्यात पाणी आणून ते सूनेला म्हणाले 'बाई मला म्हतारपणी उन्हाळा करतेस की काय? तू माझे पाठीवर आहे तर अहल्या मेली व खंडू आहे. हा मला भरवसा! माझी सारी दौलत राज्य सांभाळवयाच काम मी तुला मुलगा समजून तूझेकडून करीत होतो. आता हे सारे सौभाग्य कायम ठेवणे तुझ्या हाती आहे. याचा विचार कर व माझी म्हाताऱ्याची तूला कीव येवू दे'[६५] हे त्यांची दगडालाही पाझर फूटावा अशी अर्त विनंती ऐकुण समजूतदार अहिल्याबाईना कीव आली. तसेच प्रजेलाही आपल्या शिवाय कोणी नाही. कारण सासरे म्हातारे व मुलगा लहान म्हणून त्यांनी सती जाण्याचे टाळले. पण अहिल्याबाई व्यतिरिक्त खंडेरावास असलेल्या अकरा बायका खंडेरावासोबत सती गेल्या. पण सासरे मल्हारराव यांच्या विनंतीवरून राज्यासाठी व रयतेच्या कल्याणासाठी अहिल्याबाई सती गेल्या नाहीत. बादशहाच्या चाकरीत असतांना खंडेरावांचा मृत्यू झाला. म्हणून बादशहाने अहिल्याबाईना वेरूळ परगणा दिल्याचा उल्लेख आहे. इ. स. १७५६ कुभेरीच्या वेढयात खंडेराव यांचा जाटाशी लढताना मृत्यू पावले म्हणून आंबाडचा महाल दिलेले पत्र– श्रीमंत खंडेराव होळकर पातशाही हुकुमवरून लढत असता कुंभेरीस कैलासवासी झाले सबब जायदादींत परगणे आंबाड महाल वगैरे, मातुश्री अहिल्याबाईसाहेब यांस चोळी करिता परगणे वेरुळ पातशहानी सनदा फरमानें सरकारांत दिले ते खानदेशप्रांती बाळासाहेब यांजवर आरबानी गर्दी केली त्यावेळेस दप्तराचे कागद संदुकात होते... त्यात अंबाड वगैरे महाल व वतनदारी प्रकरणे काही कागद गेले...[६६]

त्या काळात सती गेल्यामुळे स्वर्गात जागा मिळते ही कल्पना होती तसेच सती न गेल्यास लोक निदेचं भय होतं. अहिल्याबाईने कशाचीही पर्वा न करता विचार केला की, पती सोबत गेले तर एकटी सुखी होईन पण जिवंत राहिले तर तर लाखो जनतेस सुख मिळेल असे त्यांना वाटत होते.कशाची आशा न करता, कोणाला न जुमानता, जगण्याची इच्छा नसताना त्या जिवंत राहिल्या ते केवळ लोकांच्या कल्याणासाठी या वरून त्यांचे प्रजेवर किती प्रेम होते हे दिसून येते. पुढील काळात बाईंनी पतीची आठवण म्हणून कुंभेरी पासून सव्वा मैलावर 'गंगर सोली' येथे छत्री बांधली तसेच संगमवरी मुर्ती इंदूरास स्थापन केंलेली आहे.

### २.३.६ अहिल्याबाई होळकर:

भारतीय इतिहासात ज्या शूरवीर स्त्रियांची गाथा वर्णन केले जाते. त्यात अहिल्याबाईंचा उल्लेख आवर्जून करावा लागतो. अशा या थोर अहिल्याबाईंचा जन्म ३१ मे १७२५ ला म्हणजेच वैशाख ७ शके ला श्री माणकोजी शिंदे व सुशिलाबाई यांच्या पोटी झाला. महाराष्ट्रातील पुर्वीच्या बीड व सध्याच्या अहमदनगर जिल्हयातील जामखेड तालुक्यातील सीना नदीकाठच्या छोटयाशा 'चौंडी' या गावी धनगर कुटुंबात जन्म झाला.[६७] त्यांचे वडील श्री माणकोजी शिंदे हे चौंडी गावचे पाटील होते. आई सुशिलाबाई नावाप्रमाणेच सुशील, धर्माचरणी, ज्ञानी, विनयशील, कर्तव्य परायणात तूसभरही कमी पडणार नाही. अशी एक आदर्श व्यक्तिमत्व होते. देवधर्म करणे, पूजा-आर्चा करणे, साधु-संतांचा आदर करणे, किर्तन, भागवत सप्ताहास जाणे, दानधर्म करणे अशा धार्मिकवृत्तीच्या आदर्श गृहिणी होत्या. श्री माणकोजी शिंदे व माता सुशिलाबाई यांना १ महादजी २ येसाजी ३ बाणाजी ४ विठोजी ५ सुभनजी अशी पाच मुले व एक मुलगी अशी अपत्य होती.[६८]

असे पाटीलकी असलेल्या अतिशय संपन्न व सधन घराण्यात अहिल्याबाईंचा जन्म झाल्यामुळे त्यांचे बालपण अतिशय लाडात व आनंदात गेले. अहिल्याबाईंचे आईवडील धर्मपरायण वृत्तीचे असल्याने त्यांनीही आपल्या मुलीवर उत्तम संस्कार केले. गोरगरीब दु:खी कष्टी लोकांना मदत करीत असताना आपल्या मुलीस चांगलेच संस्कार व वळण लावण्यात त्यांच्या आईचा फार मोठा वाटा आहे. अशा धार्मिकवृत्तीच्या आई वडीलांच्या हाताखाली व मार्गदर्शनाखाली धार्मिक शिक्षणाचे बाळकडू  त्यांना बालवयातच मिळाल्याने त्या आयुष्यभर ईश्वराचे चिंतन व उध्दार कार्य करण्यात मग्न होत्या.

#### २.३.६.१ शिक्षण:

वडीलांनी आपल्या सहा ही अपत्याना तत्कालीन परिस्थिीप्रमाणे शिक्षण दिले. अहिल्याबाईचे शिक्षण हे त्यांच्या पाच भावाप्रमाणेच शिक्षण दुसरीपर्यत झालेले होते. त्यांना मोडी लिपी लिहिता व वाचता येत होते. मोडी भाषेचे ज्ञान उत्तम होते. या सोबतच तलवार चालविणे, घोडयावर बसणे, दांडपटटा चालविणे, नेम धरणे, तीर मारणे व बचावात्मक पवित्रा घेणे इ. प्रशिक्षण मिळालेले होते. अहिल्याबाईच्या व्यक्तिमत्त्वाची प्रगल्भता नजरेत भरलेल्या मल्हाररावांनी तिला प्रयत्नपुर्वक राज्यकाराभारात सहभागी करून घेतले. देवनागरी लिपीसोबतच मोडी लिपीत त्यांना लिहिता व वाचता येत होते. तसेच मराठी सोबतच संस्कृत व हिंदी भाषेचेही त्यांना ज्ञान होते. तसेच रामायण, महाभारतासारख्या महाकाव्यासोबतच गीतासारख्या तत्त्वज्ञानाच्या ग्रंथाची ही ओळख त्यांना होती. राज्याकाराभारात चालविण्यासाठी आवश्यक असा सैनिकी शिक्षणाची व्यवस्था मल्हाररावांनी अहिल्यांबाईसाठी केलेली होती.

**२.३.६.२ राज्यकारभाराचे धडे:**

श्रीमंत पेशवे यांच्या प्रमूख सरदारापैकी एक पराक्रमी सरदार मल्हारराव होळकर यांची कर्तबगार सून म्हणून अहिल्याबाई होळकर यांचे कार्य महान स्वरूपाचे आहे. सूभेदार मल्हाररावांना जाणीव होत होती की आपल्या पुत्रापेक्षा सूनबाई सर्वच बाबतीत गंभीर, आज्ञाधरक, अधिक हूशार, व सरस आहेत. सासरे मल्हारराव व सासु गौतमाबाईनी अहिल्याबाईचे गुण ओळखुण आपल्या मार्गदर्शन खाली व राजनितीचे व युध्दाचे तसेच राज्यकारभार चालविण्याचे, शेजारील राज्याबद्दलच्या धोरणाविषयीचे, राजनितीचे व्यावहारीक शिक्षण, युध्दाचे डावपेच, यूद्धनिती, व्यावहारीक ज्ञान, यूद्धातील कामगिरी, समस्या, युध्दनिती व प्रशासनातील महत्वपुर्ण बाबी, युध्दातील अनेक पेचप्रसंग, युध्दक्षेत्रावर करावयाची कामगिरी, खाजगी व दौलतीच्या कामकाजाची जबाबदारी सांभाळणे, दारूगोळा व युध्दसामुग्री गोळा करणे, ती सूरक्षित स्थळी हलविणे व त्याविषयीची माहिती अतिशय गुप्त ठेवणे, सल्ला मसलतीचे कार्य करणे, यशस्वीपणे फौजेच्या हालचाली करणे, त्याच्यातील हिकमती व डावपेचाने आपल्या बाजुने परिस्थिती निर्माण करून अर्धे युद्ध लढाई अगोदरच जिंकणे, शत्रूचे मानसिक परिवर्तन करून त्याचे मानसिक खच्चीकरण करणे, शत्रूशी करावयाचे तह व करार, पत्रांची ने-आण करणाऱ्या काशीदांवर लक्ष ठेवणे, त्यांच्या जेवणाची व राहण्याची व्यवस्था नोकरां करवी करून घेणे, हूंडया वटविणे इत्यादी अनेक कामाविषयी इत्यंभूत बाबींचे शिक्षण व प्रशिक्षण दिले. ते अहिल्याबाईने काळजीपुर्वक वेळोवेळी लक्ष देऊन आत्मसात करून अतिशय कुशलपणे त्यांनी नंतर राज्यकारभार केला. त्यामुळेच तसेच .या सर्व बाबीचे प्रशिक्षण त्यांना सहजपणे सासऱ्याकडून मिळाले.[६९]

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी आपल्या सूनेला व मुलाला राज्यकारभाराचे योग्य धडे दिल्याने हळुहळु राज्याची थोडी थोडी जबाबदारी देऊन त्यांना आपल्या कार्यात चांगलेच सहभागी करून घेतले. त्यामुळे सुभेदार मल्हारराव होळकर यांना राज्य विस्तार करण्यास व मराठा राज्य उत्तर भारतात पसरविण्यास पूर्ण वाव व सहकार्य मिळाले. म्हणुनच मराठयाना या अशा पराक्रमी सरदारमुळेच दिल्लीवर आपला वचक व विजय संपादित करता आला. पेशव्यानी १७६१च्या पानिपतचा कलंक पुसून काढण्यासाठी उत्तर मोहिम हाती घेतली. तेव्हा मल्हररावांनाही आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी ते या मोहिमेत आघाडीवर असताना वाटेतच त्यांची प्रकृती बिघडल्याने अचानक कर्तबगार सासऱ्याचा मृत्यू झाला. त्यामुळे होळकर राज्याचे फार मोठे नुकसान झाले. पण यापुर्वीच मल्हररावांनी तुकोजी होळकराकडे बरीच सेनापतीचे कार्य सोपविलेली होती. सासऱ्याच्या अचानक जाण्याने अहिल्याबाईची अवस्था फार वाईट झाली. साऱ्या होळकर राज्याचा भार त्यांच्या अंगावर येवून पडला. शिवाय भोवतालची परिस्थिती फार बिकट होती. तरीही त्यांनी साऱ्या संकटांना न डगमगता तोंड दिले.

### २.३.६.३ अहिल्याबाईचे व्यक्तिमत्व

अहिल्याबाईंच्या व्यक्तिमत्वसार त्यांच्या आई सुशिलाबाई, वडील माणकोजी शिंदे, सासरे मल्हारराव होळकर, सासू गौतमाबाई यांचा खूप मोठा प्रभाव पडलेला होता. आईच्या धर्मनिष्ठेचा मोठाच ठसा अहिल्याबाईंवर उमटलेला होता. त्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्व धार्मिक कार्यात सूर्यप्रकाशाएवढे उजळून निघाले असले तरी सामाजिकता हा देखील त्यांचा स्थायिभाव होता. बद्रिनाथपासून ते रामेश्वरपर्यंत आणि द्वारकेपासून ते जगन्नाथापर्यंत संपूर्ण भारतात त्यांच्या लौकिक-अलौकिक कार्याचा ठसा उमटलेला आहे.

### २.३.६.४ दिनचर्या:

होळकर सस्थानातील तत्कालीन ब्रिटीश अधिकारी जॉन माल्कनने लिहिलेले आहे त्यानुसार अहिल्याबाईची दिनचर्या पुढील प्रमाणे होती. अहिल्याबाई हया सूर्योदयापूर्वी घटका अडीच घटका उठून स्नान करीत व नंतर पूजाअर्च्या करीत. या नंतर त्या नियमितकालपर्यंत पुराण श्रवणास बसत नंतर दानें देऊन त्या आपणासमक्ष ब्राम्हणांस भोजनें घालीत. हे होते आहे तोंच त्यांचे ताट वाढून येई. त्यांचे स्वत:चे भोजनास सारे शाकभाज्यांचे पदार्थ असत. त्या आपलें भोजन आटपल्यावर पुन:कांही वेळ परमेश्वर स्तवन करुन थोडा वेळ वामकुक्षी करीत. नंतर पोशाख करुन त्या सरकारी कामकाज करावयास दरबारात जात असत. जेंव्हा दरबारांत जात तेंव्हा बहुधा दोन प्रहर होत. तेथें सूर्यास्तापर्यंत कामकाज चाले. याउपर एक प्रहर पूजाअर्चा फराळ वगैरे कृत्यांत जाई मग रात्री सरकारी काम मध्यरात्रीपर्यंत चाले.[७०] अशी त्यांची नियमित दिनचर्या होती. अहिल्याबाईच्या नित्याच्या पंगतीत अनेकांना जेवणाचा त्याला मान होता. त्यात शरिफभाई, भारमलदादा होते.

### २.३.६.५ अहिल्याबाईचा स्वभाव:

अहिल्याबाईचा स्वभाव अतिशय प्रेमळ, करारीपणा व कर्णाचे औदार्य असले तरी अहंकार व सुडबुध्दी अजिबात कधीही त्यांच्या अंगी नव्हता. धार्मिकवृत्तीच्या ईश्वरावर दृढविश्वास व श्रध्दा होती. लहानपणापासून हूशार, चाणाक्ष, मन विवेकी व सात्विक स्वभाव होता. मनाचा दयाळुपणा, परधर्मसहिष्णुता, औदर्यावादीवृती व माणसांची अचूक पारख असलेल्या मोठया मनाच्या सुसस्कृत राज्यकर्त्या होत्या. तसेच मुर्तीमंत प्रतिके प्रचंड बुध्दीमत्ता, मुत्सद्देगिरी, चोख व्यवहार, अजोड कर्तृत्व, शुद्ध चारित्र, सदाचरणी व सामाजिक समतेचा पुरस्कार करणारी आदर्श राज्यकर्ती होत्या. सदैव कार्यमग्न असणारी अलौकीक साध्वी, त्यागी व वैराग्यवृत्तीच्या होत्या. भारताच्या इतिहासातील अहिल्याबाई शूर व मुत्सुद्दी स्वभावाची स्त्री राज्यकर्ती होती.

आपले वैयक्तिक जीवन अतिशय साध्या पध्दतीने जगत असताना मात्र जनतेसाठी अहोरात्र अनेक निर्माण कार्य केले. म्हणून त्यांना पुण्यश्लोक या उपाधीने गौरविले आहे. अहिल्यादेवी आपल्या प्रजेवर पुत्रवत प्रेम केले. एक आदर्श माता, कन्या, पत्नी, सून व

प्रशासक म्हणून संपूर्ण भारतवर्षात त्यांच्या हयातीतच त्यांचा देवी, लोकमाता, पुण्यश्लोक या विशेष नावांनी लोक उल्लेख करू लागले. दुर्भाग्य नियतीने अहिल्याबाईच्या डोळया समोर सासु, पती, सासरे, मुलगा, सुना, जावाई, मुलगी, व नातु व नात सूना गेल्याचे आभाळा एवढे दु:ख त्यांनी सहन करून जनहिताला प्राधान्य देऊन अख्ये आयुष्य खर्ची लावले.

**२.३.६.६ अहिल्याबाईचे राहणीमान:**

अहिल्याबाई सकाळी ब्रहयमुहूर्तवर उठून कर्मे आटोपून धर्मग्रंथ श्रवण करीता तसेच दानधर्म या कामातून त्यांची सकाळ सत्कार्याने उजळून निघत होती. त्यानंतर त्याचा शूभदिवस सुरू व्हायचा. त्या शाकाहारी जेवण करित त्यांना मांसाहर वर्ज्य होता. त्या अतिशय सोज्वळ जीवन व्यतित करित होत्या.अहिल्याबाईचे राहणीमान हे अत्यंत साधे व अंगावर पाढरी साडी डोक्यावर पदर, कपाळावर पांढरा गोल गंध, पती निधनानंतर पांढरी साडी नेसत. दागिन्यांचा तर त्यांनी त्यागच केलेला होता. त्यांच्या अंगी हिंदु स्त्रीयांचा मुर्तिमंत आदर्श दिसून येतो. सासऱ्यांनी अतिशय काटकसरीने कमावलेला सोळा कोटी रूपयाचे त्यांना या अफाट पैशाचा अजिबात मोह नव्हता. एवढ्या अमाप संपत्तीची मालकीण असतानाही या संपत्तीचा कधीही एका आण्याचा सुध्दा दुरूपयोग केला नाही. त्यांनी या अति संपन्न परिस्थितीतही अतिशय साधे व निर्मळ जीवन जगण्याचा मार्ग निवडलेला होता.

अहिल्याबाईचा आहार बेताचा असून तोही शुद्ध शाकाहारी स्वरूपाचा होता. साध्या वेषामध्ये, साध्या आसनावर घोंगडी टाकून त्या बसत असत. मातोश्री अहिल्याबाई यांच्या अगाध संपत्तीची मालकीण असूनही त्या तपस्विनीचे जीवन जगल्या. आयुष्यभर त्यांनी सिंहासनावर पांढरी घोंगडी ठेवून राज्यकारभार केला. प्रजेला त्या सांगत असत दौलतीत जो नमस्कार केला जातो तो दौलतीस असतो. खासगीत आम्हाला नमस्कार करण्याची गरज नाही. यावरून त्यांच्या नि:स्वार्थीपणाचा व स्थितप्रज्ञतेचा अनुभव येतो.

**२.३.६.७ विवाह:**

श्रीमंत पेशवे व मल्हारराव होळकर उत्तरेकडून पुण्याकडे जात असतांना त्यांचा चौंडी या गावी मुक्काम होता. गावच्या बाजूलाच असलेल्या सीना नदीच्या किनाऱ्यावर आठ-नऊ वर्षाच्या दहा-बारा मुली वाळूचे शिवलिंग बनवण्याचा खेळ खेळत होत्या. कोणाचे शिवलिंग सुंदर होईल याच चढा ओढीत त्या रंगूण गेलेल्या.असताना मराठा तळावरील एक घोडा अचानक उधळून पळत सूटला. टापाच्या आवाजाने घोडा जवळ येत असल्याचं पाहून साऱ्या मुली पळून गेल्या पण घोडा शिवलिंग जवळ येताच चिमूकल्या अहिल्याने आपले शरीर त्या पिंडावर झोकून दिले. तेवढयात उधळलेला घोडा तिच्या जवळून पळत गेला. तेव्हा श्रीमंत बाजीराव पेशवे व सुभेदार मल्हारराव होळकर त्यामुलीकडे धावले. पेशवे जवळ येऊन अहिल्येस म्हणतात की, पोरी तूला वेड—बिड लागलं की काय? घोडयाने तूडवले असतेना? अशी वाळूच्या ढिगाऱ्यावर का पडून आहेस? सात—आठ वर्षाची अहिल्या विचारलेल्या

प्रश्नावर अश्चर्य व्यक्त करीत म्हणाली. वाळूचा ढिग!... हे तर आहे शिवलिंग मी घडविलेले. आपण जे घडवाव ते प्राणपणाने रक्षवं अस थोर पुरूष म्हणतात. आणि याला रक्षून मी तेच केले...! [७१]

अहिल्येच्या नजरेतील तेज व धैर्यपूर्ण भाषा आत्मविश्वास पाहून पेशव्यांना खूप आनंद झाला. तिची स्तुती करतांना श्रीमंत म्हणतात. सरदार मल्हारराव मुलीच्या वागण्यावर व तिच्या गुणावर मी संतुष्ट आहे. मला एखांदा अविवाहीत मुलगा असता तर तिला मी माझी सूनच केली असती. पण तुम्ही तिला तुमची सून करून घ्या. तूमच्या घराण्याचे नाव ती नक्कीच उज्ज्वंल केल्या वाचून राहणर नाही.[७२]

वयाच्या ८ व्या वर्षी अहिल्यादेवींचा विवाह खंडेरावासोबत झाला. त्यांच्या वैवाहीक जीवनात सुखापेक्षा दुखा:ला अधिक सामोरे जावे लागले. पती खंडेराव अधिक व्यसनी व राज्यकारभाराकडे दुर्लक्ष आदि कारणांनी अहिल्यादेवी अधिक संकटात होत्या, परंतु त्या कधी डगमगल्या नाहीत. तितक्याच ताकदीने त्या कार्य करीत राहिल्या. अहिल्येचा विवाह खंडेराव यांच्याशी शाही वातावरणात श्रीमंत बाजीराव पेशवे यांच्या उपस्थित पुणे येथे पार पडला.[७३] अहिल्याबाई व खंडेराव यांना दोन अपत्य होती. मुलगी मुक्ताबाईचा विवाह यशवंतराव फणसे याच्याशी लावून दिले.

अहिल्याबाईच्या जिवनात आनंदाचे दिवस आले. ते लहानपणातच नंतर मात्र त्यांना फारसा कौटूंबिक आनंद मिळणार नाही. कारण पती खंडेराव हे फार हटी व चिडचिडया स्वभावाचे होते. उधळेपणा व डामडौलाची त्यांना फार हौस होती. त्यांना अहिल्याबाई शिवाय इतर अनेक बाईका असल्यामूळे बाई कडे फारसे लक्ष देत नसतं. बहूपत्नीत्वाच्या पद्धतीमुळे थोर मोठयाच्या स्त्रियांना हा त्रास होतच असे. परंतु खंडेराव शूर शिपाई होते. ते पत्नीशी वाईट रितीने वागत असत व अहिल्याबाई ही वागवतांना पतीचा मान ठेवत त्यांचे पतीवर मनापासून प्रेम होते.

अहिल्याबाई इतक्या पुण्यशील व तत्वीक होत्या की, त्यांच्या बरोबर वाईट रितीने वागने कोणालाही शक्य नव्हते. तसेच त्या बाणेदार स्वभावाच्या होत्या. खंडेरावाचा त्या योग्य मान ठेवीत त्यांच्या सुखाला जपत, पण जर ते त्यांच्या कामात आड आले तर, त्या जूमानीत नसतं. काही वेळ तर त्या पतीलाही उपदेश करीत. त्यांच्या अशा स्वभावामुळे सर्वावरच वचक होता. एवढे नव्हे तर खंडेरावानाही त्यांचा अपमान करणे शक्य नव्हते. खंडेराव अहिल्याबाईची योग्यता जाणून होते. त्यांच्याशी ते आदराने वागत असत त्याच्या प्रमाणे पार्वताबाई व सरताबाईशी त्याचा व्यवहार सभ्यपणाचाच होता.

**२.३.६.८ अपत्य:**

मल्हारराव व गौतमाबाई आपल्या गुणे सूनेवर अधिकच प्रेम करत होते त्यातच १ डिसेंबर १७४५ मध्ये सुन अहिल्याबाईस मुलगा झाला त्याचे अतिशय आवडीने मालेराव असे

नाव ठेवण्यात आले. नंतर तीन वर्षानी २० मे १७३३ त्यांना मुलगी झाली. तिचे नावे मूक्ताबाई या दोन मुलांच्या जन्मामुळे त्यांचे संसारात सुख समाधान सुरू झाला.[७४]

पुण्यश्लोक अहिल्याबाईची दिवंगत किर्ती भारतभर पसलेली आहे. प्राचीन भारतातील धर्मराजानंतर पुण्याश्लोक ही पदवी दोनशे वर्षापूर्वी समाजात जन्मास आलेल्या महिलेला मिळाली. ज्या अलौकीक स्त्रीने आपले आयुष्य चंदनाप्रमाणे झिजवले. प्रजेच्या सुखसोयीसाठी अहोरात्र परिश्रम घेऊन संपूर्ण भारतभर अनेक जनकल्याणाच्या सुविधा आपल्या प्रशासनातून उपलब्ध करून दिल्या. पण त्यांनी निर्माण केलेल्या अप्रतिम वास्तू, तलाव, घाट, विहिरी व जलकुंड अनेक ठिकाणी आज ही पहावयास मिळतात, नव्हे त्याचा वापर अजूनही चालूच आहे परंतू अहिल्याबाईंच्या मृत्यूनंतर अनेक राजसत्ता या देशात येवून गेल्या. बरेच सत्तांतरे घडून आली परंतू त्यातील एकही राजाने अथवा सत्ताधीशाने असे महान निर्माण कार्य केलेले नाही. किंवा त्याने अहिल्याबाईचे कर्तृत्व आचरणात आणण्याचा प्रयत्नही केला नाही.

**२.३.६.९ संकटाची मालिका:**

मातोश्री अहिल्याबाई यांचे वैवाहिक जीवन सुरळीत चालू असताना पती खंडेराव कुंभेरीच्या युद्धात मारले गेले. तेंव्हा त्यांच्यापुढे आभाळा एवढे दु:खाचा डोंगर उभा राहिला. एवढेच नाही 'संकटे एकटी येत नसतात सोबत संकटाची मालीका असते' असाच प्रकार अहिल्याबाईंच्या कौटूबिंक जीवनात घडून आले. पती निधनानंतर आई सुशिलाबाई, वडील माणकोजी शिंदे, सासू गौतमाबाई, सासरे मल्हारराव, मुलगा मालेराव, नातू नथोबा, नात सूना, जावाई यशवंतराव फणसे, मुलगी मुक्ताबाई, बंधू यांच्या स्वर्गवासी झाल्याने अहिल्याबाईंच्या जीवनात मोठा अंधकार पसरलेला होता. तरी स्वत:च्या जीवनातील आभाळाएवढे दु:ख बाजूला ठेवून सामान्य रयतेच्या कल्याणासाठी कार्य करीत राहिल्या. नव्हे तर स्वत:चे खाजगीचे सोळा कोटीची मालकीण असताना देखील अतिशय सामान्य जीवन जगून संपूर्ण भारतभर निमार्ण कार्य करून आपल्या जीवनातील दु:ख बाजूला ठेवले. तसेच त्यांनी सती प्रथेस विरोध करीत सुनेंस सती जाण्यापासून परावृत करण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला होता. जेव्हा जावाई यशवंत फणसे निधन पावले. तेव्हा मुलगी मुक्ताबाई सती जाण्यासाठी तयार चालु होती. तेव्हा ती मुक्ताबाईस सती न जाण्याविषयी विनवणी केली. पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही. ती शेवटी सती गेली.

होळकर राज्यात चोर, डाकुंनी डोके वर काढून मोठ्या प्रमाणात धुमाकुळ घातल्याने जनतेला याचा फार त्रास होत होता. त्यामुळे जनता खूपच घाबरलेली होती. तेव्हा अहिल्याबाईंनी धुमाकुळ घालणाऱ्या दरोडेखोरांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी एक विलक्षण दवंडी पिटवली, 'जो दरोडेखोरांचा पुरता बंदोबस्त करील त्याला मी माझी मुलगी देईन.'[७५] अशी भर दरबारात घोषणा केली. यामुळे स्वत:ची मुलगी प्रजेच्या हितासाठी पणाला लागली. ठग पेंढाऱ्याचा यशस्वीपणे जो कोणी बंदोबस्त करेल त्यास आपली मुलगी देईन अशी घोषणा

भर दरबारात केली. तेव्हा यशवंतराव फणसे या वीरांनी हा पण यशस्वी करून दाखविला. तेव्हा त्याचा जात, पात, घराणे, पंथ, वंश, कुळ व धर्म याची कोणतीही तमा न बाळगता तुकोजी होळकर यांच्या सैन्यात काम करणारे सरदार श्री यशवंत फणसे या बहाद्दर तरूणाने हा 'पण' जिंकला. अहिल्याबाईंनी आपल्या मुक्ता या एकुलत्या एका मुलीचा विवाह सन १७६६ मध्ये त्याच्याशी लावून देवून त्याच्या पराक्रमाचा उचित गौरव केला.[७६] एवढेच नव्हे तर त्यास काही गावांची जहागिरी दिली. होळकर राज्याच्या शासक असलेल्या मातोश्री अहिल्याबाईंने मध्ययुगात आंतरजातीय विवाह घडवून आणला. या विवाहातून समाजासाठी समानतेचा व आंतरजातीय विवाहाचा संदेश दिला.

सन १७६७ मध्ये सरदार यशवंत फणसे यांना एक मुलगा म्हणजेच अहिल्याबाईना नातु झाला. त्याचे नाव 'नथोबा' असे ठेवले.[७७] नंतर अहिल्याबाईनी नथोबाचे सन १७८० मध्ये लग्न केले. पण तो लवकरच सन १७९० मृत्यू झाला.[७८] नंतर एका वर्षाने ३ नोव्हेंबर १७९१ रोजी जावाई यशवंत फणसेचा मृत्यू झाल्याने मुक्ताबाईही प्रथेप्रमाणे सती गेली.[७९] असे घडल्याने अहिल्याबाईच्या डोळया समोर अंधार पसरलेला होता. वयाच्या ७१व्या वर्षी श्रावण वद्य १४ रोजी म्हणजेच त्यांचा मृत्यू १३ ऑगास्ट १७९५ झाला.[८०]

### २.३.७ मालेराव होळकर:

सरदार खंडेराव व अहिल्याबाई यांच्या पोटी १ डिसेंबर १७४५ रोजी मुलाचा इंदूर जवळील देपाळपूर येथे जन्म झाला.[८१] मल्हाररावांनी आपल्या नातवाचे नाव मालेराव असे ठेवले. हा अत्यंत चंचल स्वभावाचा व खोडकर होता. पुत्र मालेरावचा विवाह ११ व्या वर्षी झाला. त्यांचा विवाह मैनाबाईशी सन १७५६ ला व दुसरा विवाह हा पाराबाईशी झाला.

मालेराव होळकर याना मल्हारराव होळकर व राणेजी शिंदे यांनी वतने पत्र दिलेले होते. मालजी होळकर... सरकार मांडवगड प्रांत माळवा येथील दरोबस्त एकतीस माहलचे कानगोईपणाचे वतन सरकारचे आहे. ते स्वामीनीं कृपाळू होऊन आम्हां उभयतांस वतन करुन.. . देऊन वतनपत्रें करुन दिले ते ३१ महालचे कानगोई पणाचे वतन सरकारचे होते ती उभयतास दिली.

२ दोन सनदा उभयांचे नावच्या

२ देशाधिकारी, वर्तमानभवी यास...

——

४

तसेच ९ जानेवारी १७५६ रोजी पुणे दरबारकडून मालेरावांच्या नावाने सोनगीर व चांदवडची सनद दिलेली होती ते पत्र पुढीलप्रमाणे आहे.

मौजे सोनगीर तालुके कोपाटणे राजश्री मालेराव होळकर यांचे नावें जहागीर देणें बदल हुकुम. १ परगणे चांदवडची सरदेशमुखी सनद रा. मल्हारजी होळकर यांसी देणें मंजूर, [८२]

होळकराच्या समृद्ध राज्यांचा वारसा असणारे मालेराव लहानपणापासूनच लहरी स्वभावाचे होते. त्यांना वाघ, चित्ते, हत्ती इ. यासारख्या प्राण्यांची आवड होती. प्राण्याच्या सहवासात राहण्याचा व हत्तीची जलक्रिडा पाहण्याचा त्यांना छंद होता. मालेराव वेडसर व विक्षिप्त स्वभावाचे होते असे. ते ब्राम्हणाला दान देण्यासाठी म्हणून राजवाड्यात बोलवत असे. कपडे, भांडे वगैरे वस्तू दान देतांना त्यात विंचु घालून देऊन ते ब्राम्हणला चावले की मालेरावांना आनंद होईल. यावरून मालेरावांनी निष्पाप ब्राम्हणाला त्रास दिल्याचे सांगितले जाते. पण प्रत्यक्षात मालेरावांनी आपल्या संपूर्ण जीवनात सामान्य जनतेला त्रास दिल्याचे मात्र कुठे तसे पुरावे सापडलेले नाहीत. त्यांच्या बुद्धीमत्तेची, चातुर्याची व हूशारीचे अनेक पुरावे इतिहासात सापडतात. म्हणजे त्यांनी सामान्य जनतेला त्रास विनाकरण दिला नाही. म्हणजेच यावरून स्पष्ट होते की, मालेराव होळकर हे वेडसर नव्हते तर त्यांना ब्राहमणातील दुष्टता व दांभिकता यांचा खूप मोठा राग होता. म्हणून ते केवळ ब्राहमणाविरोधी असे कार्य करीत होते.

मालेरावावर अनेक युद्धाच्या वा मोहिमेच्या जबाबदाऱ्या सोपवल्या जात असतं. असेच एकदा मालेराव उत्तरेकडील मोहिमेवर असताना सुभेदारांनी पत्र पाठवून कळविले होते ते असे. 'पंधरा दिवसानंतर राघोबादादा गोहदकडे जातील तिकडून दक्षिणेत येतील त्यांच्या बरोबर मालेराव बाबासाहेब सुद्धा येतील. श्रीमंत येऊ पावले. तर श्रीमंत मालेराव आणि फौजेची व्यवस्था बघण्यासाठी दक्षिणेत येतील.[८३] म्हणजेच यावरून असे लक्षात येते की, ज्या माणसांवर युद्ध मोहिमेची जबाबदारी टाकली जाते तो माणूस वेडा कसा असणारं? राघोबादादा व पेशवे यांनी तरी असे स्वराज्याचे कार्य मालेरावांसारख्या मुलाकडे दिले. त्याअर्थी मालेराव हे सरदाराची भुमिका चांगल्या प्रकारे निभावून नेहतील यांची त्यांना खात्री होती.

मल्हारराव बुलंदखंडात गुंतले तरी त्यांची माळव्यातील समस्यांवर नजर होतीच मल्हाररावांकडून मालेरावास पत्रांनी आदेश धाडण्याची अनेक दाखले मिळतात. मौजे सारंगाखेडे परगणे. सूलतानपुरच्या फत्तेसिंग राऊलकर जप्ती उठविण्याचे सुभेदार मल्हारराव होळकर यांनी ता. १९ फेब्रुवारी १७६१ पत्र पाठवून कळविले होते. ते असे चिरंजीव विजयीभव राजश्री मालवा यांसी प्रती मल्हारजी होळकर आर्शीवाद उपरी मौजे सारंगखेडे प्रगणे सुलतानपूर येथील फतेसिंग राउळ याची स्त्री अमरावतीनें तुझां पसी येउन केसरीसिंग राउळ फतेसिंगाचा भाउ यांजला गावाकडून परांगदा करुन राउलकीचे वतन जप्त करविले. त्यांस तेथील जप्ती तूर्त उठवून, देशास आलिया मनास आपले म्हणून मीरखान टोके यांनी सांगितलेवरुन तुम्हास लिहिले असे. तरी मौजेमजकुरचे राउळकीची तुझी जप्ती करविली असेल ते सोडवून देणें. आम्ही देशास आलिया मनास आणून करणें ते केले जाईल. तूर्त केसरीसिंगास आणून त्याचे हातें राउळकीचें कामकाज सुदामत प्रमाणे घेणें.[८४]

या पत्रवरून हे स्पष्ट होते की, मल्हारावाने आपल्या नातु मालेरावावर माळव्याची जबाबदारी सोपवलेली होती. त्यांनी मालेरावावर पूर्ण विश्वासाने माळव्याचा राज्यकारभार

सोपविलेला होता. त्यामुळेच मालेरावांनी विधवा . पत्नीस न्याय देण्याच्या विचाराने फत्तेसिंग राऊलकर यांच्या जप्तीचे आदेश दिलेले होते. मालेराव देखील या दृष्टीने समर्थपणे पावले उचलत होते. अहिल्याबाइच्या मार्गदर्शनाखाली मालेराव होळकर कार्य करीत होते.

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी चिरंजीव मालेरावास सैन्यातील सरकार मधील घोडे व उंट यांच्या खर्चासाटी आर्थिक तरतुद कण्यासाठी २५ जानेवारी १७६६ रोजी पत्र पाठवून कळविलेले होते की, सटवाजी गायकवाड याजकडील सरकार पागेची घोडी, उंटे तुझां समागमें आली आहेत. त्यास रोजमुरा दीडमाही रुपये ५९ तुझांकडून देविले असेत, तरी एकूण साठ रुपये मशरनिल्हेकडील पागेसी देणें. आणि पागेकडील घोडी, उंटे, शिंगरें तेथें आली असतील त्यांची हजेरीगणती चौकशी करुन चंदी दररोज देत जाणे.[८५]

सुभेदार मल्हारराव होळकर हे आपल्या राज्यातील रयतेस त्यांच्या प्रवासाची योग्य प्रकारे काळजी घेणारे होते हे या पत्रावरून स्पष्ट होते. मल्हारराव होळकरांनी नातू मालेरावास २३ नोव्हेंबर १७६५ रोजी पत्र पाठवून न्याहालकर्ण मंडलोई गंगायात्रेसाठी जात होते त्यांच्या मुक्काची व्यवस्था चांगल्याप्रकारे करण्याचे कळविले होते. ते असे राजश्री न्याहालकर्ण मंडलोई कस्बे इंदूर हे श्रीगंगाप्रदक्षिणेस यात्रा सुध्दां जात आहेत त्या समागमें पडताळे सुमारे ५० माणसे असामी ५०० डोली सुमार १० ऐसी जात आहेत. त्यांसे मार्गी कोणेविसे मुजाहिम न होय. रात्री राहतील तेथें चौकी पाहारा देऊन आपलाली हद्दपार करून देणे.[८६]

मल्हारराव होळकरांच्या पश्चात पेशवे माधवराव यांनी मालेराव होळकरांना परगणे बेरछा, दतिया व भांडेर मधील काही गावे सुभेदारांच्या छत्रीसाठी २जून १७६६ रोजी इनाम सनद बहाल कलेली होती ती अशी होती. मालजी होळकर यांजकडे छत्रीचे खर्चाकरितां इनाम गांव दिल्याबददल सनद बार आहे. छत्री मौजे मल्हारनगर उर्फ अलंमपूर परगणे बेरछा येथे आहे तेथें सदावर्ताचे वगैरे खर्चाबदल इनाम गांव.

१७५०१ परगणे बेरछा पैकी गांवे ११

७,००० परगणे दतियापैकी गांव ३

३,००० परगणे भांडरपैकी एक गांव १

...........

२७५०१ नूतन इनाम दरोबस्त कुलबाब कुलकानू म्हणोन सनद.[८७]

मल्हारराव होळकराचे मराठा साम्राज्यविस्तारात फार मोठे योगदान होते. त्यांच्या कार्याच्या पावती म्हणून सुभेदाराची मोठी छत्री बांधण्यासाठी मालेरावास बहाल केले.

सूभेदार मल्हारराव होळकरानंतर पुणे दरबारानें २३-९-१७६६ रोजी मालेरावास सरंजाम व वस्त्रांची सनद देण्यात आली.[८८] त्या काळात असलेल्या अनेक वयस्क व अनूभवी मंडळीना मालेरावाची योग्याता माहिती होती. म्हणूनच तर त्यांच्या विरूद्ध कोणीही लिहिलेले आढळत नाही.

अहिल्यादेवींचे व्याही हे सती परंपरेचे समर्थन करणारे होते. मालेरावाच्या मृत्यूनंतर मैनाबाई आणि पिरताबाई या दोन्ही कोवळया मुली सती जाऊ लागल्या. त्या वेळी अहिल्याबाईनी त्यांना समजावण्याचा प्रयत्न केला पण त्या न ऐकता सती गेल्या. नथोबाचा मृत्यू झाल्यानंतर बाळाबाई आणि गौरी या दोन बायका सती चालल्या होत्या, त्या वेळीदेखील अहिल्यादेवींनी आपल्या ताकदीनिशी विरोध केला. सती जाणे हा धर्म नाही. पुरुषी स्वार्थापोटी स्त्रियांवर लादलेली ही दुष्ट प्रथा आहे. सती जाणाऱ्या स्त्रीला स्वर्गाचे गाजर दाखविले जाते, कुठे आहे तो स्वर्ग? कुणी तो पाहिल्याचा पुरावा आहे का? एखादी बाई मरण पावली तर तिचा पती तिच्या चित्तेवर सती का होत नाही, असा सवाल करून त्या वेळच्या कर्मठ लोकांची बोलती बंद केली. रामायण आणि महाभारतात अनेक युध्दे झाली परंतु त्यावेळी कुणी सती गेल्याचा उल्लेख आढळत नाही, असे उदाहरण देऊन अहिल्याबाई होळकर लोकांमध्ये जनजागरण करीत होत्या. एकंदर अहिल्यादेवींच्या राज्यात अंधश्रध्देला अजिबात थारा नव्हता, म्हणजे त्या किती पुरोगामी विचारसरणीच्या होत्या हे यावरून स्पष्ट होते.

मालेरावांची एक दासी थोडी चंचल स्वभावाची असल्यामुळे मालेराव तिच्यावर नेहमी पाळत ठेवत असतं. एक दोन वेळेस ती दासी एका कारागिराला चोरून बोलत असल्याचे मालेरावाच्या लक्षात आले. त्यांचा त्या दोघावरचा संशय अधिकच बळावला. एका दिवशी कारागीर चोरून दासीच्या महालाकडे जात असल्याचे मालेराव पाहिले. तेव्हा त्यांचा राग अनावर झाल्याने ते रागाच्या भरात कारागीरावर तुटून पडेल. आपल्या तलवारीने सपासप वार केल्याने त्या कारागिराचा मृत्य झाला. तेव्हा अहिल्यादेवी नि:पक्षपातीपणाने चौकशी सूरू केली. असं जॉन माल्कन म्हणतात. अहिल्यादेवीना चौकशी अंती अस लक्षात आलें की, दासीचा व कारागिरांचा जरी कामानिमित्य नेहमी संबंध येत होता. त्यात चरित्र्यावर संशय घेण्यासारख काहीच नव्हतं.

आपल्या हातून एका निष्पाप माणसाचा खून झाला. या घटनेचा मालेरावांच्या हळव्या मनावर फार मोठा आघात झाला. याच मानसिक धक्याने मालेरावांना वेड लागले. त्यांच्यात सुधारणा होऊ शकली नाही. अहिल्याबाईंचा दान धर्मावर विश्वास होता. त्यामुळे त्यांनी दान धर्म पुष्कळ केले. काहीच फरक पडला नाही. उलट त्यांचे जास्तच हाल होऊ लागले. अहिल्याबाईचा जीव बेचैन झाला. त्यांना आधार देण्यासाठी मल्हारराववही नव्हते. त्या बिछाण्यावर पडून रात्रदिवस चिंता करत असतं. शेवटी मालेरावांचे खूपच हाल हाल होऊ लागले. मालेराव होळकर ता. ३—६—१७६७ मालेराव होळकर मृत्यू पावले.[८९]

आता राज्याचा वारसा कोणाला करावं? हा प्रश्न उभा राहिला. आहिल्याबाईनी खंबीरपणे विचार करून तुकोजीरावांच्या नावाचे सुभेदारीसाठी पेशव्यांकडे पत्र पाठवून वस्त्रे मिळवून मुलूखगिरीचे कार्य तुकोजीरावांकडे सोपवून आपणाकडे मुलकी खाते ठेवून राज्याचा कारभार सुरू केला.

### २.३.८ तुकोजीराव होळकर:

तुकोजी होळकर यांचा जन्म संवत १७८० इ.स. १७२३ म्हणजेच २६ जुलै १७२४ ला झाला.[९०] त्यांचे वडील जानोजी असून ते सुभेदार मल्हाररावांच्या नात्यातील होते. म्हणजेच मल्हाररावांचे वडील व तुकोजीरावांचे आजोबा हे सख्ये भाऊ होते. मल्हाररावांच्या चुलत भावाचा तुकोजी हा मुलगा होता. तुकोजीस महादजी व संताजी भाऊ होते. म्हणजेच तो मल्हाररावाचा पूतण्या व अहिल्याबाईचा दीर होता. तुकोजी हा अत्यंत गर्विष्ट, व्यसनी, उधळया स्वभावाचा होता.[९१]

अहिल्याबाईचे ते समकालीन असून तुकोजी होळकर हे मल्हारराव होळकर यांच्या हाताखाली व सोबत लहानपणापासून मोहिमांवर जात असे. तुकोजीराव ही मल्हाररावांस आपल्या पित्याप्रमाणे मानून आदर करीत असत.

तुकोजीरावांस रखमाबाई, दुसऱ्या रखमाबाई, कृष्णाबाई व यमुनाबाई ऊर्फ राधाबाई या चार बायका होत्या.[९२] तुकोजीच चार मुले होती. रखमाबाई प्रथम पासून तुकोजीस काशीराव व मल्हारराव हे दोन औरस पुत्र झाले. तर राधाबाई यापत्नी पासून विठोजी व यशवंतराव हे दोन अनौरस पुत्र झालेले होते.[९३] सुभेदार मल्हाररावांचे तुकोजीवर अधिकच विश्वास व प्रेम होते. मल्हाररावांच्या मृत्यू नंतर माधवराव पेशव्यांच्या आदेशानुसार इन्दौर राज्याचा सर्व मुलकी राज्यकारभार अहिल्याबाईच पाहत होत्या व तुकोजीकडे सर्व लष्कराचे सेनापती म्हणून काम पाहत होते. तसेच सुभेदार मल्हाररावांचे तुकोजी होळकर हे मानसपुत्र म्हणून सर्वत्र वावरत असत. तुकोजीरावांचा दत्तक विधान कधीही झालेला नसला तरी त्यास अहिल्याबाईंनी कधीही हरकत घेतलेली नव्हती.

सुभेदार मल्हारराव होळकरांच्या काळात प्रत्येक मोहिमावर तुकोजीराव सोबत असत. त्यावेळी त्यांनी शिपाईगिरी केली होती. कर्तबगारी व इमानदारी पाहून त्याच्यांवर हुजूरपागेचे काम सोपविलेले होते. तो साधा, सरळ, भोळा पण परप्रत्ययेन बुध्दिचा शिपाईगडी होता. तुकोजीराव होळकरांची खरी कारकीर्द इ.स. १७५० पासून सुरु झाली असे सरकारी कागदपत्रात नमूद आहे. इ.स. १७५८ मध्ये राघोबादादा, सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या सोबत तुकोजीराव होळकर हे ही होते. तुकोजीरावांनी ही अटकेपार झेंडे फडकाव्यात महत्वपूर्ण सहभाग होता. तेव्हा तुकोजी होळकर व साबाजी शिंदे यांनी अटकेपर्यतचा मुलूख काबीज करण्यात सहभागी होते. इ.स. १७६९ ला रजपूत राजांनी होळकर शासकांना खंडणी देणे बंद केलेले होते. तर काही राजे खंडणी देण्यास टाळाटाळ करीत होते. तेव्हा तुकोजीरावांनी राघोगढ, खीचीं, कोटा व बुंदी राज्यावर स्वाऱ्या करुन खंडणी देण्यास त्यांना भाग पाडले. इ. स. १७७० भरतपूरच्या राज्यावर स्वारी करुन रजपूत राजा जाटाचा पराभव पराभव करून मथुरा व आग्रावर आपला अधिकार निर्माण केला.

मराठ्यांच्या पानिपतवरच्या पराभवानंतर रोहिले व पठाणानी डोके वर काढून मराठी सत्तेस ते अजिबात मानावयास तयार नव्हते. तेव्हा तुकोजीराव होळकर यांनी पानिपतवरचा झालेला पराभव याचा बदला घेण्यासाठी नजीबखान रोहिले व बंगशवर स्वारी करुन पराभूत केले. इ.स. १७७१ मध्ये दिल्लीवर आक्रमण करुन जिंकून घेतले. तेथील शहाआलम बादशहास अलाहाबादवरून आणून दिल्लीच्या तख्तावर बसविले. इ.स. १७७२ ला जाबियतखान रोहिलेवर हल्ला करुन दुआबमध्ये प्रवेश केला. नंतर हरिद्वार येथील चंडीघाट येथे खानाचा पूर्ण पराभव केला. तेव्हा सर्व रोहिले रणांगणावरुन शहरात जाण्याऐवजी ते पळून जाऊन तराईच्या जंगलात लपून बसले. त्यावेळी मराठा सैन्यानी शुक्रताल, नजीबाबाद, पत्थरगड व रोहिलेखंडावर आपले वर्चस्व निर्माण केले.[९४]

इ.स. १७७२ ला तुकोजीरावांनी अमरोहच्या प्रदेशावर स्वारी करुन तेथील शासक सय्यदचा पराभव करुन चौथाई वसूल केली. त्यानंतर तुकोजीरावांनी जाटाच्या प्रदेशावर हल्ला करुन त्यांचा खुर्जाचा प्रदेश जिंकून घेतला. दिल्लीचा बादशहा शहाआलम मराठ्याविरूध्द पावले उचलून लढण्याची तयारी केली. हे मराठ्यांना कळताच तुकोजीराव होळकर व इतर सरदारांनी मिळून दिल्लीवर इ.स. १७७२ स्वारी करुन मोगल फौजेस पराभूत केले. तेव्हा शहाआलमने मराठ्यांशी करार केला. त्यानुसार मराठ्यांना कोडा व अल्हाबादचा प्रदेश मिळाला.[९५]

तुकोजीरावानी मराठा फौजेसह दुआबवर इ.स. १७७३ हल्ला चढवून असदपूर, संभलपुर, मुरादाबाद जिंकून घेतले. त्यानंतर फेब्रुवारी १७७४ ला तुकोजीरावांनी राघोबादादावर माही घाटात पराभव केला. तुकोजीरावांनी जानेवारी १७७९ ब्रिटीश कर्नल इजर्टनवर हल्ला करुन त्यास पराभूत केले. त्यामुळे इंग्रजानी तुकोजीवाविरूद्ध लढा पुकारला. तेव्हा इ.स. १७८० इंग्रज फौजाशी अनेक ठिकाणी छोटे छोटे संघर्ष करुन त्यांच्या वाढत्या आक्रमक धोरणास प्रतिबंध केला. त्यानंतर इ.स. १८८१ मध्ये कर्नल गोडार्ड या कलकत्ता सेनापतीस ही पनवेल पर्यंत मागें रेटत नेले.

**२.३.८.१ टिपू सुलतानचा पराभवः**

म्हैसुरचा टिपू सुलतान मराठ्यांचा दुबळेपणा पाहून तो मराठी प्रदेशावर हल्ले करून अनेक हिंदुना सक्तीने धर्मांतर करण्याचा प्रयत्न करीत होता. तेव्हा मराठ्यांनी त्यावर हल्ला चढवून त्यास पराभूत करुन धडा शिकविला. पण तो पुन्हा डोकेवर काढल्याने इ.स. १७८६ मध्ये तुकोजीराव होळकरांनी मोहीम हाती घेऊन त्यांचा बादामी, गजेंद्रगड, धारवाड, सावनूर, अडौनी व बहादुरविंड प्रदेश ताब्यात घेतला. मार्च १७८६ मध्ये तुकोजीरावाने मोठा पराक्रम गाजवून म्हैसूरचा टिपू सुलतान यांचा दारुण पराभव केला.[९६] टिपूच्या दोन्ही मुलास पकडून कैदेत टाकले. टिपू सुलतानची जी धर्मांधता चालू होती; ती या पराभवाने मोडीस काढली. या पराभवाच्या घटनेनंतर टिपू सुलतान हा हिंदू प्रेमी बनला. एवढेच नाही तर, टिपू सुलतान हा

निधर्मी आणि देशप्रेमी बनला. तुकोजीरावांनी म्हैसूरच्या ओडीयार राज्याचे भक्षण करणाऱ्या टिपूस संपविले.

### २.३.८.२ मेडतची लढाई:

इ.स. १७८७ महादजी शिंदे व तुकोजीराव होळकर यांनी मिळून उत्तर मोहिम हाती घेतली. मार्गातील अमझेरा, रतलाम, कृष्णगड, सादडी, उदयपूर व जयपूर पर्यंत विक्रमी घोडदौड करून खंडणी वसूल केली. तुकोजीराव होळकर यांचा थोरला मुलगा काशीराव यांनी उत्तरेत मोहिमेवर असताना हरियानातील नूंह निमकसरवर नोव्हेंबर १७८९ मध्ये हल्ला चढवून तो जिंकून घेतला. तसेच इ.स. १७९० मध्ये काशीराव होळकर यांनी इंस्माईल बेगवर हल्ला करुन त्यास पळवून लावले.[९७] जून १७९० मराठा फौजेने रजपूत व मोगलांच्या संयुक्त आघाडीचा धुव्वा उडविला. तेव्हा रजपूतानी पळून जाऊन पाटनचा आश्रय घेतला. म्हणून मराठा फौजेने त्यावरही हल्ला चढवून तो जिंकुन घेतला. तर काही राजपूत जोधपूरला पळून गेले. त्यांच्यावर ही हल्ला केला. तेव्हा मराठ्यांनाशेखावटी व अजमेरवर अधिकार मिळाला. त्यानंतर १० सप्टेबर १७९० मेडता पासून चार मैलावरील नेटारिया येथे मराठे व रजपुत याच्यात युध्द होवून रजपुतांचा दारूण परभव केला. व रजपुतांचा प्रदेश ही जिंकून घेतले.[९८]

तुकोजीरावांचे सर्व आयुष्य रणांगणावरच गेलें आहे. त्यांच्या स्वभांवातील निरनिराळया बाजू निदर्शनास येते. हे मेडत्याची लढाई झाली त्यात रजपूत चीत झाले. त्यांस जबरबस्त बसली. यालढाईचा डिबाइन या शिंद्याचे लष्करी अधिकाऱ्याने शिंद्यांकडे जो अहवाल सादर केला त्यात तो स्पष्ट लिहितो की "होळकरांचे सैन्य जितक्या निकरानें लढलें तितक्या निकराने लढले नसतें तर हा विजय मिळाला नसता."[९९] त्यांच्या स्वभांवातील निरनिराळया बाजू निदर्शनास येण्यास वरील उल्लेखांचा उपयोग होणारा आहे. त्यांचे धैर्य स्वामी सेवा व सरळ स्वभाव हीं स्पष्टपणें दिसतात. तसेंच कोणतेही काम अंगावर घेउन धडाडीनें तडीस लावले त्यांच्या स्वभावांत नव्हतें. म्हणून लालसोट व लाखेरीत त्यांची दूरदृष्टी नव्हती. मल्हाररावांच्या हाताखाली ते वाढले, पण सुभेदारांची धडाडी तुकोजीरावांत उतरली नाहीं. त्याचप्रमाणे सुभेदारांची करडी जमाखर्ची नजर तुकोजीरावांत मुळींच उतरली नव्हती त्यामुळे खर्चाचा पेंच त्यांस जन्मभर भोंवला.

तुकोजीराव होळकर यांनी इ.स. १७९१ ला जयपूरवर स्वारी करुन जयपूनचा राजास पराभूत केल्यावर दौसा व हिन्डौन या महालावर ताबा मिळविला. तसेच सतरा लाख रुपये खंडणी वसूल केली. तुकोजीराव होळकर यांनी कुशलगड इतर किल्ल्यावर ऑक्टोबर १७९१ स्वारी करुन जिंकून घेतले. त्यानंतर मार्च १७९५ ला मराठा सैन्यासह तुकोजीराव होळकरांनी स्वारी करुन त्यांचाही पराभव केला.

होळकर राजाने महादजी शिंदेच्या पडत्या काळात केलेल्या मदतीची, प्रेमाची, उपकाराची परतफेड दासीपुत्र महादजी शिंदेने बेइमानाने केली.[१००] पानिपतच्या तिसऱ्या

युद्धानंतर रघुनाथरावांनी महादजी शिंदेचा वध करण्याचा हूकूम दिलेला असताना सुभेदार मल्हारराव होळकरांनी मध्यस्थी करुन जीवदान दिलेले होते. एवढेच नव्हे तर महादजीची आर्थिक बाजू डबघाईस आलेली होती. त्या त्यावेळी अहिल्याबाईने बऱ्याच वेळा मागीतल्यापेक्षाही मोठी सढळ हाताने भरगोस मदत केलेली होती. राणोजी शिंदेचा दासीपुत्र महादजी शिंदेनी संपूर्ण शिंदेशाहीस धर्म संकटात टाकले. मराठेशाही कलंकीत केली. तर पुढे महादजी शिंदेचा दत्तक पुत्र दौलतराव शिंदेनी तर होळकरशाही व पेशवाई बुडवून स्वराज्य नष्ट करण्याचा छंदच बांधलेला होता. असे त्यांनी केलेल्या कृतीवरून दिसून येते.

**२.३.८.३ लाखेरीचे युध्दः**

दौलतराव शिंदे यांच्या सरदारकडून **सुशैली येथे** झालेल्या युध्दात तुकोजीराव होळकर व काशीरावांचा पराभव झाला. त्यानंतर तुकोजीरावांनी शिंद्याचा बदला घेण्यासाठी पुन्हा युध्दाची जय्यत तयारी केली. तुकोजीरावांनी दुसरा पुत्र मल्हारराव यांस सोबत घेऊन अहिल्याबाईच्या संमतीने २९ मे १७९३ शिंदेशी लढा देण्यासाठी निघाले. १ जुन १७९३ ला शिंदे सोबत झालेल्या युद्धात तुकोजीराव व मल्हारराव दुसरा यांचा पराभव झाला.[१०१] या युद्धाचे नेतृत्व शिंद्यांतर्फे सेनानी बेनोइट डीबोइन हा करीत होता. तर होळकरांच्या सैन्याचे नेतृत्व मल्हारराव दुसरा हा करीत होता.

पण महादजी शिंदे सारख्या कसलेल्या सुभेदाराचा पराभव करण्यासाठी गेलेल्या होळकरांचा लाखेरी येथे युद्ध होवून तुकोजीराव व मल्हारराव दुसरा पिता पुत्राचा पराभव केला. अहिल्याबाई यांच्या काळात मात्र शिंदेची वाकडी नजर देखील टाकल्याची हिम्मत नव्हती. पण होळकरांसारखा खंबीर मित्र कमजोर झाल्याचे पाहून शिंदेची ही कपटी वृत्ती ही मराठ्यांना शोभणारी नव्हती. या युद्धाने शिंदे होळकर कायमचे एकमेकापासून दुरावले

"महादजी शिंदेच्या आक्रस्थाळी चढाईखोर आणि हावरट धोरणामुळे मराठ्यातील भाईचारा संपला आहे. महादजीस पेशव्यांनी रोखावे अथवा शिंदे होळकरांचा उत्तरेतील सर्व सरंजाम जप्त करावा"[१०२] अशी मागणी २३ जानेवारी १७९३ ला तुकोजीरावांनी आपल्या कारभारी यशवंत गंगाधर यांच्याकडे मार्फत पेशव्याकडे केलेली होती. तुकोजीराव होळकर व नाना फडणीस या दोघांनी मिळून सवाई माधवरावांच्या आज्ञेत राहून सन १७७६ ते १७८५ या बारा वर्षात दक्षिण हिंदुस्थानातील मोहिमामध्ये मराठ्यांना यश मिळवून दिले.

**२.३.८.४ खडर्याचे युध्दः**

रघुनाथरावांनी सवाई माधवराव हे पेशवे अल्पवयीन असल्याने फितूर व स्वार्थी वृतीने निजामाशी संधान बांधून मराठा मंडळास आव्हान देण्याचा प्रयत्न करीत होते. तसेच होळकर व शिंदे तसेच नाना यांच्यातील भांडणामुळे हैद्राबादचा निजाम दिवसेंदिवस प्रबळ बनत चालेला होता. याशिवाय निजामाने टिपू सुलतानाच्या विरोधात इंग्रजाचे साहय घेतले. निजामाच्या या नादानपणास, दांभिकपणास व घरभेदीपणास मराठ्यांना आव्हान देवू पाहत

असतांना नाना फडणीस यांनी पुढाकार घेऊन सर्व मराठा सरदारातील मतभेद बाजूला ठेवून सर्व सरदार सेनापती व सुभेदारांना एकत्र करुन ७ मार्च १७९५ ला परंडया जवळील खर्डा येथे समोरा समोर गाठ पडली. निजामाकडे या युद्धात एक लक्ष दहा हजार सैन्य व १५० तोफा होत्या. तर मराठयाचे मात्र चौऱ्याहत्तर हजार सैन्य व १९२ तोफा होत्या. मराठयानी अल्पसैन्यानिशी निजामावर अतिशय जिद्दीने लढा देऊन निजामाचा मोठा पराभव केला. या युद्ध समयी मराठा पेशव्यांचे सेनापती व सुभेदार तुकोजीराव होळकर हे आघाडीवर होते.[१०३] मात्र या युद्धात शिंद्याचे कोणीही हजर नव्हते. कारण महादजी शिंदेचे निधन झालेले होते. त्यांचे फक्त दुय्यम दर्जाचे सरदार हजर होते. महादजी शिंदे दत्तक पुत्र दौलतराव शिंदे हे १० में १७९४ ला गादीचे वारस बनले.[१०४] खडर्याच्या लढाईचे सर्व श्रेय नाना यांच्या संघटन कौशल्यास जाते. शिंदे-होळकर यांच्या मित्रत्वात शत्रूत्वाची भावना वाढत गेली.

अहिल्याबाईचा वृध्दापकाळाने निधन झाल्यानंतर होळकर शाहीचे सेनाधिकारी सरसेनापती तुकोजीराव होळकर हे होळकर शाहीचे सुभेदार बनले. पण तुकोजीराव हे ही अहिल्याबाईच्या वयाचे असल्याने सात दशके त्यांनीही आपले जीवन व्यतीत केल्याने ते ही थकले होते. तरी पण ते सुभेदार झाले खरे, पण नंतर तुकोजीरावांनी पत्र काशीरावांच्या नावाने होळकर शाहीची सुभेदारी मिळावी यासाठी २९ जानेवारी १७९५ ला पेशव्याकडे राजवस्त्राची मागणी केलेली होती.[१०५] यातून त्यांनी आपला उत्तराधिकारी काशीराव असेल असे जाहीर केलेले होते.

पण तुकोजीरावांना सतत अनेक युद्ध मोहिमावर सुरोली, लाखेरी व निजामाशी खर्डा यासारख्या लढाईमुळे स्वत:चा वारसा प्रश्न कायमचा सोडविण्यासाठी वेळच भेटला नाही. पण मातोश्री अहिल्याबाईनी रामराव अप्पाजी यांच्याशी सल्लामसलत करीत असत. तेंव्हा त्यांनीच रामराव अप्पाना दरबाराचे दरखदार म्हणून नेमलेले होते. या दरखदाराच्या कामाचा इ.स. १७९८ मध्ये ठरविण्यात आलेले होते. तुकोजीरावांच्या हयातीतच त्याच्या नंतरच्या सुभेदारीपदावरून संघर्ष वाढतच चालला. तेव्हा वडील तुकोजीरावास थोरला मुलाने (काशीरावानी) दौलतीचे मालक बनावे व धाकटया (मल्हाररावानी) त्यांचे मुखत्यार रहावे असे वाटत होते.[१०६]

तुकोजीराव होळकरांच्या मृत्यूनंतर सर्जेराव घाडगे व बाळाजी कुंजीर यांनी तुकोजीच्या चार मुलांत भांडणे लावून दिली. सर्जेराव घाडगेनी स्वत:ची सुस्वरुप कन्या बायजाबाई हिचा विवाह २६ फेब्रुवारी १७९८ ला दौलतराव शिंदे यांच्याशी लावून दिला. दौलतराव शिंदे यांना या अगोदरच दोन बायका होत्या ही तिसरी होती. सर्जेराव घाडगे आता शिंदेच्या लष्कराचा सेनापती व कारभारी व सासरा बनल्याने याची ताकत वाढल्याने तो अधिकच बेशिस्त वागू लागला. नाना फडणीसांच्या निधनानंतर हा सर्जेराव बळजबरीने नानाच्या घरी राहण्यास जावून त्याने ब्राहमणाचे घर मांसाहार करुन बाटविले.

काशीराव हा तुकोजीचा थोरला पुत्र असल्याने नियतीनुसार तोच होळकर राज्यांचा तुकोजीनंतर वारस होता. तसेच अहिल्याबाईचीही काशीरावासच संमती होती. मल्हारराव दुसरा हा अतिशय अहिल्याबाईचा लाडक होता. पण तो पुढे पुढे त्याच्या खोडया, आडदांडपणा व अतिमहत्वकांक्षीपणा इतक्या वाढत गेला त्यामुळे तो सर्वांच्या मनातून तो पुर्णतः उतरला होता. तुकोजीरावांची तब्यत खालवत जाऊन श्रावण वय ८ मंगळवारीं ता. १५—८—९७ ते देवलोक झाले.[१०७]

सुभेदार मल्हारराव होळकर व अहिल्याबाई सारखी न्यायनिष्ठरता, हिशोबीपणा तुकोजीरावांत नसल्यामुळे तुकोजीरावांचा आदर, विवेक, कर्तबगारी जाज्वल्याने दिसून येत नाही. तुकोजीरावांचा स्वभाव हा बिनहिशोबी असल्याने त्यांना आपल्या जीवनात नीट घडी बसविता आली नाही. तुकोजीराव हे शिपाईगडी जन्मभर राहिल्याने सतत युद्ध मोहिमावर जावे लागल्याने आपल्या मुलांकडे लक्ष देता आले नाही. त्यामुळे त्यांच्या मोठा वाद निर्माण झाला. या भावंडांच्या वादाचा फायदा महादजी शिंदेनी घेण्याचा प्रयत्न केला. त्या संघर्षात मराठी सत्ता लयास जाण्यास कारणीभूत ठरली.

**२.३.९ काशीराव होळकरः**

काशीराव होळकर यांचा जन्म २० फेब्रुवारी १७५० तुकोजीराव होळकर व रखमाबाई यांच्या पोटी झाला. यांचा विवाह हा आनंदीबाईशी झाला. यांना भागाबाई ही कन्या होती.[१०८] काशीराव होळकर हा तुकोजीरावांचा थोरला मुलगा असला तरी शारीरिकदृष्टया सक्षम नसल्यामुळे तो सुभेदारीस लायक नव्हता. मल्हारराव होळकर दुसरे काशीरावांचे धाकटे बंधु हे शूरवीर होते, पण हे ही आडदांड व अविवेकी होते. त्यामुळे दरबारातील कारभाऱ्यांनासुध्दा सुभेदारीचे वस्त्रे कोणास द्यावीत हा प्रश्न निर्माण झाला. त्यावेळी सुभेदार तुकोजी हे मृत्यच्या शय्येवर पडल्यामुळे त्याचा कोणावरही प्रभाव पडत नव्हता. याच संधीचा फायदा काशीराव व इतरांनी घेतला. नाना फडणीस, यशवंतराव होळकर व इतरांना वाटत होते की, सुभेदारीची वस्त्रे काशीराव हा वडील असला तरी तो वेडसर व तेवढा शूरवीर नसल्याने त्याऐवजी मल्हारराव होळकर यांस द्यावीत. पण दौलतराव शिंदे बापु होळकर व पेशवे यांनी स्वतःच्या स्वार्थासाठी या वारसा प्रश्नी थोरले काशीरावाच्या बाजुने हस्तक्षेप करून थोरल्या मुलासच गादी मिळावी असा आग्रह धरला.

दौलतराव शिंदे यांच्या सरदारकडून सुशैली येथे झालेल्या युध्दात तुकोजीराव होळकर व काशीरावांचा पराभव झाला. त्यात महादजी शिंदेचे निधन १२ फेब्रुवारी १७९४ व मातोश्री अहिल्याबाईचे निधन १३ ऑगस्ट १७९५, महादजी शिंदेचा दत्तक पुत्र शिंदेशाहीच्या गादीवर १० में १७९४ ला विराजमान झाले. ६ डिसेंबर १७९६ ला बाजीराव दुसरा पेशवे गादीवर बसले. तर १५ ऑगस्ट १७९७ ला सुभेदार तुकोजीरावचा मृत्यू झाला.[१०९] असा घटनाक्रम

घडत असताना दौलतराव शिंदेच्या सरदाराकडून होळकरशाहीत जबरदस्तीने चौथाई वसूली सुरू केली.

दौलतराव शिंदे याचा विरोध करण्यासाठी सुरौली येथील युद्ध घडले. या युद्धात होळकरांचा पराभव झाल्याने पुन्हा होळकरांनी लाखेरीचे युद्ध घडवून आणले. या सर्व घटना कामात होळकरशाहीच्या वारसा संघर्षाची भर पडली या सर्व बाबीने मराठेशाही अस्थिर होण्यास व शिंदे-होळकर संघर्षास सुरुवात झाली. म्हणजेच काळाने मराठी सत्ता ही तरुणांच्या हाती दिल्याने कोणीही कोणाचे ऐकण्यास तयार नव्हते. यासाठी पुंणे दरबारातील जेष्ठ मंडळी नाना फडणीस, शिंदेचे कारभारी आबाजी इंगळे, लखबादादा, जीवबा बक्सी, अंबाजी रघुनाथ चिटणीस व गोपाळराव चिटणीस हे सर्व जन प्रयत्नशील होते.

दौलतराव शिंदे सत्ताविस्ताराची भूक मोठी होत चालली होती. दौलतरावाना पुण्याचे पेशवे पद, साताऱ्याचे छत्रपतीपद व होळकरांचे राज्य, असा सर्व मानमरताबची हाव वाढत चालली होती. विश्वासघाती दौलतराव शिंदेशी तोंड वा सामना देण्यासाठी काशीराव कमी आहे. म्हणून होळकरशाहीचे सेनापती पद स्वत:कडे राहावे असे मल्हारराव दुसऱ्यास वाटत होते. शिवाय काशीरावांचा स्वभाव हा साधा, भोळा-भाबडा, शांत, समयी व मायाळू असल्याने त्यांचा टिकाव धुर्त अशा शिंदे पूढे लागणार नाही. शिवाय काशीराव हा शिंदेच्या सल्याने वागणारा होता. होळकर कुटुंबास व होळकर राज्यास दौलतराव शिंदेच्या संकटाची भिती निर्माण झालेली होती. हे मल्हारराव दुसरे यांनी पुरेपुर ओळखलेले होते. पण काशीरावास मात्र असे काहीच वाटत नव्हते. तसेच पेशवे पद आपल्याकडेच असावे यासाठी राघोबादादाचे अमृतराव, बाजीराव दुसरा व चिमणाजी या तीन्ही मुलांमध्ये वारसा संघर्ष चालु होता. यासंधीचा फायदा दौलतरावांनी घेऊन होळकर राज्य स्वत:च्या घशात घालण्याचा प्रयत्न सुरू केला होता. हे काशीरावास कळून येत नव्हते. उलट काशीरावचा दौलतराव शिंदे यांच्यावर अधिक विश्वास होता. म्हणूनच काशीरावांनी दौलतराव शिंदे यांच्या सहाय्याने होळकरशाहीच्या सुभेदारीचे वस्त्रे १५ ऑगष्ट १७९७ पासून मिळाले.[११०]

एका अर्थाने दौलतराव शिंदेकडून होळकर संस्थान हडप केले जाणार होते. हे काशीरावाच्या लक्षात आल्याने त्यांनी दौलतरावाशी नमतेपणांने घेण्यातच आपले हित आहे. म्हणजे काशीरावांनी काळाची पावले ओळखून शिंदेशी शत्रूत्व न पत्करता दोस्ती पत्करुन होळकर संस्थान टिकविले. एका अर्थाने काशीरावाची मुत्सद्देगीरीचा फायदा झाला. म्हणजेच शिंदेच्या विरोधात सरौली व लाखेरी युद्ध करुनही शिंदेशी दोस्ती टिकवून ठेवली. पुणे मराठामंडळीत फारमोठी अराजकता पसरलेली होती. दौलतराव शिंदे होळकरांचे राज्य बळकावण्याच्या प्रयत्नात होते. पेशव्यांचे कारभारी नाना फडणीस थकलेले होते. सर्जेराव घाडगे पुणे सरकार नष्ट करण्याच्या प्रयत्नात होते. काशीराव होळकरांना सुभेदारी पाहिजे होती.

व ती टिकावयाची होती. मल्हारराव दुसरे, विठोजी व यशवंतराव यांस शिंदेकडून होळकरशाहीची सुटका करावयाची होती. तर इंग्रजांना मराठी सत्ता हडप करावयाची होती.

काशीराव हा स्वत:च्या मनाने वागेल असा नसल्याने तो पेशवे बाजीराव व शिंदे यांच्या तंत्राने चालू लागला. तर दौलतराव शिंदेना होळकरांचे राज्य गिळकृत करावयाचे होते. त्यामुळे यांना मल्हारावासारखा किंवा विठोजीरावांसारखा वा यशवंतरावसारखा बुध्दीमानी, स्वाभिमानी, शूरवीर व धाडसी नको नव्हता. म्हणूनच दौलतराव शिंदेने स्वार्थ हितसाधण्यासाठी धाडसी असणाऱ्या तुकोजीरावांच्या बाकीच्या मुलांचा काटा काढण्याचा डाव रचला. त्यासाठी काशीराव भोवती तसा कंपु ठेवला. त्या कंपुच्या सल्याने काशीराव निर्णय घेत असे. त्या कंपुने काशीरावास सल्ला देऊन मल्हाररावास आपल्या मार्गातील सर्वात मोठा अडसर आहे हे पटावून दिले .त्यामुळे शिंदे पेशव्यांकडे आपले माणसे पाठवून पाच लाख रुपये देण्याचे कबुल करुन दौलतरावांस विनंती केली. तेंव्हा दौलतराव शिंदे यांनी होळकरांचे शिंदे घराण्यावरील उपकार विसरुन आपमतलबी धोरण समोर ठेवून काशीराव मतास सहमती दर्शविली. काशीरावाकडून आलेले मध्यस्थ मंडळी ही दौलतरावांच्या तंत्राने चालणारे होते. म्हणून त्यांनी आपलेही मत समाविष्ट करून दौलतरावास सांगितले. म्हणजेच काशीरावांना मल्हारावास फक्त धडा शिकावयाचा होता. काशीराव शरीरानें आणि मनानें व्यंग, बापू होळकर त्यांचा बक्षी: आणि बापू व मल्हाररावांचे हाडवैर. काशीरावांना हाती धरलें पेशवे व शिंद्यानीं 'हस्तगत न होता तैसाही प्रकार (मारण्याचा) झाल्यास चिंता नाही.' म्हणाल्यामुळे या तिघांच्या कुटील डावाने मराठेशाहीत 'ध' चा 'मा' हा दुसऱ्यादा झाला. या कटात बापू होळक पुढारी होते.[१११] त्यांनी स्वत:चे पूर्वीच्या वैराचा बदला मल्हारराव दुसरे याच्यांशी घेण्याचा प्रयत्न केला. दौलतराव शिंदेच्या या संकुचित धोरणामुळे होळकर कुटूंबास तुकोजी होळकर नंतर खूप मोठा त्रास सहन करावा लागला..

यामुळे इ.स. १७९६ च्या अखेरीस होळकरशाहीत भाऊबंदकी सुरू झाली.[११२] होळकरशाहीत काशीराव, चुलते बापू होळकर, चुलतभाऊ संताजी होळकर. चिमाजी बुळे व रघुपंत खंडेराव हा एक गट बनला. तर मल्हारराव दुसरे, विठोजी होळकर, नाना फडणीस, पेशवे अमृतराव व यशवंतराव होळकर यांचा दुसरा गट बनला. पण दौलतराव शिंदेनी काशीरावांनीही आपला हेतु न कळु देता. काशीरावांस भडकावून अचानक रात्रीच्या वेळी १५ सप्टेबर १७९७ रोजी भांबुर्डा येथे वेगळी छावणी करून मुक्काम टाकलेल्या ठिकाणी हल्ला चढविला. त्याबेसावध बंधुना समजण्या अगोदच मल्हारराव, विठोजी व यशवंतराव त्वेशाने लढता लढता मल्हारराव मारले गेले. तर विठोजी व यशवंतराव जख्मी होवून अंधारात प्रसार झाले. या लढाई काशीरावास आपल्या बंधुस ठार मारावयाचे नव्हते, पण शिंदेना होळकर शाही घशात घालावयाची होती. ती हे बाकीचे होळकर बंधु असताना शक्य नव्हते. तेव्हा

एक-एकांचा नाश करावयाचा होता. तो यातून सुरूवात केलेली होती. काशीराव होळकर यांचा मृत्यू १५ फेब्रुवारी १८०८ रोजी झाला.[११३]

**२.३.१० मल्हारराव होळकर दुसरे:**

मल्हारराव होळकर दुसरे यांचा जन्म तुकोजीराव होळकर व रखमाबाई यांच्या पोटी झाला. म्हणजेच सवाई मल्हारराव हे तुकोजीरावांचे औरस द्वितीय चिरंजीव होते. यांचा विवाह जयाबाई ऊर्फ जीजीबाई यांच्याशी झाला. त्याना खंडेराव हा मुलगा होता.[११४] यांच्या अंगी सुभेदार मल्हारराव होळकरांसारखी धमक व चमक होती. मल्हारराव होळकर दुसरे काशीरावांचे धाकटे बंधु हे शूरवीर होते. पण हे आडदांड व अविवेकी असल्याने अहिल्याबाईचा खूप आवडता असुनही त्यांनी पुढे पुढे खूप त्रास देत असल्याने अहिल्याबाईचा नाइलाज झाल्याने त्यांस डयुडरनेक या फ्रेंच सरदारमार्फत पकडुन बिजागडच्या किल्ल्यात कैदखान्यात ठेवले. पण तुकोजीने आपल्या मुलाच्या प्रेमापोटी व त्याच्या पत्नीने सुटका करण्याची गयावया केल्यामुळे अहिल्याबाईनी त्यांची सुटका केली.

मल्हारराव होळकरांचा स्वभाव हा अतिशय शूर धाडसी व उदारवत्तीचा होता. तेवढाच तो उपदव्यापी, आडदाड व अतिशय खोडकर वृत्तीचा होता. लहानपणी तो अहिल्याबाई व तुकोजीरावाचा आवडता होता. पण जस जसा मोठा होवू लागला. तस तसा तो सगळयाना भंडावून सोडू लागला. त्यामुळे त्याच्या शत्रुत व हाडवैरीमध्ये बरीच मोठी वाढ होत गेली.

दौलतराव शिंदे यांच्या सरदारकडून सुशैली येथील युध्दात तुकोजीराव होळकर व काशीराव या पितापुत्रांचा पराभव झाला. त्यामुळे तुकोजीरावांनी शिंद्यांकडून झालेल्या पराभवाचा बदला घेण्यासाठी तात्काळ पुन्हा युध्दाची जय्यत तयारीनिशी दुसरा पुत्र मल्हाररावांस सोबत घेऊन अहिल्याबाईच्या परवानगीने २९ मे १७९३ शिंदेशी लाखेरी येथे लढा दिला. या युद्धाचे नेतृत्व शिंद्यांतर्फे सेनानी बेनोइट डीबोइन हा करीत होता. तर होळकरांच्या सैन्याचे नेतृत्व मल्हारराव दुसरा हा करीत होता. त्या १ जून १७९३ ला शिंदेच्या फौजेशी निकराचा लढा दिला. पण युध्दात पराभूत होवून परतावे लागले.[११५]

दोघा भावंडात सुभेदारीसाठी स्पर्धा लागली. काशीराव शिंदेच्या गोठात गेला. पेशव्यांनी सुभेदारीची वस्त्रे काशीरावांना दिली. मल्हारराव दुसरे यांचा दगाबाज असलेल्या दौलतराव शिंदेवर व सर्जेराव घाडगेवर अजिबात विश्वास नव्हता. काशीरावांनी शिंदेशी केलेली मैत्री मल्हाररावांना अजिबात मान्य नव्हती. सर्व मराठा मंडळीस गिळंकृत करण्याएवढी पाशवी ताकद शिंदेकडे होती. बाजीराव दुसऱ्यासही शिंदेची व सर्जेराव घाडगेची प्रचंड भिती वाटत असल्यामुळे त्यांनी स्वरंक्षणासाठी इंग्रजांना जवळ केले. शिंद्यांपेक्षा इंग्रज बरे अशी अनुभूती इतिहासात पेशव्यांना प्रथमतःच झाली! रानटी शिक्षापेक्षा, सुसंस्कृत इंग्रज केव्हाही चांगले असे पेशव्यांना वाटले.

अहिल्याबाई यांच्या काळात मात्र शिंदेची वाकडी नजर देखील टाकल्याची हिम्मत नव्हती. पण होळकरांसारखा खंबीर मित्र कमजोर झाल्याचे पाहून शिंदेची ही कपटी वृत्ती ही मराठ्यांना शोभणारी नव्हती. या लाखेरी युद्धाचे सेनापती मल्हारराव दुसरे यांच्याकडे होते. या युद्धाने शिंदे होळकर कायमचे दुरावले. सुभेदारीचे वस्त्रे काशीरावास देण्याचा तुकोजीरावाच्या विचाराने मल्हारराव दुसरे नाराज झाले. त्यावेळी नाना फडाणीसांकडे हा वाद आल्यावर त्यांच्या मते तुकोजीराव होळकरांच्या काशीराव हा वेडसर असल्याने मल्हाररावांस सरदारकीची वस्त्रे द्यावीत. पण शिंदे आणि बाजीराव पेशवे याच्या मनांतून होळकरांचे घराणे नानांचे पक्षातून काढून आपल्या ताब्यातून ठेवावे अस वाटत होते. त्याप्रमाणे काशीरावास सरदारकीची वस्त्रे दिली व त्यांची बशिगिरी म्हणजे सैन्याचा अधिकार बापू होळकरास देण्यात आली. त्यावेळी जी वस्त्रे देण्यात आली.[११६]

होळकर राज्याचे सुभेदार तुकोजीरावानंतर त्यांचा थोरला मुलगा काशीराव गादीवर बसल्याने लहान भाऊ मल्हारराव दुसरा यांनी भांबुडर्यास जाऊन तेथे सवता सुभा उभा करुन राहू लागला. हे काशीराव व बाजीराव पेशवे यास ते सहन होत नव्हते. मल्हारराव आपल्या फौजा खानेदशात पाठवून खानदेशात आपला स्वतंत्र अंमल सुरू केला. शिवाय तेथे दंगा करुन महालात लूट करू लागले.''नंदुरबार, सुलतानपूर, अंबाड वगैरे जागा धूळधुमासा करुन दिल्या, येणेंकरुन यागा, पीलखाना वगैरे कारखाने दामदस्त बरबाद जाहले. त्यावर मल्हाराव म्हणाले की, "माझे हातून मुखत्यारीनें काम घेतील तरी काशीरावांचा हुकूम मजवर आणि माझा हुकूम दौलतीवर: परंतु बापू होळकर याजला काढून ध्यावें म्हणजे मी सर्वेपरी अनुकुल. "[११७]

काशीराव हे मनाने व शरीराने अपंग होते. काशीरावांचे बक्षी बापू होळकर व बंधु मल्हाररावांशी मोठा वैर होता. त्यामुळे पेशवे, शिंदे व बापू होळकर यांस मल्हारराव नको होते. 'मला होळकराचे सेनापती पद मंजूर करा अथवा सुभेदारी द्या.'[११८] अशी मागणी बऱ्याच दिवसापासून बाजीराव पेशव्याकडे मल्हारराव दुसरे यांनी केली होती. याचा गैर फायदा घेऊन दौलतराव शिंदेनी काशीरावाच्या प्राप्त सुभेदारीस अप्रत्यक्षपणे मल्हाररावांनी आव्हान दिले असल्याचा कांगावा सुरु केला.

तेंव्हा वडील तुकोजीरावांनी आपला पूण्यातील वकीलांचा मुलगा रघूपंत खंडेराव यास काशीरावांकडे समेटाचे बोलणे करण्यासाठी पाठवून दिले. तर मल्हाररावाकडे एक लाख्या बारगीर नावाचा शूर गडी हा उमद्या स्वभावाचा असल्याने व हजार बाराशे सैन्याचा जमाव आल्याने सल्ला मसलत झाली की, त्यानुसार ते खानदेशात स्वारीस गेले. तर शामराव महाडिक माळव्याकडे गेले. या मोहिमेमुळे काशीरावांनी दौलतराव शिंदेस तगादा लावून यशवंतरावांची माणसे खानदेशाकडे गेली. तेंव्हा निजामाशी संघर्ष करावा लागला. त्यावेळी त्यांनी मल्हाररावाकडे आणखीन कुमक पाठविण्याची विनंती केली. तेंव्हा मल्हाररावाच्या

लोकांनी ही निजामाविरुद्ध हाती घेतलेल्या मोहिमेस वाढीव कुमक पाठवून दिली. त्यामुळे स्वत: मल्हाररावांकडे मात्र अतिशय कमी फौज राहिली. याचा सुगावा काशीराव व शिंदेस लागताच त्यांनी मल्हाररावांच्या फौजेची झालेल्या फाटाफटीचा फायदा घेतला.

''लष्कर आवळून कांहीं फौज पलटणें बंदोबस्तास ठेवून पलटणांचा परीघ पहाडाभोंवतां केला. मुझफरखानास मोहऱ्यावर पाठविले तलवार चालली... खासा मल्हारराव होळकर यांस तरवारीच्या जखम व तोराची जखम व गोळी ऐशी लागून ठार जाहले....[११९] म्हणजेच दौलतरावांनी मल्हाररावास बेसावध ठेवून कमकुवतीच्या संधीचा फायदा घेण्यासाठी दौलतराव शिंदेनी मल्हारराव होळकर दुसरे यांच्या छावणीवर अचानक हल्ला केला. त्या चकमकीत मल्हारराव होळकर दुसरे हे शिंदेच्या मुजफरखानाने ता. १४ सप्टेंबर १७९७ रोजीं भांबुडर्याच्या मैदानावर मल्हारराव मारला गेला.[१२०] पण शेवटी काशीरावांनी आपल्याच सख्या भावाचा शेवट केला. त्यांचा अत्यंसस्कार हा त्याचे वडील तुकोजीराव यांच्या शेजारी पुण्यात करण्यात आला. त्यावेळी मल्हाररावाची पहिली पत्नी सती गेली. तर जयाबाई गरोदर होती. [१३८] एवढेच नाही तर यशवंतरावांची पत्नी, मुलगी, मल्हाररावाची पत्नी जयाबाई व यमुनाबाई ही होळकर राज्यपरिवार शिंदे व काशीरावांच्या हाती सापडली.[१२१] त्या सर्वांस कैदेत टाकले. मराठ्याचे मातबर सुभेदार शिंदे व होळकर हे आपले राज्य सोडून पुण्यात व पुण्याच्या आसपासच रेगांळून होते. याचीही भिती बाजीरावास नेहमी वाटत होती.

होळकरशाहीतील पहिला यादवीचा भयानक प्रकार सर्वाना अनुभवयास आला. त्यामुळे होळकर शाहीत आता तरी शांतता व स्थैर्य लाभेल असे अनेकांना वाटत होते. पण दौलतराव शिंदे व त्यांचा नवा सासरा सर्जेराव घाटगे यांनी मिळून शिंदेशाहीत व होळकरशाहीत अत्याचार सुरु केले. तेंव्हा मल्हाररावाची गरोदर पत्नी जयाबाईनी काशीरावाचा स्वभाव ओळखूण पूण्यातील कैदतून निसटून पूण्यात केशव गणेश कुंटे यांच्या वाड्यात राहयला आल्या. तिथे त्या प्रसूत होवून मुलगा जन्मला त्याचे नाव खंडेराव ठेवण्यात आले.[१२२] तेंव्हा काशीरावांनी खंडेराव व जयाबाईला मारण्यासाठी दोन तिनशे मारेकरी पाठवून दिले. त्या अगोदरच जयाबाईनी स्वसंरक्षणासाठी दोनशे अरब सैनिक सावधगिरी म्हणून सेवेत ठेवलेले होते. त्यांनी कांशीरावांच्या फौजेचा पराभव केला. पण त्यानंतर पेशव्यांनी सर्व मराठा सरदारासाठी फतवा काढून सर्व मराठा सरदारांनी वा सुभेदाराने अरबास कोणीही कामास ठेवू नये. यामुळे जयाबाईनेही काही अरब कमी केले. तेव्हा जयाबाईने खंडेरावास सुखरूप रहावे यासाठी शनिवारवाडयावर पाठवून दिले. त्यावेळी दौलतरावांनी खंडेरावाची पेशव्याकडे मागणी केली. त्यामुळे बाजीरावांनी त्यांस दौलतरावाकडे सपुर्द केले. यामागे पेशवे व दौलतरावांचा उद्‌देश हा वेगवेगळा होता. पेशव्यांना दौलतरावास काहीही करून पुण्यातून काढावयाचे होते. तर दौलतरावांस शिंद्याच्या बायांस यशवंतरावाची मदत बंद करावयाची होती. त्यासाठी त्यांनी यशवंतरावास पत्र ही पाठवून देऊन कळविले की, ...आमच्या दौलतीमध्ये बखेडा करूं नये.

मल्हाररावाचा पूत्र खंडेराव सरंजामसुद्धां दौलतीची वस्त्रें देवून रवाना करतों तुह्मी आमच्या बायांशी बिघाड करावा. खंडेरावाच्या नावाने सरदारीची (होळकर दौलतीची) आणि तुमच्या नावांने दिवाणगिरीचीं (मुतालकीचीं) वस्त्रे सरकारांतून देववितों.[१२३] दौलतराव शिंदे खंडेरावास घेऊन उत्तरेकडे निघाला. पण वाटेतच महामारीमुळे १४ फेब्रुवारी १८०७ रोजी देहावसान झाले.[१२४]

### २.३.११ विठोजी होळकर:

विठोजी होळकर यांचा जन्म तुकोजी होळकर व यमुनाबाई यांच्या पोटी २१ फेब्रुवारी १७७० ला झाला. यांना नर्मदाबाई, रमाबाई व रेवाबाई या तीन बायका होत्या.[१२५] त्यांना हरिराव हा मुलगा होता. भांबुर्ड्याच्या लढाईत पेशवे, शिंदे व काशीराव यांनी मल्हारराव, विठोजी व यशवंतराव यांच्या गोटावर अचानक रात्रीच्या वेळी बेसावध ठेवून हल्ला केल्याने दोन्ही गटात झालेल्या लढाईत मल्हारराव दुसरा मारला गेला. तर विठोजी भांबुडर्याच्या हल्ल्यात जीव वाचवून पळून जाण्यात यशस्वी झाले. पण होळकरांचा सर्व कुंटुंबकबिला काशीरावांनी आपल्या ताब्यात घेऊन कैदेत टाकले. त्यामुळे विठोजीस बाजीराव दुसरे व काशीराव सुभेदाराची गुलामी सहन न झाल्याने पेशव्यांच्याच मुलखात पंढरपूर येथे राहून बंड उभारले.

पेशवे, शिंदे व होळकर यांच्या आपापसातील दुहीमुळे त्यांना परमुलखात जावून स्वारी करून खंडणी वसूल करावी असे कोणाचेच धोरण नव्हते. त्यामुळे सर्वाच्या फौजेचा खर्च वाढत गेला. तो देणे लांबणीवर पडू लागल्याने बेबंदशाही निर्माण झाली. जो राजा वा सरदार आपल्यास पैका देईल त्यांच्याकडे सैन्य चाकरीस जावू लागले. त्यामुळे काही सरदार अशा फौजेच्या जोरावर परमुलखात लूटमार करु लागले. त्यात जिवाजी यशवंत गोदावरी नदीकिनारी लुटालुट सुरु केलेली होती. तर काशीरावाचा सरदार मालुजी गावडेने दहा हजार लुटारु फौजेनिशी खानदेशात लुटालूट सुरू केलेली होती. विठोजी होळकर पुणे परिसरातून सोलापूरकडे कुच केले. पंढरपूर मंगळवेढा व करकंब भागातील सैन्याची जमावा जमव करुन आमचा पेशवा अमृतराव असून बाजीराव हा नालायक असे मानून पेशव्यांच्या प्रदेशात लूट सूरु केली. विठोजी होळकरांच्या सैन्यात वाढ होत गेली. यातील काही सैन्य होळकरांचे, काही पेशव्याचे तर काही शिंदेचे सैन्य जावून मिळालेले होते. विठोजीने सोलापूर पेठ लुटून तेवीस हजार खंडणी वसूल करून पुण्याजवळील वाफगावी मुक्काम ठोकला. विठोजीने पेशव्यांच्या मंगळवेढा, पंढरपूर, करकंब व टेंभूर्णी भागात सरशी मारून आपली हुकूमत बसविली. पेशव्यांनी पाठविलेले बाळकृष्ण गंगाधर बावनपागे व सरदार पटवर्धन यांचा याचा पराभव केला.[१२६]

काशीरावाचे सरदार मोत्याजी काळू गावडे व जिवाजी यशवंत हे विठोजीसाठी खानदेश व गोदावरीच्या किनारपटी भागात लूट जाळपोळ करीत होते. तर यशवंतरावांचे सरदार

फत्तेसिंग माने, शहामीरखाँ व यशवंतरावाच्या पेंढाऱ्यांनी तापी नदी ते कृष्णा नदी दरम्यानच्या पटयात कहर माजविला. या पेशव्यांच्या प्रदेशात धुमाकूळ चालत असला तरी बाजीराव काहीच करु शकत नव्हता. दौलतराव शिंद्यानी विठोजी विरुद्ध पेशव्यांचा कारभारी बाळाजी कुंजीर व स्वत:चा सेनापती सर्जेराव घाडगेस पाठवून दिले असता, त्यांचाही विठोजीने पराभव केला. विठोजीस अनेकांची साथ होती. त्यात पेशव्याचे बाळकृष्ण गंगाधर बावनपागे, शिद्याचे येसाजी रामकृष्ण, बाजीबा व कृष्णराव मोदी यांचा सहभाग होता.

तेंव्हा तिथे बाजीराव पेशव्यांचा हस्तक किल्लेदार होता. त्यावर चार हजार फौजेनिशी हल्ला चढवून त्या वेळी किल्लेदारास आबा काळे व पानसे आपल्या सैन्यासह व १४ तोफासह येवून मिळाले. तरीही विठोजीने हल्ला चढवून शत्रू फौजास मोडीत काढून त्यांच्या तोफा हस्तगत केल्या. तेंव्हा विठोजीने सोलापूरात प्रवेश करुन बाजारपेठ लुटून घेतली. त्यानंतर करकंबा येथे येवून तेथून तेवीस हजाराची खंडणी वसूल करुन संकरगावी जावून तळ ठोकला. तेथून पुढे जानेवारी १८०१ वाफगावी पोहचले. त्यावेळी त्यांनी विचार केला. विठोजी होळकर यांनी अमृतराव यांची बाजू घेतल्याने बाजीराव दुसरे यास भिती वाटू लागली. विठोजीरावांच्या या कृत्यांने श्रीमंत पेशवे फारच चिडले. तेव्हा विठोजी होळकरांना कायमचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्यांचा सेनापती यांस कर्नाटक स्वारीवरून परत बोलावून घेतले. बापू गोखलेस भरपूर सैन्य देऊन विठोजी होळकरांचे परिपत्य करण्यासाठी रवाना केले.

बापू गोखल्यानी विठोजीचा साथीदार बाळकृष्ण गंगाधरला फितूर करून त्याला पैशाची लाच देऊन बेसावध असलेल्या विठोजीवर हल्ला करून ता. २७ एप्रिल रोजी बापूं गोखल्यांनी कैद करून पेशवे दरबारात हजर केले.[१२७]

शनिवारवाडयात विठोजीच्या हत्येचा आनंदोत्सव पहाण्यासाठी एक शामियांना उभा करण्यात आलेला होता. त्यात श्रीमंत व त्याचे ईस्टमित्र आनंदाने विनोद थटा मस्करी करत बसले होते. तेवढयात एखाद्या राक्षसाला बांधून आणावं तसं विठोजीला आणण्यात आले. पेशव्यांनी हत्तीच्या पायाखाली देण्याअगोदर विठोजीला दोनशे चाबकाचे फटकारे मारण्याची शिक्षा दिली. त्यानुसार माराला सुरूवात करण्याचा हुकूम देतांच. विठोजीच्या उघडया अंगावर दोनशे चाबकाचे फटकारे पडू लागले. त्यामारामुळे ते व्याकूळ झाले. अनेक वेळा प्राण वाचविण्यासाठी श्रीमंताकडे याचणा केली. पण त्यांच्या करूणास्पद केलेल्या विनवनीचा विनोद करून मंडळी हासू लागली. माराने जर्जर होऊन विठोजी जमिनीवर पडेपर्यंत मार देऊन रक्तबंबाळ केले. 'सरकारवाडयात पोहंचतांच बेडी तोडून मारमारला दोनशें कमऱ्या मारुन लागलाच हत्तीच्या पायास बांधून ओढाविला दुसरे दिवशीं कारभारी येऊन मूठमाती द्यावयास परवानगी द्यावी म्हणोन अर्ज केला त्यावरुन आज्ञा जाहली. बायको सहगमन करणार होती तिला आज्ञा जाहली नाहीं बायको व पुत्र यांस कैदेत ठेविलें.'.[१२८]

विठोजीच्या समोर यमरूपी हत्ती दत्त म्हणून उभा! मरण डोळयासमोर पाहूणं विठोजीने मोठ-मोठ्याने किंकाळ्या फोडल्या. पण शनिवारवाड्याच्या दगडी भिंती शिवाय त्यांना कोण प्रतिसाद देणार? शेवटी पेशव्यांनी विठोजीस हत्तीच्या पायाखाली देऊन ठार केले. विठोजीचा हा प्रकार छ २ जिल्हेजीं म्हणजे ता. १६ एप्रिल १८०१ रोजीं घडला.[१२९] हत्तीच्या पायी चिरडल्या नंतरही विठोजीच्या पत्नीने सती जाण्यासाठी प्रेत मागितले. पण प्रेताची दूर्गंधी सूटेपर्यत प्रेतास हात लावू दिले नाही.

तेव्हा दौलतराव शिंदे यांनी स्वार्थ हित समोर ठेवून काशीरावांस आपलेशे करून कट रचून मराठेशाहीत 'ध' चा 'मा' दुसऱ्यांदा केला. या कटाचे सुत्रधार बापू होळकर हे होते. पेशवे बाजीरावांनी दौलतराव शिंदेचे ऐकुण व शिंदेनी सर्जेराव घाडगेचे ऐकुण विठोजीचा राष्ट्रद्रोही म्हणून भर दिवसा खून केला. त्यानंतर त्या प्रेताचा विटंबना केली. विठोजीच्या पत्नीस व मुलगा हरिराव यास कैदेत टाकले.[१३०]

**२.३.१२ प्रथम यशवंतराव होळकर:**

यशवंतराव होळकर यांचा जन्म ०३ डिसेंबर १७७६ रोजी तुकोजीराव प्रथम व यमुनाबाई यांच्या पोटी झाला.[१३१] तुकोजीराव नंतर होळकर शाहीची सत्ता काशीरावांच्या हाती आली. पण काशीराव राज्यकारभार सांभाळण्यास असमर्थ निघाले. यंशवतराव पंधरा वर्षाचे असताना अकरा वर्षाच्या मातोश्री अहिल्याबाईने लाडाबाईशी वैशाख दशमीला १ मे १७९१ रोजी विवाह केला.[१३२] यशवंतराव यांना देऊबाई, लाडाबाई, तुळसाबाई व केशराबाई (कृ ष्णाबाई) चार बायका होत्या. यशवंतरावांना दोन अपत्य होती. लाडाबाई या पत्नीपासून भीमाबाई ही भिमाबाई ही कन्या तर केशरबाई या पत्नीपासून मल्हारराव (तिसरे) हा मुलगा होता. केशरबाई ऊर्फ कृष्णाबाई या 'मॉसाहेब' म्हणून ओळखल्या जात होत्या.[१५५]

यशंवतराव चतुर, पराक्रमी व धाडशी मुलगा असल्यामुळे त्याला ऐंशी घोडदळाचा नायक बनविले. पुढे यंशवतरावाची कामगीरी पाहून ५०० स्वाराची शिलेदारी देण्यात आली. तुकोजीरांवाची मोहीम निजाम राज्यातील खडर्याचा किल्याकडे निघाली होती. त्यात यशंवतराव सामील झाले. खडर्याच्या महाराणी अहिल्याबाईंचे माहेर चोंडी गावच्या पुर्वेला १५ मैलावर आहे. हा किल्ला निजामाच्या ताब्यात होता. या खडर्याच्या लढाईत यशवंतराव शत्रुवंर तुटून पडले. आणि १० एप्रिल १७९५ ला निजामाचा पराभव केला.[१३४]

यावेळी यशवंतराव ऐंशी पागेच्या स्वारांनिशी निजामावर चालून गेलेले होते. परत येताच त्या पागेचा तनखा मागण्यासाठी यशवंतराव सुभेदार काशीरावांकडे गेले. तेंव्हा काशीरावानी टाळाटाळ केली. म्हणून यशवंतरावांनी तनख्यांचा तगादा लावून हैराण केले. त्यावेळी काशीरावांनी अरबी पठाणांना पाठवून 'यशवंतराव होळकर यांजला गराडा धावा.' यामुळे यशवंतराव चांगलेच अडचणीत आले. तेव्हा तुकोजीरावांनी काशीरावास समजूत काढण्याचा प्रयत्न केला. तेंव्हा तो वडील तुकोजीरावांना जाब पाठविला की, ''जर आपण

यशवंतराव यांस जामीन व्हाल तर मी त्यांस सोडीन.[१३५] त्यानुसार गोविंदपंत गानू या खाजगीच्या दिवाणाने यशवंतरावांची जामीन घेतली. पण होळकर शाहीत दोन गट उघडपणे पडून दोघेही ऐकमेकांवर हल्ला करण्याची तयारी सुरु केली. यशवंतरावांनी 'या प्रदेशांत राहणें योग्य नाहीं दृढनिश्चय करुन देश हस्तगत करण्यात हिमतीनें आपली कंबर चांगली बांधावी, आणि या कामी आपला बाहुटा उमरावा पूर्वीपासून आपलेकडे देश आहे आणि नवीन देश काबीज करुन या सर्व प्रदेशाची चांगली व्यवस्था केली. तर काशीरावांस गादीवरुन दूर करणें हें काय मोठेसे आहे.?'[१३६] असा विचार करून पुढील कामासाठी लागले

**२.३.१२.१ भांबुडर्याच्या लढाईत:**

यशवंतराव होळकर हे शिंदे, पेशवे व काशीरावांशी भांबुडर्याच्या लढाईत पराभूत झाल्याने यशवंतराव जख्मी अवस्थेत पळून, तो बापू विठ्ठल परभू नांवाच्या एका हुशार गृहस्थास हाताखालीं घेऊन जेजूरीस गेला.[१३७] म्हणजे ते जेजुरीस जाण्यात यशस्वी झाले. पण यशवंतरावांची पत्नी लाडाबाई, मुलगी भीमाबाई, मल्हाररावाची पत्नी जयाबाई व मुलगा खंडेराव, विठोजीची पत्नी व मातोश्री यमुनाबाई इत्यादी सर्व होळकरांचा राज्यपरिवार दौलतराव शिंदे यांनी काशीराव होळकरांस हातास धरून या सर्वाना कैदेत टाकले. जेजुरीस आल्यावर तिथे त्यांना विधवा तुळसाबाईची ओळख झाल्याने आजीबा साधुने दोघांचा विवाह लावून दिला. यावेळी पहिली पत्नी लाडाबाई ही शिंदेच्या कैदेत होती. दुसरा विवाह देऊबाईशी तर त्यांचा तिसरा विवाह हा केशर ऊर्फ कृष्णाबाई या नर्तकेशी झाला. कृष्णाबाई यांच्यापासून त्यांना मल्हारराव तिसरा हा मुलगा झाला.[१३८]

खंडोबा मंदिराचा पुजारी व गुरव यांच्याकडून काहीं द्रव्य मिळवून तो नागपूरच्या रघूजी भोसल्याकडे आश्रयार्थ गेला. तेथे इंग्रज रेसिडेंट कोल्बुक होता. त्यानें यशवंतरावास शिंद्याचे विरुध्द चिथविण्यास कमी केलें नाहीं. रघूजीनें त्यास आपले पदरीं ठेविलें. हे वर्तमान बाजीराव व दौलतराव यांस कळतांच त्यांनीं रघूजीस धमकीचीं पत्रें लिहिलीं की, 'यशवंतराव होळकर तुह्मांपाशी पळून आला आहे. त्याजला कैद करुन पुण्यात पोंहचवून द्यावें.'.[१३९] ही बातमी यशवंतरावांस कळतांच ते बापू विठठल प्रभू यांच्या सल्याने व सहाय्यानें नागपुराहून निसटले. मल्हारराव दुसरे यांच्या मृत्यनंतर दोन वर्षे पर्यतं यशवंतरावास निराश्रित स्थितींत भटकावे लागले. गूरगांव येथे गुरु चिमणभाऊ याची भेट व आशीर्वाद घेऊन पुढे चालते झाले.[१४०] धाडसी सहाय्यक लाला भवानीशंकर कायस्थ हा गृहस्थ भेटला, आणि त्याच्यासह खानदेशांत येऊन सुलतानपूर नंदुरबार परगण्यांत कुंकरमुंडा येथें झुंजार नाईक भिल्ल याचे आश्रयानें थोडी जमियत तयार करुन मुलखांत लुटालूट करीत हिंडत राहिला. त्याच्या पाठीवर इंदुराहून काशीरावाची फौज चालून गेली. तेव्हां यशवंतराव नर्मदापर होऊन तो बढवाणीवरुन धार येथें जाऊन आनंदराव पवार याजपाशीं तीनशे स्वारांनिशीं चाकरीस राहिला. पण पवाराचा दिवाण रंगराव ओढेकर दौलतरावाचे पक्षांत होता. त्यानें यशवंतरावाचा जम बसूं दिला नाही.

धाडस शौर्य वगैरे सेनानायकाचे गुण लोकांत प्रसिध्द होऊन त्याचा जमाव वाढत गेला. गनिमी काव्यानें मुलुखांत लुटालूट करुन त्यानें द्रव्य संपादिलें, आणि त्यांतून जास्त फौज चाकरीस ठेवली. दौलतरावाचा सूड घेऊन सिंद्याच्या बरोबरीनें होळकरांची दौलत पुन: उभी करण्यासाठी तयारी सुरू केली. धार येथें त्यास फार वेळ राहतां आलें नाहीं. दौलतरावानें पवारास धाक घातल्याबरोबर यशवंतरावास त्याने आपल्याजवळून दूर केले. तेंव्हा तो माळव्यांतील सिंद्याचे मुलखांत लुटालूट करुं लागला. 'मल्हाररावाचा अल्पवयीन मुलगा खंडेराव हा होळकर दौलतीचा मालक असून आपण त्याचा कारभार करणार, असें जाहीर करुन यशवंतरावानें काशीरावावर युद्ध पुकारलें.'.[१४१]

होळकरांचे कित्येक जूने सरदार शामराव महाडिक पिंपळे, संताजी होळकर, भिकीजी होळकर, भारमलदादा बाळाजी कमळाकर वगैरे त्यास सामील झाले. पहिल्या मल्हाररावाची रक्षा हरकुँवरबाई व लेकावळा भारमलदादा हे यशवंतरावाच्या आश्रयास आले. त्याच सुमारास बडगोदा गांवीं शिकरींत आपघातानें बंदूक सुटून यशवंतरावाचा उजवा डोळा गेला. महेश्वरास येऊन त्यानें अहिल्याबाईचें द्रव्यभांडार फोडिलें, आणि तेथील द्रव्य घेऊन सैन्याची व्यवस्था बनविली. विठल महादेव तात्या जोग इंदूर येथील सरदार कीबे यांचा पूर्वज यास यशवंतरावानें फडणिशीच्या कामावर नेमिले.[१४२]

### २.३.१२.२ अनेक मातबर सरदारांची साथः

संताजी होळकर व भारमलदादा यांना यशवंतराव उपद्व्यापी वाटत असले तरी, यशवंतराचे साहस, धाडस आणि कर्तत्व या गुणांमुळे अनेक सरदार येवून मिळाल्याने यशवंतरावाच्या ताकतीत वाढ झाल्याने शामराव महाडिक व बाळाजी कमळाकर यांच्या साहयाने परगणे देपाळपूर येथे येवून कार्यक्रम आखूण शेंसव्वाशें घोडे पागेचे व रोकड पाचपन्नास याच्या जोरावर परगणा जावरा, बर्डावदा येथून ते झरावदा, महत्पूरच्या वाघ राजानें आपले धान्याचा पुरवठा केला. पण आतून तो कपटी असल्याने भवानी शंकर यांनी प्रसंगावधान ओळखूण फणसे यांच्या तराणा येथून ते कायथ्यास पोहचले. वजीर हुसेन, मीरघासी व मर्दानअली हे आपल्या सैन्यासह यशवंतरावास येवून मिळाले. मेहरबानसिंग हा तीनशे स्वारानिशी, दुसरा एक साठ स्वानिशी तसेच जमाखान, सोबाजी व भोपाळचा अमीरखां पठाण मोठया लवाजम्यासह हे यशवंतरावास येवून मिळाले.

### २.३.१२.३ शिंदेविरूद्ध लढा:

यशवंतराव होळकर यांना अनेक मातबर सरदारांची साथ मिळाल्याने आपल्या लष्करी ताकतीत योग्य वाढ झाल्यानंतर आपला लढा हा कुटील डाव करणाऱ्या शिंदे धडा शिकविण्यासाठी शिंदेच्या सुजालपूर व बेगंजपूरवर हल्ले करून ते लुटलें. नरसिंग गडच्या अधिकाऱ्यांने चारशे स्वार, दोन हजार प्यादे, दोन हजार रूपये व पोशाख असा नजराणा देऊन साहय केले. तर नवाब अमीरखानचा भाऊ करमदीनखानाने शंभर स्वार पाठवून दिले.

सुजालपुरास अमीरखानास मोठी वस्त्रें व हजार रुपयें नगद देऊन मोठा गौरव केला. तसेच सुजालपुर महालातून दहा हजार खंडणी वसूल करून सैन्याचा पगार वाटप केला. रामसिंग पागेदार चारशे घोडेस्वारानिशी, रामपूरचा नजीबखान शंभर शिपाई व अकरा स्वारानिशी, कोहेलखान चाळीस स्वारानिशी, सदरूद्दीन शंभर स्वारानिशी, नजबअल्ली शंभर स्वारानिशी रामजी गौळीव हाकीमखॉ साठ स्वारनिशी येवून मिळाल्याने यशवंतरावांचे सैन्य दोन हजार स्वार व पाच हजार पायदळ होते. तर सुजालपूर सात हजार, बडोदपासून चार हजार अष्टयाहून पंधरा हजार नेमावरमधून सात हजार खंडणी जमा झाली.

दौलतराव शिंद्यांचा हंडया या शहरावर हल्ला चढविला. ता. २२ मार्च १८०० चें वर्तमान.''यशवंतरावानें जाठाचा एक किल्ला हस्तगत केला. द्रव्य बहुत सांपडले. फौजही हुशार दीडशे दोनशें पर्यत तोफा, पायदळ व स्वार मिळून पन्नास हजार पुण्याकडे येण्याचा रोख आहे. भोसल्यांचीही काहीं फौज बरोबर आहे. नानाच्या सुत्रे करून येत आहे...[१६६] यशवंतराव चंबळच्या पलीकडे जाठांच्या मुलुखांत असून त्याचें तोंड दक्षिणेकडे वळले होते. ''गोविदराव बुळे येऊन भेटले. मीरखां पठाण यांजलाही पत्रे जलद यावयास गेली आहेत. दौलतरावानें आपलीं कांहीं पलटणें यशवंतरावावर रवाना केली.''सिंदे बाया दरकूच उज्जनीकडे जातात. त्यांच्या मदतीसाठीं लखबा लाड उज्जनीनजीक आले. यशवंतराव इंदुराजवळ आहे. त्रिवर्ग एक जागां होणार मसलत जड दिसते. यशवंतरावांनी सिंद्यांच्या महालांत झाडून अम्मल बसविला. लखबादादा, अलीबहादुर, यशवंतराव व बाया सर्व एक विचारें होऊन दौलतरावास ठिकाण ठेविलें नाही.:.[१४३]

तुम्ही आम्हांस अनूकुल असावें उज्जयनीस पोहोंचतांच दरमहा खर्चास देऊ. आम्ही येईपर्यत होळकरांशी कायम करार करुं नये. तुम्हांस कळेल तें तुम्हीं करावें, आम्हांस कळेल तें आम्हीं करुं, यशवंतराव पानसुपारी न घेतां निघून गेले. बायांनीं आपला तळ बाहेर दिला. लखबादादा आल्यावर जड पडेल असें वाटून होळकरानें पहांटेच बायांच्या तळावर छापा घालून फौज लुटून घेतली. भाया सडया निघून लखबाकडे गेल्या. ता. १ नोव्हेंबर १८०० होळकरांनी विश्वास दाखवून छापा घालून लष्कर लुटून घेतलें.[१४४] त्यात लखबा वागळे तोफेचा गोळा लागून ठार झाला.

बायांचे व यशवंतरावांचें सूत्र बिघडण्यास दौलतरावच कारण झाला. पण नवा डाव शिंदे करून आपल्या बायांचा कायमचा काटा काढण्यासाठी यशवंतरावास पत्र पाठवून कळविले की, याउपर तुम्ही बायांस मिळून आमच्या दौलतीमध्ये बखेडा करुं नये. मल्हाररावांचा पुत्र खंडेराव सरंजामसुध्दा दौलतीची वस्त्रें देऊन रवाना करतों. तम्ही बायांशी बिघाड करावा. खंडेरावाच्या नावाने सरदारीची (होळकर दौलतीची) आणि तुमच्या नावाने दिवाणगिरीची मुतालकीचीं वस्त्रें सरकारांतून देवावितों.'[१४५]

लवकरच लखबादादा व यशवंतराव यांच्या भेटी होऊन बोलणीं झालीं. त्यानें यशवंतरावाची समजूत करुन त्याचा बायांशी मिलाफ केला. दौलतरावाच्या फौजा चालून येऊ लागल्या, म्हणून यशवंतराव त्यांचे मुकाबल्यास परत वळला. आणि दौलतरावास निर्धास्त ठेवण्यासाठीं त्यानें ता. ११ नोव्हें १८०० रोजीं बाजीरावास पत्र पाठविलें कीं 'सिंदे बायांनी पुण्यापासून उज्जैनपर्यत मुलखाची धुळ केली. पुढे बहकुन जाण्याची चाल पाहुन त्यांची खातर जमा..[१४६]

यशवंतराव लहानपणापासून अहिल्याबाईच्या आदर्शमय वातावरण वाढल्यामुळे अनेक सुसंस्कार त्यांच्यावर झालेले होते. वयाच्या केवळ वीस बावीसाव्या वर्षी सत्ता हाती घेतली. यशवंतरावांच्या हाती होळकरांची सत्ता येताच प्रथम आपल्या कूलदैवताच्या दर्शनासाठी जेजूरीस जावून भक्तीभावने खंडोबाची आराधना केली. यशवंतराव हिंदू देव देवताप्रमाणे मुस्लीम पिरांनाही आदर बाळगतं होते. त्यांचे श्राध्दास्थान हे अहिल्याबाई व म्हाळसाकांत हेच होते.

तर विठोजी व यशवंतरावांना बाले वयातच स्वत:चा जीव वाचविण्यासाठी भटकंतीत जीवन व्यथीत करावे लागले. यशवंतराव सतत आपल्या मागण्या पेशव्यांकडे मांडत होते त्या अशा होत्या.

१ वेडसर काशीरावाला वस्त्रें मिळून त्याच्या नावांवर होळकरांची सर्व दौलत शिंद्यानी गिळकूत केलेली आहे... माझ्या घराण्याच्या उज्वल परंपरेस साजेल अशा रीतीने आपली सेवा करावी अशी माझी इच्छा आहे.

२ श्रीमंतानी दूरवर विचार करुन माझा व शिंद्याचा समेट करुन द्यावा... बिचारी रयत मारली जात आहे.

३ मल्हाररावांचा अल्पवयी मुलगा खंडेराव आणि त्याची आई जईबाई दोघेंही आशीरगडावर कैदेंत आहेत त्यांस ताबडतोड मुक्त करावें.

४ होळकरांचा एकच कायदेशीर वारस शिल्लक राहिला आहे. त्याच्या नावाने सरकारांतून सरदारीची वस्त्रे मिळावी व मला त्यांच्या मुतालकीची वस्त्रे मिळावी.

५ शिंद्यानी व इतरानीं काशीरावांपासून वाटेल तशी करारपत्रें व कर्जखतें लिहून घेतली आहेत. ती होळकरांच्या दौलतीला बंधनकारक असूं नयेत.

६ आम्हा दोघांपैकी एकाचा मुलूख दुसऱ्याचा ताब्यांत गेला आहे तो ज्याचा त्यास परत मिळावा.

७ नर्मदे पलीकडील मराठीराज्याच्या पेशवे, शिंदे आणि होळकर अशा तीन वाटण्या राज्यांत पूर्वापार चालत होत्या.

८ शिंदे व होळकर हे बरोबरीचे तीनपिढयांचे सेवक: असें असतां शिंद्याना एक किल्ला व दहा लाखांची जहागीर सरकारांतून नूतन मिळाली त्याप्रमाणे आम्हासह मिळावी.

९ उत्तर हिंदुस्तानांतील राजेरजवाडे यांजपासून खंडणी वसूल करण्याचा हक्क शिंदे व होळकर या दोघानाही पूर्वपार चालत आहे.

१० आम्हाउभयतांचा समेट करुन द्यावा दुदैवानें प्रयत्न फोल झाल्यास श्रीमंतानी तटस्थ राहवें. एका विरुध्द दुस—यास मदत करुं नये.

११ मी दक्षिणेंत येत आहें तो केवळ आपणाकडे दाद मागावी, आपला गैरसमज दूर करावा याच हेतूने येत आहे. आपल्याला उपमर्दकारक वाटणारे कोणतेही कृत्य मजकडून होणार नाही. ही खात्री बाळगावी.[१४७]

११ कलमांची यादी श्रीमंतांपुढे पाराशर दादाजीनी सादर केली होती. त्यातून यशवंतरावांचा हेतु स्पष्टपणे दिसून येतो. यशवंतराव सतत आपल्या मागण्या पेशव्यांकडे मांडून खंडेरावासह होळकरी राजपरिवार मुक्त करा, होळकरांच्या प्रांतावरील जप्तीचे हुकम मागे घ्या. व दौलतरावांशी समेट करुन द्या. म्हणून सतत विनवनी करीत होते. त्याचप्रमाणे दौलतराव शिंद्यासही होळकरावरील अन्याय व अत्याचार थांबवून त्यांच्या कुटील डावाने होळकरांचा राजपरिवार कैदेत होता. तो ही मुक्त करावा असे वारंवार सांगत होते. यशवंतरावांनी दौलतरावांवर व पेशव्यांवर हल्ला करुन त्यांनी सहज वटणीवर आणता आले असते पण त्यांनी तसे केले नाही. त्यात पेशव्यानी हलगर्जीपणा करून दोन मराठा सरदारास समानतेची वागणूक देणे अभिप्रेत होते. पण स्वत: पेशवा हा शिंद्यांच्या हातातील बाहुले बनल्याने होळकरांवर अन्याय झाला. हे यातून स्पष्ट होते.

यशवंतरावांनी सुरुवातीच्या अवस्थेत भिल्ल, पेंढारी व पठाणांची फौज जमा करुन त्यांना प्रशिक्षण देऊन शिंद्यांच्या व पेशव्यांच्या कारवायाना बंदोबस्त घालण्याचा प्रयत्न केला. शिंदे पेशव्यांनी होळकर कुटूंबावर व राज्यावर चालविले धोरण थांबविण्यासाठी सतत लढत राहून त्यांची मुक्तता केली. त्यात पत्नी, मुलगी भावजय व होळकर राज्याचा खरा वारस खंडेराव यास मुक्त करण्यासाठी आपले आयुष्यपणास लावले. स्वत: पेशव्यासमोर आपल्याच सुभेदाराच्या कुटूंबातील सदस्यावर म्हणजेच विठोजीस अत्यंत क्रुरुतेने अत्याचार करून ठार केले. तेंव्हा यशवंतरावांनी या शिंद्यांच्या व पेशव्यांच्या क्रुरुतेचा बदला केंव्हाच घेतला असता. पण स्वत:च्या जीवावरचे व कुटूंबावरचे दु:ख व मरण यातना सहन करुन केवळ राष्ट्रीय भावनेस महत्व देऊन नेहमी शिंदे, भोसले, पेशवे व इतर सरदारांना जमा करुन इंग्रज विरूध्द लढा पुकारला. पण त्या राष्ट्रीय कार्यास कोणत्याच राजानी मदत केली नाही. ही मोठी शोकांतिका सहन करीत स्वत:च इंग्रजाशी चिवटपणे लढा देऊन त्यांना सतत पराभूत केले.

यशवंतरावांचा सुरुवातीचा जीवन प्रवास हा अतिशय थरारक, संकटांची एवढी वादळे, युध्दाचा सततचा झंझावत, सतत विजयाची आस, स्वातंत्र्याची प्रचंड आस, आफाट नेतृत्व क्षमता, पराकोटीचे युध्दकौशल्य, नितांत दुर्दम्य आशावाद प्रयत्नांची निराशा न होता केलेली पराकाष्ठा, क्षमाशीलता, शत्रूशी दुर्दात क्रुरता असे सर्व गुण एकत्र असणारा असा महायोध्दा

व राज्यकर्ता जगाच्या इतिहासात क्वचितच सापडेल. ऐन विजयात आपल्याच सरदाराकडून विश्वासघातावर मात करीत शत्रूस सळो की पळो करुन जबरदस्त धास्ती निर्माण केली. त्यांनी सर्व ऐतेदेशीय राजे महाराजांना एकत्र केले व जागतिक इंग्रजांना सर्वात मोठा पराभव स्विकारावा लागला. त्यासाठी त्यानी शेवटच्या क्षणापर्यंत झुंज देत मातृभूमी साठी आपले जीवन त्याग केले.

श्रीमंत महाराज राजराजेश्वर यशवंतराव होळकर हयांचें निधन कार्तिक शुद्ध ११ रविवार संमत १८६८ शके १७३३ ता. २७ ऑक्टोबर १८११ इ..[१४८]

**२.३.१३ मल्हारराव होळकर (तिसरे) दुसरेः**

मल्हारराव होळकर तिसरे यांचा जन्म १ मे १८०७ ला यशवंतराव होळकर व केशर उर्फ कृष्णबाई यांच्या पोटी झाला.[१४९] वडील यशवंतराव होळकर यांच्या निधनानंतर तुळसाबाईनी सहा वर्षाच्या मल्हारीला गादीवर बसवून राज्यकारभार सुरू केला. होळकरांच्या इतिहासामध्ये सुभेदार मल्हारराव, तुकोजीरावांच्या मुलगा मल्हारराव व यशवंतरावांचा मुलगा त्याचेही नाव मल्हारराव असे ठेवण्यात आलेले होते. त्यांस अनुक्रमे पहिला, दुसरा, तिसरा असा क्रम येतो. म्हणून यशवंतरावांचा मुलगा मल्हारराव तृतीय असेही म्हणतात. पण यशवंतराव होळकर यांच्या निधनानंतर ते होळकर गादीवर आले. म्हणजेच हे होळकर गादीवर येणारे दुसरे शासक होते म्हणून यांना मल्हारराव दुसरे असेही म्हणटले जाते. कारण सुभेदार तुकोजीराव होळकरांचा दुसरा मुलगा मल्हारराव यांच्यावर काशीराव होळकर व दौलतराव शिंद्यानी भांबुर्डयाच्या छाप्यात ठार केले. म्हणजेच ते होळकरांच्या गादीवर बसलेले नव्हते. ना ही त्यांना पेशव्यांकडून सुभेदारीचे वस्त्रे मिळालेली नव्हती. तुकोजी होळकर यांचा मुलगा मल्हारराव होळकर दुसरा हा पदावर आलेला नव्हता. त्यामुळे यशवंतराव होळकरांचा मुलगा मल्हारराव तिसरा हा पदावर आल्याने सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या नंतर हा पदावर दुसरा येतो म्हणून यांना मल्हारराव होळकर तिसरे यांस दुसरा म्हणून ओळखले जातात.

मल्हारराव तिसरे यांचा इ.स. १८१५ ला त्रिंबकराव देशगावडे यांच्या कन्येशी मोठ्या समारंभपूर्वक विवाह पार पडला.[१५०] मल्हारराव होळकर दुसरे यांना त्यांच्या कार्यात त्यांची बहिण भीमाबाई यांनी इंग्रजाविरोधात खंबीरपणे साथ देऊन होळकर शाही वाचविण्याचा मोठा प्रयत्न केलेला होता. नंतर ते गादीवर विराजमान झाले. मल्हाररावांचा विवाह हा गौतमाबाईशी झालेला होता. त्या ताईसाहेब म्हणून ओळखल्या जात होत्या. आश्वीन शुद्ध १४ रविवार तारीख २७ ऑक्टोबर सन १८३३ रोजी अंतकाल सूर्योदयापासून तेरावे घटकेस होऊन श्रीमंत मल्हारराव महाराज स्वर्गवासी झाले.[१५१]

### २.३.१४ भिमाबाई होळकर (बुळे):

झुंजार सेनानी यशवंतराव होळकर व लाडाबाई यांच्या पोटी १७ सप्टेबर १७९५ ला पुणे येथे जन्म झाला.[१५२] भिमाबाईचा जन्म पुण्यश्लोक अहिल्याबाईच्या निधनानंतर महिन्या सव्वा महिन्यात झाला. तिच्या आईने नांव लाडाबाई दौलतराव शिंदेनी भांबुर्डा येथील होळकरांच्या छावणीवर अचानक हल्ला करून मल्हारराव मारला गेला, तर विठोजी व यशवंतराव हे जख्मी होवून पळून गेले. तेव्हा होळकरांचा पराभव झाल्याने बाकीच्या होळकरांचा सर्व कुंटुंब कबिला शिंद्यानी आपल्या ताब्यात घेऊन कैदेत टाकले. त्यात आई लाडाबाई, आजी तुळसाबाई, चुलती जयाबाई चुलत सख्खा भाऊ हरिराव व खंडेराव व स्वत: तीन वर्षाची लहान भिमाबाई सुध्दा होती. तिचे बालपण तिथेच कैदेत गेले. नंतर यशवंतरावानी हडपसरच्या युद्धात शिंद्याचा व पेशव्याचा २५ ऑक्टोबर १८०२ रोजी पराभव केल्यानंतर साधारणत: पाच वर्षानी सुंटका केली.[१५३] वयाच्या सहाव्या वर्षी भीमाबाई बाहेर आल्या म्हणजेच त्यांचे बालपण कैदेतच गेले. यशवंतरावानी आपल्या मुलीस घोडेस्वारी व युध्दाचे सर्व प्रकारचे लष्करी शिक्षण व प्रशिक्षण देऊन तरबेज केलेले होते. भालाफेक व बंदूक चालविण्यात ती तरबेज होती.

यशवंतरावांची एकुलती एक कन्या भीमाबाईचा विवाह धारचे घराण्याचे संस्थानिक गोविंदराव यांच्याशी सन १८०९ च्या फेब्रुवारी ता. ९ रोजी महाराजांची कन्या भीमाबाई यांचा विवाह गोविंदराव मुळे यांजबरोबर मोठया थाटानें झाला. गोविंदराव बुळे चांगले पराक्रमी होते. सन. १८०९ च्या ता. ६ डिसेंबर रोजीं त्यांनी धार येथें चांगला विजय मिळविला आणि त्या विजया मुळें धार दरबारनें लाखांचा भरणा गोविंदरावांकडे केला.[१५४] यशवंतराव होळकर यांनी आपल्या कारभारी मंडळ नियुक्त केलेले होते. त्यात जावाई गोविंदराव बुळे यानां मानाचे पद दिलेले होते पण त्यांनी ते आदराने नाकारले.

सोळाव्या वर्षी वडीलांचा तर एकेवीसाव्या वर्षी ऐन तारूण्यात पती गोविंदरावांचे निधन झाल्याने ती नंतरचे सर्व आयुष्य मोहरमध्येच आपल्या भावाच्या कार्य यशस्वी होण्यासाठी घातले. तेंव्हा भीमाबाईने महिंदपूरच्या लढाईत बंधू मल्हारराव तिसरा यास पूर्णपणे साथ देऊन घोडदळाचे नेतृत्व केले. यात होळकरांचा पराभव झाल्याने भीमाबाईनी नंतर पेंढाऱ्यांची स्वतंत्र फौज तयार करुन वडील यशवंतरावांची धगधगती मशाल स्वत: सांभाळत इंग्रजांशी झुंज देण्यासाठी दोन हजार पाचशे सैन्याच्या जोरावर गनिमी काव्यानी लढा चालूच ठेवला. तेंव्हा माल्कमनी भीमाबाईच्या विरोधात मोहिम उघडून हल्ला करण्यासाठी चालून येताच भिमाबाईंनी माळव्यात असलेल्या माल्कमवर अचानक हल्ला करुन पराभूत केले. तेंव्हा माल्कमला जीव वाचविण्यासाठी पळ काढावा लागला.[१५५]

सोळाव्या वर्षी वडीलांचा तर एकेवीसाव्या वर्षी ऐन तारूण्यात पती गोविंदरावांचे निधन झाल्याने ती नंतरचे सर्व आयुष्य मोहरमध्येच होळकर दौलतीच्या रक्षणासाठी इंग्रजाशी अनेक

मोहिमामध्ये पराभूत करून सळो की पळो करून सोडले. मंदसौरच्या तहानुसार भीमाबाई हीस बुंदेलखडात पुंच परगणा इंग्रजांनी जहागीर दिला.[१५६] त्यानंतर नोव्हेंबर १८५८ला भीमाबाईचा मृत्यू झाला.[१५७]

### २.३.१५ मार्तण्डराव होळकर (दत्तक):

मार्तण्डराव होळकर हे होळकर कुटुंबातील होते. मार्तण्डराव हे बापू होळकरांचा मुलगा होता.[१५८] मल्हारराव होळकर व्दितीय यांच्या निधनाअगोदर बापु होळकर यांनी आपला मुलगा मार्तण्डराव यांस मल्हारराव यांच्या मांडीवर बसविले. पण त्यावेळी मल्हारराव दुसरे यांच्या मृत्य वेळी बडीसाहेब जवळ नव्हते. तर जवळ असलेले बापू होळकर यांनी आपल मुलगा मांडीवर बसविलेले असल्यामुळे होळकर शाहीचे मार्तण्डराव होळकर प्रमुख बनले. तरी पण कृष्णाबाईना मार्तण्डराव होळकर गादीवर बसल्याचे मान्य नव्हते. त्यानंतर मल्हररावांचे निधन झाल्यावर बापु होळकर यांनीच त्यांचे उत्तरकार्य पार पाडले. मार्तण्डरावांचे दत्तक विधान झाले. पण गौतमाबाईची या दत्तकास आतून अनुकुलता नव्हती. तरीही त्यांना होळकर गादीवर बसविले. पण मल्हारराव दुसरे यांनी मृत्यू अगोदर आप्पाजी कृष्णराव यास सांगितले होते की, 'महेश्वरी कैदेत हरिराव होळकर आहेत. माझ्यानंतर त्यांना गादीवर बसवावे.'[१५९] तरी पण मॉसाहेबांनी दरखदार सरदार व मानकरी यांस वस्त्रे देऊन बहूमान केला. पण मार्तण्डराव होळकर यांच्या विरोधात इंदूर येथे बंड होवून कैदेत असलेल्या हरिराव यांची सुटका करून त्यांना इंदूर येथून सोडवून आणून त्यांना महेश्वर येथे आणल्यामुळे मार्तण्डराव होळकरांस पद सोडावे लागले. तेंव्हा हरिराव यांना गादीवर बसविले. त्यानंतर मार्तण्डराव होळकर अल्पशा आजाराने १८ जानेवारी १८३४ रोजी मृत्यू झाला.[१६०]

### २.३.१६ हरिराव होळकर:

विठोजीराव होळकर यांचा हरिराव हा मुलगा असून त्यांचा जन्म इ.स. १८०९ मध्ये झाला. वडील विठोजी यांच्यावर भांबुडर्याच्या मुक्कामी पेशवे बाजीराव दुसरे यांनी दौलतराव शिंदे यांच्याशी संगनमत करून होळकर सुभेदार काशीरावास हताशी धरून अचानक छाप्पा टाकला. त्यात मल्हारराव दुसरे, विठोजी व यशवंतराव यातिघांनी निकराचा लढा दिला. पण यात मल्हारराव दुसरे लढताना ठार झाले. तर विठोजी व यशवंतराव निसटून जाण्यात यशस्वी झाले. त्यांनी बाहेर पडून आपला लढा चालूच ठेवला. तेव्हा विठोजीस पराभूत करून पुण्यात शनिवारवाडयाच्या बाहेर हत्तीच्या पायी देऊन ठार केले. तर बाकीचा होळकर कुटुंबकबिला पकडून कैदेत टाकले. त्यात विठोजीची पत्नी व मुलगा हरिराव यांचाही समावेश होता. त्यामुळे हरिरावांचे बालपण हे कैदेत गेलेले होते. पुढे चुलतभाऊ मल्हारराव होळकर दुसरे यांच्या पश्चात मार्तण्डराव होळकर गादीवर दत्तक पुत्र म्हणून बसले. पण हे गौतमाबाईना व अनेकांना मान्य नव्हते. तसेच मल्हारराव होळकर द्वितीय यांनी आपली प्रकृति ठीक नसल्यामुळे मृत्यू अगोदरच आप्पाजी कृष्णराव यांस

महेश्वरी कैदेत हरिराव होळकर आहेत. माझ्यानंतर त्यांना गादीवर बसवावे. अशी कल्पना दिलेली होती. तरी पण बापू होळकर यांनी मार्तण्डरावास गादीवर बसविल्याने नंतर मात्र गोंधळ निर्माण झाल्याने व अनेकांना ते नको असल्याने मार्तण्डरावांना पदावरून दूर करण्याच्या हालचाली सुरू झाल्या. त्यानुसार रामचंद्र अप्पा व इतरांनी महेश्वर गाठून संस्थान महेश्वर येथें श्रीमंत हरिराव होळकर अटकेंत होते. त्यांनी कारस्थान करुन अप्पाराव यांजकडील मंडळी अनुकूल करुन काहीनी त्याना बाहेर काढण्याचा प्रयत्न सुरू केले. इंदूर येथील रामचंद्रअप्पास कैद करून सुलतान अप्पा व बलअप्पा जमादार कर्नाटकी यांजला परमारे दमदिलासा देऊन त्यांजकडील आरब व मकराणी व भिल्ल भामटे जमा करुन ते पौष शुद्ध ९ तारीख १२ जानेवारी सन १८३४ दीड प्रहर रात्रीस मंडळखोर बाजूनें चढवून वाडयांत शिरुर ज्या ठिकाणी हरिराव होळकर होते. तेथें जाऊन कवाडाची कुलपे तोडून बाहेर काढून श्रीमार्तेडाचे चौकांत आणून गादीवर बसवून शहरांत व्दाही फिरवून तेथील बंदोबस्त करून रामा किल्लेदार व लक्ष्मणपंत आबा यांना कैदेत टाकून ज्यानी हरामखोरी केली होती त्यांचे पारिपत्य केलें. सुटकेनंतर दुसऱ्यादिवशी मानकरी तबेला व मोती तबेला व पागा तयार करून मुखत्यार भगवंत आनंत व गोपाळराव बाबा खासगीवाले व बापु सरमंडळ यांजला समागमे देऊन महेश्वरी रवाना केले.[१६१] ही वार्ता इंदूर येथे समजाताच मानकरी तबेला व मोती तबेला व पागा तयार करुन त्यात मुखत्यार भगवंत अनंत व गोपाळराव बाबा खासगीवाले व बापू सरमंडळ यांना महेश्वरकडे पाठवून दिलेले होते. तसेच सोबत बापाजी बल्हेगांवकर, राजजी त्रिंबक यानी शेपन्नास पायदल ठेवलेले होते. त्याच वेळी महेश्वर येथील सरकारनेही तोफाचा जमाव करुन युद्धास तयार केल्या. इंग्रज रेसिडेंट इस्टूरसाहेब मुंबईस गेलेले होते. तेव्हा मासाहेबांना इंदूर येथे पत्र आले की, पलटणाची व तोफाची रवानगी करुन द्यावी. त्यानुसार खंडो पांडुरंग यांच्या मार्फत दोन तोफा व मातादीन कप्तान व शरसिंग आगीटन हे मुखत्यार पलटणात करुन रवाना केले. सरंजाम महेश्वरला पाठवून दिला. तेंव्हा मातादीन व शहरसिंगने शेमरुडच्या वाटेने जावून घाट ओलांडून महेश्वर गाठले. त्याचप्रमाणे गोपाळराव बाबा खासगीवाले व भगवंत अनंत निसबत पागनीस हे ही महेश्वरला आले. त्यावेळी सैन्यास तनखा न मिळाल्याने बेभनाव झाला. तेंव्हा पलटणवाले, शिलेदार व शागीर्द पेशवाले एकत्र आले. ताई साहेबानी उदेसिंग राऊळ यास पाठवून त्यांचा बंदोबस्त केला. त्यावेळी इंदूरहून महेश्वरास श्रीमंत हरिराव होळकर यांजला आणावयाकरितां पागा, सिलेदार, हत्ती, पालकी व चोघडा बमय निशाणासुध्दा पळसींकर बाबा समागमे देऊन रवानगी केली. त्यानुसार हरिराव यास इंदूरला येण्याची विनंती केली. त्याप्रमाणे फाल्गुन शुद्ध ५ पंचमीस स्वारी कूच होऊन शुध्द ८ अष्टमीस ता. १८ मार्च सन १८३४ ला येऊन दाखल झाले.[१६२] सोबत आरब मकराणीची नवीन चौदा हजार फौज होती. शिवाय गणेश विठ्ठल किबे, रेवाजी फणसे ही सोबत होते. इंदूर येथील रामचंद्रअप्पास कैद करून त्यांची

सुटका केली. त्यानंतर त्यांचा राज्याभिषेक होवून होळकर शासक बनले. तेव्हा वैशाखमासी रेवाजी बापु फणसे यांजला दिवाणगिरीची वस्त्रें देऊन कारभारास आरंभ केला. हरिरावांची पत्नी भगिरथबाई होत्या. हरिराव यांना सकुबाई नावाची मुलगी होती. त्यानंतर कन्या सकुबाई यांचा विवाह रेवाजी बापु यांचे चिरंजीव राजोजीराव फणसे यांच्याशी झाला. त्यांचा विवाह हा वैशाख शुद्ध १३ स झाले. रेवाजी बापू यांचे चिरंजीव राजोजीराव फणसे यांजला दिल्ही. तसेच सन १८३५ साचे फेब्रुवारी महाराजांचे लग्न गिरगुणे यांची कन्या हिराबाईशी झालें.[१६३] राणी साहेब गरोदर होत्या. पुढे काही दिवसांनी राणी साहेब प्रसूत होऊन कन्यारत्न जन्मास आलें. त्यांची प्रकृती खालावत गेली. त्यात श्रीमंत हरिरावांची कार्तिक शुद्ध द्वितीया शके १७६५ तारीख २५ ऑक्टोबर सन १८४३ ई. रोजी श्रीमंत निधन पावले.[१६४]

### २.३.१७ खंडेराव होळकर (दत्तक):

खंडेराव होळकर यांचा जन्म १८१२ ला झाला. खंडेराव होळकर हे बापु होळकरांचे सुपुत्र होते.[१६५] २७ जून १८४१ रोजी रेसिडेंट साहेबांनी वारसा प्रश्न निकालात काढण्यासाठी फणसे जावून भेटले. त्यावेळी त्यांना कळाले की, बापुजी होळकर यांचे चिरंजीव खंडेराव होळकर यांस मांडीवर घेण्याचा विचार श्रीमंतांचा आहे.[१६६] फणसे यांच्या मदतीने खंडेराव यांस हरिराव यांच्या पत्नी मैनाबाईच्या मांडीवर बसवून दत्तक विधानचा सोहळा पार पडला. त्यावेळी ते तेरा वर्षाचे होते. हरिरावांनंतर खंडेरावांस होळकरांच्या गादीवर बसविले. पण तो लहान असल्यामुळे दिवाणजी राजाभाऊ पानेस यांनी पुरेपुर गैरफायदा घेतला. सौभाग्यवती मैनाबाईसाहेबांचा महेश्वरी मुक्कामी आजारी पडल्याने ३० ऑगस्ट १८४२ मध्ये निधन झाले. त्यानंतर होळकर शासक खंडेराव होळकर यांचे माघवद्य १४ ता. ८ फेब्रुवारी सन १९४४ रोजीं देहावससान झाल.[१६७]

### २.३.१८ दुसरे तुकोजीराव होळकर:

दुसरे तुकोजीराव होळकर यांचा जन्म ०३ मे १८३५ रोजी झाला.[१६८] हे भाऊसाहेब होळकरांचे पुत्र होते. खंडेराव होळकर यांच्या मृत्यूनंतर आषाढ शुद्ध १२ द्वादशी गुरुवार शके १७६६ ता. २७ जून सन १८४४ रोजी पंधरा घटकेस श्रीमंत मातोश्री कृष्णा मासाहेब यांचे मांडीवर मुलगा बसविला. त्याचें नाव तुकोजीराव होळकर ठेविलें लाटसाहेबाकडील वस्त्रें देऊन गादीवर स्थापन केली.[१६९] त्यांचे मुळ नाव मल्हारराव असे होते पण गादीवर येताना त्यांचे नाव 'यशवंतरावसुत तुकोजीराव होळकर' असे ठेवण्यात आले. महाराज तुकोजीरावांचा पहिला विवाह इ.स. १८४६ त गिरगुणे यांची कन्या रुख्माई यांजबरोबर झालें. सन १८४८ त रख्माबाईसाहेब निवर्तल्या. सन १८४९ त महाराजांची दोन लग्नें झाली. सन १८५१ त येशवंतराव खिल्लारी यांचे कन्येबरोबर लग्न झालें लग्न होण्यापूर्वी म्हणजे इ.स. १८४९ त श्रीमंत कृष्णाबाई मासाहेब ता. ९ सप्तेंबर रोजी कैलासवासी झाल्या.[१७०] म्हणजेच तुकोजीराव होळकर दुसरे यांच्या सौ. भागिर्थीबाई (फणशांची कन्या), सौ. गुंडयाची कन्या, राधाबाई

(खिल्लारी यांची कन्या), सौ. झाळसाबाई (गुंडाची कन्या) त्यांना या चार बायका होत्या. कृष्णाबाईच्या मृत्यूमुळे तुकोजीरावाचा आधार गेल्याने त्यांना फार दु:ख झाले. त्यानंतर ता. २८ मार्च रोजी खासगीबददल भागिर्थीबाई साहेबाचे नावाने सिक्के तयार झाले व खासगी त्यांचे नावानें सुरु झाली.

कृष्णाबाईसाहेब हया कैलासवासी झाल्याने होळकर संस्थानात सर्वत्र दिवाणी, फौजदारी बंदोबस्त मुकदमे यांचा अम्मल दौलत व खासगीचा एकसूत्री केले. इ.स. १८५२ त सकुबाई इहलोक सोडून गेल्या. त्यानंतर त्यांचे पती राजोजीराव फणसेही ता. १७ जुलाय सन १८५३ त कालवश झाले.[१७१] तुकाजीराव होळकर यांचा ३ मे १८४३ रोजी मृत्यू झाला.

**२.३.१९ शिवाजीराव होळकर:**

शिवाजीराव होळकर यांचा जन्म ११ नोव्हेंबर १८५९ ला झाला.[१७२] यांना इंग्रजी, मराठी, हिंदी व उर्दु यासारख्या अनेक भाषा अवगत होत्या. यांना सीताबाई, सावित्राबाई, ताराबाई व ठकूबाई या कन्या होत्या.[१७३] २७ जून १८४४ रोजी तुकोजीराव होळकर दुसरे हे होळकरांच्या गादीवर बसले. लाट साहेबांनी त्यांना मानाची वस्त्रें देऊन सन्मान केला. यांचा मृत्यू १३ ऑक्टोबर १९०८ रोजी झाला.[२७४]

**२.३.२० सवाई तुकोजीराव होळकर (तृतीय):**

सवाई तुकोजीराव होळकर (तृतीय) यांचा जन्म २६ नोव्हेबर १८९० ला झाला.[२०३] तर यांचा मृत्यू २१ मे १९७८ रोजी झाला.[१७५]

**२.३.२१ हिज हायनेस द्वितीय यशवंतराव होळकर (अखेरचे राजे):**

होळकर घराण्यातील शेवटचे सुभेदार यशवंतराव यांचा जन्म ०६ सप्टेंबर १९०८ ला झाला.[१७६] यांचा मृत्यू ०५ डिसेंबर १९६१ रोजी झाला.[१७७]

होळकर घराण्यातील प्रमुख सरदार वा शासकांचा गौरवशाली कर्तृत्वाचा आढावा घेण्यात आला आहे. तत्पुर्वी होळकर घराण्याची स्थापना व तदनतंर त्यांच्या कार्याचा संक्षिप्त आढावा घेण्यात आलेला आहे. होळकर शासकांचा कर्तृत्वाचा आढावा घेत असताना असे निदर्शनास आले की, सर्व होळकर राज्यकर्त्यांनी स्वबळावर पेशवे यांच्या सहकार्याने उत्तरेतील शत्रूच्या प्रदेशात स्वत:चे राज्य निर्माण केले. हे करीत असताना त्यांच्या मधील काळानुरुप निर्णय घेण्याची क्षमता, गनिमी काव्याची निपुणता, स्वराज्य विस्ताराची धमक, दुरदृष्टी व कार्याशी एकनिष्ठता ही प्रखरतेने दिसून आले. होळकर शासकांनी स्वत:ची अशी शासन प्रणाली लागू केली. ती प्रजेच्या हितावह होती. होळकर शासकांनी इतिहासातच नव्हे तर, जनतेच्या मनातही आपले वेगळे असे स्थान निर्माण केले. हे करीत असताना विविध संकटाना तोंड देत त्यांनी त्यांचे अलौकिक कार्य तडीस नेले. त्यामुळेच मराठी सत्तेच्या साम्राज्य विस्तारात व उत्कृष्ट प्रशसासनात त्यांचा अमुल्य वाटा आहे.

# संदर्भ सूची


१ डॉ. शहा मु. ब., (संपा.), इतिहासाचार्य वि.का. राजवाडे समग्र साहित्य, खंड-११ राजवाडे संशोधक मंडळ, डॉ. प्र. न. देशपांडे प्रकाशक, धुळे, १९९८, पृ.३५८

२ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशनः पुणे, १९५४, पृ.६

३ शेळके नीलेश केदारी, होळकरांची थैली, अक्षरवेध प्रकाशन, गडहिंग्लज, पहिली आवृत्ती, २०१५, पृ.७

४ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे, १९५४, पृ.१

५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.१४

६ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.३२३.

७ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१

८ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१३

९ मधुसुदन राव, यदुवंशी धनगर ग्वाली समाज का इतिहास, बुकमैन प्रिटंर्स, दिल्ली, २००८ पृ.१०४

१० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१३—१४

११ यादव शिवनारायण, होलकर राज्य का प्रशासनः विकास का इतिहास, मानक पब्लिकेशन्स प्रा. लि. दिल्ली, प्रथम संस्करण, १९९४, पृ.१७

१२ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१३

१३ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७, पृ.१

१४ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१३

१५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.४२

१६ प्रा. जोशी सु. ह., डॉ. कुलकर्णी म. रा., डॉ. शेळके रघुनाथ, कुलकर्णी शिल्पा, दांडेकर सुनिता, डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड पब्लिकेशन, पुणे, प्रथम आवृत्ती, २००९, पृ.३३१

१७ खरे ग. हा. आणि कुळकर्णी अ. रा., संपा., मराठयांचा इतिहास, खंड—३ (१७६१ —१८१८) कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, ३०, प्रथमावृती, १९८६, पृ.४२९

१८ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.१५

१९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१५

२० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१६

२१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२७

२२ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७, पृ. ३

२३ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशनः पुणे, १९५४, पृ.३

२४ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७, पृ.३

२५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२०

२६ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशनः पुणे, १९५४, पृ.३

२७ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७, पृ. ३

२८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२०

२९ केळकर य. न., होळकरांची कैफियत संशोधन व टीपा, सदाशिव लक्ष्मण कोकाटे हनुमान प्रकाशन, पुणे, २ सन १९५४, पृ.५

३० मधुसुदन राव, यदुवंशी धनगर ग्वाली समाज का इतिहास, बुकमैन प्रिटंर्स, दिल्ली, २००८, पृ.१०४

३१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१

३२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२१

३३ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७ पृ. ४

३४ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग–१ (१६९३–१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.४

३४ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.५४

३५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग–१ (१६९३–१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२१

३६ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, अॅड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, २०१७ पहिली आवृती, पृ.२७२

३७ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.५७

३८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग–१ (१६९३–१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१३३

३९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग–१ (१६९३– १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.१५२

४० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग–१ (१६९३– १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.१

४१ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

४२ डॉ. इंगळे राम अहिल्याबाई होळकर विश्वभाली प्रकाशन नागपूर, १९९४, पृ.३४

४३ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.३८

४४ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग–१ (१६९३– १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.२०

४५ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.३५

४६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग–१ (१६९३–१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर ,१९४४,. पृ.७२

४७ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१४७

४८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग–१ (१६९३–१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.११२

४९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर,

अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१४२

५० डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.८

५१ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.२८.

५२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर ,१९४४, पृ.२३०

५३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१

५४ ठाकूर वा. वा., (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.७४

५५ ठाकूर वा. वा., (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, .पृ.७६—७७

५६ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.४३

५७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२१

५८ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.४४

५९ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.६४

६० जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग–१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं.मंडळ, मुंबई, १९९०, पृ.३१५

६१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.७०

६२ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.४६७.

६३ जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग–१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं.मंडळ, मुंबई, १९९०, पृ.३१८

६४ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.४६८.

६५ राणा अशोक, लोकमाता अहिल्यामाई, निऋत्ती पब्लिकेशन परभणी, प्रथम आवृत्ती, २०१३, पृ.२२

६६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर ,१९४४, पृ.७३

६७ माने उज्ज्वलकुमार, रणरागिणी अहिल्यादेवी, यशोदीप पब्लिकेशन, पुणे, द्वितीयावृत्ती, २०१५, पृ.२०

६८ केळकर य. न., होळकरांची कैफियत संशोधन व टीपा, सदाशिव लक्ष्मण कोकाटे हनुमान प्रकाशन, पुणे, १९५४, पृ.४७

६९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर ,१९४४, पृ.७६

७० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१८७

७१ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५४७

७२ कित्ता, पृ. ५४८

७३ राणा अशोक, लोकमाता अहिल्यामाई, निऋत्ती पब्लिकेशन परभणी, प्रथम आवृत्ती, २०१३, पृ.११

७४ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.४३—४४

७५ नजन ओमप्रकाश वसंत, अहिल्याबाई होळकर, साकेत प्रकाशन, पुणे, पाचवी आवृत्ती, २०१६, पृ.२८

७६ डॉ. माशाळकर धम्मपाल रेवण, लोकमाता अहिल्यादेवी, चिन्मय प्रकाशनः औरंगाबाद, २०१६, पृ.३४

७७ खेडेकर पुरुषोत्त्तम, लोकमाता अहिल्यादेवी होळकर, जिजाई प्रकाशन पुणे, पुनर्मुद्रण २०१२, पृ.१३०

७८ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.६४

७९ इंजि. सिद्दीकी एच. ए, इन्दौर के आंचल मे मातोश्री अहिल्याबाई, नभ प्रकाशन, अमरावती, प्रथम आवृत्ती, २०१०, पृ.८३

८० कोळेकर हरीभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१३, पृ.५०

८१ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.११

८२ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७),

होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ. ७३

८३ कित्ता, पृ.८७

८४ कित्ता, पृ.९६—९७

८५ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५४९

८६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—१ (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१२३

८७ कित्ता, पृ.१५२

८८ राणा अशोक, लोकमाता अहिल्यामाई, निऋत्ती पब्लिकेशन परभणी, प्रथम आवृत्ती, २०१३, पृ.२९

८९ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.११

९० प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशन, लातूर, पृ.३३०

९१ प्रा. जोशी सु. ह., डॉ. कुलकर्णी म. रा., डॉ. शेळके रघुनाथ, कुलकर्णी शिल्पा, दांडेकर सुनिता, डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड पब्लिकेशन, पुणे, प्रथम आवृत्ती, २००९, पृ.२४०

९२ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५०

९३ डॉ. खाबेरेकर वि. गो., मराठा अंमलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९८८, पृ.५५९

९४ मधुसुदन राव, यदुवंशी धनगर ग्वाली समाज का इतिहास, बुकमैन प्रिटंर्स, दिल्ली, २००८, पृ.१४७

९५ कित्ता, पृ.१४८

९६ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.३७.

९७ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.४

९८ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.३७.

९९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१४२

१०० प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशन, लातूर, पृ.३२४

१०१ ठाकूर वा. वा., (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४,. पृ.३४९

१०२ हेरवाडकर रघुनाथ विनायक, पेशव्याची बखर, व्हिनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९७५, पृ.३०६

१०३ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५४

१०४ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५५

१०५ नजन ओमप्रकाश वसंत, अहिल्याबाई होळकर, साकेत प्रकाशन, पुणे, पाचवी आवृत्ती, २०१६, पृ.२८

१०६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.८

१०७ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशन, लातूर, पृ.३३०

१०८ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३०

१०९ कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास खंड-२, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, १९८५, पृ.१७६

११० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.३४

१११ कित्ता, पृ.९

११२ कित्ता, पृ.४

११३ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

११४ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५६

११५ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.४

११६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.८

११७ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१५५

११८ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.१०

११९ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५९

१२० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.४

१२१ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरांच्या इतिहासाची साधने भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.८

१२२ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१४४

१२३ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.३४

१२४ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.५५९

१२५ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१२६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.१३

१२७ कित्ता, पृ.१३

१२८ कित्ता, पृ.१४

१२९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१५६

१३० हेरवाडकर रघुनाथ विनायक, पेशव्याची बखर, व्हिनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९७५, पृ.३०८

१३१ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१३२ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२४४

१३३ कोळेकर हरीभाऊ, स्त्री स्वातंत्र्याचा ललकार पुरोगामी अहिल्यादेवी, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.३३—३४

१३४ कित्ता, पृ.३३

१३५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर

गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.९

१३६ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१५५

१३७ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.१०

१३८ कोळेकर हरीभाऊ, स्त्री स्वातंत्र्याचा ललकार पुरोगामी अहिल्यादेवी, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.३३

१३९ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशन, लातूर, पृ.३२४

१४० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.१९०

१४१ कित्ता, पृ.६३—६४

१४२ गर्गे स. मा., (प्रमुख संपादक), मराठी रियासतः गोविंद सखाराम सरदेसाई, खंड—८, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, नवीन संदर्भासहित संपादित आवृत्ती, २०११, पृ.१८७

१४३ कित्ता, पृ.१८८

१४४ कित्ता, पृ.१८९

१४५ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.३४

१४६ जोशी मो.रा., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२७, (तात्या जोगांच्या चरित्राची साधने), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९५२, पृ.१७६

१४७ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.६३

१४८ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१४९ गायकवाड चंद्रशेखर, पुरोगामी विचारांची जीवनधारा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, ओम प्रकाशन, अकलुज, २०१०, पृ.२७

१५० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.२८८

१५१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३०

१५२ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१५३ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशनः पुण, २०१५, पृ.१९५.
१५४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४६, पृ.१३५
१५५ कोळेकर हरीभाऊ, स्त्री स्वातंत्र्याचा ललकार पुरोगामी अहिल्यादेवी, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.२५
१५६ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.६३४
१५७ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१
१५८ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशनः पुण, २०१५, पृ.१९८.
१५९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३१
१६० कित्ता, पृ.२३२
१६१ कित्ता, पृ.२३२
१६२ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२४८
१६३ कित्ता, पृ.२४९
१६४ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१
१६५ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३५
१६६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२७१
१६७ कित्ता, पृ.२७७
१६८ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१
१६९ यादव शिवनारायण, होलकर राज्य का प्रशासनः विकास का इतिहास, मानक पब्लिकेशन्स प्रा. लि. दिल्ली, प्रथम संस्करण, १९९४, पृ.१५
१७० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२७८
१७१ कित्ता, पृ.२९०
१७२ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर,

प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१७३ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास, भाग—२ (१७९७— १८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर, १९४४, पृ.२

१७४ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

१७५ कित्ता, पृ.१३१

१७६ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.३७२

१७७ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५, पृ.१३१

**प्रस्तावना—:**

छत्रपती पदाचे पुढील वारस म्हणावे तेवढे शूरवीर, धाडसी, पराक्रमी नसल्याने व भट घराण्यातील व्यक्ति मात्र तेवढेच पराक्रमी, धाडसी, कर्तबगार, महत्वकांक्षी व छत्रपती बद्दल पूर्ण निष्ठा असल्याकारणाने त्यांनाच पुढे पेशवा हे पद बहाल करण्यातच सातारा छत्रपतीचे हित होते. हे छत्रपतीने पूर्णपणे ओळखलेले होते. पेशव्यांच्या काळात छत्रपती पदाचे महत्व कमी झाल्याने त्यांची जागा पेशव्यांनी भरुन काढली. पेशव्यांनी आपल्या मातब्बर सरदारांच्या महापराक्रमाची साथ मिळावी यासाठी मराठा मंडळ निर्माण केले. या कल्पनेमुळेच शिंदे, होळकर, गायकवाड यांच्या सारख्या सरदारांना आपला पराक्रम दाखविण्यास वाव मिळाला.[१] अशा मातब्बर सरदारांच्या महापराक्रमामुळे मराठी राज्याचे रूपांतर हे मराठा साम्राज्यात होण्यास मोलाची मदत झाली. हेच सरदार पेशवाईच्या उत्कर्षाचे खरे आधारस्तंभ बनले. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर विशेषत: बाळाजी बाजीरावाच्या काळात आक्रमक साम्राज्यवादाचा स्विकार करून मराठा मंडळाची निर्मीती करुन त्यांना उत्तरेकडे राज्य विस्ताराचे धोरण राबविले. 'बुंद्यावर द्याव घातला की फांद्या आपोआप खाली येतात.'[२]

पेशवे काळात होळकर घराण्यातील सुभेदार मल्हारराव होळकर यांनी मोठा पराक्रम गाजवून स्वत:चे माळव्यात पेशव्याच्या सनदेनुसार आपले राज्य स्थापन केले. नव्या भारताच्या जडणघडणीत स्फूर्तिदायक ठरतील अशा मोजक्या ऐतिहासिक घराण्यात होळकर शासनकर्त्याची गणना केली जाते. होळकर घराण्याच्या शासकाचे व्यक्तीमत्व हे स्फार्टिकाप्रमाणे स्वयंभू होते. होळकर शासकानी आपल्या मुत्सद्दी कर्तृत्वांने मराठ्याच्या इतिहासात त्यांने नाव निर्माण केले. आपल्या राज्यव्यवस्थेमध्ये भारतीय संस्कृतीची धुरा सांभाळत लोककल्याणाची व प्रजाहितदक्ष कार्य करून एक निस्वार्थ प्रशासनाचा नमूना जगासमोर ठेवला. होळकर शासक हे स्वयंपराक्रम व स्वकर्तृत्व यांच्या बळावर उत्कृष्ट शासक ठरले. होळकर घराण्याच्या वंशावळी मध्ये अनेक व्यक्ती होत्या. परंतु होळकर शासक मध्ये उत्कृष्ट शासक म्हणून सुभेदार मल्हारराव, अहिल्याबाई, यशवंतराव, शिवाजीराव होळकर याचा बहुमूल्य वाटा आहे. पण अहिल्याबाईंने खालील केलेले विधान हे भारतीय इतिहासाला आजही लागू पडते. 'आम्हाकडील लोकांची कामे चांगली होतात परंतु उजेडात आणणारे कोणी नाही. न होत्याचें उजेडास येते दिवसच असे आहेत.'[३]

वरील विधान हे होळकर घराण्याबाबत सर्वानांच लागू पडते. इतिहासातील त्याचे अलौंकिक कार्य, कर्तृत्व शौर्य, मृत्सद्दीपणा व त्यांचे अतुलनींय प्रशासन आजही काळाच्या दृष्टीक्षेपास आलेले नाही याचा खेद वाटतो. हा हेतू ठेवूनच सदरील प्रकरणामध्ये होळकर शासकांच्या कार्याचा आढावा घेण्यात आलेला आहे. अठराव्या शतकातील मराठा साम्राज्यविस्तारात होळकर शासकांचा वा सुभेदारांचा खूप मोठा वाटा आहे. हिंदवी स्वराज्याचे साम्राज्यवादी वा विस्तारवादी धोरण खऱ्या अर्थाने पेशव्यांच्या काळात मोठ्या प्रमाणात विशेषत: उतर भारतात घडून आले. त्यात होळकर व शिंदे या घराण्याने मराठी साम्राज्याची नुसती उत्तरेस वाढ केली नाही. तर ते टिकवण्याचाही यशस्वी प्रयत्न केला. होळकरशाही इंदूर

येथे मल्हारराव होळकर यांच्या अथक प्रयत्नातून स्थापन झाली. आपल्या पराक्रमाने व धाडसीवृत्तीने संपूर्ण हिंदूस्थानभर आयुष्याचे ४० वर्ष रणांगणावर विजयी घोडदौड केली. पानिपतच्या पराभवानंतरही उत्तरेतील राजकारणावर आपले वर्चस्व व दबदबा निर्माण केले.

सुभेदार मल्हरराव होळकर यांनी स्थापन केलेल्या होळकर राज्यांचे ते स्वत: बेचाळीस वर्ष आपली सत्ता सांभाळून मराठी राज्यासही मोठा हातभार लावला. यांच्यानंतर त्यांचा मुलगा खंडेराव कुंभेरीच्या युध्दात मारला गेल्याने खंडेरावांचा मुलगा मालेराव होळकर गादीवर आला. पण तो ही अल्पशा आजाराने निधन पावला. त्यानंतर होळकर राज्यांच्या गादीवर स्वत: अहिल्याबाईने राज्याचा कारभार हाती घेतला. व मुलूखगीरीचे कामे तुकोजीराव यांच्यावर सोपविले. तेंव्हा अहिल्याबाईने अष्ठावीस वर्ष राज्यकारभार सांभाळला. त्यांच्यानंतर तुकोजीराव होळकर गादीवर आले. पण त्यांच्या उतरत्या वयाने फार काही पराक्रम गाजविता आले नाहीत. त्यांचा थोरला मुलगा काशीराव हा होळकरांच्या डावपेचाने व बंधुच्या सत्तच्या युध्दामुळे त्यांनाही फार काळ पदावर राहता आले नाही. त्यानंतर यशवंतराव होळकर यांनी वीस वर्ष राज्य करुन इंग्रजाना चांगलाच शह दिला. त्यानंतर त्यांचा मुलगा मल्हारराव दुसरे यांनी गादीवर येवून इंग्रजांशी वाटाघाटी करीत होळकरांचे राज्य सांभाळले. पण मंदसौरच्या तहानुसार होळकरांच्या राज्याचे एका छोटया संस्थानात रुपांतर झाले. त्यानंतर मार्तण्डराव होळकर गादीवर आले. पण त्यांना काही महिन्यातच गादीवर दूर व्हावे लागले. त्याठिकाणी हरिराव हा यशंवतरावाचा मुलगा गादीवर आला. पण तोही अल्पआयुष्यी ठरला. त्यांच्यानंतर खंडेराव यांना दत्तक घेण्यात आल्याने ते गादीवर केवळ काही महिण्यासाठी गादीवर आले. यांच्यानंतर तुकोजीराव दुसरे (दत्तक) हे होळकरांच्या गादीवर आला. होळकर शासकांनी होळकर राज्याचा एकूण २२० वर्ष राज्यकारभार केला.[४]

त्यात होळकर राज्याचे संस्थापक सुभेदार मल्हारराव होळकर, अहिल्याबाई, चौदा प्रमुख शासकांनी इंदूर राज्यावर वा प्रदेशावर दोनशे वीस वर्षे बावीस दिवस आपले अधिराज्य गाजविले त्यांच्या राजकीय कारकिर्दीचा आढावा या प्रकरणामध्ये घेतलेला आहे. त्यात प्रामुख्याने चौदा होळकर सुभेदारांनी आपल्या कारकिर्दीमध्ये केलेले विविध क्षेत्रातील कार्याचा अंतर्भाव या केलेला आहे.

### ३.१ सुभेदार मल्हारराव होळकर: (२६ मे १७२८ ते २० मे १७६६)

मल्हारराव आपल्या आईसोबत मामा भोजराजच्या तळोदे गावी राहण्यासाठी आले होते. मल्हारराव थोडे मोठे झाल्यावर मामाकडील मेंढरे राखण्याचे काम करीत असताना एके दिवशी मल्हारी मेंढरे राखताना बसल्या ठिकाणी एका झाडाखाली झोंपी गेला असता एका नागाने आपली फडा मल्हारजीचे डोक्यावर सावलीसाठी धरलेले दृश्य पाहून आई जिवाईने पाहिले. या घटनेचा अर्थ एका ब्राहमणास विचारला असता त्यावर तो हे ऐकून असे म्हणाला की, ‘बाई, हा मूल पृथ्वीपति होईल. त्यास दहा वर्षाचा होई तावत्काल फार सांभाळावे. पुढे

हा पृथ्वीस संभाळून तुला पृथ्वीपतीची आई म्हणवील!'[५] यामुळे मामा भोजराज बारगळांनी भाचा मल्हारकडील मेंढया राखण्याचे काम काढून आपल्याकडील पागेतील घोड्याची देखरेख करण्याकरीता ठेवले. तेव्हा मल्हाररावांनी सर्व प्रकारचे सैनिकी शिक्षण व प्रशिक्षण चांगल्या प्रकारे अवगत करून मामाच्या सैन्यात प्रवेश करून सैनिकी जीवनास सुरूवात केली. मामा हे कदमबांडयांचे एक सरदार तर कदम बांडे दाभाडे यांचे सरदार होते तर दाभाडे हे छत्रपती शाहूचे एक मातबर सरदार होते.

मराठा सरदार त्रिंबकराव दाभाडे हे कधी गुजराथवर तर कधी माळव्या स्वाऱ्या करीत असत. त्यावेळी मामा भोजराज व मल्हारराव ही कधी दाभाडेंबरोबर गुजराथ स्वाऱ्या तर कधी संताजी जाधवबरोबर माळवा स्वाऱ्या कदमबांडे करत होते. गुजराथ व माळवा हा प्रदेश अतिशय संपन्न असल्यामुळे अनेक शूर सरदारांची दृष्टी या प्रांताकडे नेहमी असल्याने दाभाडे व कदमबांडे हे कधी एकत्र तर कधी स्वतंत्रपणे या प्रांतांवर हल्ले करीत होते. त्यावेळी मामा भोजराज बारगळ यांनी मोठ्या झालेल्या मल्हाररावांस बारगीर म्हणून कदम बांडयांच्या चाकरीस ठेवले. म्हणजेच मल्हारजीच्या पहिली शाळा बांडे यांचे हाताखाली सुरु झाली. पण मल्हारराव नंतर स्व पराक्रमाच्या जोरावर सैनिक पदापासून कदमबांडे यांच्या फौजेतील पंचेवीस स्वारांचे प्रमुख बनले. त्यानंतर मल्हाररावांनी आता दिडशे स्वारांचे पथक तयार केलेले होते. तेव्हा मल्हारराव इ. स. १७१८ पुर्वीपासूनच माळव्यावर स्वतंत्र स्वाऱ्या करीत होते.[६]

छत्रपती शाहूचे सेनाकर्ते बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनी उत्तर मोहीम हाती घेतली. त्यात त्यांना खानदेश, वऱ्हाड, अहमदनगर, बेदर, हैदराबाद व विजापूर ही सहा सुभ्यातून चौथाई व सरदेशमुखींच्या सनदा मिळाल्या होत्या. त्यामोहिमेत मल्हाररावांनी शौर्य व कर्तृत्व गाजविण्याची संधी मिळाली. ती पेशव्यासह बाजीरावांनी पाहिलेली होती. मल्हाररावांच्या दरबारी व लष्करी अशा दोन्ही शाळा येथून खऱ्या अर्थाने सुरु झाल्या आणि या दोन्ही शाळातून त्यांना जे व्यावहारिक शिक्षण मिळालें मल्हाररावांनी पंचेवीस घोडे स्वारावरून सव्वाशे घोडे स्वारांचे पथक तयार केले. त्यानंतर पाचशे घोडे स्वारांचे पथक तयार केले. मल्हारराव होळकरांनी मध्येच मामा भोजराज बारगळ व कदमबांडे यांच्या संमतीने मल्हाररावाने बडवनीचा शासक मोहनसिंग यांची नोकरी करण्यासाठी गेले. तिथे ही त्यांनी मोहनसिंग व बाजीराव यांच्यातील संघर्ष सोडविण्यासाठी उभयपक्षी तहाची मुखत्यारी यशस्वीपणे करून दोन्ही पक्षास मान्य होईल असा तह घडवून आणला. त्यामुळे पेशवे बाजीराव खुश होवून मल्हाररावांस आपल्या लष्करात सामील करून घेतले. मराठा पेशवा यांनी मल्हाररावांस पाचशे घोडेस्वारांचा प्रमुख बनले.[७]

पेशवे बाजीरावांनी जाणीवपुर्वक नव्या समविचारी, पराक्रमी व एकनिष्ठ असणाऱ्या नव्या तरूण सरदारांस व सुभेदारांस म्हणजेच मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, उदाजी पवार यांना सहभागी करून घेतले. मल्हारराव होळकर हे पेशव्यांचे उजवा हात तर राणोजी शिंदे

डावा हात बनून उत्तरेत मराठा साम्राज्य विस्ताराच्या कार्यासाठी वाहून घेतले. बाजीराव व चिमाजी अप्पाच्या प्रत्येक स्वारीत मल्हारराव होळकर नेहमी आघाडीवर राहून विजय प्राप्त करीत असत. खानदेशावर हल्ला करून अजीमउल्लाखानचा सरदार दाऊदखानचा पराभव केला. मल्हाररावांचा हा पराक्रम पाहूण बाजीरावांनी मल्हाररावांस छत्रपती शाहू महाराजांच्या परवानगीनें माळव्यात इ.स. १७२५ त चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वंशपरंपरा वसूल करण्याविषयीचीं सनद दिली. मल्हाररावांनी आपल्या आंगच्या उपजत बुध्दीने शौर्याने त्यात वाढ करून पुढे लवकरच होळकरशाहीची स्थापना केली, व मराठी स्वराज्याचे साम्राज्यात रुपांतर करण्यास मोलाची मदत केली.

इ.स. १७२२—२३ मध्ये पेशव्यासह सरदार कंठाजी कदमबांडे हे दक्षिणेतून नर्मदा उतरुन खंडण्या घेत... साबळयाचा राजा अनुपसिंग शरण येऊन पेशव्यास खंडणी व नजराना कारभारी पिथासामार्फत पाठवून मराठ्यांचे मांडलिकत्व स्विकारले... पेशव्यांनी १७२६ मध्ये जिंकलेल्या मुलूखाची वाटणी करुन झाबवा पेटलावद प्रांत मल्हाररावांना हे प्रांत सरंजाम जहागीर दिले. मल्हारराव होळकर यांनी विठोजी बुळे हे प्रांत सरंजाम जहागीर दिले.[८] या पत्रावरून असे स्पष्ट होते की, सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पराक्रमाची चढती कमान सुरू होवून होळकरांच्या सरंजामीत मोठी वाढ होत गेली. त्यातून आपले राज्याचा पाया घालण्यासाठी पहिला प्रयत्न यशस्वी केला. तसेच इ.स. १७२४ रोजी इंदूर, सरकार उज्जैन प्रांत माळवा हा महाल पुर्वी भोसलेना दिलेला होता. नंतर मात्र ते मल्हाररावांकडे कायमचे दिलेले आहे.

### ३.१.१ होळकरशाहीची स्थापना:

सुभेदार मल्हारराव होळकर व पेशवे बाजीराव हे दोघेही अतिशय बाणेदार स्वभावाचे होते. त्यात मल्हारराव कडक शिस्तीचे व अत्यंत उदार मनाचे सर्वांशी मिळते जुळते घेणारे एक मायाळू सुभेदार होते. अशा या शूर सरदाराने जे राज्य मिळवले. ते स्वत:च्या तलवारीच्या जोरावर! १९ फेब्रुवारी १७२३ ला निजाम-उल-मुल्कची झाबवे येथे भेट घेऊन पेशव्यासह शिंदे, होळकर व पवार सह परत माळव्याकडे येत असताना, सैय्यद बहादूरशहा मराठयावर चालून येताच सर्व मराठा सैन्यांनी ५ डिसेंबर १७२३ रोजी लढाई करुन विजय मिळविला. उज्जैनला आपले ठाणी बसवून त्यांच्या कायमच्या बंदोबसतासाठी वीस हजार फौजसह मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यास पाठवून दिले. त्यावेळी 'माळवेप्रांती जो अम्मल साधेल तो साधावा'.[९] अशी व्यवस्था करुन पेशवे परतले.

### ३.१.२ होळकरांना खाजगी जहागीर:

मल्हारराव होळकर यांनी आपल्या पश्चात आपले कुटूंब सुखरूप असावे यासाठी पत्नी गौतमाबाई यांच्या नावे पेशव्यांकडून 'खाजगी जहागीरीची सनद' इ.स. १७३४ ला बाजीरावाने आपल्या अनेक सरदारापैकी केवळ एकमेव होळकर संस्थानांतील मल्हारराव

होळकर यांनाच खाजगी जहागीर दिली. त्याचे उत्पन्न सात लाख रूपये होते.[१०] सुभेदार मल्हाररावांस सत्त विविध युद्धमोहिमावर गेल्यास इन्दौर राज्याचा खाजगी व सरकारी कारभार गौतमाबाईच पाहत असत. तर गौतमाबाईच्या पश्चात अहिल्याबाई यानी होळकरांच्या खाजगीचा कारभार पाहत होत्या. त्यासाठी स्वतंत्र दिवाणाची नियुक्ती करून त्यांचा हिशोब ठेवला जात होता. अहिल्याबाईच्या पश्चात या खाजगी जहागिरीचा अधिकार हा वंशपरंपरागत होळकर सुभेदाराच्या पत्नीस आपोआप मिळत असे.

**३.१.३ निजामाशी युध्दः**

इ. स. १७२८ मध्ये बाजीराव पेशव्यांनी निजामाविरूध्दच्या लढाईसाठी जय्यत व नियोजनबध्द तयारी करून गोदावरी नदी पलीकडे निजामाच्या प्रदेशात त्याची कोंडी करून पराभूत करण्याचे ठरविले. मल्हाररावांस आपल्या फौजेनिशीं येऊन दाखल होण्याविषयीं श्रीमंतांचा हुकूम येऊन पोहोंचला; त्यानुसार मल्हारराव पूर्ण तयारी करून आपल्या सैन्यानिशी मदतीस येऊन हजर झाले. तेव्हा निजामाचा रसद पुरवठा तोडल्याने त्याच्या लष्करात महागाई निर्माण झाल्याने उपासमारीची वेळ आल्याने त्यानी शरण आला. शिवाय त्यांनी मराठयाकडे काही दाणापाणी पाठवून द्यावा अशी विनंती केल्याने श्रीमंत पेशवे बाजीरावांनी आपला शत्रू असा भुकेला, आजारी वा निजला असता नाश करणें आमचे शिपाईगिरीस योग्य नव्हे. असे समजून शत्रू निजामाच्या शेटयास सांगून पाचहजार बैलावर दाणाकिराणा पाठवून दिला. शेवटी मुंगी शेगाव येथे दोघांत तह झाल्यावर वेढा उठविला. त्यानंतर दुसऱ्या दिवशी निजामाची व त्यांच्या बेगमची औरंगाबादला भेटीस येण्यांची विनंती पेशव्यांना केल्यामुळे बाजीरांवानी आपल्या निवडक पाच हजार स्वारांनिशी भेटावयास गेले. त्या निवडक सैन्यात मल्हारराव होळकरही होते. स्वराज्यात परत आल्यावर बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकरांचे युध्दांतील शौर्य व विजयश्री खेचून आणण्याची सचोटी पाहून त्यांना मोठा आनंद झाला. म्हणून श्रीमंत बाजीराव पेशव्यांनी मल्हाररावांस नर्मदेच्या पलीकडे अकरा परगणे सेनाखर्चाकिरिता जहागीर दिले. मल्हारराव यांनी १७१९ ते १७२५ दरम्यानच्या काळात माळवा, गुजरात व खानदेश यात मोठी कामगिरी केल्याबद्दल बाजीरावांनी मल्हाररावांस ११ परगण्याची जहागिरी दिली. (१७२७ ऑगस्ट ६ रोजी) त्यात—

**४ प्रांत गुजराथमधील महाल चारः**

१ मौजे मोघे, १ परगणे खंबाइत १ परगणे बलवद १ परगणे सबलके.

**६ प्रांत माळव्यांत महाल सहा**:

१ आरणिया. १ परगणे देवळे. १ परगणे रुणीझा.

१ परगणे खाचरोद. १ परगणे पिंपलोद. १ परगणे जावरा..

**१ प्रांत खानदेश एकः** १ ... असे एकूण **११ परगणे** मिळाले.[११]

या पत्रावरून असे स्पष्ट होते की, ६ ऑगस्ट १७२७ रोजी पुणे दरबारकडून मल्हाररावांस आपल्या फौजेच्या खर्चासाठी हे अकरा परगणे लावून दिलेले होते. १७२७ साली बाजीराव पेशव्यांनी सरंजामीसाठी गुजरातमध्ये चार, माळव्यात सहा (विंध्य पर्वतापासून चितोड आणि मोकुद्रा डोंगरांच्या रांगांपर्यंतचा दक्षिणोत्तर भाग, पूर्वेस भोपाळपासून पश्चिमेस गुजरात जवळील दोहदपर्यंतचा प्रदेश) आणि खानदेशात एक असे एकूण अकरा महाल मल्हाररावांना दिले. त्यामुळे होळकरांच्या सरंजामीत सातत्याने वाढ होत राहिली. सुभेदार मल्हारराव होळकर यांनी होळकरशाहीची स्थापना २६ मे १७२८ रोजी केली.[१२]

मल्हारराव होळकर यांनी निजामाविरूध्दच्या पालखेडच्या युद्धात जो पराक्रम दाखविला त्यावेळी बाजीरावांनी जे प्रांत सरंजामासाठी वाढवून दिले. मल्हारराव होळकर यांनी निजामाविरूध्दच्या पालखेडच्या युध्दात जो पराक्रम दाखविला त्यावेळी बाजीरावांनी जे प्रांत सरंजामासाठी वाढवून दिले. ते खानदेशात दोन, १ परगणे उतराण.[१३] असे एकूण तीन परगणा मिळाला. मल्हाररांवाना तसा आदेश मिळताच इ.स. १७२८ ला माळव्याकडे प्रस्थान करून दोन वर्षातच चागंला माळवाच्या राजकारणात वचक निर्माण केला. इ.स. १७३० मध्ये बादशहाने भवानी राम यास माळव्यातून परत बोलावून त्याजागी महंमदशहा बंगशची माळव्याचा सुभेदार म्हणून नियुक्ती केली. मल्हारराव होळकर यांनी इ.स. १७३१ शहाजापूर नजीक बंगशाशीं गाठ पडून जुजबी लढाई झाली.

मल्हाररावांना माळव्यांत पुर्वीच्या अधिकारावर रवाना केलें. त्यावेळीं माळवा प्रांताचा बंदोबस्त उदाजी पवारांकडे होतो. उदाजी पवारांस छत्रपतींच्या काळात बरीच मान्यता मिळालेली होती. तसेच पुढे पुढे छत्रपती व पेशवे त्यास पत्र लिहतांना ‘अखंडित लक्ष्मी अलंकृत महाराजे श्री उदाजी पवार’[१४] असा आदरांने उल्लेख करीत होते. पण तो नंतरच्या काळात उध्दटपणाने वागत असताना तो छत्रपती वा पेशव्यांच्या हुकुमांना न जुमानता तो माळव्यात स्वतंत्र पध्दतीने वावरत असे. वास्तविक पहातां दाभाड्यासारखा पवारांस छत्रपतींनी कोणताही स्वतंत्र मुख्य अधिकार दिला नसल्यामुळें त्यांस श्रीमंतांचा हुकूम माननें अवश्यक होतें. त्याच्या या उपमर्दपणास आळा घालणाच्या उद्देशाने बाजीराव पेशवे यांना मल्हारराव होळकरांसारखा नम्र, विश्वासू व शौर्यवानास माळव्यात जम बसविण्यासाठी तयार केले. ‘तुम्हीं फौज वाढवून माळव्याचा बंदोबस्त करावा... नवीन फौजेच्या खर्चाकरितां तुम्हांस आणखी सतरा परगणे जहागीर दिले आहेत.’ प्रांत मालवा येथील वाटणीचे महाल वाटणी पांच ५ पैकी दोन दक्षिण तुम्हांकडे त्यांजबददल महालचा तपशील.

| १ परगणे इंदूर | १ परगणे खैराबाद. | १ परगणे महत्पूर देखील | १ परगणे काटकुट. |
|---|---|---|---|
| १ परगणे बुढा | १ परगणे करहई. | १ परगणे महेश्वर लालगड. | १ परगणे हासलपुर. |
| १ परगणे झाबवा | १ परगणे तराणे. | १ परगणे पिंपळोदे . | १ परगणे पिंपलोद तलाठ |
| १ परगणे गांगुरानी | १ परगणे रामपूर. | १ परगणे आवेर. | १ परगणे देवळे. |
| १ परगणे जावरा. | १ परगणे जेपालपुर | १ परगणे बाकाणीनिमें. | १ परगणे लवाणी. |
| १ परगनें पिढावा. | १ परगणे बेटमे. | १ परगणे बरडावद. | १ परगणे कोठडे |
| १ परगणे जिरापुर | १ परगणे कायथे | १ परगणे भिलवडी. | १ परगणे पाटण |
| १ परगणे डोंगरपुर | छेपालपूर | | |
| पैकी चौथ | ऐकूण २८ !! साडे अठठावीस | | |

येणें प्रमाणें लावून दिले असत तर सदरहू महालांचा ऐवज फौजेचे सरंजामीस घेत जाणें.[१५]

२२ जून १७३२ च्या या पत्रावरून असे स्पष्ट होते की, बाजीराव बल्लाळ यांनी मल्हारराव होळकर यांना आपल्या सैन्याच्या खर्चासाठी सरंजाम म्हणून वंशपरंपरागत साडे अठ्ठावीस परगणे दिले. त्यामुळे या परगण्यातून चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा पेशव्याकडून मिळाल्या होत्या. या प्रांताचा मोकासा वसूलीचा अर्धा हिस्सा सरकारला द्यावचा होता. तर राहिलेल्या अर्ध्या मोकासा स्वत:कडे फौजेच्या खर्चासाठी घ्यावयाचा होता.

मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी २२ जुलै १७३२ माळव्यातील सर्व मुलूख आपल्या अंमलाखाली आल्याचे पेशव्याना कळविले. तेव्हा छत्रपती शाहू महाराजांचे आज्ञेनुसार बाजीराव पेशवे यांनी तो मुलूख सरदार पवार, होळकर आणि शिंदे यांत वाटून देऊन सनदा दिल्या. या वाटणीतच आनंदराव पवार यांस धार, तुकोजी व जिवाजी पवार यांस देवास, मल्हाराव होळकर यांस इंदूर व राणोजी शिंदे यांस उज्जेन आणि त्याचे आसपासचा मुलूख मिळाला.[१६] २० जानेवारी १७३४ च्या पत्रावरून श्रीमंत पेशवे बाजीराव यांच्याकडून मल्हारजी होळकर गोसावी यांस माळवें प्रांती वाटण्या होळकर २, शिंदे २, पवार १ असे पांच हिश्य्याने प्रगणे जिल्हे निहाय सन गुदस्त साली सनद दिली गेली.

**३.१.४ दिल्लीवर स्वारी:**

इ.स. १७३५ मध्ये मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी मोगलाच्या दिल्लीवर स्वारी करुन त्यांच्या दोन लाख सैन्याचा पराभव केला. बादशहाकडून जयसिंग कछवाय, मारवाडचा अभयसिंग राठोड, कोटाचा दुर्जनसाल हाडा, मोगल सुभेदार कमरुदद्दीन व खानदौरान तसेच भरतपूरचा सूरजमल जाट या संयुक्त फौजेचा पराभव केला. इ.स. १७३६ ला मारवाडवर स्वारी अभयसिंह राठोडकडून चौथाई वसूल केली. इ.स. १७३७ मल्हारराव होळकरांनी मराठी फौजेसह दिल्लीवर चाल केली. तेव्हा मोगलाकडून मुज्जफरखान, मीर हुसैन खान, कमरुदद्दीन व कोका राजा शिवसिंह या सर्वाच्या फौजेचा दारुण पराभव केला.

असे पत्र चिमाजी अप्पांनी पेशवे बाजीरावास १० डिसेंबर १७३७ रोजी पाठवून निजामाशी झालेल्या लढाईत मल्हारराव, राणोजी, व पिलाजी यांनी केलेल्या पराक्रमाबद्दल कळविलेले होते. म्हणजेच मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे हे एका जिद्दीने व एकोप्याने शत्रूवर तुटून पडत होते. त्यामुळे शत्रूना ते भारी पडून आपला विजय मिळवित होते. इ.स. १७३८ ला मल्हाररावांनी मराठा सैन्यासह निजामावर हल्ला करुन त्यांचा पराभव केला या निजामास कोटाच्या दुर्जनसाल हाडा ही मदतीस आलेला होता. तेव्हा त्याच्याकडून मराठ्यांनी दहा लाखची खंडणी वसूल केली.

**३.१.५ डभोईचे युध्दः**

इ.स. १७३६ मराठ्यांचा सेनापती खंडेराव दाभाडे गुजरातवर नियुक्त केला. पण तो २७ सप्टेंबर १७२९ ला मृत्यू पावला. त्याचा मुलगा हा मराठ्यांचा सेनापती त्र्यंबकराव दाभाडे यांस नियुक्त केले. श्रीमंत बाजीराव पेशव्यांची दृष्टी माळव्यापलीकडे आगरा, दिल्ली या मुलूखांवर होती. दाभाडे सेनापती व बाजीराव साहेब मुख्य प्रधान यांत चुरस उत्पन्न झाली. तेंव्हा प्रांतात धामधूम करुन पाच लाख खंडणी वसूल केली.[१७] यामुळे त्र्यंबकराव दाभाडे व पेशवे बाजीराव यांचे आपापसात जमत नव्हते. त्याच वेळी मराठा सत्तेचे पेशवे बाजीराव व सेनापती दाभाडे यांच्यात मतभेद वाढत जावून दोघेही एकमेकांसमोर उभे राहिले. शिवाय गुजरातमध्ये त्र्यंबकराव दाभाडे स्वतंत्र वृत्तीने वागत होता. तसेच त्यांनी निजामाशी व मोगलांचा माळवा गुजरातचा सुभेदार महंमदखान बंगश यांच्याशी संघान साधून होता.

बाजीराव पेशव्यांचे सर्व त्यांचे विरोधक त्र्यंबकराव दाभाडे, पिलाजी गायकवाड, निजाम, आनंदराव पवार व उदाजी पवार या सर्वांनी पेशव्याच्या विरूध्द लढाईचे रणशिंग फुंकले. तेव्हा दाभाडेंचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी चिमाजी अप्पांच्या नेतृत्वाखाली फौज देऊन रवाना केले. त्यांच्या सोबत मातबर सरदार मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे होते. डभोई येथे पेशव्याविरुध्द लढाईसाठी एकत्र येण्याचे ठरविले. तेव्हा मंहमदखान बंगश निजाम व उदाजी पवार एक होऊन सेनापती दाभाडेस मदतीस येण्यापूर्वीच मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी गाठण्याचे ठरविले. त्यानुसार बाजीरावांनी सन १७३१ ला डभई येथे सेनापती दाभाडेवर हल्ला चढविला. त्यावेळी त्र्यंबकराव दाभाडे हत्तीवर बसून तिरंदाजी करीत असतां अकस्मात् कपाळावर गोळी लागून पडले. तेव्हां त्यांच्या फौजेची दाणादाण होऊन ती चोहोंकडे पळून गेली युक्त फौजेचा सामना करुन विजय मिळवून सर्व जूने मराठा सरदार संपविले. त्याचप्रमाणे उदाजी पवार याच्यात तह होऊन त्र्यंबंकराव दाभाडे यांच्या मुलास म्हणजे यंशवतराव दाभाडे यास पेशव्यांनी सेनापती पदाची वस्त्रे देऊन सन्मान करून पाठविले. माळव्याचा सुभेदार महंमदखान बंगशची बादशहाने उपलबांगडी करुन त्यांच्या ठिकाणी सवाई जयसिंगांची नियुक्ती केली. त्यामुळे निजामाचे काही चालले नाही. त्यातून मराठ्यांचा उत्तरेकडे जाणारा माळव्यातील मार्ग कायमचा मोकळा झाला.

इ.स. १७३६ मध्ये मराठा फौजेने मारवाड प्रांतावर हल्ला करुन मराठ्यांनाचौथाई वसूलीचा हक्क मिळवून दिला. तसा उदाजी पवार हे बाजीरावांच्या विरोधात गेल्याने एकटया मल्हारराव होळकरांना उत्तरेस पराक्रम गाजविल्यास नामी संधी मिळाली. तसेच माळव्यांतील सर्व ठाकूर जमीनदार व राजे एक होऊन मोगलास साहय करु नये. असे ठरविल्याने होळकर व शिंदे यांना चांगली संधी आपोआप साधून आली. मल्हारजी, पवारांची बाजू घेऊन चिमाजीअप्पास लिहितात 'फौज भारी होईल मुलूखगिरी लांब पावेतो जाऊन करु चार रुपये जास्ती मिळतील.'[१८]

माळव्यातील सुभेदारांनी मराठयांची वाढता प्रभाव पाहूनच छ. शाहू महाराजाकडे तहासाठी तयार झाला. पण पेशव्यांशिवाय तह होणार नाही. हे कळाल्यावर मोगल सुभेदारांनी पेशव्यांशी लढा देण्यासाठी सिरोंजहून ते खेमलासा येथे पोहचले. पण मल्हारराव होळकर पन्नास हजार फौजेनिशी सिरोंजजवळ आल्याचे तसेच दुसरी वीस हजार फौजेची तुकडी येत असल्याचे समजताच या मोगल सुभेदारांनी मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे व आनंदराव पवार यांस नजराने पाठवून करार केल्याने मराठ्यांचा संपूर्ण माळव्यातील संचार मुक्तपणे सुरु झाला.

**३.१.६ दया बहादुरवर स्वारीः**

आग्रा व माळवा हे दोन सुभे जयसिंगला इ.स. १७२०-२१ च्या सुमारास बादशहाकडून प्राप्त झालेली होते. तेव्हा जयसिंगाने आग्रा हा आपल्याकडे लगत असल्यामुळे ठेवून माळव्यावर त्याने आपल्या वतीने राजा गिरीधर बहादुर यांची नेमणूक केली. पण याने जयसिंगाचे वर्चस्व जुगारून तो आपला भाऊ दया बहादूरच्या मदतीने स्वतंत्रपणे राज्य करू लागला. तेव्हा जससिंगाने गिरीधर व दया बहादुरचा पाडाव करण्याची योजना तयार करू लागला.

माळव्यातील इतर सरदार व बादशहाच्या व बहादुर बंधुच्या त्रासाला कंटाळलेली होती म्हणून मराठयांची आलेली स्वारी ही त्यांच्यासाठी एक चांगली संधीच होती. अनुपसिंग ठाकूरने जानेवारी १७२३ च्या सुमारास बाजीरावाची भेट घेतली. आणि मराठ्यांनासर्वतोपरी मदत देण्याचे कबुल केले.[१९] उदाजी पवार हे दक्षिण माळव्यात तर मल्हारराव होळकर हे माळव्यात सक्रीय होते. मदलाल मंडलोई अनुपसिंग ठाकूर व इतर सरदार रजपूत सैन्यात येऊन सामील झाले. मल्हारराव होळकरांची व इतर सर्वाची फौज सामील होऊन फेब्रुवारी १७२३ धारच्या दिशेने कुच केली. आघाडीवर बारा हजार सैन्यासह मल्हारराव होळकर हजर होते... चिमाजी अप्पासह मल्हारराव व गिरीधर बहादुर यांच्या सैन्याचा सामना मार्च १७२३ च्या सुमारास सारंगपूर येथे झाला. यात मल्हाररावास विजय मिळाला. यावेळी बाजीराव पेशवे स्वत: जातीने... माळव्यातील दक्षिणेतून जाणाऱ्या वाटेवर आपले सैन्य घेऊन हजर होते.[२०]

दया बहादूरच्या विरोधात म्हणजे दिल्लीचा बादशहा मंहमदशहाच्या विरोधात सर्व रजपूत, जाट लढण्यास तयार होते. तसेच दया बहादूरच्या जाचाला नंदलाल मंडलोई, अनुपसिंग ठाकुर व इतर राजे कंटाळलेले होते. मोगली सत्तेपासून कायमची सुटका करून घेण्यासाठी मराठयांस सर्वानी मदत करण्याचे ठरविले. कारण त्यांच्यावर बादशहाचा वाढता डोईपट्टी नावाचा कर देणे सक्तीचे केलेले होते. मराठे दक्षिणेतून माळव्यांत चालून येत असल्याचे कळताच जयपूरचे राजे सवाई जयसिंग यास आपल्या मोरक्या मानून सर्व एक झाले. त्यासाठी त्यानी इंदूरकर चौधरी नंदलाल मंडलोई यास दोनशे स्वार देऊन पाठवून निरोप दिला की, 'तुम्ही जुवामर्दीचा इरादा धरला आहे, त्यास जर तुम्ही उज्जनीस असलेला मोंगलांचा सुभेदार, दाय बहादूर, याजवर हल्ला करुन त्यास तेथून हांकलून लावाल, व तुम्ही आपला अंमल उज्जैन वगैरे ठिकाणीं बसवाल... सदर सुभेदारापाशीं साठ हजार पठाण घोडेस्वार, चाळीस हजार पायदळ व तीनशें तोफा याप्रमाणें जय्यत सरंजाम आहे.'[२१]

पेशव्यानी पगारी फौज तयार करून माळव्याचा सुभेदार दया बहादुर वर स्वारी करण्याच्या उद्देशाने मल्हारराव होळकर यांना तशी फौज तयार करण्यास सांगून पेशव्याच्या फौजेस गोदावरी नदी काठी भेट घेण्यास बोलवले. त्यानुसार मल्हाररावांनी होळकरानी पाच हजार नव्या तरूणांची फौज तयार करून गोदावरी गाठली. बाजीराव व मल्हारराव होळकर हे स्वारीवर जाताना उदाजी पवारास सोबत घेण्यासाठी सातपुडा घाटातील खानदेशामधील शिरपूर जवळील शेंदव्याच्या घाटात भेटीस गेले. तेव्हा उदाजी पवार पेशव्यासोबत युद्धमोहिमेस येण्यास तयार नव्हते. तो पेशव्याचां नव्हे तर छत्रपती शाहूच्या पदरी पहिल्यापासून स्वतंत्र व पिढीजाद नोकर राहिल्याने तो स्वत:स पेशव्यांच्या बरोबरीचा समजून तो पेशव्याची बरोबरी करू लागला. तेव्हा बाजीरांवानी त्यांस 'तुम्ही आम्ही एका धन्याचे चाकर; तेव्हां आम्ही तुम्हांस नोकरांप्रमाणें हजिरी देऊन पगार कां घेऊं? आम्हांस बरोबर हिस्सा द्याल तर आम्ही स्वारीस येऊ.'[२२]

पवारांसारख्या तलवार बहाद्दर व लढवय्या असल्याने ते त्यास सोबत घेऊन न जाणे योग्य वाटत नव्हते. पण त्यांचे अर्धे हिस्स्याचे म्हणणे मान्य करणे ही शक्य नव्हते. तेव्हा त्यांनी त्यांची या मोहिमेत सोबत असणे आवश्यक आहे. म्हणुन बाजीरावांनी स्वत:चे पागोटे काढून त्याच्या पुढे ठेवले तरी, तो काही केल्याने तयार होत नव्हता. उदाजी पवाराचा दिवाण रामराव केशव कवठेक सारखा पवारानां विनंती करून पेशव्यांशी हो म्हणावे असा वारंवार सल्ला देत होता. तेव्हा मल्हाररांव होळकरांना या बाबीचा राग आला. आणि पेशव्यांना म्हणाले 'इतकी विनवणी केली तरी ऐकत नाहींत; मर्जी त्यांची; एक कुळबंट न आलें तर काय होणार आहे? आपलें नशीब आपल्याबरोबर!'[२३] अशी पेशव्यांची समजूत घालून पानसुपारीचा पाहूनचार न घेताच तडक निघाले. 'श्रीमंतांनी आपली परोपरी विनवणी केली असतांही, आपण त्यांचें ऐकिलें नाही. ही या प्रसंगी आपण मोठी चूक केली! मल्हारराव

होळकर हे केवळ परीस आहेत. ते श्रीमंताबरोबर असल्यामुळे त्यांना काय पाहिजे तें करितां येईल![२४] शेवटी दिवाणाचा सल्ला पवारांना पटला म्हणून ते मल्हारराव होळकरांच्या मागे मागे मोहिमेत सहभागी झाले.

पेशवे बाजीराव पुढील वाटचालीसाठी पुण्यास परत गेले. तर मल्हाररावानी वेगवान हालचाली करता याव्यात यासाठी डेरे, राहूटया, बायकामुलें परत पाठवून दिले. मोहिमेसाठी आवश्यक ते सामान सोबत ठेवून केवळ सडया बारा हजार स्वारानिशी आपला मुक्काम बुऱ्हाणपूरच्या मैदानात नेला. तेथे नंदलाल मंडलोई आपल्या स्वारानिशी हजर झाला. त्यांना सवाई जयसिंगाचा निरोप सांगितला. त्यामुळे मल्हाररावांना या नवख्या प्रदेशाची वा नद्यांच्या उताराची माहिती मिळाल्याने त्यावर मल्हारराव होळकर म्हणाले की, 'प्रथम आम्हांसही दया बहादूराचाच समाचार, घ्यावयाचा आहे; हें कार्य उरकल्यानंतर मग पुढील विचार पाहून घेऊं.' मोहिम फत्ते करता येईल. त्यावर नंदलाल मंडलोई म्हणाले की, 'तुम्ही आम्हांस घाटवाट वगैरे दाखवून ऐन दोन प्रहरांचे सुमारास दाय बहादूराचे नजीक नेऊन सोडावें; नंतर श्रीमार्तंड काय करील तें सर्वांचें दृष्टीस पडेलच!'[२५] दोघांत ठरल्यानुसार नर्मदा नदी पार करून दोन पहरी नेऊन सोडण्याचे मान्य केले.

### ३.१.७ अमझेरा व तिरलाचे युध्द:

माळव्यात मराठ्यांचाप्रवेश होऊ नये म्हणून बादशहाने माळयाचा सुभेदार गिरीधर बहादूर व त्यांचा बंधु दया बहादूर सत्त मराठ्यांशीसंघर्ष करीत होते. मराठे आपल्यावर चालून येत असल्याचे दया बहादुरयास कळताच तो नर्मदा नदी पार करून धार येथे तळ ठोकला. बाजीरावांनी १७२८ ला माळयावर चिमाजी अप्पास सोबत मल्हारराव होळकर व इतर सरदार स्वारीस निघाले .तर बाजीरावानी दुसऱ्या बाजूने स्वारी केली. चिमाजी अप्पानी धार जवळ गिरीधर बहादूर पराभूत करुन ठार केले. त्यानंतर माळव्याचा मोगल सुभेदार दया बहादूरने २९ नोव्हेंबर १७२८ ला आमझऱ्याच्या घाटात प्रचंड तोफखानाची रचना करुन मराठ्यांनाकोंडीत पकडण्याअगोदरच मल्हारराव होळकर नंदलाल मंडलोई व बढवणीचे ठाकूर अनुपसिंगसह सर्व फौज तांडा घाटावरील सरळ रस्त्या ऐवजी मांडवगडच्या पुर्वेकडील भैरव घाटाने वेगळयाच मार्गाने जलद हालचाली करण्यासाठी मराठ्यांनी मांडवगडच्या घाटांचा मार्ग धरला.

सुर्योदयापूर्वीच माळव्यातील महेश्वर व धर्मपूरीच्या दरम्यान अकबर पुला जवळून नर्मदा नदी पार करून मांडवगडच्या वाटे मराठेवर चढले तेंव्हा दयाबहादूराचे युध्दाचे बेत ढासळले.[२६] त्यामुळे दया बहादूरला तोफाखाना सोडून मराठ्यांशीसामना करावा लागला. तेवढयात उदाजी पवारांची फौज ही मल्हारराव होळकरांना येऊन मिळाली. ही सर्व फौज जय्यत तयारीनिशी मांडवगड जवळ भैरव घटापर्यंत जाऊन पोहचल्याने दया बहादूर केवळ अर्ध्या कोसावर होता. अचानक पाठीमागून २० नोव्हेंबर १७२८ अमझेरा येथे हल्ला करून दयाबहादुर सैन्याची पार वाताहत करून सोडली. उदाजी पवार मारामार करीत दया बहादूराच्या

हत्तीपर्यंत पोंहोचला. वर चढून त्यांने खाशाचें डोके कापिले. खासा सरदार मारला गेला, त्यात मराठा सरदार होळकरांसह सर्वांनी खूप मोठा पराक्रम गाजविल्याने शत्रूस पळ काढावा लागल्याने मराठयास प्रचंड लूट सापडली. शिवाय अठरा हत्तीही मिळाले, ते अठरा हत्ती चिमाजीने शाहूस नजर केले. तर बाजीरावांनी उदाजी पवारांस पत्र पाठवून मोठा गौरव केला. . ..होळकरांस व उदबास रजा बंद राखणे.' होळकरांच्या कामगिरी बद्दल त्यास स्वारीतच हत्ती देऊन गौरव करण्यात आला. १७१८ चा बारगीर १७२८ त हत्तीवर आरुढ झाला.[२७]

दया बहादूरने चार पाच हजार पठाणांनिशी पुन्हा युद्धाची तयारी केली. दोन्ही फौजात तरला येथे तुंबळ युद्ध होऊन गनिमी काव्याने मल्हाररावांनी परत फिरून मोगलांचा पराभव केला. १२ ऑक्टोंबर १७३१ ला धारजवळ दया बहादुरचा पराभूत होवून ठार झाला. तेव्हा त्याचे सैन्य पळायला लागले. मल्हारराव होळकरांनी या विजयानंतर धारेस जाऊन पेशव्यांच्या नावाची द्वाही फिरवून विठुजी बुळे यांस पगार देऊन तेथील व्यवस्थेसाठी दोन हजार फौजेसह ठेवून आपण आठ हजार फौजेनिशी उज्जैनला गेले. माळवा हा मोगलाचा सुभा जिंकून मराठेशाहीस जोडण्याच्या अनेक सरदारांपैकी मुख्य सरदार मल्हारराव होळकर हे एक प्रमुख सरदार होते.

इ. स. १७२९ मराठी सैन्य कूच दरकूच करीत उज्जैन नजीक पोहोचले. दया बहादूराचा पुतण्या भवानीराम यानें मोठ्यातातडीने सैन्याची जमवाजमव केली. आणि उज्जेनच्या भोवताली कामचलाऊ तटबंदी घालून मराठ्यांनातोंड देण्याची तयारी चालविली. बादशहानेंही सैय्यद नजमुद्दीन, कोटयाचा महाराणा दुर्जनसाल व महंमद उम्मरखान यांस भवानीरामाच्या सहाय्यास जाण्याचे हुकूम सोडले. दिल्लीचा बादशहा हा मराठ्यांचावाढता प्रभाव पाहून त्यांना वेळीच आळा घालण्यासाठी जयत तयारी करूनही या युध्दात विजय मिळेल की नाही याबाबत साशंक होता. पण मराठे मात्र पूर्ण विश्वासाने युध्दात शत्रूवर तुटून पडून विजय आमल्या बाजूने खेचून आणण्यात माहीर झालेले होते.

मराठ्यांचे या युध्दात पस्तीस दिवस गेले. तरी शत्रू हार मानावयास तयार होण्याचे चिन्हे दिसत नव्हती. तेव्हा बाजीरावांनी एकाच ठिकाणी गुंतून न बसता सैन्याच्या खर्चासाठी ठिकठिकाणी चौथ सरदेशमुखी वसूल करीत गुजराथकडे गेले. नंतर मल्हारराव होळकर व उदाजी पवार यांनी पावसाळा असल्याने माळव्यातच आपला तळ टाकला. मोगलांच्या हालचाली पाहून पवार व होळकरांनी मांडवगडचे सुप्रसिद्ध ठाणे काबीज केले. मल्हारराव होळकर यांनी सन १७३१ ला महंमद खान बंगशचा शहापूर जवळील जूजबी लढाई झाल्या पण त्यात कोणताही निर्णय झाला नाही. तेव्हा माळव्याचा सुभेदार भवानीरामला बादशहाने परत बोलावून त्या जागी महंमदखान बंगशची नेमणूक केली.

मराठयांस द्रव्यप्राप्ती तर झाली, पण त्याबरोबर दोनशें मैल लांब व दोनशे मैल रुंद्र इतक्या विस्तृत प्रदेशावर मराठ्यांनी हुकमत चांलू लागली... उदाजी पवार व मल्हारराव

होळकर यांनी पावसाळ्यात माळव्यांतच छावणी केली. तसेच पवार व होळकर यांनी मांडवगडांचे सुप्रसिध्द ठाणे काबीज केले. यासालांत मराठ्यांचे पाऊल माळव्यांत चांगलेच रोविले गेले होते.[२८]

१ जून १७३२ ला मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांचा मुक्काम इंदूर जवळ पडला असता, इंदूरचा जमीनदार नंदलाल तेजकर्ण भेटल्यास येत असल्याचे कळविले. 'तुमचे भेटीकरीता तळावरी आम्ही वाट पाहाते, तरी पत्रदर्शनी स्वार होऊन येणें. एक घडीचा विलंब न करणे.' मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी २२ जुलै १७३२ माळव्यातील सर्व मुलूख आपल्या अमलाखाली आल्याचे पेशव्यांना कळविले. तेव्हा छत्रपती शाहू महाराजांचे आज्ञेनुसार बाजीराव पेशवे यांनी तो मुलूख सरदार पवार, होळकर आणि शिंदे यांत वाटून देऊन सनदा दिल्या. या वाटणीतच आनंदराव पवार यांस धार, तुकोजी व जिवाजी पवार यांस देवास, मल्हाराव होळकर यांस इंदूर व राणोजी शिंदे यांस उज्जैन आणि त्याचे आसपासचा मुलूख मिळाला.[२९] बुंदेलखंडचा हिंदू राजा छत्रसाल यांच्यावर इ.स. १७२० महंमदखान बंगश चालून आल्याने छत्रसालांनी तात्काळ मदतीस यावे यासाठी बाजीरावांकडे विनंती केली.

**३.१.८ राजा छत्रसालास मदत:**

माळव्याचा सुभेदार गिरीधर व दया पराभवाच्या बातमीने दिल्लीचा बादशहा चिडला व त्याठिकाणी महंमदखान बंगशची नेमणूक माळव्यावर करून रवाना केले. त्यांनी माळव्यात येताच महमंदशहा बंगश या सुभेदारांने बुंदेलखंडचा हिंदू राजा छत्रसालावर चालून जाण्याची तयारी चालवली. तेव्हा बुंदेल नरेश छत्रसाल यांनी मराठा छ. शाहू महाराजास मदतीस येण्याची विनंती केली. त्यानुसार आपला वकील दक्षिणेस पाठविला. त्या पत्रात बाजीरावास शंभर दोहऱ्यांचे पत्र दिले.

जो गति ग्राहगजेंद्रकी, सो गत भई है आज।
बाजी जात है बुंदेलन्की, राखो बाजी लाज।।[३०]

छत्रपतीच्या आदेशानुसार बाजीराव पेशवे फौजेसह ताबडतोब कुच करून माळव्यात मल्हारराव होळकरास येण्याचे कळविले होते. सरळ महंमदखान बंगशवरच चालून गेले. तेव्हा बाजीरावांसह मल्हारराव होळकर ही सन १७२३ बुंदेलखंडात येऊन बंगशचा पराभव केल्याने छत्रसालने मराठ्यांशीमैत्री केली. पण महंमदखान बंगशने पुन्हा जय्यत तयारीने सन १७२७ छत्रसालावर स्वारी करुन भिंड, मउहा, पैलानी, आगवासी व सिमानी परगणे जिंकून महोबा परगण्यातील इजोली येथे दोघांत तुंबळ युद्ध झाले; पण छत्रसालाचा पराभव झाल्याने जैतापूरच्या अरण्यात लपून बसले. तेव्हा बंगशने बारीगड, नौरीझूमा व कुलपहार जिंकून जैतापूरास वेढा दिला. तेव्हा छत्रसाल बंगशला शरण आला. त्यावेळी पाच हजार सैन्यापर्यंत छत्रसालाकडे ठेवून सुटका केली.

छत्रसालानी पुन्हा मराठ्यांनामदत मागीतली. मराठे व छत्रसालाच्या संयुक्त फौजेने १९ मार्च १७२९ ला महंमदखान बंगशवर स्वारी करताच दिल्लीकडून बंगशने कुमक मागीतली. तसेच बंगशचा मुलगा कायमखान वडीलांच्या मदतीसाठी तीस हजार फौज व धान्याचा साठा येऊन मदतीस घेऊन जैतपूरकडे निघाला. यावेळी त्याला बिलाजी जाधव यांनी अडवून पराभूत केले. तेव्हा तो पळून गेला. त्याचे युद्ध साहित्य तीन हजार घोडे, तेरा हत्ती व इतर मौल्यवान वस्तू मराठ्याच्या हाती पडल्या. तर महमंदशहा बंगश जैतपूरच्या किल्यात आश्रयास होता.

जैतापूरच्या किल्यातील बंगशला सत्तर हजार फौजेनिशी मराठ्यानी वेढा दिला. तेव्हा बाजीरावांनी त्याचा बाहेरून जाणारा रसद पुरवठा बंद केल्याने त्यावर उपासमारीची वेळ आली. त्यात बाजीरावांच्या फौजेच्या उजव्या बाजूस विठ्ठल शिवदेव विंचूरकर डाव्या बाजूस मल्हारराव होळकर व पिलाजी जाधव यांनी वेढा देऊन बंगशला पळून जाण्यास भाग पाडले. तेव्हा तो पेशव्याना शरण आला. तेव्हा पेशव्यांनी आपला वेढा उठवून महंमदखान बंगशला जीवदान दिले. तेव्हा जैतापूरचा किल्ला छत्रसालास परत मिळाला. या फौजेत मल्हारराव होळकर आपले पथकासह हजर होते... बंगशची कोंडी करून गोटा लुटला...एकोणीस हत्ती पाडाव झाले. पेशव्यांनी छत्रसाल राजाची भेट घेतली. तेव्हा छत्रसालानी भव्य दरबार भरवून श्रीमंत बाजीराव पेशवे यांचा मोठा सन्मान करून सर्वासमक्ष जाहीर केले की, ‘जसे माझे दोघे पुत्र आहेत त्याप्रमाणें बाजीराव हे तिसरे पुत्र होत!’... छत्रसालाने पेशव्यांस पुत्रवत् लेखूण त्यांस झांशीची जहागीर बहाल... राज्याचा तिसरा विभाग पेशव्यांस मिळावा अशी व्यवस्था केली.[३१] म्हणजेच सव्वा दोन लाखचा मुलूख व आपल्या दरबारातील नर्तकेची मुलगी बहाल केली.

ती मस्तानी दिसायला अतिशय सुंदर होती जी की भेट म्हणून दिली. याशिवाय मल्हारराव होळकर व इतर सरदारांना मानाचा पोषाख देवून उचित सन्मान केला. तेव्हा बाजीरावानी वाई जवळील बावधन गावचा गोविंदा खेर हा कऱ्हाडी ब्राहमणाचा तरूणाबांड मुलगा सोबत आलेला होता. त्यास या छगसाल राजाकडून मिळालेल्या प्रदेशाच्या बंदोबस्तासाठी नेमले. तोच पुढे गोविंदपंत बुंदेल नावाने ओळखला जाऊ लागला मल्हाररावानी १९ हत्ती आणल्यामुळे खुश होवून त्यापैकी हंसराज नावाचा हत्ती मल्हाररावास बाजीराव पेशव्याने बक्षीस देऊन सन्मानित केले.[३२]

मस्तानी व बाजीरावांच्या घरगुती नाजूक संबंधास नीट घडी घालण्यात मल्हाररावांचा मोठा पुढाकार होता. बाजीरावांच्या पत्नी काशीबाई व बंधु चिमाजी अप्पांच्या कठोर विरोधास हळुवारपणे मस्तानी प्रकरणाचा तिढा सोडविण्यात मल्हारराव हे बाजीरावांच्या पाठीशी खंबीरपणे उभे राहून आधार दिला.

### ३.१.९ सवाई जयसिंगाकडून खंडणी वसूल:

पेशवे बाजीरावानी परत येताना जयपूर मार्गे येण्याचे ठरवून जयपुरला मुक्काम केला तेव्हा जयपुर नरेश सवाई जयसिंगाची भेट होऊन दयाबहादुरच्या लढाईचा खर्च देण्याचे कळविले. तेव्हा जयसिंगांनी निरोप पाठविला की 'आम्ही तुम्हांस दायबहादुरावर स्वारी करते वेळीं मदत केली त्याचा ह्याच रीतीनें उपकार फेडतां कीं काय, तेव्हा श्रीमंत पेशव्यानी आपल्या भाषेत परत निरोप पाठविला 'असले लपंडाव चालावयाचे नाहींत, खर्चाचा पुरवठा केलाच पाहिजे.'[३३] तेव्हा नाईलाज झाल्याने सवाई जयसिंगाने तीस लक्ष रुपये दिले.

### ३.१.१० चापानेरवर हल्ला:

नंतर मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी रेवा नदी काठी पोहचताच आपल्या सैन्याचे दोन विभाग करून एक तुकडी आनंदराव पवार व विठूजी बुळे यांच्या नेतृत्वाखाली माळव्यास रवाना केला. तर दुसरी तुकडी मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी चापानेर सर केले.

### ३.१.११ सुभेदार सवाई जयसिंगावर स्वारी:

माळव्याचा मोगल सुभेदार सवाई जयसिंग हा माळव्यात चिमाजी अप्पावर चालून जात असल्याचे कळताच तात्काळ मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी आपला मोर्चा माळव्याकडे वळविला. माळव्यात सुभेदार सवाई जयसिंगाची सन १७३४ कोंडी करून त्यांची रसद पूर्णत: बंद केल्याने तो शरण येऊन माळव्यातील २८ परगण्यातील घेतलेल्या खंडण्या व शिवाय सहा लक्ष रुपये रोख मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यास देण्याचे कबूल केले.[३४] त्यानंतर मराठ्यांनी आपला मोर्चा बढवाईकडे वळविला. त्यात बढवाईच्या ठाण्यास घेरून त्यांस जेर करून खंडणी घेतली. तर पिलाजी जाधवांच्या फौजेने आगऱ्याच्या पूर्वेस असलेल्या भदावराकडे मोर्चा वळविताच भदावरकरांने तीन लक्ष खंडणी देऊन आपला बचाव केला.

मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे राजपुताकडे जाऊन महंमद खान बंगशच्या मोगली आक्रमणाचा बदला घेतला. मोगलांची प्रचंड फौज कमरुद्दीनखान व मीरबक्षीच्या खानडौरान नेतृत्वाखाली मराठयाना शह देण्यासाठी निघाले. तसेच त्यांना सवाई जयसिंग, मारवाडचा अभयसिंग, महाराव कोटेवालासह सामील झाल्याने दोन लाख स्वार व प्रचंड मोठा तोफखाना घेऊन रामपूरा प्रांताच्या दिशेने मराठयाकडे निघाले. हे कळताच क्षणी मल्हारराव होळकर व राणोजी शिंदेच्या फौजेने संधीचा फायदा घेण्यासाठी बुंदीचा वेढा उठवून ते सरळ जयपूर, बुंदी, कोटा, येथील तुकडयावर आघाडीवर गेल्यामुळे जयसिंगाच्या व इतर रजपूत रजवाडयांच्या प्रदेशावर चालून जाताच मोगलाच्या संयुक्त फौजेतून बाहेर पडून स्वत:चा प्रदेश वाचविण्यासाठी निघाला. त्याचप्रमाणे इतर रजपूत राजे ही परत फिरले. तेव्हा जयसिंगाच्या

मध्यस्थीने होळकर व मीरबक्ष हयांच्या ता. २२.३.१७३५ ला भेटी होवून तह ठरला. माळव्याच्या चौथाई दाखल दरसाल बावीस लक्ष रुपये देण्याचे खानडौरानने कबूल केले.

मल्हारराव होळकरांच्या प्रचंड विजयामूळे येथून पुढे बाजीरावांनी 'राजश्री मल्हारजी होळकर दिम्मत चिमाजी बल्लाळ.' असे जें शीर्षक असे, त्याऐवजी 'सुभा मल्हारराव होळकर दिम्मत पंतप्रधान.' यातून असे स्पष्ट होते की मल्हारराव होळकर यांच्या विजयी घोडदौडीमुळे पेशव बाजीराव जाम खुश होवून स्वत: मल्हारजींस भरजरी पोशाख दिला असून सोन्याचें कडें मोल्यांचा तुरा, शिरपेंच वगैरे बहुमान दिला आहे. यापुढे त्यांच्या नावाचा अतिशय अदबिने व सन्मानपुर्वक उल्लेख करतात. तसेच या वेळेपासून सुभेदार झाले. इ.स. १७३५ पासून होळकरशाहीचा पाया घातला गेला असे धरण्यास हरकत नसावी. येथून होळकरशाहीचा प्रारंभ झाला असें मानल्यास पूर्वीची पंधरा वर्षे 'पूर्व तयारी' असें धरुन चालावयाचे.[३५]

**३.१.१२ भेलसावर विजय:**

मराठ्यांचे माळवा व बुंदेलखंडातील वाढते वर्चस्व पाहून दिल्ली बादशहाने अगोदरच मराठ्यांशीतह करण्याची योजना आखली. पण दरबारातील तुराणी पक्षाणी विरोध दर्शिवला. यामुळे पेशव्यांनी माळवा येथे शिंदे, पवार, होळकर यांनी भेलसा येथे एकत्र येऊन इ.स. १७३७ ला भेलसावर विजय मिळवत बुंदेलखंड, ओडशा, दतिया व नरवर जिंकून भदावराकडे मोर्चा वळविताच, येथील राजाने मोगलांचा अलाहाबादचा सुभेदार सादतखान मदतीस येईल म्हणून मराठ्यांशीलढण्याची तयारी सुरु केली. तेव्हा मराठा सैन्याचे पेशव्यांनी दोन विभाग करुन दोन बाजूनी स्वारी करताच भदावरच्या राजाने शरणाती स्विकारली. वीस लाख खंडणी व दहा हत्ती देण्याचे कबूल केल्यावरुन राजास जीवदान देण्यात आले.[३६]

मोगल बादशहाने मराठ्यांनाशह देण्यासाठी पुन्हा अभयसिंग जयसिंग व खादतखान यांस फौजा घेऊन दिल्लीस येण्याबद्दल फर्माने सुटली. तेव्हा पेशव्यांनी या मोगली फौजा एकत्र येण्या अगोदरच हल्ला करण्यासाठी जाधव, रेटरेकर व मल्हारजी होळकर यांसरदाराना सात हजारानिशी यमुना पार केली. त्याप्रमाणे यांनी फिरोजाबाद व इतिमादपूर जिंकून जेलसरकडे जाताना मोगलांच सुभेदार सादतखनाने पन्नास हजार फौज घेऊन व त्याचा पुतण्या मनसूर अली खान वीस हजार फौज घेऊन मराठयांवर चालून आली तेव्हा मराठ्यांनीमोगलांची एवढी फौज समजून हल्ला चढविला. पण सादतखानाचे पन्नास हजारावर सैन्य चालून येत असल्याचे कळताच अंतर्वेदातील मराठ्यांचाडाव फिसकटला. आपल्यापेक्षा पाचपट सैन्यापुढे आपला निभाव लागणार नाही हे ओळखूण लगेच मराठ्यांनीदुधडी भरुन वाहणारी यमुनानदी पार करुन पैलतीरावरील पेशव्यास येऊन मिळाले. तर मोगलाचा सुभेदार सादतखान आग्राकडे येताच मराठ्यांनीआपला अवजड तोफखाना बुंदेलखंडाकडे रवाना करुन सादतखान, वजीर मीरबक्षी येऊन मिळण्यासाठी दिल्लीवरुन आग्राकडे निघाले.

तेव्हा पेशव्यांनी सरळ दिल्लीवर मोर्चा वळविला. बादशहास नमोहरण करण्यासाठी दोनशे मैलाचे अंतर पार करण्यासाठी सोबतचे बाजारबुणगे व अवजड तोफखाना रवाना करुन निवडक फौजेसह राज रस्ता सोडून डोंगरी प्रदेशातून केवळ दहा दिवसात वीस वीस कोसांचा मजला मारून मोगलास पत्ता न लागू देता २८ मार्च १७३७ रोजी दिल्लीस बारापुला, कालिकेचे देऊळ उजवे टाकून कुशबंदी नजीक मुक्कम केला. तेव्हा दिल्ली दरबारातील कोका, उमराव व खान यांनी बादशहास लढण्याचा मार्ग सांगितला. तेव्हा तोफांचा मार मराठयावर सुरु करताच मराठे मागे मागे सरकुन ते तोफखान्याच्या पूढे येतांच सटवाजी जाधव, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे. व पवार बंधूनी तिन्ही बाजुनी मोगल सैन्यावर हल्ला करुन पराभूत केले. तेव्हा तुराणी पक्षानी मराठ्यास तेरा लाख खंडणी देऊन सुटका करुन घेतली. हे वृत्त मोगली सादतखान, मीरबक्षी खान डौरान, जयसिंग व महंमदखान बंगश दिल्ली वाचविण्यासाठी निघाले. तेव्हा मराठ्यांनी दिल्ली सोडून दक्षिणेकडे निघाले असताना, हैदराबादच्या निजाम—उल—मुल्कने छत्रपती शाहू व पेशवे बाजीराव यास कळविलेले होते.

पत्र पाठवून कळवितो व तो स्वत: उत्तरेकडे बादशहाच्या भेटीस सन १७३७ ला निघतो. तेव्हा मराठ्यांचा काही आणांस त्रास होऊ नये. म्हणून त्यांनी मुलगा नासिंरजंगकडे पाच हजार फौजेसह औरंगाबाद येथे ठेवतो. खानदेशात अब्दुल रहिमखान व अनरुलखानकडे पाच हजार फौज, विजापूर, बीड, पाथरी भागात चंद्रसेन जाधव तर वऱ्हाडमध्ये सुजायतखान आसा कडेकोट बंदोबस्त ठेवून दिल्लीकडे निजाम निघाला.

१९ एप्रिल १७३७ ला बुऱ्हानपूर येथे येऊन सादतखान सोबत मराठयावर हल्ला करण्याची योजना आखली; पण पेशव्यांनी निजामांच्या कावेबाज मैत्रीच्या पत्राचा अर्थ उलघडण्यासाठी निजामाकडे जाधवाना पाठविले. तो पर्यंत निजाम दिल्लीत जाऊन बादशहाकडून मोठा मानसन्मान व ‘कुल अखत्यार’ नाव धारण बादशहाशी करार केला. पाच सुभे देणें व करोड रुपये देणे. माळवा, गुजरात या प्रांताची सुभेदारी निजामपूर गाजीउद्दीन यांस बहाल केल्याने निजामाने तीस हजार फौज तोफखान्यासह माळव्याकडे काल्पी, बुंदेलखंड मार्ग निघाला. वाटेत दतियेकर ओडसेकर छत्रसालाचा मुलगा सोभानसिंग, सवाई पुत्र जाट व रजवाड्याच्या फौजा व तोफखाना निजामास येऊन मिळाल्याने सैन्यबळ सत्तर हजारावर पोहंचले. निजाम धामोणी, सिरोंज पार करुन भोपाळला पोहचला. तेव्हा पेशव्यानी सरगोण करुन पुनाशाजवळ ऐंशी हजार फौजेनिशी नर्मदा नदी पार करुन भोपाळकडे मोर्चा वळविला. दोघेही ऐकमेकांसमोर उभे टाकले. तेव्हा मराठ्यांनी गनिमी काव्याचा अवलंब करुन निजामाची बाहेरुन येणारी सर्व रसदपुरवठा लुटून घेतल्याने निजामावर उपासमारीची वेळ आली. तर सादतखान निजामाच्या मदतीस येत असल्याचे मराठ्यांना कळताच मल्हारराव होळकर व पवार यांनी त्यांच्यावर हल्ला करुन त्यास ठार केले. तर दक्षिणेकडून नासिरजंग येत असल्याचे कळताच बाजीरावांनी बंधू चिमाजी आप्पासोबत कदम बांडे, दाभाडे, गायकवाड? फत्तेसिंग

भोसले, शंभुसिंग जाधवराव सरलष्कर व रघुजी भोसले यास आज्ञा दिली. दक्षिणची फौज निजामास सामील होवू न द्यावी यास्तव चिमाजी बल्लाळ खानदेश प्रांती राहिले आहेत, त्यास टाकोटाक फौजेनिशी जावून सामील होणे. त्यावेळी नासीरजंगनेही सुलतानजी निंबाळकर, जानोजी निंबाळकर, चंद्रसेन जाधव, अनरुलाखान व मुल्लादुदाखान यांच्या बारा ते पंधरा हजार फौजेनिशी निधाला. तेव्हा मराठा सरदार रघुजी भोसले ही बाजीरावाकडे निघाले; पण एलिचपूरचा सुभेदार सुजायतखान मार्गात आडवा होता. त्यांचाही भोसलेनी पाडाव केल्याने नसिरजंग पूढे न जाता फुलंब्री येथेच थांबावे लागेल. त्यामुळे निजामास बादशहाकडून दक्षिणेतील मुलाकडून मदत येऊ शकली नसल्याने निजाम हातबल झाला. २६ डिसेंबर १७३७ ला निजामाने पेशव्याकडे आपला वकील पाठविला. 'निजामाची बेअब्रु होऊ नये. अब्रू राखिली तर तुमचे सर्व मतलब मान्य करतील.'[३७]

पण निजामाने दुसऱ्या दिवशी भोपाळकडे आपल्या सैन्यानिशी कुच केली. तेव्हा आवजी कवडे व पवार यांनी निजामावर हल्ला चढविला. तेव्हा पेशव्यांनी शेवटी निजामाने शरण आणले. तेव्हा ता.७ जानेवारी १८३८ रोजी दुराईसराई येथे ठराव झाला. पेशव्याशी तह केल्याने माळवा व सनदा बादशहाकडून मिळवून देण्याचे मान्य केले.[३८] याशिवाय इतर रजपूत राजवाडे यांचाही कायमचा बंदोबस्त मराठ्यांनीकेला. कोटयाच्या राजाकडून दहा लाख रुपये युद्धखंडणी मिळवली. मराठ्यांनी उत्तर मोहिमेत व निजामाच्या पाडावात मल्हारराव होळकरांचा मोठा हात होता.

मराठयांच्या उतर मोहिमेमुळे जयपूर, जोधपूर, उदेपूर, माळव्यातील जमीनदार, बुंदेल नरेश, अंतर्वेदीतील जाट तसेच दिल्ली दरबार बादशहा, भोपाळचा नवाब, भागानगारचे निजाम हे मराठयांना वचकू लागले. शरण आल्याने मराठयांची शक्ती व समर्थ्य भारतभर पसरली. त्याचप्रमाणे होळकर, शिंदे, पवार याही सरदाराची कमान चढती होऊन ते प्रांताधिपती बनले.

**३.१.१३ वसई मोहिम:**

दक्षिण भारतातील फिरंगी पोर्तुगीजांनी आपले आरमार स्थापन केलेले होते. जंजिरा प्रांतात हबशाची सत्ता होती. ते मराठी मुलुखातील जनतेचा व हिंदूस मोठा छळ, आत्याचार करीत असल्याने पेशवे व छ. शाहू महाराजांनी चिमाजी आप्पा व मल्हारराव होळकर यांस बंदोबस्तासाठी रवाना केले. मराठ्यांच्या कल्याण सुभ्याचे सुभेदार गंगाजी नाईक होते. तर गोव्याच्या गव्हर्नरनी अंटोनियास मराठा फोजेवर चालून येताच मल्हारराव होळकरांनी डिसेंबर १७३८ मध्ये त्यास पराभूत केले. तेव्हा चिमाजी आप्पा पूण्यास कळवितात ते असे रात्री चार पांच सुरुंग मल्हारजी होळकरांकडून तयार झाले... सुरुंग एकामागून एक अंतर करुन उडाले... खिंडार पडलें, तसेंच मल्हारबाचा खासा सुरुंग बुरजाखाली होता. हुजरातच्या निशाण्याच्या... उजवेकडे मल्हाराबाची निशाणें सारी होती. तैसीच राणूजी भोसले यांची होती त्यांनीही शर्थ करावयाची तैशी केली.[३९]

वसईस जवळपास तीन महिने वेढा देऊन ही फिरंगी मराठ्यांनाशरण येत नव्हते. ते व मराठे एकमेकांवर तोफांचा भडीमारासारखा चालूच होता. शेवटी फिरंगी ४ मे १७३८ रोजी शरण येऊन मल्हारराव होळकरांनी वसईतून अठ्ठयांऐंशी हजार तीनशे चौरेचाळीस एवढी वसुली मिळवली. श्रीमंत पेशव्यांनी १७४० जानेवारी पुन्हा उत्तर मोहिम हाती घेतली. त्यावेळी २७ फेब्रुवारी १७४०ला निजाम भेट घेवुन ५ मार्च १७४० ला त्यांच्याशी तह करुन नेमाड प्रांत म्हणजे माळवा मराठ्यांनामिळाला. या सुमारास मल्हारजी होळकर यांनी नासीरजंगासी मसलत करुन वसूली रुपये १३८५७ केली. तोपर्यंत इराणचा बादशहा नादीरशहा ने दिल्लीवर स्वारी करुन प्रचंड मोठी लूट करुन बादशहास कैद केले नंतर मराठे दिल्लीकडे येत असल्याचे पाहून बादशहाची सुटका करुन तो परत फिरला पेशवे बाजीराव नर्मदा नदी मुक्कामी असताना वैशाखा शुध्द १३ रोजी (ता. २८ एप्रिल सन १७४० इ.) स्वर्गवासी झाले. [४०]

इ.स. १७२० ते १७४० या वीस वर्षाचे अवधीत दक्षिणोत्तर... प्रोत्साहनानें तर खरेंच पण त्यातही ‘‘प्राप्तीचा काही वाटा मल्हारजींचा आहे यांत संशय नाही. माळव्यांत, बुंदेलखंडांत, अंतर्वेदींत व वसईत मल्हाररावांनी आपली समशेर गाजविली तर खरीच, पण ती शक्ती-युक्तीच्या जुक्तींत गाजविली. मनसुबीचे कार्यास त्वरेस मोल आहे.’[४१]

### ३.१.१४ मल्हाररावांस जरीपटकाचा मानः

स्वारी आटोपून पुण्यात आपल्यावर मल्हारराव होळकर पेशव्यांना म्हणतात की, ‘आम्हास तुम्हांकडील एक पाग्या, जरीपटका, मुतालकी शिक्के, कारभारासाठीं खांसा डेरा, ब्राम्हण कारभारी हीं द्यावीं... आमच्या व पाग्याच्या नांवचीं पाठवीत जावीं.’[४२] तेव्हा पेशवे बाजीरावानी मल्हाररावांचे मागणी मान्य करून म्हणाले की, ‘तुम्ही मागाल तो पाग्या देऊं; बाकी जरीपटका वगैरे तयार आहेत.[४३] त्यानंतर पेशव्यानी होळकरांच्या कारभारी म्हणून खेड तालुक्यातील निंबगावचे गंगाधर यशवंत चंद्रचुड यांस नेमले.

### ३.१.१५ पेशव्यांनी माळव्याची वाटणीः

मल्हाररावांची कामगिरी पाहून बाजीरावांनी “मल्हारराव होळकर यांना इंदूर येथे तर उदाजी पवार यास धार येथे मे-जून १७२४ च्या सुमारास ठाणे दिले.”[४४] जून १७२४ ला पेशव्याकडून त्यांना इंदूर बक्षीस मिळाले. ६ ऑगस्ट, १७२५ साली मल्हाररावांना पेशव्यांनी ५०० स्वारांची मनसब दिली. निजामावरील विजयामुळेच मल्हाररावांना ६ ऑगस्ट १७२७ रोजी पेशवे बाजीराव यांनी संरजामासाठी गुजरात माळवा व खानदेशातील अकारा जिल्हयाचे उत्पन्न लावून दिलेले होते. त्याचप्रमाणे माळवा प्रांताची, दरशेंकडा पंचेचाळीस श्रींमत पेशव्यास, बाकीचे साडेबावीस शिंदे, साडेबावीस होळकर व दहा पवार, याप्रमाणे वाटणी करून दिले.[४५] पेशव्यानी होळकरांच्या कारभारी म्हणून खेड तालुक्यातील निंबगावचे गंगाधर

यशवंत चंद्रचुड यांस नेमले. तर शिद्यांचे कुलकर्णी रामचंद्रबाबा शेणवी अरवली गावचे होते. तर पवाराचे दिवाण रामराव कवठेकर यांची नियुक्ती केली.

मल्हारराव होळकर हे एक होते. होळकर, शिंदे व पवार यांनी माळवा जिंकून घेतल्यानंतर बाजीरावांनी या तिघांत माळव्यांची वाटणी करुन सरदारांचे सुभेदार हे तिघे बनण्याचा मान मिळाला. बाजीराव बल्हाळ पेशवे पंतप्रधान यांनी मल्हारजी होळकर यांना माळवें प्रांती वाटण्या होळकर २, शिंदे २, पवार १ असे पांच हिश्याने प्रगणे जिल्हे निहाय सन गुदस्तसाली सनद दिली गेली.[४६]

मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यांजकडे सरंजाम महाल देण्याबदल रामचंदे बल्हाळ कामाविसदार यांस पत्र देण्याचे बार आहे

परगणे नेमावर पंच महाल सरकार हांडे:—

१ परगणे नेमावर. १ परगणे हरणगांव १ परगणे काठाफोड व सत्वास.

१ परगणे राजोर. १ परगणे निमनपूर. एकूण पांच महाल.

एकूण पांच परगणे पेशजीपासून राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री राणोजी शिंदे यांस सरंजास आहे.[४७]

३ जून १७४५ च्या पत्रानुसार पेशवे यांनी रामचंद्र बल्लाळ कमाविसदारास वरील महाल सरंजामासाठी देण्याविषयी कळविले आहे.

...मल्हारजी होळकर यांजकडे परगणे दरोबस्त दिल्याबदल

१ छ. २१ रमजान पेशजी पासून सरकार बिजागड येथील परगणे दरोबस्त आहेत.

१ परगणे सेंधवे देहे १०४ व परगणे नागलवाडी देहे ६६...[४८]

६ ऑक्टोबर १७४५ रोजी पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांस बिजागड, सेंधवे व नागलवाडी ही परगणे दिलेली आहेत. सन १७४९ च्या ता. १५ डिसेंबर रोजी छत्रपती स्वर्गवासी झाले आणि मराठेशाहीची सर्व सूत्रें बाळाजी बाजीराव पेशवे यांचे हाती आली. त्यावेळी नानासहोबांनी बहुमान, पोशाख, भरजरी शाल, मंदील पैठणी शालू वगैरे खासा मल्हार व पुत्र खंडेराव व पत्नी सौ. गौतमाबाई व सून सौ. अहिल्याबाई याशिवाय भोजराव बारगळ व गोविंदराव बुळे यांस देऊन गौरव केला.

दिल्लीचा बादशहा यांनी माळव्याच्या सुभेदारी पदी अजिमुल्लाखान यांची नियुक्ती केल्याची बातमी दिल्लीच्या वकीलांनी कळविली तेव्हा सुभेदार म्हणतात की, ...आम्ही देशास आलों म्हणून काय झाले. कोणी लबाडी करतील तेही आपल्या गुणेंच फजीती पावतील. चिंता काय आहे.[४९] यावरून हे दिसून येते की मल्हारराव होळकरयांना दिल्लीच्या कोणाचीच कसलीच भिती वाटत नव्हती. नानासाहेब उत्तरेकडे सन १७४० त शिंदे, होळकर, पवार व पुरंदरे यास बरोबर घेऊन निघाले. १७४३ मल्हारराव होळकर यांनी माळव्यातील गायकवाड यांच्याशी सामना करण्या अगोदरच माघार घेतले. बुंदेल खंडपर्यंत मराठ्यानी मजल मारली

तेथे मोगली सैन्याशी सामाना करुन त्यांचा बुंदेलखंड येथे मोगलांचा पराभव केला. तेव्हा बादशहास मराठ्यांशी करार केला. ...शहाजादा यास माळव्याची सुभेदारी आणि पेशव्यांस नायब सुभेदारी देण्यात आली. या करारावर राणेजी शिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव यांनी जामीनदार म्हणून कबुलायत लिहून दिली की पेशवे बाळाजी बाजीरावांनी करार न पाळल्यास आम्ही त्यांची नोकरी सोडून देऊ. यावरून मल्हारराव होळकर यांचा पेशव्यावरचा दांडगा विश्वास होता. हे दिसून येते.

**३.१.१६ होळकरांचा मान सन्मानः**

मल्हारराव होळकरांचा आतापर्यतचा उत्तरेतील सर्वत्र विजय पाहून इसवी सन १७४५, होळकर व शिंदे यांस इनाम व होळकरांस बहुमान वस्त्रे व दागिने दिले.

१ खासा मल्हारजी होळकर, पोशाख रु. ३८४ व कडें जडावाचे, शिरपेच, मोत्यांचा तुरा, व पदक

२ खंडेराव होळकर (मल्हाराजीचे पुत्र) यांस पोशाख व मशारनिल्हेचे दोन्ही कन्यास शालू व परकर मुत्सद्दी गंगाधर येशवंत, रामजी यादव, राघव लक्ष्मण यांस वस्त्रे.[५०]

नानासाहेब पेशव्यांच्या तीन उत्तर मोहिमेत मराठ्यांचाचांगलाच दबदबा निर्माण झाल्याने शिंदे होळकरांच्या कार्यास प्रोत्साहन मिळाले.

**३.१.१७ दसऱ्यास बहुमानः**

सन १७४४ मध्ये भेलसावर भोपाळचा नवाब याद मुहम्मदखावर ११ मार्च १७४५ ला विजय मिळवून माळवा बुंदेलखंडाची शिंदे-होळकरांना वसूलीची व्यवस्था सोपविली. त्यामुळे दसऱ्याचा सरदारीचा बहुमान, खासा मल्हारजी होळकर उंची वस्त्रे, जडावाचे कडें, सिरपेंच, मोत्याचा तुरा व पदक याशिवाय पुत्र खंडेराव व मशारनिल्हेच्या दोन्ही कन्यास बहुमानवस्त्रे, मंदील, शेला पैठणी शालू वगैरे देवून सन्मान केला. त्यानंतर मल्हारराव होळकरांचा जीवलग सोबत्याचा ता. १९-७-१७४५ रोजी राणोजी शिंदे निधन झाल्याने त्यांना फार दु:ख झाले. त्याच्या पश्चात त्यांची मुले दत्ताजी जनकोजी हे होते. मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे इ. स. १७४६ ला बुंदेलखंड कालिंजर, जैतपूर, अजयगढ येथे मिळवलेल्या विजयाबदल पेशवे नानासाहेब त्यांचे नानासाहेबांनी पुढील कौतुकांचे पत्र लिहिले. ते अस 'बुंदेल्यांनी जेतपुरास तोफा जेजाला, बरकंदाज, दारुगोळा वगैरे सामान विपूल ठेविले होते... तेणे करुन अजीच किल्ला फत्ते केला, म्हणोन विस्तारें लिहिले. ते श्रवण होवून संतोष जाहला. जैतपूर बांकी जागा. बाजे सरदारांनी व लोकांनी श्रम साहस करुन फत्ते केली. शाबास तुमची व शाबास लोकांची...'[५१]

त्या युध्दांत मराठ्यांनी खंडणी वसूल केली. संस्थान दतिया जेतपूर, खेची, रेवा, नरवल, हमीरपूर, ओरछा, काल्पी, कडाकूरा, खंडणी आकार रुपये ५४,२४,३४७ यासी तपसील नक्त रु. ५३,८६,३३५ व हत्ती तीन किंमत रु. १३७५०, उंट एकेचाळीस किंमत रु.

६४७०, कापड किंमत रु. १७७९२. येणेप्रमाणे हिशेब होळकर शिंदेमार्फत पुणे दरबारांत भुक्तमान केला.

पेशव्यांनी मल्हाराव होळकर व राणोजी शिंदे तुकोजी पवार याच्या वरील विजयाने व मिळविलेल्या खंडणी व लूटीमुळे खुष होवून आपल्या मातबर सरदाराचा उचित सन्मान करण्यासाठी प्रांत माळवा मक्ता ठराव होळकर, शिंदे, पवार खालील प्रमाणे— ७७००० मल्हारजी होळकर (दरसदे साडे अडतीस), ७७००० जयाजी शिंदे (दरसदे साडे अडतीस) व ३२००० यशवंतराव पवार (दरसदे सोळा) व १४००० तुकोजी पवार (दरसदे सात), हया प्रमाणे दोनलक्ष रुपयांचा ठराव झाला.[५२]

सवाई जयसिंगचा पुत्र माधवसिंग यांची भेट इ.स. १७४७ ला बगथडी परगणे तोडा येथे झाली. जयपूर प्रकरणाचा छडा लावला. त्यामुळे पेशवे नानासाहेब यांनी मल्हारराव होळकर गंगाधर यशवंत रामजी यादव, बाबुराव वाघमारे राघोलक्षुमण व दादोपंतास बहूमानची वस्त्रे दिली. त्यानंतर मल्हारराव होळकर यांनी ईश्वरसिंगाकडील चार महाल सवाई माधवसिंगास दिली. तेव्हा माधवसिंगाने नजराना म्हणून मल्हारराव होळकरांस दहा लक्ष रुपयेचार हप्त्यानी देण्याचा करार करून कावनई किल्ला मिळविला. हे नानासाहेब पेशव्यास कळाल्याने मल्हारराव होळकर व गोविंदपंतास बहुमानाची वस्त्रे देऊन उचित गौरव केला. त्यानंतर मल्हाराव होळकर व राणोजी शिंदे यांनी इ.स.१७४८ मध्ये करेरा जिंकून घेतले आणि दातियासी करार केला तर सुरजमल जाट यांच्याकडून पावणे अकरा लक्ष वसूल करून पुणे दरबारास पाठवून दिले.

छत्रपती शाहू महाराजांच्या निधनाने मराठी सत्तेचे स्थलांतर होवून ते पेशव्यांच्या हाती सर्व सत्ता सुत्रे आल्याने पेशव्यासाठी सर्व मैदान मोकळे झाले याचा प्रत्यय बाजीराव दुसरे यांच्या काळात दिसून येतो.

**३.१.१८ मल्हारराव व शिंद्यांची उत्तर भारतातील लुटः**

मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे आपल्या माळवास्थित राज्यात गेले. त्यानंतर बाजीराव कोकणाच्या स्वारीवर गेले. पण त्यांना तेथे आर्थिक चणचण भासत होती. तेव्हा त्यांनी माळव्यातील शिंदे व होळकरांना या दोघानेही उत्तर भारतात बादशहाच्या मुलूखात स्वारी करून आग्रापर्यंत लुटीचा सपाटा सुरू केला. तेव्हा बादशहानी घाबरून वजीर खानडौरानला बोलावून शिंदे-होळकरांशी सल्ला करून त्यांस कसें तरी परतवून लावावें यासाठी तो तहाच्या बोलणीसाठी येतो. पण मराठा या सुभेदारांनी आम्ही श्रीमंतांचे हुकमाशिवाय आम्हांस तह करित नसल्याचे सांगून परत पाठविले. म्हणून बोलणी होवू शकली नाही.

बादशहाकडे लढण्याशिवाय दुसरा पर्याय नाही. म्हणून वजीराने आपला भाऊ मुजफफरखानला प्रचंड फौज देऊन पाठविले. पण तो शिरोंजपर्यतच येऊन त्यांनी मराठयांच्या

छोटया छोटया तुकड्याचा पराभव करून त्याना पळवून लावले. आणि वजीर परत दिल्लीस जाऊन गर्वाने बादशहास भर दरबारात आपण विजयी झाल्याचा वजीराने टेंभा मिरविला. पण मराठ्यांचे दोघेही सुभेदार मात्र उत्तरेतील लूट करण्यात मग्न होते. एका मागून एक किल्ले ताब्यात सहज मिळत होते. दोंघांनी उतरेत बादशहाच्या प्रदेशात मिळालेली अमाप लूट पेशव्यांस रवाना केले; पण पेशव्यानी आपल्या फौजेत एवढी मोठी वाढ केल्याने खर्चाचा मेळ बसत नव्हता.

### ३.१.१९ माळव्याचे सुभेदार:

श्रीमंत नानासाहेबांनी मल्हाररावास इ.स. १७५१ ला माळव्याचे सुभेदार असे उपपद दिले. तेव्हापासून मल्हाररावांस ‘सुभेदार’ म्हणून घेण्यात अभिमान वाटत होता. १७५१—५२ च्या पत्रानुसार शिंदे व होळकर यास लष्करी सरंजामासाठी पुढील परगणे लावून दिलेले आहेत. संरजाम देशीहून फौजेसह हिंदुस्थान मुलूख सरकरुन घेण्यास व स्वारीबरोबर खर्चास महाल सन ११६१ फसली सालांत श्रीमंत पेशवेसरकारनें दिले. हया यादीपैकी फक्त होळकरांचे सरंजामाचा खुलासा...

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २००० | परगणे आंबाड | १००००० | परगणे | ४०००० | परगणे देपुर |
| ३०००० | गाळणा. | ४०००० | चांदवड. | २०००० | कोरहाळे. |
| ४५००० | उन्नण. | ५०००० | पैठणनिमे | ६०००० | थाळनेर. |
| १२५००० | सुलतानपुर. | १००००० | अडावद. | ७००० | आंबे. |
| १५००० | बिजागड. | .......... | नंदुरबार | ......... | |
| १००००० | बारखेडी, वाफगांव आलें | **२९००००** | | **१२७०००** | |
| **६५००००** | लोणी, बिबी, लाखनगांव, मणचर, काठापूर, वगैरे. | | | | |
| **७५०००** | वेरुळ व रावेर निम्मे मिळून. | | | | |

येकूण एकंदर होळकरांचे हिश्शाचीबेरीज रु.११४१००० अकरा लक्ष एकेचालीस हजार. सदरहु सरंजाम देशीहून आणले त्याचे खर्चास. एकूण देशचे महाल फौजेचे खर्चास रु १६६१००० सोलालक्ष एकसष्टहजार रुपये दोन्ही सरदारांस खर्चास दिल्हे. तपशील ११४१००० होळकर सरकार कडे. महाल.५२०००० पांच लक्ष वीस हजार, शिंदे सरकार कडे. ऐकूण रु.१६६१००० दोन्ही सरदारांस श्रीमंत पेशवे सरकारनें खर्चास दिल्हे.[५३] या माहितीवरून हे स्पष्ट होते की, होळकर शासकाचा दबदबा व शौर्य पाहून स्वत:हून पेशव्यानी त्यांच्या सरंजामत मोठी भरगोस वाढ करून मोठा भार टाकलेला होता. तो होळकर शासकानी इमानइतबारे जपण्याचा प्रयत्न केलेला होता.

### ३.१.२० गाजीउद्दीनला दिलेल्या वचनाची पुर्तता:

मराठा सुभेदारांनी बादशहास रोहिलखंडात विजय मिळवून दिल्याने खूश बादशहाकडून दक्षिणेच्या सुभेदारी पदी गाजीउद्दीनची नेमणूक करुन घेतली. मल्हारराव होळकर, जयप्पा शिंदे

व गाजीउद्दीन तिघेही मोठी मजल मारत औरंगाबादला येऊन थांबले. पण औरंगाबादच्या मुक्कामी असताना निजामअलीच्या आईने जेवणाचे आमंत्रण देऊन गाजीउद्दीनला विष घालून ठार केले. त्यावेळी त्याच्याजवळ पाच कोटीची रोकड होती. ती पेशव्यास कोणीतरी लुटण्याचा सल्ला दिला. मल्हारराव होळकर यांना ती रोकड लुटाची अशी बातमी कळताच नानासाहेबांना विनंती करुन म्हणाले. 'मी त्यास इमानप्रमाण देऊन आपल्या हुकुमावरून येथें आणिला, तों असा विपरित परिणाम झाला! ईश्वरी क्षोभापुढें कोणाचा इलाज नाहीं! परंतु माझें वचन गुंतले आहे, सबब त्याची सर्व चीजवस्तू व शरीर दिल्लीस पोंचवून देतों; या गोष्टीस आपली परवानगी असावी.[५६] त्यास नानासाहेबांनी परवानगी मिळताच सुभेदार मल्हाररावांनी गाजीउद्दीनच्या प्रेतासोबत त्याची सर्व संपत्ती सटवाजी राजोळेकडे पाच हजार फौजेनिशी इ. स. १७५२ ला दिल्लीस रवांना केले. यातून मल्हाररावांचे नि:स्पृह वृत्ती व दिलेल्या शब्दास जपण्याची वृत्ती स्पष्ट दिसून येते.

### ३.१.२१ कुंभेरीचा वेढा:

राघोबादादा, सुभेदार मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे मुलूखगिरीसाठी उतर भारतात बायकापोरासह निघले होते. उत्तरेकडे जाताना मार्गात खंडण्या घेत घेत पुढे जात होते. त्यांनी नर्मदा नदी ओलांडून जाटाच्या प्रदेशात शिरले. तेव्हा तिथे सुरजमल जाट राजा होता. त्याला मराठे आल्याचे कळताच त्यांनी घाबरुन आपला वकील रुपराम चौधरी यास तहासाठी पाठविले असता. 'पेशवे ऐकत नाहीत; एक क्रोड रूपये खंडणी मागतात.' राघोबादादानी आपला हट्ट न सोडता कुंभेरीच्या किल्ल्यास वेढा देण्याचे आदेश दिले. सुरजमल जाटानेही पूर्ण जय्यत तयारी केली असल्याने राघोबादादास उलट जाटाने पत्र पाठविले. चाळीस लक्ष रुपये देतों, ते घ्यावे; नाही तरी युद्धास उभे राहावें.'[५५]

कुंभेरीचा किल्ला हा मजबूत असल्याने काही केले तरी पडत नव्हता व जाट शरण येत नव्हता. सत्त तीन महिने युद्ध व वेढा चालूच असताना एके दिवशी खंडेराव होळकर दुपारचे भोजन आटोपून मोर्च्यात सहभागी होण्यासाठी जात असताना अचानक शत्रूचा अकस्मात् प्रळयकालच्या विजेसारखा जेजालेचा गोळा येऊन त्यांच्या अंगावर पडला! त्यासरें लागलीच त्यांचे देहावसान झालें![५६] खंडेरावाचे हे वृत्त वाऱ्यासारखे छावणीसह सर्वत्र पसरल्याने सुभेदार मल्हारराव होळकरांना कळताच त्यांना मोठा धक्का बसला, व ते जमीनीवर कोसळले. मोठा दु:खाचा डोंगर त्याच्यावर पडला. तेव्हा राघोबादादा, जयाप्पा शिंदे व इतर मित्रांनी सुभेदारास खूप समजूत घालण्याचा प्रयत्न केला; तरी त्यांना पुत्र शोक अनावर झाला. तिथेच असलेल्या खंडेरावांच्या मातोश्री गौतमाबाई व पत्नी अहिल्याबाईना हे कळताच त्याची पायाखालची मातीच सरकली. बाळे अहिल्ये, तूंही या वेळेस सती जाऊन मला म्हाताऱ्याला चोहींकडून उघडा करितेस काय? तुजकडे पाहून मी, अहिल्या गेली आणि खंडू आहे असें समजून आपल्या मनास धीर देईन!'[५७] पुत्र खंडेरावांचा शोक अनावर करताना त्वेशाने दात

ओठ चावून त्यानी एक भीष्म प्रतिज्ञा केली. 'सुरजमल्लाचा शिरच्छेद करुन कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन तरच जन्मास आल्याचें सार्थक! नाहीं तर प्राणत्याग करीन!'[५८]

हे वृत्त सुरजमल जाटास कळताच तो अतिशय घाबरला. आपले काहीच खरे नाही. त्यात मराठ्यांनी वेढा अतिशय टाईट केल्याने रसद पूरवठा होत नाही. तेव्हा आता मराठे मागतील तितके रुपये देण्याशिवाय त्यांच्याकडे मार्गच उरला नव्हता. तेव्हा जाटाचा वकील रुपराम चौधरी व जाटाची पत्नी अनुसया यांनी विचारपूर्वक मातब्बर जयाप्पा शिंदेच आता आपणांस यातून तारु शकतो. म्हणून त्यांस हरयुक्तीनें 'पगडीभाई' करुन घेण्यासाठी जाटाने वकील पाठवून जयाप्पास विनंती केली. 'आपण माझे वडील बंधु व मी आपला धाकटा बंधु आहें, असें समजून ह्या प्रसंगी कळेल त्या मार्गानें बचाव करूनही माझी अब्रू राखावी.'[५९]

वकील रुपराम चौधरीने सोबत जाटाची पगडी आणली होती. ती जयाप्पानी आपल्या डोक्यावर चढविली. आपल्या जिवलग मित्राच्या दु:खाचा मागचा पुढचा विचार न करता जयाप्पानी जाटास अभय देऊन मोठी घोडचूक केली. हे दुटप्पी वागणे मल्हाररावास कळाले; तेव्हा मल्हाररावाच्या पायातील आग मस्तकात गेली. राघोबादादा मल्हाररावास भेटले. आपल्याच पदरांत विस्तव बांधून शत्रूच्या नाशाची इच्छा धरल्यास तें कसें घडावें? शिंदे व जाट पगडीभाई झाले; आतां मसलत फत्ते होऊन जाट कसा स्वाधीन होईल? आपण मालक आहां; या सर्व गोष्टींची योग्य चौकशी करून काय करणें तें करावें. ऐकलेली हकीकत आपणास कळविणें एवढेंच माझें काम तें मी केलें.'[६०] हे मल्हारराव बोलून ते आपल्या डेऱ्यात निघून गेले.

तेव्हा मल्हाररावांचे ऐकून राघोबादादांना भिती वाटू लागली. म्हणून त्यांनी सखाराम बापूस बोलावून सारा प्रकार सांगीतला. तेव्हा बापू म्हणाले की, 'शिंद्यांकडून अशी गोष्ट कदापिही घडावयाची नाहीं; घडलीच असेल तर ते श्रीमंतांचें अनहित करणार नाहींत, अशी आपण खात्री असूं द्यावी. मल्हाररावांनी कदाचित् पुत्र निधनशोकामुळें त्यांजवर आळ घेतला असेल! परंतु आपणा शरीराचे दोन्हीही हात सारखेच, कोणती राखाल व कोणता तोडाल?[६१] यात बापूनी जयाप्पाना आवर घालण्याचा सल्ला देण्याऐवजी त्यानी केलेले करार योग्यच असतील असे भरवून देऊन राघोबादादांनीही होळकरावरील अन्यायाकडे दुर्लक्ष केले. यात बापूनी जयाप्पाना आवर घालण्याचा सल्ला देण्याऐवजी त्यानी केलेले करार योग्यच असतील असे भरवून देऊन राघोबादादांनीही होळकरावरील अन्यायाकडे दुर्लक्ष केले.

राघोबादादा जयाप्पा व बापू यात विचार विनिमय चालू असताना देखील मराठा फौजांकडून सत्त जाटावर हल्ले, तोफांचा मारा चालूच होता. हे थांबविण्यासाठी शत्रू जाटाने पुन्हा जयाप्पास कळविले. म्हणून शिंदेनी राघोबादादाना आपले नोकर असल्याचे सांगुन जाटाशी युद्ध थांबवून जे जाट देण्यास तयार आहे. ते घेणेच आपल्या हिताचे आहे. हे पटवून दिले. राघोबादादानी जयाप्पास पाहू म्हणून परत पाठविले तिकडे जयाप्पाने जाताच

उपासमारीच्या जाटांना त्रास होऊ नये म्हणून अन्नधान्याची रसद स्वत:च्या मोर्चातून सुरु केली. हा मराठ्याचा वा मल्हारराव होळकरांशी गद्दारी करण्यासारखे होते. पण जयप्पाना जाणूनबुजून केलेला मोठा दगा होता. कुंभेरीचा विडा सुटत नाही तोपर्यंत मारवाड मधील नागोर संस्थानांत रामसिंग व बिजेसिंग या चुलत भावात संघर्ष होऊन लहान भाऊ बिजेसिंगाने जबरदस्तीने सर्व राज्य बळकावून रामसिंगास अडचणीत आणले. रामसिंगाने आपला वकिल जयापा शिंदेकडे मदतीसाठी पाठविले तेव्हा जयाप्पाने त्या वकीलास सहमती दर्शिवली. जयापांनी असा निरोप देऊन ते तडक राघोबादादाच्या छावणीकडे निघाले. 'तुम्ही थोर खावंद आहां, आपण या स्थळीच राहून जाटाचें पारिपत्य करावें; आम्हांस आज्ञा द्यावी आम्ही मारवाडमध्ये जाऊन मसलत फत्ते करितों. सर्वांनीं येक जागा राहून मसलत पदरीं फौज भारी यांस काय द्यावें?'[६२] जयप्पानी कुंभेरचा वेढा उठवून फत्तेनगरकडे जाण्याचे फौजेस आदेश दिले. ही जयाप्पाने मोठी दुसरी घोडचूक करुन आपल्या जून्या जिवलग मित्रास न विचारता नव्या मित्रास साथ दिली.

तेव्हा राघोबादादांनी मल्हाररावांस बोलावून 'शिंदे तर कूच करून चालले; तशांत जाट बादशाही उमराव असल्यामुळें तिकडून दिल्लीहून खुद्द बादशहा त्यास मदत करण्याकरितां फौज घेऊन चमेल सिकंदरापर्यंत आल्याचें ऐकतों; तुम्ही वडिलांच्या ठिकाणीं आम्हांस आहां; तेव्हां या प्रसंगीं काय विचार करवा तें सांगा.' ते ऐकून मल्हारराव मनातल्या मनात म्हणाले. 'शिंदे जातात ते दादासाहेबांचे विचाराशिवाय जात असतील असें नाहीं; तेव्हां या दोघांचा आंतून एकच विचार आहे; वरकांतीं उगीच आम्हांस विचारतात. आतां आपणच या वेळेस दुरागह धरावा तर सर्व अपयश आपणाकडे येईल. असो एका अधणानें सर्व तुरी शिजल्या असें नाहीं. जाट कोठें जातो आहे? आतां नाहीं तर पुढें एखाद्या प्रसंगास पाहून घेऊ, तूर्त यांचें ऐकावं हेंच उत्तम.[६३]

राघोबादादांनी मल्हारराव म्हणाले की आपण धनी आहां व शिंदे मुखत्यार सरदार आहेत; ज्यांत आपली खुषीं तेंच आम्हांस मान्य आपणास जें चांगलें वाटेंल तेंच आपण कराल. आम्ही शिलेदार, आम्हांस काय? सांगाल ती चाकरी करूं.'[६४] ठरल्यानुसार राघोबादादानी जयापास जाटांशी तह करण्याची परवानगी दिली. त्यानुसार साठ लाख रुपये जाटाकडून घेऊन राघोबादादा पूण्यास निघून गेले. तर शिंदे मारवाडकडे मल्हाररावांस सोडून निघून गेले. लाजेपोटी व भितीपोटी जाटांनी खंडेराव होळकरांची छत्री बांधवून तेथें पूजाअर्चा वगैरे करावयास ब्राम्हण ठेविले, व तेथील नित्य खर्चाकरितां पांच गांव छत्रीत इनाम दिले. त्याचप्रमाणे सन १७५२—५३ मध्ये मल्हारराव होळकर यांना पेशव्यांनी पुढील गावे इनाम म्हणून दिली.

**९ प्रांत खानदेश.**

२ परगणे ललींग येथील गांव देखील वाडिया, मजेंर हल्ली १गांवाखाली चालत असतील त्यांसुध्दा: मौजे मुंगळी.१ मौजे वडजाई.

१    मौजे न्याहळोद सोनगीरगांव मजेर वाडियासुध्दा.

२    परगणे थाळनेरपैकी गांव. १ मौजे करवंदी १ मौजे बनावला.

२    परगणे आंबेपैकी १ मौजे वतेवा. १ मौजे सांगवी.

१    मौजे चंदनपुरी वाडीमजरेसुध्दा.

१    मौजे मंडले देखील मनरेवाडीसुध्दा.[६५]

——

९

तसेच इ.स. १७५२—५३ वर्षी सुभेदार मल्हारराव होळकर यांना नवाब गाजुदिनखांनकडून देण्यात आलेली होती. त्यासंबंधीचे पत्र पुढील प्रमाणे होते. नवाब गाजुदिनखांनकडून राजश्री मल्हारजी होळकर यांचे नांवे आलतम गांवे प्रांत खानदेश येथील गांवे दिल्ही

| महाल | प्रांत खानदेश | गांवे |
|---|---|---|
| १ परगणे थाळनेर. | | १ मौजे मुंगठी. |
| १ परगणे आंबे. | | १ मौजे न्याहळोद परगणे सोनगीर |
| १ परगणे अडावद. | | १ मौजे करवदी परगणे थाळनेर |
| १ परगणे उन्नाण. | | १ बनावळ परगणे थाळनेर |
| ...... | | १ मौजे भडगांव. |
| ४ | | २ मौजे सांगवी व बतेली. |
| | | १ मौजे मोवर परगणे सुलतानपूर |
| | | १ मौजे दहीवल. |
| | | —— |
| | | ९ येणेप्रमाणे [६६] |

४ मार्च १७५३ रोजी पेशव्यांनी सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या नावे सनद दिली. त्यात परगणे इटावे व परगणे फफुंद प्रांत अंतरवेदची वाटणी सरकार होळकरव शिंदे यात शेकडा दर वाटणीचा ठरला. संदर्भाचे पत्र पुढील प्रमाणे Parganas Itawa and phapunda ( in the United provgices) are under the peshwa. The espenses of the joint army maintained at Delhi will be deducted out of the revenue of these parganes: of the remainder :-

| | | |
|---|---|---|
| The Peshwa to recive | Rs | 53-6-0 |
| Malharji Holkar” | “ | 23-5-0 |
| Jayajee Shinde | “ | 23-5-0 |

Out of every 100/- Rupees. [६७]

### ३.१.२२ सुभेदार मल्हाररावाचा बादशहावर छापा:

सुभेदार मल्हारराव मथुरेस असताना जाटाना मदतीस निघलेला दिल्लीचा बादशहा चाळीस पंचेचाळीस कोसावर असल्याचे कळताच मल्हाररावांनी चाळीस हजार पेंढारी व दहा हजार स्वार असलेली सडी फौज घेऊन तिसऱ्या पहरी जलद हालचाली करुन पाच घटका रात्रीस बादशहाच्या फौजेवर तुटून पडले तेव्हा 'मल्हार आया' करत आंधारातच बायका पोरे दिल्लीकडे पळत सुटले पेढांऱ्यांनी बादशहाची तमाम फौज लुटली. बादशहाच्या मलकाजमानी शहाजादीस ही पेंढारीने लूटून नग्न केले तेव्हा ती "मल्हार काहां है" असे ती म्हणताच मल्हारराव तेथे जावून पेढांऱ्यांना बाजूला सारुन शहाजादी नग्न दिसताच त्यांनी कमरेचा शेला सोडून तिच्या अंगावर फेकला. तेव्हा ती सुभेदार मल्हाररावांना म्हणाली. 'मल्हार! तुम ह्यां होते तो हमारेपर ऐसा गहजब नहि होना! लेकिन् तुम क्या करेगे, खुदाका गहजब!'[६८]

मल्हाररावांनी मोगल स्त्रियांना त्यांच्या बापूजी त्र्यंबक वरखेडकर या कारकुनाच्या हवाली करुन लूटीतील दीड लाख रुपये देऊन रवाना केले. सुभेदार मल्हाररावांना या लूटीत मोगलाचा एक रथ व हिरे जडित फणी मिळाली. या लूटीत शिंदे नसतांना देखील शिंध्यांचा हिस्सा, पेशव्यांचा हिस्सा पुण्यास रवाना केले. सुभेदार मल्हारराव होळकर नंतर मथुरेवरुन दिल्लीस गेले. तिथे बादशहाने त्यांचा मोठा आदर सत्कार करुन ऐंशी लाख रुपये पैकी काही रोख रक्कम तर काही विटाव तालुक्यातील महाल बादशहाने दिले. त्यानंतर इ.स. १७५४ ला मल्हारराव पुण्यास आले.

### ३.१.२३ कालिकादेवीच्या मेळ्यातील लुट:

पेशवे बाजीराव स्वत: उत्तरेत माळवा बुंदेलखंड प्रांतात खंडण्या वसूलीसाठी निघाले. पेशव्यानी मोठा धूमाकुळ घातल्याने बादशहाचा वकील बोलण्यासाठी आला असता. पेशव्यांनी तहातील अटी मान्य न करता पुन्हा लुट सुरू ठेवली. मल्हारराव होळकर, विठोजी बुळे व पिलाजी जाधव सह यमुना नदी ओलांडून दुआब प्रांतावर चाल करून लुट सुरू केली. तेव्हा बादशहाचा वजीर मोठ्यासैन्यानिशी येत असल्याचे कळताच यमुना नदीच्या अलिकडे पर्वीच निघून आले. त्यामुळे सादतखान यश मिळाल्याच्या आनंदाने दिल्लीस परत गेला. तेव्हा दिल्ली दरबारातील पेशव्याचा वकील पाठवून दिला. तो वकील सरळ पेशव्यांना येऊन मिळाला. सादतखनाचा विजय व मल्हाररावाचा पराजय झाल्याच्या खोटया बातमीमुळे पेशव्यांना मोठा राग आल्याने स्वत: पेशवे, सुभेदार मल्हारराव व इतर सर्व फौजेसह दिल्लीकडे कुच केली. दिल्लीच्या सात आठ कोसावर जाऊन कालिकादेवीच्या मेळयात मुस्लीम मोठ्याप्रमाणात गो हत्या करतात त्यांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी सर्वजण तयार झाले. त्यानुसार मल्हारराव होळकरांनी आपल्या सर्व सरदारांस व फौजेस मोठी गर्जना करून सक्त ताकीद दिली की 'बायका, मुलें, व अशस्त्र लोक शिवाय करून जेवढे म्हणून मुसलमानांच्या पक्षाचे सांपडतील तेवढ्यांची, एकदम हल्ला करून कत्तल करून टाकावी!'[६९]

सर्व रयत मोठ्याप्रमाणात रागेत आनंद लुटत असताना फक्त संरक्षणासाठी असलेले मुस्लीम सैन्याची हरहर महादेव म्हणून मराठा सैन्य तुटून पडून शेकडो मुसलमानांची कत्तल करून प्रचंड संपत्तीची लूट केली.

**३.१.२४ दिल्लीवर हल्ला:**

दुसऱ्या दिवशी सर्व फौज पेशवे होळकर, पवार, शिंदे व सर्व सरदारांनी हरहर महादेव म्हणून दिल्लीकडे कुच केली. दिल्लीच्या जवळच आपला तळ टाकला. व बादशहास पत्र पाठविले 'सल्ला करितां कीं युद्धास उभे राहतां?' तेव्हा बादशहा बेसावध असताना या पत्राने त्यांची चांगलीच झोप उडाली. 'आम्ही सल्ला करण्यास कबूल आहों; आपण वकील पाठवावे!' तेव्हा पेशव्यानी अधिक सुरक्षित्ता व सोयीचे व्हावे म्हणून पुन्हा पत्र पाठविले. 'आमच्या वकिलांच्या जिवाचा जिम्मा मिळाल्याशिवाय त्यांस पाठवीत नाहीं'[७०]

पेशव्यांनी तळ टाकलेली जागा ही अगदी शहराच्या जवळ असल्याने रयतेस याचा त्रास होऊ नये म्हणून सर्व फौजेचा तळ थोडा मागे सरकुण टाकण्यासाठी झिल तलावाच्या मैदानात निघाले तेव्हा बादशहाच्या दरबारातील लोकांना वाटले मराठ्यांनीं आपणांस भिऊनच आपल्या फौजेचा तळ पलीकडे नेला असे वाटल्याने मूर्खपणाचा निर्णय वजीरानी घेऊन सैन्याची तयारी करून व वजीराचा बधू मुजफरखान मीरहुसेन कोका, राजा शिवसिंग व इतर सरदारासह आठ हजार फौजेनिशी मराठयावर चालून येत असल्याचे सयाजी जाधव यांनी ही वार्ता मराठ्यांनादेताच एका बाजूने पेशवे, दुसऱ्या बाजूने शिंदे व तिसऱ्या बाजूने मल्हारराव होळकर यांनी तिन्ही समशेर बहादर लढवय्यानी चोख प्रत्युत्तर देऊन मीरहुसेन पळ काढला. तर राजा शिवसिंग युध्दात ठार झाला. मुजफरखान दिल्लीत पळून गेला. मराठ्याचाविजय होऊन मराठयाना मोगलाचे हत्ती, उंट, घोडे जवाहिर अशी अमाप लूट हाती लागली. तेव्हा बादशहा शरण येऊन तहाचा बोलणी करण्यास तयार झाला. तेव्हा पेशव्याने त्यांना महत्व न देता लूट करीत करीत रेवारीमंदावरकडे निघाले. पण कोकणांत गडबड झाली त्यामुळे दक्षिणेत जाण्यासाठी बादशहास करार करून माळवा प्रांताचे अधिपत्य मान्य करून घेतले. याशिवाय तेरा लाख रुपये युद्ध खर्च घेतला.

**३.१.२५ निजामाचा पराभव:**

तेव्हा मराठ्यानी दिल्ली सोडून तडक कोकणाकडे सर्व फौज निघाली. दिल्लीच्या बादशहाने मराठ्याची मोठी धास्ती घेतल्याने मराठ्यांनी दिल्ली सोडल्यावर बादशहानी व इतर दरबारातील मंडळीशी चर्चा करून मराठ्यांचे वाढते प्रस्थ संपविण्यासाठी मोगल जुना मातबर सुभेदार निजाम-ऊल-मुल्क यास भागानगर येथून दिल्लीस बोलीवून घेऊन सल्ला मसलत करून मराठ्यावर चालून जाण्याची जय्यत तयारी सुरू केली. व त्यांचा नासीरजंग या मुलास माळवा व आग्राची सुभेदारी दिली.

निजामाने या संधीचा फायदा घेऊन मराठ्यांना माळवा, बुंदेलखंडातून हाकलून लावण्यासाठी ऑक्टोंबर १७३७ मध्ये दक्षिणेकडे निघाला. उत्तर माळव्यातून स्वतः व दक्षिण माळव्यातून मुलगा नासिरजंग मराठ्यावर चालून जाण्याचे ठरले. पेशव्यांना निजामाचे हे धोरण समजताच त्यांनी आपली सर्व फौज तयार करून निजामाच्या फौजेशी नाकेबंदी करण्यासाठी भोपाळ तळ ठोकून बसलेल्या निजामास चांगलाच धडा शिकविण्यासाठी आपल्या सैन्याच्या पवार, होळकर, शिंदे व स्वतः वेगवेगळया बाजूनी एकाच वेळी हल्ला करण्याची योजना केली. त्याच वेळी उत्तर कोकणातही पोर्तुगीजांशी लढा चालू होता. तेंव्हा बाजीरावानी उत्तरेकडे व चिमाजी अप्पास नासीरजंगाकडे बुऱ्हाणपूरला मोहिमेवर निघाले. मराठ्यांनी निजामास बाहेरून कोणतीही रसद मिळणार नाही याची दक्षता घेऊन त्यास उपासमारीची वेळ आली. तेव्हा निजामाच्या पिछाडचे मुख्य सरदार अब्दूल मनसुरअली व कोटयाचा राजा हे निघून जाण्याच्या इराद्यांनीं थोडचा फौजेनिशी बाहेर पडू लागलें. हे मल्हाररावाना समजताच त्यांनी तात्काळ त्यावर हल्ला चढवून त्यास परत आपल्याच जागी परत जावे लागले. त्यात मोगलांचे दीड हजार सैन्य ठार झाले. भोपाळला १६ डिसेंबर १७३७ रोजी गराडा घालून वेढा अधिकच मजबुत केला. निजामाने भोपाळच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. शेवटी निजाम शरण आला. तेंव्हा ७ जाने १७३८ ला बाजीरावासोबत दोराहसराईचा तह करुन नर्मदा ते यमुना नदी दरम्यानचा प्रदेश मराठ्यांनापरत दिला. शिवाय मोगल खजिन्यातून पन्नास लाख रुपये दिल.[७१] या शिवाय माळव्याचा ताबा मराठ्याकडे ठेवला. बाजीरावाने उत्तर मोहिमेत निजामाचा पराभव केल्याने उतर हिंदूस्थानच्या राजकारणात मराठ्यांचे वर्चस्व कायम झाले.

राणोजी शिंघांमार्फत पेशव्यांशी बोलणी करून स्वतःची सुटका केली. त्यानंतर दोघांत तह झाला. माळवा प्रांत देणे. नर्मदा व चंबळ यांजमधील मुलूख देणे. या प्रदेशाच्या सनद बादशहा आणविणे. मराठ्याच्या खर्चाचे पन्नास लाख रूपये बादशहाकडून देणे.'[७२] त्यानंतर पेशव्यानी ११ फेब्रुवारी १७३८ ला भोपाळचा वेढा उठवून चंबळ नदीच्या मार्गे खंडण्या वसूल करून पुण्याकडे निघाले.

**३.१.२६ वसईची मोहीमः**

भारतात पोर्तुगीज व्यापारी केवळ व्यापार करण्यासाठी इ.स १७३८ वसई बंदरावर उतरले. तेथून ते मलबार बंदरावरील कालीकोट बंदरावर इ. स. १४९८ ला आले. पण तेथील मयूर जमाजीचे व्यापारी सघन त्यांच्या पुढे या फिरंग्याचे काही चालत नव्हते. तेव्हा तेथील राजाकडे विनंती करून व्यापार करण्याची परवानगी मिळवून व्यापार सुरू केला; पण नंतर हळुहळु राज्य करण्यासाठी तेथील मुलूख आपल्या ताब्यात घेऊन त्याभोवती तटबंदी किल्ले बांधण्यास सुरूवात केली. पुढे पुढे त्यांनी आपला कॅथॉलिक पंथाचा प्रसार व प्रचार जबरदस्तीने सुरू करून साष्टी, आगर, वसई, बांद तेथील हिंदु लोकांवर अनेक प्रकारे

अत्याचार जुलूम हत्या करण्याचे सत्र सुरू ठेवले. तेव्हा पेशव्यांनी चिमाजी अप्पा व मल्हारराव होळकर यास या फिरंग्याला चांगलीच आदल घडविण्यासाठी पुढे रवाना केले.

इ.स. १७३८ चिमाजी अप्पास व मल्हाररावांनी दक्षिणेकडील पोर्तुगीजवर चालून जाण्याचे जबाबदारी सोपविली. त्यानुसार मराठ्यांनी हल्ला केला. कारण त्यांनी माहिम, तारापूर, अशेरी, धारावी व वसई या प्रदेशावर व किल्ल्यावर ताबा मिळवत त्यांच्या वाढत्या कारवाया संपविण्यासाठी हल्ला करुन जिंकलेले प्रदेश वा किल्ले परत जिंकून घेतले. वसई जवळ प्रखर लढा देऊनही पोर्तुगीजास शरण येणे भाग पाडले दोघात तह झाला. त्यानुसार मराठ्यांना आठ शहरे, वीस बंदरे व ठाण्याच्या किल्ल्यासह प्रदेश द्यावा लागला. मराठ्यांचा हा विजय पाहून अगोदर पासूनच इंग्रजांनीही मराठ्यांशी सलोख्याचे संबंध ठेवले.

मल्हारराव होळकरांनी ठाणे किल्ल्यावर हल्ला केला. पोर्तुगीज जनरल पेद्रो दमेलने पण बुरजास तयार करून गरनाळांचा मारा सुरू केला. त्याचवेळी मल्हाररावांच्या एका गोलंदाजानें नेमकी बुरजाच्या वरच्या बाजूस तोफ डागून पेद्रो दमेल ठार केला! त्यामुळे फिरंग्यांना पळ काढण्याशिवाय दुसरा पर्याय नव्हता. मल्हाररावांनी किल्ला जिंकला. त्याच वेळी चिमाजी अप्पांनी आप्पासाहेबासह माहिमवर चालून ते सर करून वसईकडे वळले. तर राणोजी शिंदे, मोरोजी व कर्णाजी शिंदे, बुगाजी नाईक, मुऱ्हारजी नाईक व बाजी भिमराव या मातबर सरदारनीही केळवे, तारापूर, साळमुंबे, नारगोळ डाकु व अशेरी या फिरंग्यांच्या प्रदेशावर एकाच वेळी हल्ले करून फिरंग्याची दाणादाण उडवली. याच कत्तलीत बाजी भिमराव तारापूर जिंकताना धारातीर्थ पडले. चिमाजी आप्पासाहेबांनी वसईस वेढा दिला तेव्हा सर्व मराठा सरदार मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, विठ्ठल शिवदेव, शंकराजी नारायण, मानाजी आग्रे, पिलाजी जाधव, राणोजी शितोळे, येऊन पोहचले त्यापाठोपाठ खंडोजी मानकर, गोविंद हरी तुकोजी पंत व कृष्णाजी आणि मुऱ्हारजी नाईक हे ही सरदार धारावीसाठी या ठिकाणाहून येऊन मिळाले. त्यामुळे मराठयाची प्रचंड फौज पाहून फिरंगी शरण झाले. 'जिंजीऱ्याच्या शिद्दीबरोबर जसा तुमचा करार आहे तसा करार आम्हांबरोबर कराल तर आम्ही वसईच्या आसपासचा मुलूख सोडून देतो.'[७३]

पण चिमाजी अप्पानी त्यांना माफ न करता कायमचा बंदोबस्त करण्यासाठी पुन्हा लढा चालू ठेवला. मराठ्यांनी मोठ्या तोफा व गरनाळ आणून फिरंग्यांचा तोफखाना उडविला व वसई किल्ल्याच्या तटास मोठे भगदाड पाडण्यासाठी सत्त तीन महिने मोठा प्रयत्न चालू ठेवले. तरी किल्ला काही केल्याने जिंकता येत नव्हता. तेव्हा चिमाजी अप्पास किल्ला घेण्याचा दृढनिश्चय व्यक्त केल्याने सर्व सरदार व सुभेदारांनी साध देत आपणही हा किल्ला सर केल्याशिवाय पुण्यास जायचे नाही असा पण केला. पण किल्ल्यातील घडामोडी काय व कशा आहेत हे पाहिल्याशिवाय किल्ला जिंकता येणार नाही. हे ओळखूण खंडोजी मानकर यांनी गुराख्याच्या वेशात अंजुरकर यांनी सुतारकीच्या वेषात व दुल्लमाजी मोरे यांनी

कासाराच्या वेषात या तिन्ही मराठा सरदारांनी वेशांतर करून किल्ल्यात प्रवेश केला. किल्लयातील सर्व माहिती घेऊन आल्यावर चिमाजी अप्पांनी आपल्या लष्करातून सुरंग खणीत किल्ल्यांच्या बुरजाखाली नेऊन त्यात दारूचे बुधले भरून बत्ती दिली. त्यामुळे किल्ल्याचा बुरूज उडाला; पण तो मलबा तिथेच पडल्याने पुन्हा दुसरा सुरंग व तिसरा सुरंग लावला. तेव्हा मोठे खंडार पडले पण ते फिरंग्यानी तात्काळ बुजवून त्यावर तोफा चढविल्या. त्यानंतर पाच सुरूंगापैकी एक राहिला होता. त्याचे काम मल्हारराव होळकरांने पक्के केले होते... तो चांगला उडाला, त्याने अर्धा बुरूज कोसळला.[७४] म्हणजेच मल्हारराव होळकर आणखीन एक सुरंग लावून शिताफीने अर्धा अधिक बुरूज उडविण्यात यश मिळाले. तेव्हा मराठे सैन्य आत घुसून मोठ्या प्रमाणात धुमश्यचक्री सुरू झाली. त्यात फिरंग्यांचा पराभव झाल्याने किल्ले सोडण्यास तयार होऊन तह केला. 'फिरंग्यांच्या पदरच्या कारकुनांस आपासाहेबांनी दरसाल ३६ रूपये व १५ मण भात द्यावे;[७५] चिमाजी अप्पानी किल्यावर भगवा फडकविला व जे धारातीर्थ पडले त्यांच्या बायका मुलास जहागिरी इनामे देऊन त्यांची सोय केली.

### ३.१.२७ उत्तरेकडे स्वारीः

उत्तरेस इराणचा बादशहा नादिरशहा दिल्लीवर चालून आल्याचे कळताच पेशवे बाजीरावांनी चिमाजी अप्पास पत्र पाठवुन मातबर सरदार मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांना बोलावून घेतले. पेशवे, होळकर, व शिंदे खानदेशात एकत्र आले. पण लुटारू नादिरशहा परत गेल्याने ते तेथेच थांबले तेवढयात पेशव्यांची तब्येत बिघडली औषोधोपचार चालु असताना शेवटी परगणे रावेर या गांव्री वैशाख शुद्ध १४ शके १६६२ या दिवशीं (ता. २८ एप्रिल सन १७४० रोजीं) श्रीमंत बाजीराव साहेबांचा काळ झाला![७६]

साताऱ्यास पेशवे पदाची वस्त्रे नानासाहेब या बाजीरावाच्या मुलास मिळु नये म्हणून श्रीपतराव प्रतिनिधी व नागपूरचे रघुजी भोसले यांनी पेशवाईपदी बाबुजी नाईक बारामतीकर यांना मिळावी यासाठी जोरदार प्रयत्न केले. पण शाहू महाराजांनी मात्र आजपर्यंतच्या पेशव्याच्या कार्याचा मान ठेवून नानासाहेबांनाच पेशवे पदी नियुक्ती करून पेशवाईचे वस्त्रे व शिक्के कट्टयार दिली. राणोजी शिंदे इ. स. १७४५ ला मृत्यू पावले त्यांना जयाप्पा, दत्ताजी व जोतिबा हे खासे (औरस) व तुकोजी व महादजी हे विदंर होते. जयाप्पा व दत्ताजी होळकरासोबत परमुलखी स्वारी करण्यास जात होते. तुकोजी शिंदे हा पेशव्याजवळ कार्य करू लागला.[७७]

### ३.१.२८ बुंदी राजास मदतः

बुंदीचा रजपूत राजा मृत्यू पावला. तेव्हा त्याचा मुलगा राजा उमेदसिंग हडे हा अल्पवयीन असल्याने जयपूर राजा सवाई जयसिंगाच्या पत्नीने या आपल्या मुलीस गादीवर बसवून भावाच्या मदतीने राज्यकारभार सुरू केला. पण पुढे काही दिवसात बहिण भावात मतभेद होऊन बुंदीचा राजा उमेदशिंगास अपहरण करण्याची योजना केली. याचा सुगावा

बहिणीस लागताच तिने आपल्या मुलासह ती मल्हाररावाकडे पुण्यास येऊन विनंती केली की. 'मी तुमची बहीण आहे; अशा कठिण प्रसंगी साहृय करून मुलास पुन्हा गादीवर बसविणें आपणाकडे आहे!'[७८]

### ३.१.२९ ईश्वरसिंगावर स्वारीः

तेव्हा मल्हाररावांनी पेशव्यांची संमती घेऊन उमेदसिंगास गादीवर बसविण्याचे अभिवचन देऊन पेशव्यासह मल्हारराव होळकर निघाले. नेवाई परगणे व धुडाड प्रांतापर्यंत मजल मारली. पण पावसाळयाचे दिवस येत होते व जयपूरकर जय्यत तयारीत असल्याने परत फिरले. जयपूरचा राजा सवाई जयसिंग इ. स. १७४३ ला निधन पावला. त्या पश्चात त्यांचा मुलगा ईश्वरसिंग जयपूरचा राजा बनला. पेशवे नानासाहेब उत्तरेतून पुण्यास परतल्याचे कळताच ईश्वरसिंगाने एकटया मल्हाररावावर चालून येत असल्याचे कळाले. तेव्हा मल्हाररावांनीही प्रत्युत्तर देण्याची योजना आखून रजपूतांची फौज आपल्या तळापासून केवळ आठ कोसाच्या टप्यापर्यंत आत येऊ दिले. मल्हारराव होळकरांनी नंतर दोन हजार स्वारानिशी रात्रीच कुच करून शत्रुच्या तळाजवळ पोहचले.

तोपर्यत ईश्वरसिंगाने बाजारबुणगे तळावर ठेऊन स्वतः केवळ सडया फौजेसह पुढे अर्ध्या कोसावर गेल्याचे पाहून मल्हाररांवानी 'हर हर महादेव' म्हणून शत्रूच्या इतर सैन्यावर व बाजार बुगण्यावर हल्ला करून लूट केली. नंतर लाखेरी दऱ्याकडे कुच करून जयपूरकरांच्या फौजेस गराडा दिला. नाकेबंदी करून रसद पुरवठा तोडला. तेव्हा रजपूत राजास व त्याचा कारभारी व राजा मल्लखत्रीने सल्ला दिला की, 'आपला जामदारखाना गेला, फौजेनें धास्ती घेतली, व बुणगेंही लुटलें गेलें आतां बचाव होण्यास तहाशिवाय दुसरा मार्ग नाहीं.' त्यानुसार ईश्वरसिंगाने आपला वकील मल्हाररावांकडे तहाच्या बोलणी करण्यासाठी पाठविला. तेव्हा मल्हारराव होळकरांनी आपल्या मागण्या सांगितल्या 'बुंदीचें राज्य व पंचवीस लाख रूपये रोकड द्याल तर या जाग्यावरून हालूं देऊं!'[७९]

जयपूरचा राजा ईश्वरसिंगापुढे काहीच पर्याय नसल्या कारणाने मल्हारराव होळकरांच्या मागण्या मान्य करून वीस लाख रूपये रोख व बुंदीच्या राज्यास सनदा देऊन जयपूरकडे रवाना होता आले. मल्हारराव होळकर बुंदीस जाऊन उमेदसिंग हाडे यास बुंदीच्या गादीवर बसवून परत इंदुरला आले. हा विजय पेशव्याना समजल्यावर अतिशय आंनद झाला.

### ३.१.३० ईश्वरसिंगावर दुसरी स्वारीः

उदेपूरच्या राजानी मोगलाचे मांडलिकत्व पत्कारले होते. पण उदयपूरच्या राजानी मात्र शेवटपर्यत कोणाचेच मांडलिकत्व पत्कारलेले नव्हते. म्हणून ते स्वतःला श्रेष्ठ वंशाचे समजत असतं. त्यांचे असे म्हणण होत की, उदयपूरची राजकन्या ज्या राज्यास दिली जाईल तिचा पुत्रच त्या राज्याच्या गादीचा वारसदार व्हावा. आणि त्या अटीवर ते आपल्या मुली इतर राजांशी विवाळ लावून देत असंत. त्यानुसार जयपूरचा राजा सवाई जयसिंगने आपला दुसऱ्या

विवाह उदेपूरच्या राजकन्येशी ठरला. उद्येपूरच्या पध्दतीनुसार आपल्या मुलीचा मुलगा वडील समजून गादीवर बसण्याचा अधिकार त्याजकडे असावा. या अटीवर सवाई जयसिंगाचा दुसऱ्या विवाह झाला. जेव्हा इ.स. १७४३ मध्ये राजा सवाई जयसिंग मृत्यू पावल्यावर थोरला मुलगा म्हणून ईश्वरसिंग गादीवर बसला; पण उदयेपूरच्या पत्नीपासून झालेला मुलगा माधवसिंगाच्या गादीवर येण्याचा हक्क ठरलेला होता. पण ईश्वरसिंग बसून उलट माधवसिंगाचा काटा काढण्यासाठी कट रचला म्हणून माधवसिंगाच्या आईने माहेर उदेपूरला येऊन दोघे राहू लागले.[८०]

मामा महाराणा संग्रामसिंगानी भाचा माधवसिंगास चंद्रावतच्या रामपूऱ्याची जहागिरी दिली. पण माधवसिंगाच्या मामेभाऊ राणाजगतसिंह याला समजले. तेव्हा त्यांना भयंकर राग आला. जगतसिंहाने ईश्वरसिंग दुराणीच्या लढाईवर गेल्याचे पाहून ईश्वरसिंगाची जयपूरकडे परत येतांना राजमहाल येथे गाठून तुंबळ युद्ध केले; पण त्यावेळे ईश्वरसिंगाने जयापा शिंदेची मदत घेऊन स्वारीवर गेल्याने शिंदेही त्याच्यासोबत असल्याने जगतसिंगालाच पराभूत होऊन पळ काढावा लागला. उदयपूर राजघराण्यातील लोकांना खूप वाईट वाटले; पण करणार काय? कारण ईश्वसिंहाला विरोध करण्याइतकी शक्ती आज त्यांच्याकडे उरलेली नव्हती. मग त्यांना मल्हारराव होळकरांची आठवण झाली. तेव्हा माधवसिंगाने मानलेल्या मामाकडे म्हणजेच मल्हारराव होळकर यांच्याकडे न्याय मागितला. मल्हाररावांचे व मामा राणा संग्रामसिंगाचे चांगले संबंध होते. मल्हारराव होळकरांना आपल्यावर अन्याय कसा झाला. याच संपूर्ण वर्णन माधवसिंहाने व जगतसिंहाने सांगितले. मल्हाररावांनी जर आपणाला ही गादी मिळवून दिली, तर चौसष्ठ लाख रूपये देण्याचे वचन दिले. मल्हाररावाने ही विचार करून माधवसिंहाची बाजू सत्याची होती. मग त्यांनी जगतसिंहाला माधवसिंहाला गादी मिळवून देण्याचे वचन दिले.[८१]

### ३.१.३१ माधवसिंगास मदत:

ईश्वरसिंहाला जेव्हा मल्हारराव आपल्या राज्यावर स्वारी करण्यासाठी येणार असल्याचे पत्र मिळाले. तेव्हा तो भीतीने इतका गोंधळून गेला की, त्याला काहीच सूचेनासे झाले. त्यावेळी मल्हाररावांचा राजपूतावर इतका वचक होता. त्यांच नुसत नाव काढताच ते थरथर कापत असत. आता तर तो चक्क आपल्यावर स्वारी करणार मग तर काय विचारता ईश्वरसिंहान अन्न पाणी सोडून दिले त्याच्या डोळयापुढे मल्हारराव व त्यांचे सैन्य दिसू लागले. त्यांच्या मनात माधवसिंहाला गादी द्यावी. असा विचार करण्याची शक्ती संपली त्यावेळी जयपूरचा कारभारी राजा मल्लखत्रीने राजा ईश्वरसिंगास चाटूस प्रांत धुडास पर्यंत गेल्यावर होळकर येत असल्याची बातमी दिली. तेव्हा आपला कारभारी होळकररास फितूर झाल्याचे समजून विष पिऊन आत्महत्या केली.[८२] ईश्वरसिंहाच्या मरणानंतर माधवसिंह मल्हाररावांवर अतिशय खूष झाला. मल्हारावांसारख्या वीरापुढे सर्वस्व अर्पण केले तरी आपण त्यांच्या कृत्याची बरोबरी करु शकणार नाही असं त्याला वाटू लागले. तेव्हा मल्हाररावांनी

कारभार राणा मल्लखत्रीच्या मदतीने माधवसिंगास आणून जयपूरवासियांना त्यांचा खरा राजा गादीवर बसविला. तेव्हा माधवसिंगाने याची परतफेड म्हणून मल्हाररावांस माधवसिंगानें ७६ शहात्तर लक्ष रूपये रोख, टोंक रामपुरा, हिंगळजगड व धाकटा रामपुरा हे प्रांत जहागीर म्हणून दिलें; व दरसाल साडेतीन लक्ष रूपये खंडणी देण्याचें कबूल केलें.[८३]

पण शिंद्याने जयपूरच्या प्रदेशात आल्यावर ईश्वरसिंगाची बाजु घेऊन त्याच्या वारसास गादीवर बसविले जाईल. म्हणून जयपूरवाशियांनी जयपूर नगरीत व्यापार भरवून शंभरांची वस्तु पंचवीस रूपयास विकली जात असल्याची वार्ता शिंद्याच्या सैन्यात पसरविली. त्यामुळे शिंद्याचे सर्व सैन्य जयपूर शहरात गेले असता शहराचे दरवाजे बंद करून सुमारे सात-आठ हजार सैन्य कापुन काढले.[८४] त्यानंतर जयपूरवाशियांनी आपल्या माधवसिंग राजास कायमचे गादीवर बसविले. शिंद्यांना हे कळल्याने त्यांचे अवसान खचल्याने मल्हाररावांनी बसविलेल्या रजपुत राजाचे हे प्रकरण सोडून दिले. पण हे वृत मल्हाररावांस समजताच जयपूरच्या कारभाऱ्यांस बोलावून सक्त ताकिद दिली.

कारभाऱ्यांनी माफी मागून यापुढे असे होणार नाही; असे वचन दिले. तरी पण मल्हारराव होळकरांच्या मनात खूप मोठा राग होता. त्यात त्यांनी रजपूत राजाचा भाईबेटाची माची गढी डोंगरावर होती. तिच्यावर हल्ला करून लूट करून उधवस्त केली. परत लष्कराच्या छावणीत येऊन जयपूरच्या कारभाऱ्यास पुन्हा बजावले. तेव्हा कारभाऱ्याने होळकर यांस झालेल्या हानी बदल पंचवीस लाख रुपयांची हमी घेतल्यावर जयाप्पा शिंदे व मल्हारराव होळकर या मराठा सरदारांनी सोडून देऊन पुढे कुच केली.

### ३.१.३२ फारुखाबादच्या पठाणावर अभूतपुर्व विजयः

अव्वलीस दिल्लीच्या बादशहाचा वजीर मनसूर अल्लीने फारुखाबादच्या पठाणावर हल्ला करुन त्यांना तेथून हाकलून लावले. वजीराने नेवलराईस तेथे ठेवून परत दिल्लीला गेल्यावर पठाणांनी परत येऊन नवलराईचा खून केला. तेव्हा वजीर मनसूर अल्लीने होळकर व शिंदे या मराठा सरदारांना मदत मागितली. 'या वेळीं जर तुम्ही आम्हांस मदत कराल तर तुम्हांस कुचाचे लाख रुपये व मुक्कामाचे पन्नास हजार रुपये देऊं.'[८५] तेव्हा होळकर शिंदे मनसूर अल्लीस आग्रास जाऊन भेट घेतली. तेव्हा फारुक्काबाद पठाणांनी चाळीस हजार स्वार, दोनशे तोफा व भरवशाचे पायदळ सादल बादल पठाणांच्या नेतृत्वाखाली देऊन कासमगंजच्या पुलावर येताच शिंदे होळकर यांनी साबाजी शिंदे व दिवाण गंगाधर पंताच्या नेतृत्वाखाली फक्त पंचवीस हजार स्वार पाठवून तिसऱ्या चकमकीत सादल बादल सरदाराची शिरे कापून विजय मिळवून परत येताच होळकर शिंदे व वजीर यांनी पूर्ण फौजेसह फारुक्काबादवर चालून गेले. तेव्हा पठाण भागीरथी नदीच्या पलीकडे जाऊन खळयाच्या आश्रयास गेले.

तेव्हा मराठ्यानी अगोदर रसद पुरवठा होणारे फारुक्काबाद लुटले. याशिवाय रसद पुरवठा बंद केला. तरीही पन्नास हजार फौजे तयार करुन लढण्यास तयार होऊन लढा

पुकारला. तेव्हा मराठ्यांनी गनिमी काव्यांनी रात्रीच्या वेळी जनावराच्या शिंगास व झाडास मशाली बांधून त्या पेटवून दिल्या व दुसऱ्या बाजूने अंधाराचा फायदा घेऊन पठाणावर अचानक हल्ला करुन चारी बाजूने मराठ्यांनी घेरल्याने पठाण राणोमाळ पळत सुटल्याने पार दाणादाण उडाली. दुसऱ्या दिवशीही विजयी मराठा फौजेने उरलेल्या पठाणावर हल्ला चढवून शरण येण्यास भाग पाडले.

### ३.१.३३ दिल्ली बादशहाकडून चांदवडच्या देशमुखीः

दिल्लीत मराठा फौज आल्यावर मल्हारराव होळकर व राणोजी शिंदेस मानाचा पोषाख देऊन सत्कार केला. त्यावेळस बादशहा मल्हाररावांना म्हणाला की. 'तुम्हांस काय बक्षीस देउंस?' त्यावर मल्हारराव बादशहास मोठ्या आदराने म्हणाले की. 'खावंद मी पेशव्यांचा नौकर आहे;... हुजूरांची मर्जी बहाल असल्यास मला खानदेशांतील चांदवड महालाची सरदेशमुखी द्यावी!'[८६] तेव्हा बादशहानी चांदवडच्या देशमुखीची सनद मल्हाररावांना बहाल केली.

साताऱ्याच्या ताराबाईना कोकणातील ब्राह्मणाचा पहिले पासूनच तिरस्कार वाटत होता. मराठा सुभेदार उत्तरेत असल्याचे पाहून छत्रपती राजारामची पत्नी ताराबाईने कोल्हापूरमध्ये बसून साताऱ्याच्या पेशवे पदी नानासाहेबांच्या जागी निजाम-उल-हक्कचा दिवाण रामदास पंताचा पुतण्यास बसवावे या उद्देशाने निजाम, दाभाडे व गायकवाड यांच्या मदतीने पेशवे नानासाहेबांशी झुंज देण्यासाठी जय्यत तयारी केली. पेशवे नानासाहेब मराठी साम्राज्याच्या विस्ताराच्या दृष्टीने भागापूरच्या निजामाचा मुलगा निजाम अल्ली हा दक्षिणेचा सुभेदार होता. त्याऐवजी निजामाचा दुसरा मुलगा गाजीउद्दीनला दक्षिणेची सुभेदारी मिळवून देण्यासाठी होळकर व शिंदेनी बादशहाला गळ घालून नव्या दक्षिणेच्या सुभेदारास गाजीउद्दीनला दक्षिणेस सोबत घेऊन यावे. यासाठी सुभेदार मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदेस तीनदा पत्र पाठविली.

स्वतः नानासाहेबांनी स्वतःचे सैन्य उभारुन पुण्यातून बुऱ्हानपुरच्या दिशेने निघाले. मार्गात सुपे येथे त्याचा मुक्काम पडला. तेव्हा निजामाचा दिवाण रामदासपंत औरंगाबाद ओलांडून पारनेर जवळील लोणी गावी येऊन पाहेवला. दुसऱ्या दिवशी पेशवे व रामदासपंतामध्ये युद्ध होऊन पेशव्यांनी बाजी मारुन रामदासपंताचा बिमोड केला. तेव्हा त्यांनी नवाबाचा सरदार जानराव निंबाळकरांनी पेशव्यांकडे आग्रह धरला तह करावा अशी विनंती केली.

### ३.१.३४ नानासाहेबास पेशवे पदाची वस्त्रे

तर जुन्या रुढीबादी सनातन्यांनी श्रीपतराव प्रतिनिधी यांना पेशवे पद मिळावे यासाठी आग्रह धरला. त्यामुळे दोन महिने उशीर झाला तरी छत्रपती शाहू महाराजांनी आजपर्यंतचे कर्तव्य पाहून नानासाहेबास पेशवे पदाची वस्त्रे दिली. तर त्यामुळे नागपूरचे भोसले स्वतंत्र

राजाप्रमाने कार्य करु लागल्याने ते पेशव्याचे कोणतेच आदेश ऐकत नव्हते. कारण ते स्वत:स पेशव्याच्या बरोबरीचे मानीत असत. ताराबाईच्या नातूस सातारा गादीवर बसविले असतानाही पेशव्यांशी लढा पुकारला. तेव्हा पेशव्यांनी २९ सप्टेंबर १७५० ला सांगोल्याचा किल्ला होळकर व शिंद्याच्या पराक्रमाने जिंकून घेतला.

बाजीराव यांच्या निधनानंतर २५ जून १७४० रोजी थोरला मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांस पेशवे पदाची वस्त्रे छत्रपती शाहू महाराजांनी दिली. बाजीरावानंतर आपल्याला पेशवे पद मिळावे म्हणून नागपूरचे भोसलेनी रघूजीचा मुलगा मुघोजीचे नाव सूचविले. तर बाबूजी नाईक जोशी या बारामतीकरांनी आपणासच पेशवे पद मिळावे. पेशवे पदासाठी भोसले व जोशी दोघेही साताऱ्यात तळ ठोकून होते. तेव्हा शाहूंनी अतिशय चालखपणे रघूजी भोसल्यास सनद देऊन नागपूर, त्रिचनापल्ली, लखनऊ, मुक्सुदाबाद, बुंदेलखंड, अलाहाबाद, पटना, ढाक्का आणि बिहारच्या प्रदेशात चौथाई वसुलीचा अधिकार देऊन गप्प केले. तरीही नानासाहेबांच्या पेशवे पदावरुन विरोधकांनी सतत त्रास देऊन कर्जाच्या फेडीचा तगादा लावून धरला. अशा बिकट परिस्थीतीमध्ये छत्रपती शाहू महाराजांनी एक महिना पेशवे पदावरुन नानासाहेबास दूर करुन ते रिक्त ठेवले. परत. एका महिन्यानंतर १३ एप्रिल १७४० पुन्हा नानासाहेबांस पेशवे पद बहाल केले.[८७] तर चुलते चिमाजी अप्पाचा मृत्यू डिसेंबर १७४० मृत्यू झाला. १४ मार्च १७४१ ला नागपूरच्या भोसल्यांना त्रिचनापल्ली तंजावर व मदुराई जिकूंन घेण्यासाठी पाठविले. त्यांनी ते जिंकून घेतले. छत्रपती शाहू महाराजांस न विचारताच जिंकलेल्या त्रिचनापल्लीवर सुभेदार म्हणून मुरारराव घोरपडे यांची स्वतंत्रपणे नेमणूक केली.

### ३.१.३५ छत्रपती शाहूचा मृत्यू

छत्रपती शाहूस सकवरबाई व सगुणाबाई या दोन बायका होत्या. तसेच विरुबाई ही बीन लग्नाची पण सत्त शाहूच्या सोबत राहिल्याने तिला ही बायका प्रमाणे वागणूक दिलेली होती. पण या विरुबाईचा १४ दिसेंबर १७४० ला निधन झाल्याने शाहू दु:खी झाले. छत्रपती शाहू यांनी तीन बायका असुनही ते निपुत्रीक होते. वृद्धपकाळाने मृत्यू होण्या अगोदरच त्यांनी ताराबाईचा नातू 'रामराजा' यास दत्तक घेवुन ४ जानेवारी १७५० ला साताऱ्याच्या गादीवर बसविले. नानासाहेब पेशव्यानी छत्रपतीचे अमात्य म्हणून विशाळगडच्या कृष्णानी पंताचा मुलगा भगवंतराव यास नेमले. येथून पुढे पेशवे हेच मराठेशाहीचे सर्वेसर्वा बनले.

मल्हारराव होळकर यांनी इ.स. १७५० ला रजपुतांस साहाय्य केल्यामुळे माधवसिंगाकडून दहा हजार व बुंदीकडून दरासाल रूपये पंधरा हजार खंडणी स्वत: मल्हारजीस देणे ठरलें.[८८] मल्हारराव होळकरांनी साडे तीनशे उत्तम प्रकारचे भाले तयार करुन घेऊन संताजी वाघ या सरदारास आपल्या पदरात घेतले. नानासाहेब पेशवे यांच्या काळात १७५० ते १७६१ या काळात मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे यांची केलेल्या उत्तरेतील कामगिरीबदल

विविध राजाकडून वसूल केलेल्या खंडणी बदल बक्षीस म्हणून मल्हारराव व जयाजी यांस प्रत्येकी दीड लाख रुपये बक्षीस देऊन सन्मान केला. या शिवाय मल्हारराव होळकर व त्यांच्या सहकार्यास इनामी जमिनी, सरदेशमुखी सनद उत्राण व अंगठी दिली.

१ इनामपट्टी, मिरासपट्टी १— मौजे बिबवी, तालुके, खेड प्रांत जुन्नर २ कसबे आळें प्रांत

१ जुन्नर. मौजे मुंगठी, परगणे ललिंग येथील सरदेशमुखी व मोकासा सालगुदस्तप्रमाणे.

१ खासा मल्हारजींकडे प्रांत जुन्नरपैकी १) लाखणगांव, २) बाफगावं, तालुके खेड, ३)

१ परगणे उत्राण, प्रांत खानदेश येथील सरदेशमुखीची कमाविस.

१ संताजी वाघ, मौजे काठापूर बुद्रुक, तालुके अवसरी, प्रांत जुन्नर

१ गोविंदराव बुळे, मौजे उडवडी, तालुके सांडस, प्रांत पुणे.

आरसे महालांत श्रीमंतांनी मल्हारजी व त्यांचे पुत्र व प्रपौत्र, व त्यांचे कुटुंबाचे मंडळीस बहुमान वस्त्रे, जडजवाहिर दागिने देऊन गौरव केला.

१३३८७ खासामल्हारजीस चौकडा मोत्यांचा किंमत रु. ७८४६ शिरपेंच जडवाडाचा किंमत रु. ४४६५ (भाऊरावसाहेब पैकी) पोशाख जरी, किनखाप मंदील, झगा, पायजमा,

१८६९ शेला, रु. १०४६.

सौभाग्यवती गौतमाबाई व सौ. अहिल्याबाई व लेकी यांस वस्त्रे, पैठणी शालू,

१११५ चोळखण, वगैरे.

३४१ पुत्र खंडेराव होळकर यांस मंदील, पोशाख व काडी सोन्याची.

२५५ मालजी होळकर (विश्वासराव पेशवे यांचेपैकी ) पोशाख जरी.

५२२ मल्हारजींचे अंगवस्त्र बनाबाईस वस्त्रे, लुगडे किनखाप.

४९८ मोहीबाई, मल्हारजींची सासू, पोशाख,

४९३ बाबूराव वाघमारे, जावई, यांस मंदील वगैरे.

४८० गोविंदराव बुळे यांस मंदील पोशाख.

४८५ संताजी वाघ यांस मंदील, पोशाख,

गंगाधर यशवंत चंद्रचूड, पोशाख रु. २०६, रामाजी यादव पळशीकर पोशाख रु. १८७, उदाजी लांभाते, पोशाख रु. १५०, राघो लक्ष्मण रु. १२३, रावजी महादेव व्यास हु. फडणीस, पोशाख रु. ६४ मजमदार गोळे. रु. ११५.[८९]

मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे यांनी इ.स. १७५१ ला गंगानदी ओलांडून सादुल्लाखान रोहिला मार्फत खंडणी वसूल केली. बदाऊ, शहाबाद, जेतागुजर, तिल्हार, संभळ, सिरसी, मुरादाबाद, अवरोह, एहमदपूर, नरोजी, खंडणी रूपये ६१९०४० सहा लक्ष एकोणीस हजार चाळीस व दिल्ली खंडणीतीस लाख तर मनसूरअल्ली मार्फत व अंतर्वेद तील लाख सहासष्ट हजार नऊशे चौपन व जाट दोन लाख एकोणीस हजार तीनशे सहव्वीस या

शिवाय हत्त्ाी तेरा यांपैकी कांही चौथाई, कांही तिजाई हिस्सा अभ्यतासं होळकर व शिंदे यांस दिल्हे.

या वरील विजयाने खुश होवून पेशवे नानासाहेब यांनी होळकर शिंदे याच्या पराक्रमाबददल जे उदगार काढलेले आहे ते असे—.अमदशाखा बंगश, बहादूरखां, रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहाबारा हजार स्वार व प्यादे यांजसी कुमकेस आणिले... हजारो घोडी पाडाव केली, हत्ती पाडाव केले... तोफखाना पाडाव केला.मल्हारराव होळकर यांनी मोगली प्रदेशावर आक्रमण करून जे किल्ले जिंकले ते असे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | किल्ले मार्कंड | ३ | किल्ले चांदवड | ५ | रोजोद खारवें |
| २ | किल्ले इंद्राई | ४ | किल्ले केनेरा | | किल्ले धोडप [९०] |

हे किल्ले जिंकण्यासाठी व बंदोबस्तासाठी एकलक्ष त्र्यायशींहजार पाचशे एक्केचाळीस खर्च केले ते पुणे दरबारांनी नंतर दिले. तसेच मल्हारराव होळकर यांनी उत्तरेतील ज्या राजाना वेळोवेळी मदत केलेली होती त्यामदतीपोटी त्यांनी पुढील खंडणी दिलेली होती.

स्वतः खंडणी कोटा संस्थान, रु. १४,५२६ व पाटण केशवराव प्रांत बुंदी खंडणी रु. ९४१२२, सिरसी तिसाला खंडणी रुपये १३९५०... अहिल्याबाई यांस वस्त्रें सदरेंत पोषाख... श्रीमंतानी तुकोजी होळकर निस्बत मल्हारजी तनखेंत गावें लावून दिली.

**३.१.३६ सनदा जहागीर इनामी:**

तसेच सन १७५३ साली मल्हारजी होळकर यांचे नांवे सनदा जहागीर इनामी वगैरे खाली खुलासा केल्याप्रमाणे.

१ मौजे जांबगाव परगणे गांडापूरपैकी देह येथील वाडिया मजरेसुध्दा नुतन इनाम गांव मोंगलाईत चालत आल्याप्रमाणे सुदामात.

१ परगणे गाडापूरपैकी गावे १ धोधलगाव कसबे शिऊर तेथील वाडिया व मजरे, सरंजाम मोगलाई चालत आल्याप्रमाणे

१ किल्ले सोनगडची जहागीर इजारा राजश्री मल्हारजी होळकर यांचकडे दरोबस्त दिवाणी फौजदारी.

२ परगणे चांदवडपैकी कस्बे निफाड, मौजे पिंपळया वसंत.

१ मौजेकोकमठाणें परगणे कुंभारी हिस्सा

१ मौजे रोही तळेंगाव परगणे पाटोदे

१ मौजे हणवंतगांव परगणे वैजापूर.

——

५

आठ हजार एक द्यावे साल दरसाल. सोनगडची जहागीर आहे ऐसियासी तेथील इजारा आठ हजार एक, करार केला आहे.[९१] मल्हाराव होळकर, जयाजी शिंदे व आजममीर

महंमदसफीबेगखा या दरम्यान एक करार झाला. तो 'करारनामा राजश्री मल्हाराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे' खान आजमीर महंमदसफी बेगखां. प्रांत सरे नूर महाल चार तपशील.

१ परगणे मदलावद, १ परगणे केदरवाडा. १. परगणे खेलचीपूर २. परगणे आलणपूर. ९६

१९ नोव्हेंबर १७५३ च्या या करारानुसार जमा होणारा महसुल भाल, सायर व फौजदारी फरोई नाकेदारी, जरीबाना, नजराणा व तलबाना इत्यादी पैकी निम्मा सरकारांत कमाविसदाराकडे आणावा व निम्मा महसुल तुम्ही घ्यावा असे ठरले. तसेच या प्रदेशात जे जहागिरदार मोगलांचे अमलदार वा कोणी हस्तक्षेप करील त्यास होळकर व शिंदेनी त्यांचा बंदोबस्त करावा त्या निम्मा निम्या हिस्याची वाटणीचा तपशील—

| **सरकारांत ठाणी** | **खान मशारनिल्हेकडे ठाणी** |
|---|---|
| १ मौजे सुरवल | १ कसबे खिलचीपूर |
| १ मौजे आवण | १ कसबे केदरवाडा |
| १ कसबे आलणपूर | १ कसबे सेरपूर |

याशिवाय कुडेरा परगणे मदलावद येथील ठाणे दोघात सामाईक असेल. तसेच मल्हारराव होळकर यांच्यामार्फत पुणे दरबारात पुढील प्रमाणे खंडणी देण्यात आली.

| | | | |
|---|---|---|---|
| १ सादुल्लाखान | २,१९,९४० | ५ प्रांत अंतर्वेद | ९००० |
| २ मेणपूरी खंडणी, | ३९,७९५ | ६ सुरजमलजाट | १,५५,३८५ |
| ३ दिल्ली खंडणी | ५,८०,६२५ | ७ सं. उदेपूरनगर | २,५०,००० |
| ४ सं. जयनगर | १५०० | | ९२ |

मल्हारराव होळकर यांना व कुटुबांना इ.स. १७५४ ला इ.स. १७५४ मल्हारराव होळकर यांना व त्यांच्या कुटुंबास बहुमानास्तव विजयदशमी दसरा या सणास पेशव्याकडून वस्त्रे देऊन सन्मान केला. प्रांत अंतर्वेदी येथील महाल फौजचे बेगमीस मल्हारजीस सनदा करुन दिल्या तपशील येणेप्रमाणे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | परगणे कन्नोज आकार रु | ८२,३१५ | १ | परगणे आलीपूरखेडा, रु. | ६५,००० |
| १ | परगणे देवळाली रु. | १,५०,००१ | १ | पगरणे सोरा, पंचकुणा रु. | ६७००० |
| १ | परगणे सकीट आकार रु. | १,७५,००० | १ | पगरणे सिंकदरा रु. | १,०३,६८५ |

येकूण महाल आठ आकारी रुपये सहालक्ष त्रेचाळीस हजार येक. वंशपरंपरा जाहगिर परगणा चांदवड गावे १५३ आकार रुपये २,३७,३८३ परगणे अकबराबाद अंतर्वेदपैकी समाईक होळकर शिदे सनद.[९३]

तसेच मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदे यास पेशव्यांचे प्रांत नेमाड सरकार मांडवगड येथील देशमुखी व कानगोईपणाचे वतनाची दोघांत वाटणी करुन सनद दिली. त्या वेळी दोघांनी मिळून दहा हजार रुपये सरकारात नजरेबदल जमा केले.

तसेच संस्थान कोटे करार करुन दरवर्षी खंडणी पोटी साडे चार लक्ष प्रमाणे सोळा वर्ष देण्यास भाग पाडले असे एकूण बहात्तर लक्ष रुपये होतात. संवत १८११ ते संवत १८२६ पोटी करार दरसाल खंडणी साडे चार लक्ष ४,५०,००० प्रमाणे सोळा साली आकार रु. ७२,००००० यांचे वाटणीचा तपशील केला.

| | | |
|---|---|---|
| १ | होळकर यांस दसदे साडे आडोतीस | २७७२००० |
| २ | शिंदे यास दसदे साडे आडोतीस | २७७२००० |
| ३ | पवार यांस दसदे तेवीस | १६५६०००. |

याप्रमाणे तिघांत ७२,००,००० रुपये वाटून आले.

खंडेराव होळकर कुभेरी युद्धात मृत्यू पावले तेव्हा त्यांचे उत्तरक्रिये करिता श्रीमंत पेशवे सराकरांनी मंजूर केले रुपये १०,००० तसेच कुंभेर येथे खंडेरावांच्या छत्रीच्या खर्चाकरीता गांगरसोली, तमरेल, सहत, वगैरे, १५,४२७ उत्पन्नाची गांवे व मिठागर ही खर्चाकरीता लावून देऊन त्यांच्या सनदा सुरजमल जाट भरतपूरकर यांनी करुन दिल्या.[१४] त्या पेशव्यानी मान्य केल्या त्या इ.स. १८४८ पर्यत चालु होत्या.

त्यानंतर होळकर व शिंदे यांजकडून श्रीमंतास नजर म्हणून संस्थान बुंदीपैकी खंड वसूल केला त्यापैकी मल्हाररावांनी अडची लाख रूपये, व शिंद्यांनी अडीच लाख रूपये असे पाच लाख रूपये दिले. मल्हारराव होळकर आणि त्यांचे गादीवर येणारे वंशज स्वत:स देशमुख चांदवड असे काही प्रकरणी म्हणवितात. ही देणगी त्यांस दिल्ली बादशहाकडून मिळालेली होती. आणि यांचे दर्शक, म्हणून त्यांची एक स्वतंत्र मुद्रा पण वापरण्याचा अधिकार दिलेला होता.

मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदेनी पुन्हा इ.स. १७५४-५५ मध्ये उत्तर मोहिम हाती घेऊन दिल्ली बादशहाशी करार करुन ब्याऐंशी लक्ष पन्नास हजार एक द्यावे त्यापैकी गाजुदीनखानकडून त्यातून मल्हाररावास दरवर्षी शेकड तेवीस रुपये पाच आणे प्रमाणे नऊ लाख ऐकोनऐंशी हजार एकशे चाळीस रुपये हिस्सा मिळाला. तसेच

पुणे दरबारांत होळकर व शिंदे यांची सरंजाम निवाडयाची यादी तयार झाली त्यात होळकर चोऱ्याहत्तर लक्ष ७४००००००, व शिंदे साडेसहासष्ट लक्ष ६६५०००० होळकर यांच`सरजामाचा तपशिल खालील प्रमाणे— २५००००० पंचविस लक्ष नवा, जुना बुळे, बारगळ, वाघसुध्दा १५००००० पंधरा लक्ष नवा संरजाम, अंतर्वेद मोहिमेबद्दल, ४००००० चार लक्ष थाळनेर, अडावद, सेवगांव वगैरे किरकोळ सुध्दा ७५०००० सात लक्ष

पन्नास हजार शहापूरा वगैरे राणा जैनगर व बुंदीवाल्याचे परगणे घेतले त्याजबद्दल आकार. २२५०००० बावीस लक्ष पन्नास हजार श्रीमंताकडून स्वारीसंबंधात हिस्सा वाटणीचे.[९५]

### ३.१.३७ ताराबाईचा बदोबस्तः

ताराबाईने सत्त पेशव्यांना विरोध करीत होत्या त्यात रामराजास छ. पदी बसविल्यानंतर गप्प न बसता उलट पेशव्यांना आव्हान केले. तेव्हा मात्र पेशव्यांनी २९ सप्टेंबर १७५० रोजी सांगोल्याचा किल्ला जिंकून ताराबाईचा पराभव केला. खानदेशातील बहादूरपूराची लढाई १५ मार्च १७५१ पेशव्यांना सुरुवातीपासुनच गुजरातचे अर्धे राज्य हवे होते. पण तेथे दमाजी गायकवाड व दाभोडे हे ताराबाईच्या पक्षातील सेनापती होते. शेवटी पेशव्यांनी मल्हारराव होळकर व शिंदे यांच्या मदतीने चढाई करुन गायकवाडाचा पराभव केला. ३० मार्च १७५२ ला पेशव्याशी गायकवाड यांनी वेण्णा नदीकिनारी असलेल्या छावणीत करार केल्यामुळे गायकवाडाना जीवन मिळाले. तर दाभाडेचा गुजरातवरील हक्क आपोआप संपुष्टात आला. यातून पेशव्यांना वैयक्तिक अर्धे राज्य शिवाय १५ लाखांची खंडणी मिळाली म्हणजेच पेशवे हे मराठ्यांचे पेशवे होते शिवाय त्यांना गुजरातची सुभेदारी त्यांच्याकडेच होती.

रघुनाथराव पेशव्यांनी दमाजी गायकवाड यांना अहमदाबाद, काठीयावाड जिंकून घेण्यासाठी २४ एप्रिल १७५३ ला मदत करुन ते जिंकून दिले. पण त्यांना सुरत जिंकता आले नाही. सुरत शहर हे मराठे, सिधी, मोगल व इंग्रज यां सर्वांना हवे होते. पण शेवटी ४ मार्च १७५९ ला सर्वामध्ये सामंजस्यांचा करार झाला. त्यानुसार सुरत ही सर्वाची बाजारपेठ राहिली.

### ३.१.३८ तुळोजी आंग्रेचा बंदोबस्तः

पेशव्याना विरोध करणाऱ्यापैकी दाभाडे, भोसले, गायकवाड व आंग्रे यांचा समावेश होता. आंग्रेचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्यांनी १९ मार्च १७५५ ला इंग्रजाच्या मदतीने पेशव्यांनी कल्याणचा सुभेदार रामाजी महादेव व रॉबर्ट क्लाईव्ह व वॅटसन यांनी सुवर्णदुर्ग, हर्णेबंदर जिंकून घेतले. तर १४ फेब्रुवारी १७५६ ला विजयदुर्गाचा किल्ला जिंकला. तेव्हा तुकोजी आंग्रेची बायका व मुले शरण आली. विश्वासघात, शत्रूत्व आणि स्वार्थ यामध्ये इंग्रज पेशव्यांना व पेशवे मोगलांना भारी पडले. पुढे १७८६ ला वॉडनच्या किल्यात कैदेत असलेल्या तुकोजी आंगेचा मृत्यू झाला. इंग्रजाचे नियोजन, दूरदृष्टी व धाडसीपणा हे नानासाहेब, सदाशिवराव भाऊ आणि रघुनाथराव पेशव्यापेक्षा शेकडो पटीने सशक्त होते हे मान्य करावेच लागले.

### ३.१.३९ नादिरशहाची दिल्लीवर स्वारीः

कंदाहारचा बादशहा नादिरशहाने भारतावर स्वारी केली. त्यात अहमदशहा आब्दाली ही होता. इराणचा बादश्चाहा नदिरशहा यांनी इ.स. १७३८ मध्ये अफगाणिस्तानवर स्वारी करुन काबुलसह जिंकून घेतले. तो पुढे दिल्लीकडे निघाला. लाहोरचा दिल्ली बादशहाचा सुभेदार

नादिरशहास रोखू शकला नाही. तेंव्हा बादशहा स्वत: कर्नलकडे निघाला. पण निजाम तटस्थ राहिल्याने मुघल सरदार खान डौरान व सादतखान नदिरशहाकडून पराभूत झाले. सादतखान नादिरशहाच्या हाती सापडला. दिल्लीच्या सर्व संपत्तीचा रक्षक निजाम असल्याचे सांगून स्वत:ची सुटका करुन घेतली. नादिरशहाने पन्नास लाख रुपये घेऊन परत जाण्याचे बादशहाशी झालेच्या वाटाघाटीत ठरले. पण निजामाचा द्वेष करणाऱ्या सादतखानाने नजिरशहाचे कान भरले. तेव्हा नदिरशहाने मोगलास वेढा देऊन वीस कोटीची मागणी केली. लढयात बादशहा निजाम, व कमरुद्दीन नादिरशहाच्या हाती सापडले. तर सादरतखानाने घाबरुन आत्महत्याच केली. तेंव्हा नादिरशहाने १० मार्च १७३९ ला स्वत:स 'दिल्लीचा बादशहा' म्हणून घोषित केले. १ मे पर्यंत दिल्लीत अमाप अत्याचार करुन कोट्यावधी रुपयांची लूट मिळवून रजपूत व मराठे एक होवून चालून येण्या अगोदरच परत फिरले.[९६]

अफगानिस्थानचा बादशहा अहमदशहा आब्दाली यांनी भारताची लुट करण्याची परंपरा चालु ठेवली. यांनी भारतावर पाच वेळा स्वाऱ्या केल्या. त्यांनी इ. स. १७४८ मध्ये पहिल्या स्वारीस दिल्लीचा बादशहा दुर्बल झाल्याचे पाहून व पजांबमधील चालू असलेली यादवी पाहून व मराठ्यांचा दक्षिणेत चालू असलेला धुमाकूळ पाहून भारतावर पुन्हा स्वारी केली. आब्दालीने लाहोर जिंकून दिल्लीकडे कुच केली. तेव्हा दिल्ली बादशहा यांनी महमूदशहाचा मुलगा शहजादा अहमद, वजीर कमरुदीन व मीरबक्षी सफरदजंग यास पाठविले असता. सरहिंद जवळील मनुपूर येथे अब्दालीच्या सैन्याचा पराभव करण्यात यश आले.

पण पुन्हा दुसऱ्या वर्षी १७४९ ला दिल्लीचा बादशहा मुहमदशहाच्या मृत्यू झाला. त्यानंतर अहमदशहा आब्दालीने भारतावर दुसरी स्वारी केली. तेव्हा दिल्लीचा बादशहा अहमदशहा यांच्या संगनमताने आयोध्याचा नवाब सफदरजगाने झुंज दिली. त्यावेळी नवाबाने होळकर शिंदे यास मदत मागितली होती. शेवटी दोघांत म्हणजेच आब्दाली व मोगल यांच्यात करार होवून पंजाबचे चार जिल्हे व एक लाख रुपये नजराना देण्याचे मीरबक्षीने मान्य केल्याने आब्दाली परत गेला. इ स १७५१ ला आब्दालीने पुन्हा तिसरी स्वारी भारतावर करताच मोडली बादशहाने पंजाब प्रांत आब्दालीस देऊन टाकले. वजीर गाजीउद्यीनखानाने सफदरजंगच्या मदतीने दिल्लीची सत्ता काबीज करून अहमदशहा बादशहास पदावरून काढून आलमगीर दुसरा यांस दिल्लीच्या गादीवर बसविले.

**३.१.४० दिल्ली संरक्षणाचा करार:**

२ एप्रिल १७५२ ला दिल्लीच्या मोगल बादशहाने शिंदे होळकर यांच्याशी दिल्ली संरक्षणाचा करार केला. बादशहाच्या वतीने सफदरजंगाने व मराठ्यांचे प्रतिनिधी म्हणून मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनी करार केल्याने दिल्लीवर मराठ्यांचे वर्चस्व निर्माण झाले. एका अर्थाने मराठे हेच दिल्लीचे मालक बनल्याने आब्दालीशी येथून पूढे सामना करावा लागणार हे निश्चित झाले. या करारातून मराठ्यांनाआग्रा व अजमेरच्या प्रांताची सुभेदारी

मिळाली. शिवाय पन्नास लाख रुपये आणि पंजाब, सिंध व गंगेच्या दुआबात चौथाई वसूलीचे अधिकार मिळाले. म्हणजेच दिल्ली दरबारात शिंदे होळकर व रघुनाथरावांनी केलेला प्रवेश वा हस्तक्षेप हा श्रेष्ठतम मुत्सुद्दीगिरीचा नमुना आहे. पुन्हा दिल्ली बादशहाने घाबरुन १७५२ मध्ये पंजाब व मुलतान प्रांत आब्दालीस देऊन टाकले.

आब्दाली १७५५ ला चौथी स्वारी करुन पंजाब, दिल्ली मथूरा जिंकुन ती लूटून घेतली. परत जाताना नजीबखानास दिल्ली बादशहाच्या पदावर बसून तर मुलगा तैमुरशहाला लाहोर येथे आपला प्रतिनिधी नियुक्त करुन परत गेला. पण हे गाजीउद्यीनला मान्य नसल्याने त्यांनी पुन्हा मराठ्यांनामदतीसाठी येण्याचे आमंत्रण दिले तेव्हा राघोबादादानी मल्हाररावास सोबत घेऊन

**३.१.४१ सावनूरवर विजयः**

पेशव्यांनी आपल्या सैन्यास कवायती फौजे शिक्षण घेतलेल्या मुझफरखानास इ. स. १७५० ला नोकरीस ठेवले. पण अंबाजी पंत परंदरे यांचे चिरंजीव महादजीपंत व मुझफरखान यांच्या गटात मतभेद होऊन मुझफरखान सावनुरच्या नवाबाकडे आश्रयास गेला. तेव्हा पेशव्यांनी त्या सरदारास परत मागितले असता सावनूर करानी ऐकले नाही, तेव्हा पेशव्यांनी भाऊसाहेब मल्हारराव होळकर विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांना सोबत घेऊन सावनूरकडे फौज रवाना केली. याशिवाय नागपूरचे भोसले यांनी दहा हजारांची फौज मदतीस पाठविली. कृष्णा नदी पार करुन बागल कोटचा किल्ला जिंकुन सावनूरकडे निघाले. पण वाटेत नवाबचा मुख्य वजीर शहानवाजखान पेशव्यावर नजर ठेवून होता. तेव्हा पेशव्यांनी त्यास निरोप पाठवून मदतीस बोलाविले. तेव्हा निजामाच्या वजीराने पेशव्यांच्या मदतीस फ्रेंच सरदार बुसीला सैन्य देऊन पाठविले. तरी पण पेशव्यांना निजामाची मदत घेणे हे आपल्या शिपाईगिरीस शोभणारे नाही.तेव्हा पेशव्यांनी मल्हारराव व विचुरकरांना बोलावून निजामाची मदत येण्यापूर्वीच सावनूर जिकले पाहिजे. तेव्हा मल्हारराव पेशव्यांच्या मताशी सहमत होते तेव्हा त्यांनी सावनूर जिंकण्यासाठी. विठ्ठलराव विंचूरकर हे मोठे तरवार बहाद्दर आणि आणीबाणीच्या प्रसंगी उपयोगी पडणारे असे सरदार आहेत; पण त्यांना ग्वाल्हेरचा किल्ला जिंकताना आलेला खर्च त्यांना अद्याप मिळालेला नाही. उलट त्यांना जाटाबरोबर कोणाच्या हुकूमाने लढाई केली असे म्हणून रागावल्यामुळें ते उदास आहेत. जर आपण त्यांस बोलावून त्यांची समजूत कराल तर ते व मी मिळून आपल्या म्हणण्याप्रमाणें नबाबाची मदत येण्यापूर्वीच किल्ला सर करू. त्याप्रमाणे पेशव्यांनी या दोघांना सावनूरची मोहिम फत्ते करण्याची जबाबदारी सोपविली. तेव्हा ते पेशव्यांना म्हणाले. 'यश येणें श्रीमंतांचे पुण्यप्रतापावर आहे; स्वामिसेवेंत शिकस्त करणें हे आमचें कर्तव्य आहे; ते करण्यांत आम्ही कसूर करणार नाहीं!' [९७]

त्यानुसार मल्हाररावांनी फौजेस पहाटे चार घटका रात्र असतानाच कूच करण्याचे ठरले. ते सावनूरला पोहचताच किल्ल्याचा दरवाजा हत्तीच्या साहाय्याने तोडून किल्ल्यात प्रवेश

मिळविला तोपर्यंत सावनूरकरांकडे कवायती फौज होती. त्यांनी तोफा डगण्यास सुरूवात केली. पण मराठा सैन्याने मुसांडी मारत किल्ल्यावर विंचूरकरांचे सरदार सरजेखान व मत्तेखानाने त्यांचा ध्वज खाली पाडुन आपले पागोटयाचे निशान चढवताच शत्रूंचे सैन्य पळायला लागले. मोहिम फत्ते केली. तेव्हा मल्हारराव विचुंरकरांना पेशव्यांच्या गोटात नेऊन ग्वाल्हेरच्या मोहिमेत झालेले बारा लाख रुपये खर्च देण्याचे मान्य करुन या रुपयाची वरत गोविंदपंत बुंदेल यांच्यावर सोपविली. व विंचूरकरांकडीलच्या त्या दोन सरदारास पागेची वस्त्रे व एक उंची पोषाख बहाल केला. सावनूरकर शरण आल्याने त्यावर तह लादला. त्यानुसार 'श्रीमंतांनीं सावनूरचा किल्ला तेथील नबाबास परत द्यावा; व त्याजबद्दल नबाबानें त्यांस आपल्या संस्थानापैकी कांहीं मुलूख द्यावा; व स्वारीचें मूळ कारण जो मुझफरखान त्यास नबाबानें आपले नोकरीवरून बरतर्फ करावें.'[९८]

**३.१.४२ शहाजादी बेगम मलकाजमानीचे आब्दालीस विनंती:**

मराठा फौजेच्या चौफेर विजयाने संपूर्ण हिंदुस्थानभर वर्चस्व वाढत गेल्याने मुस्लीम सत्ताधिशांस कोणी भिक सुद्धा घालत नव्हते. एवढे उतरती लक्ष पाहून खुदद दिल्ली बादशहा अहमदशहाची शहाजादी बेगम मलकाजमानीस खूपच वाईट वाटल्याने तिने आयोध्याचा नवाब मनसूर अलीचा मुलगा सुजाऊद्यौला व नजीबखान यांच्या मार्फत कंदाहरचा बादशहा अहमदशहा आब्दालीस येथील झालेली दैनिय अवस्थेबददल कळवून विनंती केली. 'जर आपण इकडे येऊन मुसलमानी बादशाहीची अब्रू राखाल तर तुमचा मुलगा तिमुरशहा यास मी आपली मुलगी चंदाजमानी ही देऊन दिल्लीच्या तक्तावर बसवीन.'.[९९]

असे झाले तर दिल्ली बादशहाच्या वजीर पदी सुजाऊद्यौला बक्षी पदी नजीबखानास व बादशहापदी अलमशहा दुसरा यांस करता येईल असा बेत तिने केला. त्यानुसार आब्दाली दिल्लीवर चालून येताच नजीबखानाने साहय करुन दिल्ली. जिंकून ती लूटली. दिल्ली बादशहा अहमदशहास व गाजीउद्दीन वजीरास कैद करुन लगेच मथुरा, वृंदावन व गोकूळ जिंकुन घेतले. यमुना नदी काठी मुक्काम असताना गाजीउद्दीनने पाण्यात उडी टाकून आग्रा किल्ल्यात आश्रयास गेला. तेव्हा आब्दालीने किल्ला सर करण्याचा प्रयत्न केला. तेथे यश मिळत नसल्याने सुरजमल जाटावर चालून जाणार पण दक्षिणेस मराठे येत असल्याचे समजताच ते परत कंदाहारकडे निघुन गेले. ३१ डिसेंबर १७५६ रोजी राघोबादादानी मल्हारराव होळकरांस फौजेच्या खर्चासाठी दिले त्यांचे पत्र— अंतर्वेद प्रांतातील परगणे फत्तेपूर, कुवरपूर, कटिया गुजर या महालांची जम रू ३१४५८१ तीन लक्ष चौदाहजार पांचशे एक्यांयशी सालिना तुमच्या फौजखर्चास दिले आहेत.[१००]

### ३.१.४३ राघोबादादा व मल्हाररावांची उत्तर मोहिम:

राघोबादादा व मल्हारराव होळकर हे मराठ्यांचे उत्तरेकडील महत्वाचे शिलेदार होते. यांनी आब्दालीचा सामना करण्यासाठी उत्तरेस निघाले. चंबळ नदी पार करुन सुरजमल जाटाकडून खंडणी वसूल करुन पुढे गेले.

### ३.१.४३.१ नजीबखानास जीवदान:

दिल्लीचा वजीर गाजीउद्दीनला भेटून दिल्लीवर स्वारी केली. दिल्लीच्या किल्ल्याचा किल्लेदार नजीबखान हार मानायला तयार नव्हता; पण मराठयांच्या माऱ्यापुढे त्याचा निभाव लागत नाही; हे ओळखून मल्हाररावाकडे वकिल पाठविला. 'मी आपला धर्मपुत्र आहें; माझा बचाव करावा. मी तुमचे उपकार विसरणार नाही.'[१०१] राघोबादादांना भेटून विनंती केली त्यामुळे नजीबखानास जीवदान देऊन त्यास रोहिलखंडात शुक्रतालला जाऊ दिले. दिल्ली ताब्यात घेऊन आलमशहास बादशहा पदी बसवून गाजीउद्दीनला वजीर पदी नेमून शहराची व्यवस्था पाहण्याचे काम अंताजी माणकेश्वरकडे सोपवून लाहोर कडे निघाले

### ३.१.४३.२ मराठ्यांचा अटकेवर विजय:

१८ सप्टेंबर १७५७ ला मल्हारराव होळकर व राघोबादादानी नजीबखानाचा बंदोबस्त केल्यानंतर ते पंजाबकडे मोर्चा वळविला. जाताना वाटेतील रोहटक, लोणी, बागपत बडौत व सहारनपूर जिंकत जिंकत खंडणी वसूल करीत करीत पुढे गेले. नंतर थानेश्वर व सरहिंदवर हल्ला करुन ताब्यात घेतले. तेव्हा आब्दालीचा पुत्र तैमूर व त्याचा सेनापती जहानखान लाहोर सोडून पळून गेले. इ.स. १७५८ ला पंजाबवर स्वारी करुन अटकेपर्यंतचा भाग जिंकून घेतला तेथून त्यांचा मुलगा तैमूरशहाला पिटावून लावले. मराठ्यांनी लाहोर जिंकून साबाजी शिंदे यांची नियुक्ती केली. लाहोरचा पूर्वीचा सुभेदार संदीप बेग यास आब्दालीने ठार करुन त्याच्या बायका व मुलास कैदेत ठेवले होते. राघोबांदादा व मल्हाररावांनी २० एप्रिल १७५८ रोजी लाहोर जिंकून त्या सर्वांची सुटका केली. त्यांस पाच हजार स्वार देऊन नोकरीस लाहोरला ठेवले. त्यांचा दिवाण म्हणून लक्ष्मी नारायण यास देऊन पुढे पंजाब मुलतान प्रांताकडे निघून गेले. राघोबांदादास व सुभेदार मल्हारराव यांनी मोठे यश मिळवित पुढे अटक गावावर विजय मिळवून अटकेवर 'भगवा जरीपटका' फडकाविला.[१०२]

अटक गावात त्यांनी एक महिना तळ ठोकला. मराठ्यांचाहा सर्वात मोठा विजय होता. मल्हाररावांना तीन वरशात विलायेतीत आब्दालीचे नाव राहू देणार नाही. यैसा रा. मल्हारबानी वगैरे सरदारानी स्वामीपासी विडा विचलला आहे.[१०३] कृष्णाथडीच्या घोड्यास अटकेचे पाणी पिता आले. रघुनाथरावांची राजकीय परिपक्वता सदाशिवराव भाऊ आणि नानासाहेबापेक्षा अधिक होती हे कोणालाही मान्य करावे लागेल. मल्हारराव व रघुनाथराव यांनी अफगाणिस्थानात जावून झेंडा लावला. अशा अनेक पराक्रमामुळे, मल्हाररावांची ओळख पराक्रम, धाडस, इमानदारी, स्वराज्यप्रेम, औदार्य आणि सर्व समावेशकता दिसून येते. त्यानंतर

राघोबादादा व मल्हाररावांनी त्यांचा पाठलाग करीत रावी नदी व चिनाब नदीपर्यंत गेले. तिथे एक महिना राहून त्या जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था करुन १४ जून १७५८ वापस निघाले.

नंतर राघोबादादा फक्त आपले सैन्य घेऊन दक्षिणेकडे मल्हाररावानाच्या अगोदर पुढे पुढे निघाले. राघोबादादा दक्षिणेकडे जाताना मार्गात जनकोजी शिंदेची भेट झाली. त्यावेळी राघोबांनी शिंद्यांनी कोणती मोहिमा हाती घेऊन विचारले 'दादासाहेब, आपण सर्व हिंदुस्थान काबीज करून अटकेस झेंडे लाविले; जातां आम्हीं कोणत्या प्रांतावर स्वारी करावीं?' तेव्हा राघोबादादा म्हणाले की 'तुम्ही नजीबखानावर स्वारी करून त्यास तेवढा ठार करा; आम्हींच त्याचें पारिपत्य केलें असतें परंतु तो मल्हाररावांस शरण गेल्यामुळें त्यांची भीड आम्हांस तोडवेना... तेवढा नजीबखान मात्र तुम्ही नाहींसा केला पाहिजे!'[१०४] लाहोरहून परत येताना मल्हारराव होळकर यांनी मदत केली. मल्हारराव होळकर यांना पंजाबकडून परत येताना खानदेशात भिल्ल जमातीच्या लोकांनी बंडाळी माजवली त्यांचा बिमोड केला.

### ३.१.४४ माधव सिंहावर हल्ला:

जयपूरच्या माधवसिंहाकडे खंडणी वसुल होत नव्हती. तेव्हा सुभेदारांनी जयपूर हल्ला करुन खंडणी वसुल केली. तेव्हा आसपासच्या प्रदेशातील शासकांनीही घाबरुन इशरदा, मेवाड व झीलरा येथील वकील भेटीस येऊन त्यानीही खंडणी दिली.

### ३.१.४५ जनकोजी शिंदेशी उत्तरेत भेट:

जनकोजी शिंदे उत्तरेकडे निघाले. तर मल्हारराव होळकरांची दक्षिणेकडे येत असताना जनकोजी व सुभेदार यांची भेट झाली. 'सुभेदार तुम्ही तर अटकेस झेंडे लावून सर्व मुलूख पादाक्रांत केला; आतां आम्हांस स्वारी करावयास निव्वळ असुंदे राज्य कोणतें आहे?' त्यावर मल्हारराव होळकर म्हणाले तुम्हांस रान येक आहे; भागीरथीस पूल बांधोन अयोध्येस जावें; सुजाउद्दवल्यास तंबी पोंचवून पाहिजे त्तिके रूपये मिळतील. रान असुदें आहे... त्यांत दहापांच किल्ले भारी असतील त्यांत ठाणीं घालावीं म्हणजे चित्तास येईल तेव्हा श्वेतबंधासारखें जावयास येईल..[१०५] मल्हारराव होळकरांनी जनकोजी शिंध्यांसोबत तुकोजीराव होळकरांना दोन हजार फौजे निशी ठेवून उज्जैनला आले. त्यानंतर दक्षिणेतून जनकोजी शिंदेकडे उत्तरेस जाण्यासाठी भाऊ दत्ताजी शिंदे हा निघाला. राघोबादादाची वाटेत भेट घेऊन पुढे निघाले. त्यानंतर मल्हाररावांची उज्जैन येथे भेट घेऊन पुढे जकोजीकडे उत्तरेकडे निघाले. तर मल्हारराव होळकर इंदौरला आले.

### ३.१.४६ उत्तर मोहिमेने कर्ज वाढल्याचा ठपका:

मल्हारराव होळकर व राघोबादादानी हाती घेतलेल्या उत्तर मोहिमेवरून परत आल्यानंतर पुण्यातील पेशव्यांचा कारभारी सदाशिव भाऊ यांनी साठी ऐंशी लाखाचे कर्ज झाल्याचे काका राघोबादादास निदर्शनास आणून दिले. या उत्तर स्वारीमध्यें एकंदर प्राप्तीपेक्षा खर्चच फार झाल्याने दौलतीस (राज्यास) ऐशीं लक्ष रूपये कर्ज झाले होतें. हे सदाशिव भाऊना सहन न

झाल्याने ते राघोबास म्हणाले की, स्वारीस जाऊन द्रव्य मिळवून आणावयाचें ते एकीकडेसच राहून कर्ज घेऊन परत यावें हा कोठचा शहाणपणा? यावर राघोबादादा शांतपणे उभे राहून म्हणतात की 'भाऊसाहेब, मनुष्यानें प्रत्येक गोष्टीचा अनुभव घेतला पाहिजे. स्वारीच्या कामीं कित्येक वेळां किफायत होते, आणि कित्येक वेळां नुकसानही होतें... आम्ही गादीशीं बेइमानीपणा करून मिळकत न दाखवितां कर्ज मात्र दाखवितों; त्यास येथून पुढें स्वारीचीं कामें आपण करावीं; आम्ही येथें राहून कारभार पहात जाऊं.[१०६]

मल्हारराव होळकर उत्तर मोहिमेवरून परत आल्यावर त्यांनी इंदूरची अंतर्गत व्यवस्था लावण्यात कार्यमग्न असताना पुणे दरबारात मात्र उत्तर मोहिमेवरून सरकारास कर्ज झाल्याने नाराज असल्याचे होळकरांच्या वकीलाने कळविल्याने मल्हाररावांनी आपला कारभार गंगाधर यशवंत व अन्याना पळशीकर यांस पुढे पुण्यास पाठविलें. त्यानंतर स्वत: मल्हाररावांनी आठ दहा हजार फौज घेऊन जेजुरीचे देवदर्शन घेतले. तेथून ते पुण्याकडे जाण्यासाठी निघाले पण त्यांनी आंबेल ओढण्याच्या काठी मुक्काम टाकला. तेथील मुक्कामी त्यांनी संताजी वाबळे व मोत्याजी खराडे यांनी मल्हारराव होळकर चर्चा करुन मल्हारराव होळकर पालखीत वसुन दहा स्वारा सोबत पूण्याकडे निघाले. हे पेशव्यांना कळताच त्यांनी भाऊसाहेबासंह चाळीस स्वारा सोबत पुण्याजवळ कुंभारवेशी जवळ सुभेदार व पेशव्यांची भेट झाली.

पेशवे निघून गेल्यावर सुभेदार काही वेळेनंतर पूण्यात जाऊन पोहचले तेव्हा रात्र झाल्याने ओसरीतच बिंबाजी नायकाच्या शेजारी गादी टाकून झोपी गेले. त्यांनतर थोडया वेळेने नानासाहेब पेशवे व सदाशिवभाऊ बाहेरून आल्यावर चौकीदाराने सांगीतले की, 'सुभेदार चार घटिका जाहल्या ओसरीवर येऊन माणसा काणसांत निजलें आहेत..[१०७] तेव्हा पेशवे ओसरी जवळ येऊन म्हणाले की, 'सुभेदार जागे आहेत कीं, त्यांस झोंप लागली आहे?[१०८] तेथे बंबाजी नाईक जागा होता. तो उठून मुजरा करत म्हणाला, 'डोळा लागला आहे; आज्ञा जाहल्यास जागें करितों.'[१०९] या संभाषणमुळे तेवढयात मल्हाररावांना जाग आली. तेव्हा उठून हात जोडून व लवून रामराम करीत असताना नानासाहेब पुढे येऊन समोरच्या गादीवर सुभेदारांचा हात धरून बसवित म्हणाले की, 'सुभेदार! आपण रायांचे ठायी, आज पावेतों आपलेंही करणे वडील-पणासारखेंच, आजच 'लवून रामराम करणें; हात जोडणे कोठून आणिलें?[११०] तेव्हा सुभेदार पेशव्यांच्या शेजारी उभे असलेल्या भाऊसाहेबाकडे पाहत आदराने म्हणाले की, 'बाबा तू उभा? बैस, तुला काय प्राण घेणे, कैद करणे, ते कर![१११] यावरून असे स्पष्ट होते की, उत्तर मोहिमेच्या खर्चावर पेशव्याचा रोष नसून तो भाऊसाहेबांचा होता हे सुभेदार ओळखून होते.

पेशवे जवळच्या गादीवर बसले. तेव्हा सुभेदार उभयतास बोलत होते आम्ही बाळाजीपंत व बाजीराव यांची अनेक राजकारणे पाहत मोठे होत असताना त्यांच्या आदेशाने अनेक मोहिमा फत्ते केल्या. पण आता त्यानुंसार कार्य केले तरी आपला रोष आमच्यावर आहे

म्हणून आम्हाला तुम्ही द्याल ती शिक्षा भोगण्यास तयार आहे. हे सुभेदारांचे उदासिनतेचे व निर्वाणीचे ऐकून नानासाहेब फार दु:ख झाले व डोळयात पाणी आणित म्हणाले की, 'आपण अशा गोष्टी बोलुं लागला, यात आमचें विषम काळाचे सूचक दिसतें.'[११२]

सुभेदारव पेशव्यात एकमेकांची मनधरणी चालू होते शेजारी उभ्या असलेल्या सदाशिवभाऊ कारभाऱ्याने राज्याचा जमा खर्च पाहुन राज्यास कर्ज डोईजड झाल्यावर त्यातुन मुक्त होणे फार कठीण पडेल असे म्हणताच सुभेदार म्हणाले की, भाऊसाहेब तुम्हास शपथ आहे खरोखरच दौलतीस किती कर्ज आहे?'[११३] तेव्हा सुभेदार या कर्जाची विभागणी करुन 'याद धर तीस लक्ष आपले नांवें लिहिले; तीस लक्ष शिंदे यांचे नांवें लिहिले.'[११४] असे सांगून पुढील पंधरा लाखाची बाकी विंचूरकर, अंताजी माणकेश्वर वगैरे सरदाराकडून घेता का? की मी घेऊन देवू? सदाशिवभाऊ इथेच न थांबता पुढे बोलतात की, 'आम्ही घेऊ परंतु साठ कधी पटतील?[११५] असे म्हणताच सुभेदारानी बिंबाजी नाईकास तात्काळ पुण्यातील विठ्ठल महादेव गद्रे यास बोलावण्यासाठी पाठविले. ते येताच सर्वासमक्ष म्हणतात की, 'भाऊसाहेबांस आज साठ लक्ष रुपये द्यावे![११६]

भाऊसाहेबांचे कर्ज मल्हाररावांनी एका ठिकाणी उभे राहूनच चूकते केले. तेव्हा सदाशिवभाऊ मल्हाररावांना म्हणाले की 'आपलेसारखी माणसे दौलतीत असून कर्ज कर्ज कोठून राहील?[११७] सुभेदारांना आतून नानासाहेब पेशव्यांच्या मातोश्री काशीबाईने जेवन करुन जाण्याचा आग्रह केल्याने ते तिघेही जेवन करुन आपल्या डेऱ्यात निघून गेले. सावकार विष्णुपंत दुसऱ्या दिवशी होळकरांच्या छावणीत येऊन कारभारी गंगाधर याच्यांशी भेटले. तेव्हा साठ लक्ष रुपयांची भरपाई म्हणून त्यांना महालनिहाय साठ लाख रुपयांची वराती करुन दिल्या.

**३.१.४७ शुक्रतालची लढाई :**

दत्ताजी शिंदेने जनकोजी शिंदेची भेट घेल्यानंतर दोघानेही दिल्ली, पानिपत, कुरुक्षेत्र मार्गे कुंजपुऱ्यास पोहचले. तेथे गोविंदपंत बंदेल यांची भेट घेऊन पुढील रणनीतीबद्दल चर्चा झाली. त्यानुसार भागीरथी नदीवर पूल बांधण्यासाठी नजीबखानास खास दुत पाठवून बोलावून घेतले. नदीवर पुल बांधण्याविषयी चर्चा झाल्यावर नजीबखान शिंद्यांना येथेच सोडून भागीरथी नदीकडे निघाला. वाटेत असतानाच गुप्तपणे आयोध्याच्या सुजाउद्योलास निरोप पाठविला. 'दत्ताजी शिदें आपणांवर स्वारी करण्याच्या विचारांत आहेत, तथापि जर आपण मला पूर्ण मदत कराल तर मी त्यांस भागीरथी उतरून पलीकडे येऊं देत नाहीं.' त्यामुळे सुजाऊद्यौलाने नजीबखानाचे आभार मानून आलेल्या वकीलामार्फत निरोप दिला की, 'माझी या कामांत आपण पूर्ण मदत आहे. पांच कोटीपर्यंत रुपये, पन्नास हजार सैन्य व तीनशें तोफा इतकें मी आपणांस पाठवितो.[११८]

पण दत्ताजी शिंदेनी कपटी, दगाबाज व निमकहराम नजीबखानावर विश्वास ठेवून भागीरथी नदीवरचा पूल बांधून तयार झाला. तरी शिंद्यास पावसाने पूल बांधता आला नाही. असे सांगून उलट त्या तयार झालेल्या पूलावरुन सुजाऊद्योलाची फौज बोलावून घेतली. तर कंदाहरचा बादशहा अहमदशहा आब्दालीस यास नंगीबखानाने मदतीस येण्याचा खास निरोप पाठवून कळविले. 'आम्हांवर मराठ्यांनीं स्वारी केली आहे, तरी आपण जलदीनें आमच्या कुमकेस यावें.[११९] दत्ताजी व जनकोजी शिंदे म्हणजेच काका पुतन्यानी शुक्रताल जवळ तळ टाकला. तसेच दिल्लीच्या बादशहा अलमशहास नजीबखानाने अगोदरच संधान बांधून फितवल्याचे पत्र ज्यावेळी वजीर गाजीउद्दीन यास सापडले. तेव्हा त्याने बादशहाचा शिरच्छेद करुन दत्ताजी शिंद्यांस जाऊन सर्व गोपनिय खलबते सांगितले. त्यावेळी आपण आत पूर्णपणे घेरलो आहोत. हे कळताच मल्हारराव होळकरांना तात्काळ येण्याची विनंती केली. 'तुम्ही जयपूरचा शह (वेढा) सोडून जर लागलीच इकडे याल तर तुमची आमची भेट होईल, नाहीं तर हीच पत्राची भेट.'[१२०]

तेव्हा दत्ताजी शिंदे यमुना नदी ओलांडून शुक्रताल येथे गेले. तरी नजीबखानाने यमुना नदी पार करुन आपले दोन हजार रोहिले सैन्यानिशी शिंदे बंधुवर हल्ला केला. काही वेळातच जनकोजी शिंदेस शत्रूची गोळी लागल्याने जख्मी झाले. पण दत्ताजी शिंदेसही गोळी लागल्याने ते घोडयावरुन खाली पडले. तेव्हा नजीबखानाचा गुरु कुतुबशहाने इ.स. १७६० दत्ताजी शिंदेचा शिरच्छेद केला. याशिवाय सरहिंदचा सुभेदार अबुस समदखान, मोमीनखान आणि नजीबचा सख्खा चुलतभाऊ नाजाबतखान या मराठा पक्षातील सरदारांची ही कत्तल केली.

**३.१.४८ दत्ताजी शिंद्यास मदतीसाठी**

मल्हारराव होळकर दत्ताजी शिंद्यास मदतीसाठी जाताना वाटेत जयपूर लागले माधवसिंगाकडून ठरल्याप्रमाणे तो दरवर्षी साडे तीन लाख रुपये नियमित खंडणी देत होता. पण नजीबखानाने माधवसिंगास फितवून खंडणी देण्यास उशीर करावा. तोपर्यंत मी दत्ताजीचा काटा काढतो असे आतून दोघांत ठरलेले होते. विशेष म्हणजे माधवसिंग व नजीबखानास यादोघासही मल्हाररावांनी जीवदान दिलेले होते. संधी साधु दोघांनी मल्हाररावास अंधारात ठेवून सुभेदारांना माधवसिंग खंडणी देण्यास चालढकल करीत होता. तेव्हा सुभेदारांनी वेळेचे महत्व लक्षात घेऊन शिंद्यांच्या मदतीसाठी खंडणी वसूल न करताच ते पुढे निघाले. काही कोसावर शिंदे असतील काही शिंदेचे स्वार वाटेत भेटले. तेव्हा सर्व घडामोडी सुभेदारांना कळाल्या की. 'सध्या जखमी जनकोजी शिंदे, बायकामुलें व लुटलेलें लष्कर यांसुद्धां येथून दोनआडीच कोसांवर कोटपुतळीस मुक्काम करुन राहिले आहेत'

मल्हाररावाना हे ऐकून मोठा धक्काच बसला; खूप मोठा शोक करु लागले. तेव्हा पत्नी गौतमाबाईने शांत करण्याचा प्रयत्न केला. 'तुम्ही चांगले शूर, अनुभवी व पोक्त सरदार असून या समयीं शोक करीत बसला हें काय? जनकोजी शिंदे जखमी असून त्यांच्याबरोबर

बायकामाणसें दु:खी कष्टी आहेत; तर त्यांस भेटून त्यांचें समाधान करावें हेंच तुम्हांस सध्या योग्य आहे.'[१२१] गौतमीबाई चतूर दयाळु व राज्यकारभाराची जाणीव असले बुध्दीमान व्यक्तिमत्व होते. सुभेदार मल्हाराव होळकर उत्तर मोहिमेवर असताना गौतमाबाईने पत्र पाठविलेले होते त्यातून त्याचा समजदार पणा व वेळेचे प्रसंग अवधान दिसून येते.

सुभेदार जलद कुच करुन शिंद्यांच्या तळावर पोहचले. तेव्हा भागरथीबाई व काशीबाई झाडाच्या सावलीस बसल्या होत्या गौतमबाईस पाहताच दु:खाचा शोक सर्वांना अनावर झाला. मल्हारराव होळकरांची वेळेवर आलेली कुमक पाहून जनकोजीस फार दु:ख अनावर झाल्याने सुभेदाराना मिठ्ठी मारुन दोघेही शोकाकुल झाले. नंतर मल्हाररावानी सर्व साहित्य जनकोजीस देऊन शोक शांत केला. तेवढ्यात सूरजमल जाटाकडून निरोप आला की, 'गिलचांची फौज तुम्हांवर चाल करुन येण्याच्या तयारींत असतां तुम्ही स्वस्थ कसे बसलां?

त्यामुळे सुभेदारांनी त्तकाळ जनकोजी शिंदे त्यांचा दिवाण रामाजी अनंत व यांचा दिवाण गंगाधर यशवंत या मंडळीशी पुढील वाटचालीची खलबते सुरु झाली. त्यावेळी सुभेदार जनकोजी शिंदेस म्हणाले की, 'बाबा, गिलचांची दौड भारी; सहजी चालणें म्हणजे कच्चे चाळीस कोस! तेव्हां, तुम्ही जखमी असल्यामुळें, मार्गांत तुमची निभावणूक होणार नाहीं... पलीकडे जाऊन रहावें; आणि तुमचे रामाजीपंतास व आमचे गंगाधरपंतास सड़या फौजेनिशीं या प्रांतींच ठेवावें.[१२२] त्यावर जनकोजी शिंदे सुभेदारांचे काही केले तरी ऐकत नव्हता. तो मल्हाररावांस व चुलते दत्ताजीच्या देह पडला ती भूमी सोडुन जायला तयार नव्हता. नजीबखानाविरूध्द सूडाने पेटुन उटलेला होता. त्यामुळे तो सुभेदारांचे काही केले तरी तो ऐकावयास तयार नव्हता, तेव्हा सुभेदार रागाने आपल्या डेऱ्यात गेल्यावर तिथे त्यांच्या पत्नी गौतमाबाईने समजूत काढून दिल्यावर मोठा आधार देत जनकोजीकडे जाऊन सुभेदारास त्या म्हणाल्या की, 'जनकोजी शिंदे हे वयानें लहान-केवळ मुल-असतांही त्यांची एवढी हिंमत!... असे धैर्य सोडतां हें काय?... आजपर्यंत केलेल्या मर्दुमकीस व मिळविलेल्या यशास पूर्ण काळिमा लागेल!... त्यास अनुमोदन द्यावें हेंच उत्तम आहे.

तेव्हा मल्हाररावानी एक निर्णय घेऊन ते जनकोजीकडे जाऊन त्यास समजूत करुन म्हणाले की, 'तुम्ही आम्ही सड़या फौजेत राहून बायका मूले व बुणगे झाडून माळव्यांत लावून द्यावी...'[१२३] हा सुभेदारांचा निर्णय मान्य झाल्याने बायकामुले व बुणगे यांच्या परतीच्या कुचाची करुन रामजीपंता सोबत केरोली जाटाच्या प्रदेशातून जाण्यास सांगून पाठवून दिले. दत्ताजी शिंदेची पत्नी भगीरथीबाईने मार्गक्रमण करताना दहावा दिवस चंबळ नदी काठी केल्यानंतर सर्व मंडळी कुंवारी नदीकाठी मुक्कास पोहचले. तिथे तिथे तेराव्या दिवसाच्या उत्तरक्रियेचा विधी अटोपून घेतला. भगीरथीबाई गरोदर असल्याने तीस दिवस भरलेले होते तेव्हा ती त्याच दिवशी रात्रीच्या वेळी प्रसूत होऊन मुलगा जन्मास आला. तेव्हा तोफांची सरबती करुन डेऱ्यात हत्तीवरुन साखर वाटली. दु:खाचा थोडा विसर पडुन आनंद हर्षउल्हासाचे वातावरण निर्माण

झाले. पाच दिवसाच्या मुक्कामानंतर सर्व मंडळी माळव्यात पोहचली तेथुन शिंदे परिवार उज्जैनला तर होळकर परिवार इंदूरला गेले. तिकडे होळकर शिंदे आपापली फौज सज्ज करुन मारवाड प्रांताकडे कुच केले. पण तिकडे गिलचयांची फौज येत असल्याचे कळताच यांनी पानिपत कर्नोल कडे मार्गस्थ झाले. नंतर ते तेथून दिल्ली, आग्रा, जयपूर, उदेपूर वगैरे प्रांतांत अनुक्रमें शत्रूस हुलकवण्या देत ते फिरुं लागलें.

पुढे मराठा फौज त्याच्या मागे आब्दालीची फौज असा ससेमिरा सुरु झाला. मराठे दिल्ली नंतर जलद हालचाली करुन अंतर्वेद प्रांती शिंकदर येथे येऊन त्यानंतर यमुना नदी पार करुन मैदानात मुक्काम टाकला. तेवढयात सुरजमल जाटाचे पत्र आले की, 'गिलचांची फौज दिल्लीनजीक यमुना उतरून अंतर्वेद प्रांतांतून तुम्हांवर चालून येत आहे.' सर्वा समक्ष याबाबत चर्चा होऊन पून्हा मार्गस्थ झाले खरे पण सरदाराना वाटू लागले की, 'एकवार गिलच्यांशी टक्कर मारावी, उगीच पळण्यांत काय अर्थ आहे?' म्हणून सुभेदार मल्हारराव होळकर जनकोजीकडे जाऊन म्हणाले की, 'तुम्ही आम्ही आतां एकत्र झालों आहों, तर एकवर पुनः गिलच्यांशीं सामना करूं;' पण जनकोजीच्या जखमा व सैन्याची भिती आणखीन ओल्याच असल्याने ते सुभेदाराना म्हणाले की, 'सुभेदार... आमच्या लोकांनी धास्ती खाल्ली आहे सबब आमचा धीर होत नाहीं... तुम्हींच एकटे राहून लढाई करावी.' असा जनकोजीचा नकारात्मक सूर ऐकुन सुभेदाराना राग आल्याने ते आपल्या डेऱ्यात जाऊन कारभारी गंगाधरपंत व अन्याबा पळशीकरास विचारविनिमय केला. तेव्हा सुभेदारानी गंगाधरपंत म्हणाले की, 'तुमची मर्जी एकवार टक्कर देण्याची आहेच तर तुम्ही आपल्या सर्व फौजेनिशीं येथें राहून मोठ्या खबरदारीनें लढाई करावी. मी त्यांच्याबरोबर जातों.'[१२४] त्यानुसार सुभेदारांनी जनकोजीकडे जाऊन आपण सर्व लगेच कुचाची नौबत ते आग्राकडे निघाले. पण यमुना नदीस पूर आल्याने नदी पार करणे कठीण होते. तरीपण उशीरा नदीचा उतार सापडल्याने रात्रीच नदी पार करुन सकाळी आग्राजवळच्या प्रदेशात पोहचले. तर तिकडे आतापर्यंत राहिलेल्या फौजेत गंगाधरपंत, अन्याबा पळशीकर, शेटीबा खराडे, संताजी वाबळे वगैरे होळकरांचे सैन्यातील अनेक मुख्य सरदार आब्दालीशी दोन हात करण्यास तयार होते. तेवढयात आब्दालीच्या सैन्याची पहिली तुकडी समोरून येता त्याचा होळकराच्या सैन्यानी धुव्वा उडविला. पण त्यापाठोपाठ आब्दालीचे सर्व सैन्य येऊन मिळत गेल्याने त्यांच्या अफाट सैन्यापुढे होळकरांच्या मोजक्या सैन्याचा निभाव लागत नव्हता. तरी पण शत्रूशी लढा चालूच ठेवला. दिवाण महिपंतराव व शेटीबा खराडे जखमी होऊन खाली पडले. तेव्हा शेटीबाचा मुलगा वडीलांचे मुंडके मांडीवर घेऊन शोक करीत बसला होता. हे एका पठाणे पाहून तो जवळ येताच शेटीबांनी त्यास अतिशय दीन मुद्रेने विनंती केल्याने त्या पठाणाने मोठी हिमंत करुन यमुना नदी पार करुन मराठी फौजेत आणून सोडले. तर या धुमश्चक्रीतून स्वतःस वाचवून बरेच मराठा सैन्य व गंगाधर पंतासह पलायन करून काही आग्राकडे तर काही रामगडाकडे जाऊन शेवटी आग्रास

असलेल्या मल्हारराव होळकर व जनकोजी शिद्यांस जाऊन मिळाले. नंतर सर्व मराठा सैन्याने सुभेदारासह व जनकोजीसह जयपूरकडे गेले.

**३.१.४९ उदगीरची लढाई:**

मराठ्यानी हैद्राबादच्या निजामाशी सत्त पारनेर, कुकडी व घोड नदी किनारी पराभव केला. २४ नोव्हेंबर १७५२ रोजी त्यांच्याशी भालकीचा करार करुन स्वत:ची सुटका केली. तरी पण तो सत्त मराठ्यांनात्रास देत राहिला. पुन्हा १२ डिसेंबर १७५७ ला निजामाने सिंधखेडचे रामचंद्र जाधव व म्हसवडचे सरदार नागोजी माने ह्या मराठा सरदाराना सोबत घेऊन चालून येताच पेशव्यांनी शिंदे व होळकरांच्या मदतीने पराभूत केले. शिवाय सिंदखेड येथील लढाईत नागोजी माने ठार झाला. (दत्ताजी व जनकोजी शिंदे) निजामाच्या राज्यातील अहमदनगर दौलताबाद, बुऱ्हानपूर व विजापूर जिंकून घेतले.

मराठा स्वराज्यात उदगीरच्या लढाईसाठी स्वत: पेशवे नानासाहेब व सदाशिवभाऊ तसेच राघोबादादा हे सर्व मंडळी निजामावर २६ जानेवारी १७६० चालून गेले. विठ्ठल शिवदेव विंचूरकर, संताजी माणकेश्वर यांनी ३ फेब्रुवारी १७६० रोजी निजामाचा दणदणीत पराभव केला. इब्राहिमखान गारदीचा तोफखाना यशस्वी चालविला गेल्याने मराठयाना यश मिळणे सोपे झाले. आनंदात मांजरा नदीकाठी तळ टाकलेला होता. तेवढ्यात उत्तरेतील दत्ताजीवर ओढावलेला प्रसंगाचे जनकोजीने पाठविलेल्या पत्रावरून त्यांना सर्व हकीकत कळाली. ती 'यमुनेच्या बेटांत झालेल्या लढाईंत काकांनीं (दत्ताजी शिंद्यांनीं) आपणा सर्वांस सोडून स्वर्गवास केला व सध्या आम्ही सर्व फौजेसह पळत आहों,[१२५]

उदगीरच्या लढाईमध्ये नानासाहेब अहमदनगर मुक्कामी असताना ३३ दिवसानंतर म्हणजे १३ फेब्रुवारी १७६० रोजी समजताच नुकत्याच उदगीर लढाईत विजयी होवून आलेल्या सदाशिवभाऊच्या नेतृत्वाखाली सोबतीस दमाजी गायकवाड, आनंदराव पळसकर, यमाजी गावडे, यशवंतराव पवार, नारो शंकर, विठ्ठल शिवदेव विंचुरकर, नाना फडणीस, विश्वासराव. बळवंतराव मेहेंदळे व अंताजी माणकेश्वर यांच्यासारखे मातब्बर मंडळी आब्दालीच्या पारिपत्यासाठी मार्च १७६० निघाले खरे; पण सोबत ऐंशी हजार बाजारबुगणे व वीस हजार सैन्य मजल दरमजल करीत करीत तीर्थक्षेत्रांना भेटी देत देत निघाले.

तेव्हा उत्तर मोहिमांचे व शत्रूचे जाणकर राघोबादादास बैठकीस न बोलाविता त्या सर्वांनी विचारविनिमय चालु केला. पण यांना उत्तरेच्या राजकारणाची विशेष माहिती नसणाऱ्यांचाच भरणा अधिक होता. तरी देखील त्यात बळवंतराव मेहेंदळे यांनी भाऊसाहेबास या उतर मोहिमेचे नेतृत्व करण्याचा सर्वासमोर आपला विचार मांडला. उत्तर मोहिमांचे व तेथील शत्रूचे जाणकर राघोबादादास बैठकीस नसल्याने त्यांना बोलावून घेण्यात आले. तेव्हा राघोबादादानी ऐशीं हजार फौजेस भरनालबंदी व एक कोट रुपये देत असाल तर हिंदुस्थानांत जावून मोहिम फत्ते करण्याचे बोलून दाखविले. तेव्हा पुन्हा एकदा बळवंतराव मेहेंदळे यांनी

सदाशिवभाऊस भरीस घातल्याने भाऊसाहेब स्वत: आपण या उतर मोहिमेवर जाणार असे ठरविले. तेव्हा अनेकांनी त्यांना समजावण्याचा प्रयत्न करुनही उपयोग झाला नाही.

**३.१.५० सदाशिवरावभाऊ उत्तरेकडे रवाना:**

उदगीरच्या लढाईत निजामा विरूद्ध विजय मिळवल्यानंतर उत्तरेत धूमाकुळ माजविणाऱ्या अब्दालीच्या पारिपत्यासाठी पेशवा बाळाजी याने आपला चुलत भाऊ सदाशिवरावभाऊ यास उत्तरेत पाठविण्याचे ठरवले. दमाजी (दुसरे) गाईकवाड, यशवंतराव पवार, सोनाजी भापकर, समशेरबहादूर इब्राहिमखान गारदी हरि दामोदर, तुकोजी व महादजी शिंदे, बळवंतराव गणपत मेहेंदळे, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, नारो शंकर, यमाजी गावडे, नाना फडणीस, आनंदराव पळसकर यांच्यासारखे मातब्बर मंडळी आब्दालीच्या पारिपत्यासाठी मार्च १७६० निघाले. या मातब्बर प्रमुख सरदारांस श्रीमंतांनीं उत्तर मोहिमेस जाण्यासाठी आदेश दिला. तसेच सोबत इब्राहिमखान गारद्याचा अवजड तोफखानाही घेतला वीस हजार मराठी घोडे स्वार, कवायती, गारदी व पायदळ पलटन असे दहा हजार लष्कर पण सोबत ऐंशी हजार बाजारबुगणे निघाले. तसेच सोबत काही खजिना घेऊन मजल दरमजल करीत करीत तीर्थक्षेत्रांना भेटी देत देत निघाले.

सदाशिवभाऊनी खानदेश, नेमाड करून भेलशियाजवळ तळ टाकला. तेव्हा सदाशिवभाऊनी मल्हाररावास पत्र पाठविले. 'आम्ही एकदम कूच करुन यावें कीं दम खात यावें. हे पत्र मल्हाररावानां मिळताच त्यांना भाऊसाहेबांचा खूप खेद वाटला. तेव्हा ते म्हणाले की, 'भाऊसाहेब मुख्य खासे व कर्ते पुरूष; यांनीं ठिकाणींच राहून फौजेचा पुरवठा आम्हांस करावयाचा होता; परंतु ते स्वत: आले यांत सर्व अवसान कळून आल्यासारखें दिसेल!... असो, आले त्यास उपाय नाहीं.' सुभेदाराचे पत्र भाऊंना मिळताच बळवंतराव मेहेंदळेने सल्ला दिला त्याप्रमाणे पुन्हा त्यांनी सुभेदारांना पत्र पाठविले. आपण स्वत: आधींच यावयाचे नव्हतें... आपण माळवा प्रांतींच छावणी करून रहावे व पुढं फक्त सडया फौजा मात्र रवाना कराव्या.[१२६] नंतर सुभेदारांनी पुन्हा भाऊना पण पाठवून कळविले की, 'सरकार या प्रांतांत शिंदे-होळकरांनीं फार दिवस राहून सुख अनुभविलें आहे; आतां त्यांस आम्ही इकडे आल्याचें पाहवत नाही; सबब उगीच शत्रूच्या दबकावण्या दाखवितात!...[१२७] आब्दालीची फौज मराठ्याच्या फौजेचा सारखा पाठलाग करीत होती. पण पावसाळयाच्या दिवसांनी चंबळ नदीस पूर आला होता. तेव्हा मराठा सैन्यानी केरोलीजवळ चंबळ नदीचा उतार पाहून पूर पार करण्यात मराठ्यांनायश आले. पण आब्दालीस मात्र नदी ओलांडता येऊ शकली नाही. त्यामुळे त्यांना काळजळेश्वर जवळ राहणे भाग पडले. तेवढयात सुभेदारानां भाऊचे तिसरे पत्र मिळाले 'आम्हीं ढोलपुरच्या घांटानं अतरावें कीं आचेरीकडून यावें, याचा निश्चय करून पाठवावा.'[१२८] हे पत्र वाचून सुभेदाराना खूप संताप आला. भाऊंनी आपले ऐकावे यासाठी पुन्हा पत्र लिहिले. 'तुम्हास माळवे प्रांती रहावे म्हणून लिहिले असता येथपर्यंत यावयाचे कारणास काय?... अत:पर तरी

चमेलीचे पार ग्वालेरीनजीक छावणी करावी.’[१२९] यापत्रानून मल्हाररावांनी सदाशिवभाऊना पुढे आपणासह बुणगे न येता फक्त सडी फौजच रवाना करावी असे वांरवार कळविले यात आपलेच हित आहे. हा त्यांचा उत्तरेतील राजकारणातील मोठा अनुभव होता. तरी पण सदाशिवभाऊ मात्र काही केल्याने ऐकत नाहीत याचे फार दु:ख होत होते. सदाशिव भाऊच्या सोबतची मुत्सद्दी मंडळी भाऊना चढीवर नेऊन आपण सुभेदाराच्या सांगण्याकडे लक्ष देऊ नये. असे वारंवार सांगुन त्यांनी दिल्लीकडे कुच करण्यास भरीस पाडले. त्यावर भाऊसाहेब ते न ऐकताच म्हणतात ‘सर्वच या रानात सूख पावले. त्यात आम्ही आल्याचे सूख नाही.[१३०]

तेव्हा विठ्ठल शिवदेव विंचूरकर हे सुभेदाराचे चांगले मित्र व मल्हाररावांचे उत्तरेतील राजकारणावर आतापर्यत मिळालेले अचाट यश याचे तें युध्दविषयक अनुभवी होते हे विंचूरकरांना चांगलेच माहित होते म्हणून ते भाऊना म्हणाले की. भाऊसाहेब आपलें राज्य निर्भय म्हणून समागमें सर्व सरदारांनी बायकामुलें आणलीं आहेत... यास्तव शत्रूंचें प्राबल्य फार असल्यामुळें, सुभेदारांनीं लिहिल्याप्रमाणें सर्व बायकामुलांसह आपण येथंच छावणीस रहावें हें बरें, असें मला वाटते.’’[१३१]

### ३.१.५१ उत्तरेत सदाशिवरावांशी भेट

मल्हाररावाच्या या म्हणण्याकडे सदाशिवराव भाऊनी व बळवंतराव मेहेंदळेनी हास्य विनोदावर नेऊन वेळेचे व जबाबदारीचे कोणतेही भान न ठेवत तीर्थयात्रा करीत गंभीर नदी किनाऱ्यावर तळ टाकला. तेव्हा मल्हाररावाना भाऊची फौज जवळ आल्याचे समजताच सुभेदार व शिंदे भेटावयास गेले. मल्हारराव होळकर यांनी गंभिरा नदीवर मुक्कामी सदाशिवराव भाऊची भेट घेतली त्यावेळी सुभेदारांना बाजारबुणगे व भाऊ आपल्या मंडळासह ते इथपर्यत आल्याने त्यांना राग अनाावर झाल्याने ते भर सभेत मानहानी करीत कोणाचीही परवा न करता गर्जले. ‘‘भाऊसाहेब तुम्हास चमेली नदीपार राहाणे म्हणोन लिहिले असता पुढे यावयास कारण काय? चार बवते लोक मिळले ते केवळ बेवकूप, मोहरा इरेस आणून घातल्या. आता यासी काढावयास यत्न नाही.’[१३२] वडीलकी व अनुभवाच्या नात्यानी भाऊना फक्त सडी फौजच पुढे रवाना करून बाकी आपण तेथेच थांबण्याचे वांरवार कळविले असता ते थेट येथे आल्याने सर्व आपले गणित बिघडले याचा त्यांना राग अनावर न झाल्याने ते असे बोलले असे स्पष्ट होते. म्हणजेच त्यांना पुढे काय काय अडचणी येऊन आपण अडचणी येऊ शकतो यांची कल्पना त्यांना झालेली होती.

थोडया वेळाने राग शांत झाल्यावर सर्व मंडळींना म्हणाले, ‘एखादा वेळवख्त गुजरल्यास बरोबर आणिलेल्या बायकामुलांच्या रक्षणाची काय तजवीज करावी?.. तेथील किल्लेदारास त्यांनीं दारूगोऴयास दहा हजार रुपये देऊन त्याचें वचन घेतलें कीं, निर्वाण प्रसंग गुजरल्यास तुमच्या बायकामुलांस आश्रय देऊं.’[१३३] याप्रमाणे सर्वाना घेऊन ते यमुनानदी काठी गोघाटावर मुक्काम करुन नंतर वृंदावन त्यानंतर ३ ऑगस्ट १७६० दिल्लीस गेले. दिल्लीच्या

किल्ल्यांत नजीबखानाचे पाचसहा हजार फौज होती. तेव्हा मराठ्यानी २ ऑगस्ट १७६० दिल्लीवर आक्रमण हल्ला करुन दिल्लीचा किल्ला काबीज केला. मराठ्यानी पत्र पाठविल्यानुसार सुरजमल जाटाची पाच सात हजार फौज दिल्लीत येऊन मिळाली. दिल्लीचा बादशहा शलमशहा हा आब्दाली व नजीबखानास फितूर असल्यामूळे गाजीउद्दीनने ठार केल्यामुळे बादशहा पद रिक्तच होते. म्हणून सदाशिवभाऊनी बादशाही घराण्यांतील अल्लीगौर याचा मुलगा जवानबख्त यास तक्तावर बसवून त्याचें नांव शहाअलम (दुसरा) असें ठेवलें, व त्याचे नांवचे श्क्किे करून मोहरा, रुपये वगैरे नाणें पाडलें. तसेच नारो शंकर यांस राजेबहाद्दरपणाचा किताब देऊन वजिर पदी नेमले.

तेव्हा सुभेदार मल्हारराव व जनकोजी शिंदेसह सर्व मराठा सरदारांनी बादशहाचा वजीर म्हणून गाजीउद्दीनला नियुक्त करावे असे सुचविले. कारण हा मराठ्यांशीनेहमीच मदत करीत आलेला होता. पण भाऊसाहेब फक्त बळवंतराव मेहेंदळे जे सांगतील त्याप्रमाणे वागत असल्याने नारो शंकर यास 'राजेसाहेब' हा किताब देऊन एक हजार फौजेस नियुक्त केले. यामुळे होळकर व शिंदे सह जाटही दु:खावले गेले. तसेच गोविंदपंत बुंदेल यांच्याकडे पन्नास लाख खंडणी थकलेली होती ती वकिलामार्फत आणून सैन्याचा खर्च भागविला. तरीही आर्थिक चणचण होते म्हणून भाऊसाहेबांनी कोणासही सल्ला मसलत करु न देता गुपचूप दिल्ली बादशहाच्या तक्तावरील चांदीचा छत त्यास सोन्याची वर्सी मुलामा होता. तो काढून नाणी गाळली त्या बादशहाच्या छताचे चांदीचे नऊ लाख व कुंजपुराची लुट सात लाख मिळाले.[१३४]

सदाशिवभाऊनी शिंदे व होळकर तसेच जाटाचे म्हणजेच कोणचेही न एकता आपल्या पक्षातील मुत्सद्यींच्या तंत्राने वागत असल्याने अनेक निर्णय चुक लागले. हे सर्व पाहून त्या तिघांना ही खूप दु:ख व वाईट वाटत होते पण नाईलाज म्हणून गप्प बसावे लागत होते. आपल्या एक दोन लढयातील विजयाने हुरळून आब्दालीच्या कुंजपूरा येथील तळावर हल्ला करण्याचा बेत केला. त्या अगोदर भाऊ व मेहेंदळेनी वेगळाच विचार करुन ठरविले की, 'कुंजपूरावर स्वारी करण्यापूर्वी प्रथम उदयीक सुरजमल्ल जाटास कैद करून त्याचा गोट लुटून घ्यावा. पण हे वृत्त होळकर व शिंद्यास कळताच त्यांनी जाटाचा वकील रुपराम कटारीस बोलावून भाऊंचा इरादा सांगितला व म्हणाले की 'आपण दोघांनी वचनप्रमाणे देऊन भाऊसाहेबांच्या आज्ञेवरून जाटास आणले...' त्याच्या बचावासाठीं आपणांवर भाऊंचा रोष झाला तरी तो पतकरावा; परंतु हरयुक्तींनें त्यास येथून सुरक्षितपणें काढून द्यावा हें उत्तम. मग मागें आपलेंच काय भाऊसाहेब करतील तें करोत. म्हणजेच शिंदे व होळकर या घराण्यात एकदा दिलेला शब्द ते कटाक्षाने पाळीत होत. व त्यांवर शत्रूंचाही तेवढाच याच्यावर विश्वास होता असे यावरून स्पष्ट होते.

त्यानुसार शिंदे व होळकर यांनी जाटाच्या वकीलास बोलावून भाऊचे वृत्त सांगून 'तुम्ही आज रात्रीस निघून जावे; जर रहाल तर खात्रीने लुटले जाल. पुढे आम्हावर तुमचा शब्द राहणार नाही.'[१३५] वकीलाने आपल्या जाटास सांगुन रात्रीच निघुन गेले तेव्हा भाऊनी आपली फौज पाठवून मागे असलेल्या बुणग्यास लुटले. तेव्हा भाऊंना होळकर व शिद्यांचा संशय आला होता. पण काहीच इलाज नसल्या कारणाने शांत बसावे लागले.

**३.१.५२ कुंजपुरावर मराठ्यांचा हल्ला:**

सदाशिवराव भाऊच्या आक्रमणाची बातमी कूंजपूर शहरातील कुतूबशहा महंमदखान कुतलबाज यांना कळताच आपली फौज शहराबाहेर आणून उभयतामध्ये १७ ऑक्टोंबर १७६० रोजी घनघोर युद्ध होऊन; मराठयांच्या अनेक तुकडयाच्या रचनेमुळे शत्रूच्या सैन्याचा पराभव करून कुंजपूरचा किल्ला जिंकला. कुंजपुरात व नजीबखानाच्या सैन्याची मोठ्याप्रमाणात मारले गेले तर कित्येकांची कैद केली. तेव्हा कुतूबशहा महंमदखान कुतलबाज यांचे सैन्य शहरात पळून गेले. सदाशिवराव भाऊनी लगेच आपल्या सैन्यातील पठाणांस शहर लूटण्याचा आदेश दिला. त्यामुळे प्रत्येक पठाणास बरीच लूट मिळाल्याने खुश होते.त्यात नजीबखानाचा गुरु कुतूबशहा ज्याने दत्ताजी शिंदेचा शिरच्छेद होता.तो कुतुबशहा शहरातील कत्तलीमध्ये दमाजी गायकवाड यांच्याहाती लागला. दताजीचा शिरच्छेद करणाऱ्या गुन्हेगारास त्यास भाऊसाहेबासमोर हजर केले. तेव्हा सर्वांची पायातील आग मस्तकात गेलेली होती. तेव्हा भाऊनी 'या हरामखोराचा ढोलपाशीं नेऊन शिरच्छेद करा! अशी शिक्षा सुनावली. तेव्हा तो भाऊंना गयावया करु लागला. 'मला वांचवाल तर तुमचा व गिलच्यांचासल्ला करून देईन.' तेव्हा सुभेदार होळकर व जनकोजी शिंदे पुढे येऊन भाऊंना म्हणाले की, 'यांस मारल्यानें दत्ताजी शिंदे पुन: जिवंत होतील असें नाहीं; मग विनाकारण मारण्यापेक्षां त्यास राखून त्याच्या हातानें महत्कार्य संपादून घ्यावें;[१३६] म्हणजेच इतिहास जमा झालेल्या गोष्टींचा बदला घेण्याऐवजी त्याच्याकडून काही पुढचा फायदा होतो का ते पहाणे हा दुरदृष्टीकोन हा सुभेदारांकडे होता हे यावरून दिसून येता.

परंतू भाऊसाहेब ऐकण्याच्या स्थितीत नव्हते. शत्रूचे यात मोठे दोन सरदार व पंधरा हजार फौजेची कत्तल करण्यात आली. त्या कुतूबशहाचा जनकोजी शिंदेनी शिरच्छेद केला. एवढेच नाही तर भाऊंनी कुंजपूरा शहरात नजीबखानाचा जावई व व्याही हाती लागले. तेव्हा नजीबखानाचा खजिना दाखव म्हणून खूप छळ केला. तेव्हा त्यांनी पंधरा लाखाचा खजिना दाखविल्याने तो लूटला. तसेच युद्धसमयी आब्दाली यमुना नदीच्या पलिकडेच असल्याने त्याला कुंजपूरा येथील नजीबखानास काहीच मदत करता आली नाही. त्यामुळे मराठयांची सरशी होऊन नजीबखानाचे बरेच मोठे नुकसान झाले. मराठ्यांचाहा पराक्रम यमुना नदीच्या पलीकडे असलेल्या अहमदशहा आब्दाली व नजीबखानास कळाला. पण पावसाळयाचे दिवस असल्याने नदीस मोठा पूर आल्याने काहीच करता आले नाही. नंतर गुलाबसिंग गुजर यांनी

आब्दालीस गौरीपूरला यमुनेचा उतार असल्याचे सांगताच आब्दालीने यमुना नदी ओलांडल्यात यशस्वी झाला. त्यांनी तोफखान्यासह यमुना नदी पार केली. तेव्हा मात्र मराठयांची धांदल उडली. त्यामुळे सदाशिव भाऊंनी सर्वांना तात्काळ बोलावून बैठक घेतली. तेव्हा मल्हाररावाना विचारले असता. सुभेदार 'आतां पुढील युक्ति बळवंतरावांस विचारावी. आम्ही भित्रे असून म्हातारे झालों आहों; आम्हांस काय सुचतें! [१३७] असे म्हणून शांत बसून इतरांचे ऐकत होते. बाकीच्या सर्व मंडळींनी यापूर्वीच सुभेदारांनी सूचविल्याप्रमाणे शक्य त्तिका लवकर दिल्लीस जावून पोहचण्याचा विचार झाला. त्यानुसार ते निघाले पण समोर आब्दाली येत असल्याचे कळताच त्यावेळी मल्हारराव होळकरांनी शत्रूशी गनिमी काव्यानी लढण्याची भाऊंना विनंती केली. तेव्हा गारद्यानी त्यांच्या या म्हणण्यास विरोध करुन आपल्या तोफखान्याच्या बळावर मी दिल्लीपर्यत तुम्हांस सूखरुपपणे पोहचविण्याची हमी घेतो. त्यामुळे सदाशिवराव भाऊ व बळवंतराव मेहेंदळे या दोघांना मल्हाररावांच्या गनिमी काव्यापेक्षा गारद्यांच्या तोफखान्यावर अधिकच विश्वास ठेवला. त्यानुसार त्यांनी प्रथमत: बाजी हरि व येसाजी भोईटे या सरदारना पाच सात हजार सैन्य देऊन आब्दाली व त्यांच्या फौजेवर पाळत ठेवण्यासाठी पुढे रवाना केले. त्यानंतर मराठा फौज त्यानुसार कुच सुरु केली. पण आब्दालीची प्रचंड फौज अगदी जवळच यमुना नदी काठी तळ देऊन बसलेली होती. त्यामुळे मराठ्यांनाआता पुढे जाता येणे अशक्य झाल्याने २० ऑक्टोंबर १७६० पानिपत वरच मोठे खडक खोदून तेथेच तळ देऊन बसावे लागले.

पानिपतच्या मैदानावर मराठे व आब्दाली प्रचंड सैन्यानिशी दोघेही एकमेकांच्या मार्गात तळ ठोकून बसलेले होते. पण मराठ्यांनारसद पुरवठा करणारे गोविंदपंत बुंदेल व सूरजमल जाट हे मित्र पक्ष होते. त्यामुळे मराठयांच्या या उत्तार मोहिमेत मराठ्यांनारसद पूरवठा करण्याची जबाबदारी गोविंदपंत बुंदेल यांच्याकडे होती. त्यास आब्दालीची रसद तोडावी आणि नजीब व शुजा यांचे प्रदेश लुटून अन्नधान्याची मदत करण्याची आज्ञा केली. पण आब्दालीने अताईखान व करीमदादखान यास पाठवून अंतर्वेदीत जलालाबादेवर २०डिसेंबर १७६० हल्ला करून बुंदेल्यास कापून काढले. तर मराठयांसाठी रसद घेऊन येण्यासाठी पाराजीपंत वाघ व गोविंद पंतांचा मुलगा निघाले; पण मराठयांची फौज समजून अंधारात ते शत्रूच्या गोटात मुक्कामासाठी उतरले. पण त्यांना हे मराठे वा गारद्यांची फौज नाही. हे जेव्हा कळाले तेव्हा ते घोडयावर स्वार होऊन निघातच शत्रूनी त्यांची कत्तल सुरु केले. व खजिनाही लुटून घेतला. तसेच पाराशरदादाजी पंताचा खजिना १जाने १७६१ रोजी आब्दालीने हसतगत केला. बाकीचे काही सैन्य नंतर आडमार्गाने मराठा सैन्यास येऊन मिळाले. तेव्हा मल्हारराव होळकर, जनकोजी शिंदे, दमाजी गाईकवाड, बळवंतराव मेहेंदळे वगैरे सरदार दरबारांत बसले असतां, बळवंतराव मेहेंदळे कुरापत काढण्याच्या हेतूनें कुत्सित भाषेत बोलले कीं, 'शिंदे-होळकर हे मोठे शूर सरदार असतां नांगी.मोडल्यासारखे स्वस्थ बसतात; आम्ही त्यांच्या मर्जीविरुध्द

हिंदुस्थानांत आलों म्हणून ते कुचराई करितात! या बळवंतरावाचा स्वभाव मल्हाररावाना माहित होता, पणं तरणेबांड जनकोजी शिंदेनी मनावर घेऊन बळवंतरावास भर दरबारात म्हणाले. ... उदयीक युद्ध करितों; मग परमेश्वरकृपेनें आमच्या नांग्या मोडलया आहेत किंवा उभ्या आहेत हें दिसून येईल.

सदाशिवभाऊंनी जनकोजी शिद्यांना समजावण्याचा प्रयत्न केला. तरी ते रागाच्या भरात मुजरा करुन आपल्या डेऱ्यात निघून गेले. तेव्हा सदाशिवभाऊ मल्हाररावाना म्हणाले. 'तुम्हीं जनकोजींस दोन समजुतीच्या व पोक्तपणाच्या गोष्टी सांगून युद्धास जाऊं देऊं नये, व तुम्हींही जाऊं नये.[१३८] जनकोजीने शत्रुवर चालून जाण्याची तयारी करुन आपल्या शिलेदार व सैन्यासह शत्रूवर चाल केली. व जाताना सुभेदारास निरोप पाठवून आपणही फौजेनिशी यावे असे कळविले. तेव्हा सुभेदार मल्हाररावांनी सदाशिवराव भाऊची आज्ञा न घेता द्विधा मनस्थित संताजी वाघ व भोजराजजी बारगळ या सरदारसोबत निवडक सात हजार फौज देऊन रवाना केले. हे सदाशिव भाऊंना कळताच बळवंतरावास सैन्य देऊन मदतीन पाठविले. तेव्हा आब्दालीनेही काही सैन्य व दहापंधरा तोफा देऊन पुढे लढाईस आले. २९ नोव्हेंबर १७६० ला दिवसभर युद्ध होऊन शिंदे होळकरांच्या फौजे पराक्रमाची शर्त करुन विजय मिळविला. पण बळवंतराव व त्याचे सैन्य लांब थांबून फक्त बघण्याची भूमिका पार पाडत होते. शिंदे होळकरांच्या फौजेच्या पिछाडी नंतर आपण मुसाडी मारुन आपणच विजयी होऊ अशी कल्पना करीत थांबलेला होते. सायंकाळी विजयी मोहिमेवरुन परतलेल्या जनकोजी शिंदेचे सदाशिवभाऊनी भेट घेऊन शाब्बासकी देत असतानांच तेथे बळवंतराव येतो. तेव्हा जनकोजी बळवंतराव मेहेंदळेस संतापून म्हणतात. 'बळवंतराव तुमची अशी इच्छा होती कीं, आमची फजीती व्हावी! परंतु परमेश्वर आमचा वाली. आम्ही स्वामिद्रोही व कुचराई करणारे असतों तर यश आलेंच नसतें![१३९]

आब्दालीने गोविंदपंत बुंदेलचे मुंडके व पत्र भाऊकडे पाठविले. त्या पत्रात 'तुमचे गोविंदपंत पुढें तुम्हांस स्वर्गी जागा पहावयास गेले आहेत, आणि तुम्हांस न्यावयास शिर पाठविलें आहे. खरें कीं खोटें तें पाहून घ्यावें![१४०] बळवंतरावांना फारच अपमान झाल्यासारखे वाटू लागल्याने व आब्दालीने मराठयांची रसद बंद करुन अतिशय मग्रुरीने वागत असल्याने सदाशिव भाऊकडे जाऊन ते म्हणाले की 'एकवार स्वतः युद्धास जावें, आणि म्हणून मी परवानगी मागण्याकरितां आलों आहे. भाऊसाहेबांनी परवानगी देऊन आपल्या मराठा सैन्यात सोबतीस जाण्याचे हुकूम फिरविला की 'बळवंतराव मेहेंदळे 'जरीपटका' घेऊन युद्धास जात आहेत तर त्यांस सर्वांनी मदतीस जावें!'[१४१] अब्दालीनही मागे मराठयाकडून पराभव पहावा लागल्याने त्यांनीही बरीच युध्दाची जय्यत तयारी करुन ठेवलेली होती. मराठी फौजेवर तूटून पडल्याने मराठ्यांनी ६ डिसेंबर १७६० रोजी तोफाचा मारा सुरु केल्याने दोन्हीकडच्या तोफांच्या भडीमाऱ्याने धुराची रेतीची व धुराळयाची राळ उटली. चौहोकडे अंधकार पडत होता. हे

बळवंतरावाच्या सैन्यानी पाहून माघारी पळ काढला. तेव्हा शिंदे होळकरांनी शत्रूवर एकच मुसांडी मारुन हल्ला केला. तेव्हा बळवंतरावही शिंदे होळकरांची मुसांडी पाहून पुन्हा युद्धात उतरले. तेवढयात बळवंतरावर शत्रूची गोळी लागल्याने ते घोडयाखाली पडले. त्यातच ते गतप्राण झाले. आब्दालीचा एक दुराणी (गिलचा) बळवंतरावाच्या उरावर पाय देऊन त्यांचे शिर कापूं लागला. जवळ असलेले खंडेराव नाईक निंबाळकर (अकळूजकर) पाहताच मर्दुमकीची शर्थ करून स्वत: जख्मी होवून बळवंतरावांचे शिर न कापूं देतां त्यांचें प्रेत सोडवून आणलें. आब्दालीनी पुन्हा कुंजपूरावर विजय मिळविला. बळवंतरावाचे प्रेत सूर्य मावळल्यानंतर अंधारात रात्री मराठ्याच्या गोटात आणले. तेव्हा त्यांची पत्नी मुलगा आप्पाराव व इतर सर्वांना शोक अनावर झाला. त्यांची पत्नी पतीसोबत सहगमन केले. अशा बिकट परिस्थितीत दोन्ही पक्षांना युद्ध नको होते. त्यामुळे तह वा समझोता होणे अवश्यक वाटत होते.

### ३.१.५३ पानिपतच्या युध्दाची तयारी:

मराठा सैन्यात अगोदरच अन्नापासून उपासमार चालु असताना बळवंतरावाच्या जाण्याने सैन्यात मोठी घबराहट निर्माण झालेली होती. तेव्हा सदाशिवराव भाऊनी सर्व मराठा सरदारांना बोलावून विचारविनिमय करुन येथे अन्नावांचून मरण्यापेक्षा शत्रूशी लढुन मेलेल बरे कारण आपल्याकडील कोणत्याही प्रकारचा रसद पुरवठा नाही शिल्लक नाही ना ही कोठुन येणार नाही. आणखीन येथेच राहिले तरी आपलीच परिस्थिती आणखीन बिकट होईल म्हणून ... आपण ही जागा सोडून निघावें व दिल्लीच्या नजीक जाऊन तेथून धान्य वगैरे सामुग्री आणून सर्व लष्कर ताजेंतवानें करावें व नंतर गिलच्यांचा समाचार घ्यावा![१४२] त्यावेळी सुभेदार मल्हारराव सदाशिवभाऊना म्हणाले की 'सर्व फौजेचा जमाव करून बुणगें वगैरेसह लढाई करीत करीत निघून जावें.[१४३]

सर्वांशी मसलत झाल्यावर इब्राहिमखान गारद्याच्या तोफखाना समोर ठेवून बाकीची फौज सभोवताली ठेवून मध्ये बुणगे ठेवून शत्रूशी सामना करीत करीत दिल्ली जवळ करण्याचे ठरले. दुसऱ्या दिवशी पहाटे सकाळी सर्व सरदारासह फौज सज्ज घेऊन आपल्या सर्व सैन्याची पुन्हा रचना तयार केली. सर्वाच्या पुढे इब्राहिमखानाचा तोफखाना, उजव्या बाजूस होळकर व शिंदे आणि इतर काही सरदारांची फौज तर डाव्या बाजूस दमाजी गाईकवाड, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, समशेर बहाद्दर व इतर मातब्बर सरदार आणि सर्वाच्यामध्ये सेनापती सदाशिवभाऊ, विश्वासराव व पार्वतीबाई यांच्या अंबाऱ्या व इतर सरदारांचीं बायकामुलें व बुणगे अशी व्यूहरचना करुन ७ जानेवारी १७६१ ला हर हर महादेव म्हणून कूच केली. दीड कोस अंतरावर गेल्यावर सदाशिवभाऊ निर्णय घेतला. जर शत्रूंनं बाजूस सरून आपणांस वाट दिली तर उत्तम; नाहीं तर आपण एकदम घोडेस्वारांनिशीं हल्ला करून बेलाशक मारामारी करीत निघून जावें![१४४]

त्यानुसार सर्व सरदारांनी हुकूमाचे पालन करावे असा आदेश फिरविला. त्यामुळे तोफखाना बाजूला सोडून सर्व सैन्य व सरदार एका बाजूस एका लाईनमध्ये उभे झाले. तेवढयात अब्दालीकडून सदाशिव भाऊस निरोप आला की. 'आजचे दिवस धीर धरावा; सल्यांचें बोलून सलोखा करू परंतु भाऊसाहेबांनीं धिक्कार करून वकिलांस परत पाठविलें!'[१४५] पण पौष शुद्ध अष्टमी शके १६८२ म्हणजे १४ जानेवारी १७६१ रोजी युद्धास सुरुवात झाली. पण काही कोणी कोणाचे न ऐकता सरळ एकमेकांचे म्हणजेच मराठ्यांचे व आब्दालीचे सैन्य समोर आले. मराठ्याच्या दोनशे तर आब्दालीच्या तिनशे तोफांचा मारा सुरु झाला. कोणाची कोणास काहीच खबर लागत नव्हती. विठ्ठल शिवदेव व यशवंतराव पवारांची तुकडी शत्रूच्या सैन्यावर तुटून पडून त्यांना मागे हटविले त्यानंतर तोफखान्याजवळ दमाजी गायकवाड यांच्यावर चालून आलेल्या सैन्यास दोन हात करुन मागे सारले. तेवढयात इब्राहिमखान गारद्यांच्या तोफावर आब्दालीने हल्ला केला तरी इब्राहिम गारद्यांनी तोफाचा मारा चालूच ठेवला. उजव्या बाजूस शिंदे होळकर लढत होते. त्यांच्यावर सुजाउद्योलीने हल्ला केला. तेव्हा निकराचा लढाई सुरु झाली. तर तिकडे खूद्द सदाशिव भाऊ व विश्वासराव हत्तीवरुन उतरुन सदाशिवभाऊ बोर घोडीवर बसून तर विश्वासराव पिलबाल घोडयावर बसून आपल्या सैन्यास 'हाणा हाणा', 'मारा मारा', खुबरे बहाद्दर! असे म्हणत उत्तेजन देत होते. काही वेळेनंतर स्वत: विश्वासरावांनी तलवार हातात घेऊन शत्रूवर तुटून पडले. लढता लढता शत्रूची गोळी विश्वासरावांना लागताच ते घोडयावरु खाली पडताच गतप्राण झाले. तिकडे सदाशिवरावही मोठ्यात्वेशाने लढत होते. सोबत समशेर बऱ्हाद्दरास घेऊन शत्रूवर तुटुन पडून चांगलीच मुसांडी मारत होते.

तिकडे विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांच्या सैन्यात व बुणग्यात पठाण सेवेत होते. त्यांना आपल्या मस्तकाचे भगवे वस्त्र फेकून दिले. पठाणांनी आपल्याच मराठा सैन्याची व बुणग्याची लूट करत पळत सुटले तेव्हा बुणगेही घाबरुन पळायला लागले. मराठा सैन्य हे पाहून पळता पाय काढला. नजीबखान अंबारीतून खाली उतरुन मराठयावर चाल केली. तसेच दुंदेखान रोहिला व अहंमदखान लंगडा हे ही मराठे यावर चालून आले. तर पळणाऱ्या मराठा सैन्यास कापून काढण्याचे आदेश आब्दालीने आपल्या राखीव फौजेस दिला. सर्व मराठा सरदार एका मागून एक शत्रूंशी लढता लढता धारातीर्थ व्हायला लागले. त्यात समशेरबहाद्दर दमाजी गायकवाड, विठ्ठल शिवदेव विचुंरकर, अंताजी माणकेश्वर व यशवंतराव पवार लढत होते. तर उजव्या बाजूला जनकोजी शिंदे व तुकोजी शिंदे लढत होते. सदाशिव भाऊ सैन्यात कापाकापी करीत सैन्यास उत्तेजन देत होते. तेव्हा मल्हारराव होळकरांना सदाशिव भाऊनी निरोप पाठविला 'जर कदाचित् दुर्धर प्रसंग गुजरण्याची वेळ येऊन ठेपली तर तुम्हीं आमचें कुटुंब, नाना फडनविसांची मातुश्री व कुटुंब यांस बरोबर घेऊन सुरक्षितपणें देशीं नेऊन पोंचवावें. मार्गांत शत्रूंनीं फारच गर्दी केल्यास तुम्हीं आपल्या हातानें आपल्या कुटुंबाचा शिरच्छेद करावा परंतु शत्रूंच्या हातीं सापडूं देऊं नयें![१४६]

सदाशिवभाऊना आपल्या आप्तेष्टांची खूप काळजी होती त्यामुळे युध्दात आपले काहीही होवू शकते याची भिती वाटत होती. एक खबरदारीचा उपाय म्हणून किमान आपले कुटूंब तरी शत्रूपासून बाचले पाहिजेअशी प्रमाणिकपणे भाऊना वाटत होते. 'तुम्ही हत्यार न लावणे, आमची व त्यांची तरवार लागली म्हणजे तुम्ही सहस्त्रयोगे न विचारता निघोन जावे यांत अंतर कराल तर गोब्राम्हणवधाचे पातक कराल.[१४७]

म्हणजेच इतर लढयाप्रमाणे ही लढाई नाही. आपण फार चुका केल्या हे भाऊंना यातून सांगता आले नसले तरी ते कळाले होते हे दिसून येते.असे अगोदरच सुभेदारांशी बोलुन निश्चय केलेला होता. तेव्हा शत्रूचा वाढता जोर पाहून किमान कुटुबकबिला तरी सूरक्षित असावा. म्हणून मल्हाररावास तात्काळ निघून त्या सर्व मंडळीस घेऊन जाण्याचा आदेश दिला. त्यानुसार मल्हाररावास सदाशिवभाऊचा निरोप आल्याने त्यांनी नाईलाजास्तव आपली लढाई मध्येच थांबवून सदाशिव भाऊच्या आज्ञेवरुन पानिपतचे मैदान सोडावे लागले.सुभेदार दिल्लीच्या रोखने निघाले. आब्दालीने पानिपतच्या संपूर्ण रणांगणावर दिसणाऱ्या मराठयांची कत्तल केली व विजय संपादन केला. पण या युद्ध विजयाने आब्दालीला कोणासही काहीही करार व मदार मराठ्यांशी करता आले नाहीत. त्यामुळे या युद्धाने फक्त आब्दालीचा विजय व मराठ्याचापराभव झाला एवढेच स्पष्ट होते. तसेच पानिपतच्या युध्दामध्ये मराठ्यांचा जसा सर्वागीण व सपूर्ण पराभव झाला असा क्वचितच कोणाचा इतिहासात पराभव झाला नसेल.

मराठ्याकडे इब्राहिम गारद्याचा अवजड तोफखाना होता. तर आब्दालीकडे उंटावरच्या हलक्या तोफा होत्या.तसेच मराठ्यांनीकुंजपूरा येथील कैद केलेल्या पठाणाना सेवेत घेतलेले होते. त्यांनी ऐन युद्धात मराठी निशान कढून फेकुन देऊन पठाणांनी पाठीमागून बंडखोरी करुन मराठयावरच हल्ला चढवून लुट सुरू केली. तसेच सदाशिवभाऊ हत्तीवरुन नेतृत्व करीत असताना अचानक घोडयावर स्वार झाले. त्यामुळे हत्ती रिकामा दिसत असल्याने मराठी सैन्य पळायला लागले. या शिवाय आब्दालीन आपले सैन्य तिरप्या रेषेत व राखीव फौज ठेवलेली होती. उलट मराठ्यांचे सैन्य सरळ रेषेत व राखीव फौज नव्हती. त्यामुळे नव्या दमाचे सैन्य मराठा फौजेत नसल्या कारणाने आब्दालीच्या फौजेस वाव मिळाला. आब्दालीच्या सैन्यांनी मराठया सैन्याचे, बुणग्याचे, सरदारांचे अतिशय हाल केले. काहीना ठार केले. तर काही बायका विहिरीत उडया टाकुन देह दिला. तर काही बायकांना दासी बनविल्या. इब्राहिम गारदीचे तर अंतोनात छळ करुन मारले.

मराठ्यांनीवा मल्हारराव होळकरांनी उत्तरेत जे जे विजय मिळविले ते सर्व गनिमी काव्याच्या जीवावर पण सदाशिव भाऊनी व इब्राहिमखान गारदीने यास विरोध केल्याने मराठ्यांनासपाट मैदानावर युद्ध करणे भाग पडले. छत्रपती शिवाजी महाराजापासून पानिपत युद्धापर्यंत गनिमी करण्याचाच मोठ्याप्रमाणात अवलंब करुन शत्रूस शरण येण्यास भाग पाडून विजय मिळवला जाई. पण ते नवख्या सेनापती असलेल्या सदाशिवभाऊना माहित नसल्याने व त्यांनी उत्तरेतील

राजकारणाचा व शत्रूच्या नितीचा अनुभव असलेल्या सुभेदारांचे थोडे तरी ऐकले असते तर युद्धास वेगळे वळण लागले असते. पण दुदैव मराठ्यांचे की त्यांना या युध्दात प्रचंड जीवित हानी सहन करावी लागले.

बाजीराव पेशवे यांच्या काळात खऱ्या अर्थाने मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे मराठी साम्राज्याचे उजवे व डावे हात बनून एकोप्यानेच उतर भारतात आपले खंबीर वर्चस्व निर्माण केले. दिल्लीचा बादशहा, वजीर व इतर मातब्बर सरदारही या मराठा सरदारांना घाबरायचे युद्ध करण्याऐवजी तहास तयार व्हायचे. जेव्हा आब्दालीने मोगलांना वायव्य भारतात व दिल्लीत येऊन लूट केली. तेव्हा मातब्बर अशा होळकर व शिंदेशी आपल्या संरक्षणाचा करार करणे भाग पडले. यावरून असे स्पष्ट होते की, मराठा सरदार सुभेदार मल्हारराव होळकर व शिंदे यांच्या शौर्यावर आता मोगलाचे साम्राज्याचे अस्तिव व भविष्य अवलंबुन राहिले. पण जयापा शिंदेचा विजोसिंगाने खून केला. त्याचा आळ मल्हारराव होळकरांवर आला. तर खंडेराव होळकरांवर सूरजमल जाटा कडून तोफेचा गोळा लागून मृत्यू झाला. त्यांत शत्रू असलेल्या जाटाची बाजू दत्ताजी शिंदेनी घेतली. त्यामुळे होळकर व शिंदे घराण्यात वा सरदारात असलेल्या मैत्रीस तडा गेला. नंतर मल्हाररावांनी मैत्रीचा खुप प्रयत्न केला. पण तो दत्ताजी शिंदेनी नाकारला तेव्हा त्यांना खुप वाईट वाटले.

सदाशिवभाऊना उत्तर मोहिमेत सुरूवातीपासूनच अन्नधान्याची व रसद पुरवठयाची उणीव भावत होती. याचे पुर्वनियोजन करूनच पुढे पाऊल टाकावयास हवे होते. तसेच मराठयांच्या वेगवान हालचाली करण्यास हे बाजारबुंणगे अडथळा ठरत होते. त्यामुळे त्यांना पुर्वीसारखे चपळ हालचाली करता आल्या नाहीत. पेशवे नानासाहेबांनी आब्दालीच्या बंदोबस्तासाठी सदाशिव भाऊ ऐवजी राघोबादादास मदतीसाठी पाठविले असते. तर मल्हारराव होळकरांना आपले सुत्रे हालवून आब्दालीशी होणारे युद्ध टाळण्याचा प्रयत्न यशस्वी करता आला असता. दुसऱ्या दिवशी अनुपगीर गोसावी व काशीराज यांनी पानिपंतवर जाऊन पहिले तर त्यांना तिथे त्यांना प्रेतांचे ३२ ढिग दिसून आले. त्यात २८ हजार प्रेते होती, दुरपर्यंतचे प्रताचे खच पडले होत. या लढाईत ९० हजार स्त्रीयांना व मुलाना गूलाम बनविण्यात आले. भाऊसाहेब, विश्वासराव, इब्राहीमखान, यशंवतराव पवार, तुकोजी शिंदे, जनकोजी शिंदे ही मातब्बर मंडळी मारली गेली.[१४८]

जाटाच्या प्रदेशातून जातांना एका गावाचा जहागिरदार सूभेदारास घोडा अडवून त्यांच्या घोडयाचा एका हताने लगाम धरुन मुद्याम म्हणाला. सुभेदार, आपण दमून आले आहां त्यासाठीं गांवांत चलून जेवून नंतर जावें.'[१४९] तेव्हा सुभेदारांनी गोविंदराव बुळेस इशारा कळताच घोडयाचा धरलेला हात वरच्यावर उडविला.मराठयांच्या पराभवानंतर जे कोणी वाचले ते कसे बसे परत आले. त्यात नाना फडणीस, महादनी शिंदे, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, नारो शंकर व जानोजी भोसले हे जाटाच्या प्रदेशात येवून पुढे आले. सुभेदारांस वाटेत

असताना रणागणावरुन पळून आलेली पार्वतीबाई, नाना पुरंदरे भेटली. सूरजमल जाटास हा सर्व इतिवृतात समजताच त्यांनी काही वस्त्रे व एक लक्ष रुपये देऊन रवाना केले. एवढेच नाही तर पानिपत वरचे जख्मी, पळालेले मराठे सूरजमल जाटाच्या प्रदेशात येताच त्यांची चांगली सोय केली शिवाय हुकूम राज्यात फिरविला. 'मराठयांच्या पळून आलेल्या फौजेस कोणीही इजा न देतां शक्त्यानुसार सहाय्या करावें.' याशिवाय अनेक ठिकाणी अन्न छत्रे सुरू केली. होळकरांचा फडणवीस रावजी महादेव पारनेरकर सूरजमल जाटास येऊ भेटला. तेव्हा सूरजमल जाट म्हणाले की 'कांहीं साह्य पाहिजे असल्यास मागावें तयार आहे.' त्यावर पारनेरकर म्हणाले की 'आमचे मामेभाऊ राजाराम सदाशिव हे पानिपतच्या रणांत पडले आहेत; तरी औरस चौरस चार कोस पडलेलें रण भाडयाच्या गाडया करून गंगेत टाकवावें; त्यास लागेल तो खर्च आम्ही देऊं.'[१५०] त्यासाठी जाट राजाला चाळीस हजाराचा खर्च आला होता. तेव्हा पारनेरकरांनी त्या खर्चाची सावकारी चिट्टी देऊन इंदूरला आले.

मराठ्यांचे पेशवे नानासाहेब यांना २४ जानेवारी १७६१ रोजी भेलसा येथे पानिपतवरच्या पराभवाची वार्ता कळाली. ती सांकेतिक भाषेमध्ये 'दोन मोती गळाले, २७ मोहोरा गमावल्या, चांदी व तांब्याची नाणी किती गेली याची गणपतीच नाही.'[१५१] यावरून मराठ्यांचे पानिपतवरचे मोठी हानी झाल्याचे कळाले. पनिपतवर कुचराई केल्याबद्दल पेशव्यानी शिंद, होळकर व पवार यांच्या महालाची २३ जुन १७६१ रोजी जप्ती केली पण ती काळापुरतीच होती.

### ३.१.५४ रामपूराच्या चंद्रवंतावर हल्ला:

पानिपतच्या युद्धातील मराठ्याच्या पराभवाने उत्तर वा दक्षिण हिंदूस्थानातील अनेक राजा-महाराजे, राजे-राजवाडे, नवाब, जहागिरदार व जमीनदार या सर्वांना वाटले की, आता मराठयांची सत्ता संपली; म्हणून प्रत्येकांनी आपले आपले अस्तिव पुन्हा निर्माण करीत, स्वत:चे राज्य स्वत: करुन मराठयांची सत्ता व मांडलिकत्व झुंगारु खंडणी देणे बंद केले. उलट त्यांनी मराठी सत्तेस लढण्याचीही तयारी केली. त्यात जयपूरच्या माधवसिंगाने सर्व रजपूत राजाना एकत्र करुन मराठयाशी लढा देण्याची तयारी केली.पानिपतच्या लढाईनंतरची पहिली स्वारी मल्हाररावांनी हाती घेऊन चालुन गेले. मे. १७६१ ला रामपूराच्या चंद्रवंतावर होळकरांनी हल्ला करुन त्याचा पराभव केला व रामपूर जिंकून घेतले.

### ३.१.५५ जयपूरच्या माधवसिंगाच्या फौजेचा पराभव:

सुभेदार मल्हारराव होळकरानी इंदूरला आल्यावर गप्प न बसता सैन्याची भरती करुन पंचवीस हजार सैन्य तयार केले. मराठयांची उतरेत झालेली हानी यामुळे मराठ्यांचे कंबरडच मोडलेले होते. उतरेतील अनेक छोटया मोठ्याराजानी याचा फायदा घेण्यास सुरुवात केली. जयपूरच्या माधवसिंगाने रायसिंगाच्या नेतृत्वाखाली फौज देऊन नर्मदा नदीपर्यंतचा प्रदेश जिंकण्यासाठी पाठविले. तेव्हा मल्हाररावांनी बुंदी व कोटा येथील हाडे या रजपूतांना येण्याचे

कळविले. या सर्वानी रामसिंग जयपूरकराशी भटवाडयावर गाठून लढाई केली. पण सुभेदाराच्या हाताला गोळी लागलेली जख्म भरलेली नव्हती. तेव्हा घोडयावर बसल्याने ती जख्म अधिकच दु:खत असल्याने ते पालखीत बसले. पण सैन्याचा गैर समज होऊन ते पळायला लागले तेव्हा ते पुन्हा हातास गळयात बांधून घोडयावर स्वार झाले. तेव्हा पुन्हा लढाई होऊन जयपूरकरांचा पराभव केला मल्हाररावांनी त्या शहरास वेढा देऊन नाकेबंदी केली; त्यामुळे जयपूरकर जेरीस येऊन त्याने पंचवीस लक्ष सुभेदारांना नजर म्हणून दिले व शहराभोवताल वेढा उठवून घेतला.

**३.१.५६ मंदसौर कोतवालाचा बिमोड:**

तुकोजी होळकरांना पाच हजार फौज देऊन माळव्यात ठेवून सुभेदार इंदूरला परत आले. सुभेदार मल्हारराव इंदूरला येऊन आपल्या मुलखाची अंतर्गत व्यवस्था लावून आपली धाक पूर्ववत निर्माण केली. तुकोजी होळकरांनी आपल्या फौजेसह मेवाडच्या सहाय्यास गेले. कारण मेवाडमधील मंदसोर कोतवालांचे व रयतेचे बेभनाव होऊन रयतेने बंड करून मंदसारमध्ये धुमाकळ घातलेला होता. त्यात कोतवालास ठार केले. तेव्हां त्यांच्यापैकीं कांहीं प्रमुख्य लोक सुभेदारांच्या कमाविसदाराच्या वतीनें या गुन्ह्याबद्दल पन्नास हजार रुपये नजर देऊन त्यांस शरण गेले. सुभेदारांनी क्षमा करुन नजराणा म्हणून दिलेले रक्कम कमाविसदारांना देऊन इंदूरला परत आले.

**३.१.५७ विठ्ठल शिवदेव विंचूरकर पानिपतवरुन पुण्यास परत:**

विठ्ठल शिवदेव विंचूरकर पानिपतवरुन परत येतांना नानासाहेबांची भेट गोदावरी नदी काठी झाली. तेव्हा त्यांचा शोक अनावर झाल्याने त्यांना पानिपतवरच्या घडामोडी ऐकून फार दु:ख झाले. नंतर दोघेही पुण्यास गेले. तेथे विंचूरकरांना म्हणाले की, 'मल्हारराव होळकरांविषयींमी मंडळीच्या मुखें अनेंक प्रकारच्या अनेक वार्ता ऐकतो; याकरितां खरी हकीकत असेल ती तुम्ही शपथपूर्वक सांगा. तेव्हा विंचूरकरांनी पेशव्यांच्या पायावर हात ठेवून सांगितले की, स्वामींस कोणी कांहीही सांगोत; परंतु मल्हाररावांची कोणतेही प्रकारें कसूर नसून त्यांनीं युद्धांत कुचराई अथवा फितूर किंवा स्वामिचरणीं कोणत्याही प्रकारची प्रतारणा केली नाहीं. इतकें मात्र होत गेलें कीं, भाऊसाहेबांस त्यांनीं जी जी हिताची कल्पना सुचविली ती ती दुर्दैवें करून भाऊसाहेबांचे मनास मुळींच आली नाहीं. ईश्वराची इच्छा होती त्याप्रमाणें गोष्टी घडल्या तेथें कोणाचा उपाय नाहीं. परंतु मल्हाररावांनीं कोणत्याही प्रकारची कसूर केली नाहीं असें मी खात्रीपूर्वक सांगतों.'[१५२] यावरून असे स्पष्ट होते की, पानिपतच्या युध्दात मराठा सेनापतीने अनेक धोरणे वा निती ही मराठा युद्धनितीनुसार न अंगिकारता त्याकडे दुर्लक्ष करून सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या गनिमी काव्यानेच लढण्याचा सल्ला सांगुन देखील त्याकडे उघडपणे हासण्यावर नेला. मराठयांच्या दैनिय स्थितीमध्ये ऐन उपासमारीने मरण्याच्या वेळीदेखील मराठा सेनापती सदाशिवभाऊने वेगवेगळया पातळीवर लढणे गरजेचे होते पण

नादानपणा करीत पानिपतच्या मैदानावर वेळ घालवून स्वत:हुन शत्रूच्या आक्रमणाची वाट पहात बसले. युध्दामध्ये जो पहिला हल्ला करतो. तो युध्दात सरस ठरतो पण मराठा सैन्याने खंदक खोदून सपाट मैदानावर शत्रूशी सामना करण्याचे ठरविले. मराठ्यांनीकेवळ इब्राहिम गारद्यांच्या तोफावर अवलंबून रहिले. आता पर्यंत सुभेदार मल्हारराव होळकर यांनी शत्रुशी समोरासमोर केलेली ही पहिलीच लढाई पाहिली. ते केवळ सदाशिवराव भाऊच्या धोरणाने अपयशी ठरली.

नानासाहेबांना पानिपतवरील विश्वासराव यांच्या व इतराच्या जाण्याने खूपच मनावर परिणाम झाला होता. तेव्हा हवा पालटासाठी त्यांना पर्वतीवर राहण्यास गेले असंता तेथेच इ. स.२३ जून १७६१ ला मृत्यू झाला. राघोबादादांनी नानासाहेबांचे चिरंजीव माधवरावांस सातार्‍यास नेऊन छत्रपतीकडून पेशवाईची वस्त्रे वंशपरंपरेनुसार २० जुलै १७६१ मिळवली. तसेच नीळकंठ महादेव उर्फ आबा पूरंदरे यास मुतालिकीची तर सखाराम बापु बोकील यांस दिवाणगिरीची वस्त्रे दिली. माधवरावांचे वय सतरा असल्याने राघोबादादाच राज्यकारभार पाहू लागले. पण माधवराव वयानें लहान असल्याने त्यांस वागविण्याचा अधिकार आई म्हणून माझा आहे. ते राज्याचे मालक असून रघुनाथराव दादा हे केवळ त्यांचे ताबेदार आहेत. पण राघोबादादाना वाटत होते आपण पेशवे नानासाहेबांचे लहान बंधु या नात्याने सर्व मसलती, स्वार्‍या व राज्यकारभारात आपण भागीदार असावे. पण शेवटी माधवरावांचे व राघोबादादांचे मतभेद झाले. त्यानंतर राघोबादादांनी सैन्याची जमवाजमव करुन माधवरावावर स्वारी करुन नजर कैदेत ठेवले. त्यानंतर सुभेदार मल्हारराव होळकर जेजुरीचे दर्शन घेऊन पुण्याकडे येऊन माधवरावांची भेट घेतली.

महादजी शिंदे यांनी पानिपतची हानी भरुन काढण्यासाठी उत्तर मोहिम हाती घेतली. या मोहीमेस अहिल्याबाईनीही भरीव मदत दिल्याने उत्तर भारतात महादजीने जावून पुन्हा आब्दाली येण्याचे धाडस करणार नाही, असा वाचक व व्यवस्था लावून परत दिल्ली येथे आल्यावर दिल्लीच्या बादशहाने महादजीस 'अलीजा बहादुर' ही पदवी देऊन सन्मान केले.[१५३]

### ३.१.५८ राक्षसभुवन लढाई:

राघोबादादांच्या या धोरणामुळे अनेक मराठा सरदार भागानगरच्या निजामाकडे जात होते. मिरजचे सरदार गोपाळराव पटवर्धन हे ही होते. हैद्राबादच्या निजामाने या संधीचा फायदा घेऊन अशा फितूर सरदाराच्या जोरावरएप्रिल १७६३ ला पुण्यावर हल्ला करुन प्रचंड लूट व जाळपोळ केली. सोबत नागपूरचे जानोजी भोसलेसह पंधरा हजाराची फौज विठ्ठल सुंदर या निजामाच्या दिवाणाच्या नेतृत्वाखाली येत असल्याचे कळले. पेशव्यांनी निजामाचा बदला घेण्यासाठी मोहिम उघाडली. तेव्हा राघोबादादांनी सुभेदार मल्हारराव होळकरांना बोलावून थोरले माधवरावासहनागपूरचे जानोजी भोसले व गोपाळराव पटवर्धन याना सोबत घेऊन निजामाशी समोरासमोर युद्ध करण्याऐवजी मराठ्यांनीनिजामाला न आडविता मराठे सरळ निजामाच्या

औरंगाबादवर हल्ला चढविला. त्यानंतर मराठा फौजेने सरळ भागानगर हल्ला चढवून ते जिंकले. भागानगरची लूट करून ते उध्वस्त केले. तर निजामाने पुणे शहर लुटले.

निजामाने औरंगाबादकडे मोर्चा वळविला. तेव्हा मराठ्यांनीनागपूरच्या भोसल्यांची मलकपूरची बाजारपेठ लूटली. तेव्हा मराठ्यांनीनिजामाकडे गेलेल्या भोसलेसह अनेक सरदारांची समजूत घालून परत आणले. निजामाने आपल्या नव्वद हजार सैन्याचे दोन भाग केले. राघोबादादा व मल्हारराव होळकरांनी निजामाच्या राक्षसभुवन तळावर इ.स. १७६२ अचानक हल्ला चढविला. पण निजामाच्या प्रचंड फौज पुढे मराठा सैन्य कमी पडत होते. तेव्हा काही पळायला लागले. तेव्हा थोरले माधवराव, राघोबादादा व सुभेदार मल्हाररावास मोठ्यात्वेशाने निजामाच्या सैन्यवार तुटून पडले. माधवराव हा आपला शिरच्छेद करतील म्हणून निजामाने रूमाल फिरवून शरणागती स्विकारली. तर तिकडे निजामाचा दिवाण विठ्ठल सुंदर यास १० ऑगस्ट १७६३  रोजी गोळी लागून तो ही पडला त्यामुळे निजामाचे सैन्य पळायला लागले.

### ३.१.५९ सुभेदारांनी विंचूरकरांना तारले:

इ.स. १७६४ ला पूण्यात एकदा विठ्ठल शिवदेव विंचूरकराचे घोडे स्वार मैदानात घोडे फिरवत असताना काही पेशव्याचे ही घोडेस्वार मौज पाहण्याकरीता उभे होते त्यात भांडणे झाले. हे पेशव्यास कळताच आपला आपमान समजून त्यांनी हूकूम दिला की. 'उदयोक विंचूरकरांचा गोट लुटून त्यांस कैद करावें. या हुकूमामुळे विंचूरकरांनी कैद होण्यापेक्षा दोनहात करुन मरणे बरे असे समजून आपले पाच हजार कडवे स्वारांनिशी जय्यत तयारी केली. ही बातमी मल्हाररावांना समजताच ते पेशवे माधवरावाकडे जावून म्हणाले. ...विंचूरकर हे गादीचे पुरातन नोकर असून मोठे शूर आहेत... विठ्ठलराव बहुतेकरून जिवंत स्वाधीन होणार नाहींत... हैदर अल्लीवरच्या स्वारींत त्यांस एखादें बिकट काम सांगावें म्हणजे झालें!  तेव्हा पेशवे सुभेदारांना म्हणले 'काकासाहेब, तुम्ही म्हणतां हें सर्व खरें, परंतु सध्या विंचूरकर अगदीं बिथरून गेले आहेत... सुभेदार त्यावर म्हणाले की, 'त्यांची समजूत करून त्यांस हुजूर आणण्याचें काम माझें; आपण त्याविषयीं बिलकुल काळजी करूं नका!'[१५४] सुभेदारांनी विंचूरकरांची समजूत घालून पेशव्यांकडे दोघेही भेटीस आले. तेव्हा पेशव्यांनी घडलेल्या प्रसंगाबदल दिलगीरी व्यक्त केली.तेव्हा विंचूरकरही शांत झाले.

### ३.१.६० हैदरअली विरुध्द मोहीम:

मराठ्यांच्या पानिपतवरच्या पराभवाचा फायदा घेऊन शत्रू असलेला म्हैसूरचा हैदर अलीने कर्नाटकात बराच धूमाकळ घातलेला होता. तो सतत मराठी प्रदेशावर चालून येत होतां त्याने सावनूर, बेदनूर, धारवाड व नागपूरच्या भोसल्याच्या प्रदेशावर आक्रमण केले होते.तेव्हा मराठ्यांनीहैदरअलीत्याचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्यांनी कर्नाटक मोहिम नोव्हेंबर १७६४ ते मार्च १७६५ या कालावधीत हाती घेतली.या मोहिमेत पेशवे, सुभेदार, विचुंरकर, पटवर्धन व सखाराम बापू यांनी जय्यत तयारीनिशी निघाले. हैदर अली अनावती गावाच्या जवळ एका

घोर जंगलात होता. त्यांच्याकडे वीस हजार कवायती सैन्य, चाळीसहजार पायदळ व घोडेस्वार तसेच तोफखानाही होता. मराठयांनी अचानक युद्ध सुरु केल्याने हैदर अलीनेही तोफखाना चालवून मराठयावर मात करण्याचा प्रयत्न करीत होता. तेव्हा मराठा फौजेनेही निकराचा लढा देऊन प्रथम त्यांचा तोफखाना बंद पाडला. त्यामुळे म्हैसुरच्या हैदर अलीचा दारुण पराभव झाला. ३० मार्च १७६५ ला अनंतपूर येथे हैदर अलीने मराठ्यांशी करार केला.

**३.१.६१ नजीबखान रोहिल्याचा बंदोबस्तः**

उतरेत नजीबखानाने भरतपूरच्या सूरजमल जाटावर स्वारी करुन जाटाचा ठार केले. त्यामूळे त्याचा नातू जवाहिरसिंग व नवलसिंगाने सुभेदार मल्हाररावाकडे मदत मागितली. तेव्हा उपकाराची जाण ठेऊन मल्हाररावांनी पेढारी फौज घेऊन भेट घेतली. सुभेदाराचे व जाटाचे सैन्य मिळुन नजीबखानावर नोव्हेंबर १७६४ स्वारी केली. पण नजीबखान काही केल्याने हार मानायला तयार नव्हता. तेव्हा दोघांत तह करुन संघर्ष मिटवला.

**३.१.६२ आयोध्याच्या नवाब सुजाउद्यौलास मदतः**

इंग्रजांनी आयोध्याच्या नवाब सुजाउद्यौलावर आक्रमण केले. त्यामुळे नवाबाने सुभेदार मल्हाररावांकडे आपला वकील पाठवून मदतीस येण्याची विनंती केली. 'या वेळीं मी फार संकटांत आहे; आपण जर मला मदत कराल तर तुम्हांस कुचाचे लाख रुपये व मुक्कामाचे पन्नास हजार रुपये देईन.' त्यानुसार सुभेदार आपल्या फौजेसह आयोध्याच्या नवाबास मदतीसाठी निघाले. गंगाधर यशवंत हे या मोहिमेतील सैन्याचे काम पाहत होते. तेव्हा या मोहिमेवर असताना गंगाधर यशवंत यांचे व होळकरांचे मुख्य कारभारी वा दिवाणं विसोबा लांभाते यांच्यात फौजेच्या रोजमुरा व्यवस्थेवरुन बेभनाव झाला. सुभेदारांना हे उपाध्याय शंकर भट यांच्याकडून कळताच त्यांनी फौजेचा रोजमूरा देण्याचे कबुल केले. तेव्हा सैन्यानिशी गंगाधर पंतानी ३मे १७६५ रोजी हल्ला करुन इंग्रजांच्या सात फाळणी ठार करुन चौदाशे गोरेचा पराभव केला. कारण त्यांना बंदुकीसह आपल्या छावणीत आणले. तेव्हा गंगाधर यशवंत फौजेचा शेजमुरा मागण्यासाठी ते आले असता त्यांना सांगण्यात आले की 'अद्याप चार पलटणी कायम आहेत; तेव्हां रोजमुरा काय म्हणून द्यावा?'[१५४] त्यामुळे नाराज गंगाधर पंत मानखाली घालून आपल्या छावणी जावून झोपी गेले. पण अचानक इंग्रजानी रात्रीच्या वेळी चार फलटणीसह हल्ला केल्याने बेसावध असलेल्या मराठी फौज पळायला लागली. मल्हारराव आपल्या फौजेसह काल्पी जवळून पूर आलेल्या यमुना नदीचा उतार पाहून नदी पार केली. पण इंग्रजांनी नदी पार करण्याचा प्रयत्न करताना त्यांचे बरेच सैन्य बुडून गेल्याने ते परत फिरले.

**३.१.६३ नागपूरच्या भोसल्यावर हल्लाः**

नागपूरच्या जानोजी भोसले व निजाम या दोघानी मिळून पुण्यावर १७६३ ला हल्ला करुन पुण्याची बरीच मोठी लूट केलेली होती. यांचा पेशव्यांनी बदला घेण्यासाठी मल्हारराव

होळकर यांना सोबत घेवून जानेवारी १७६६ ला वऱ्हाड प्रदेशावर भोसलेंच्या प्रदेशावर हल्ले करुन भोसल्यांचा पराभव केला. शेवटी जानोजी भोसले यांनी शरणांगती पत्करुन दर्यापूर येथे मराठ्यांशी करार केला.

**३.१.६४ कर्नाटक स्वारी:**

माधवराव पेशव्यांनी जानेवारी १७६२ ते जून आखेर पर्यंत धारवाड ते तुंगभद्रा नदी पर्यंतच्या प्रदेशातून खंडण्या वसुल केल्या. त्यानंतर १७ फेब्रुवारी १७६४ ते जून १७६५ अखेर पर्यंत हुबळी, गदग, कुंदगोळ, नवलगुंद, बेहळली, मुळगुंद जालिहाळ इत्यादी तुंगभद्रा नदीपर्यंतचा प्रदेश जिंकून घेतला. त्यानंतर धारवाड, रटटेहली व सावनूर ताब्यात घेतली.

माधवराव पेशव्यांनी तिसऱ्या स्वारीत नोंव्हेबर १७६६ ते १७६७ पर्यंतच्या काळात तुंगभद्रेच्या दक्षिण किनाऱ्यापर्यंतचा प्रदेश जिंकला. त्यात बाळापूर शिरे हासकोटे गावे जिंकून घेतली. तीस लाख रुपयांची खंडणी वसुल केली. नोव्हेंबर १७६९ ते जानेवारी १७७१ दरम्यान तुंगभद्रा नदीच्या दक्षिण किनाऱ्यापर्यंतचा भाग जिंकला. जुन १७७१ ते जुन १७७२ या पाचव्या स्वारीत म्हैसूरच्या हैदर अलीला शरण येण्यास भाग पाडून त्याच्याशी करार करुन युद्ध खर्चासाठी खंडणी देण्यास भाग पाडले. थोरल्या माधवराव पेशव्यांनी अंतर्गत व बाहय संकटाचा कणखरपणे त्यांचा बिमोड करीत असताना १८ नोव्हेंबर १७७२ ला थेऊर येथे निधन झाले. त्यांची पत्नी रमाबाई त्यांच्या सेवेत सती गेली.

**३.१.६५ झाशीवर हल्ला:**

सुभेदार मल्हारराव होळकर युद्धात गुंतल्याचे पाहून दतिया, ओडसे, शेवडे येथील राजे व गोहदचा जाट या सर्वांनी मिळून मराठयांच्या ताब्यांतील झांशी व ग्वाल्हेर हीं दोन शहरें घेण्याची मसलत केली. सोबतीस दिल्ली बादशहाचा सरदार अनुपगीर गोसावीस स्वारीचा खर्च देऊ म्हणून मदतीस बोलावून घेतले. या तिघांनी होळकरांच्या प्रदेशावर हल्ला करुन झाशी शहर ताब्यात घेतले. त्यावेळी मल्हारराव होळकर हे झाशीच्या जवळच होते. त्यांना हे कळताच त्यांनी झाशीला वेढा देवू नये यासाठी अनुपगिरच्या नेतृत्वाखाली चांगली फौज देऊन रक्षणासाठी बाहेर ठेवले. तेव्हा मल्हारराव झाशीकडे कुच न करता शेवड्याकडे मार्चा वळविला. त्यामुळे शत्रूला आपली झाशीच्या वेढ्यासाठी ठेवलेली प्रचंड फौज शेवड्याकडे रातोरात वळवावी लागली.

तेव्हा सुभेदार मल्हारराव होळकरावांनी आपला मोर्चा शेवड्याऐवजी सडया फौजेनिशी झाशीवर इ. स. १७६५ मध्ये हल्ला केला. अनुपगिरीला दोन-तीन महिने झुंज देऊन झाशीच्या बुंदेलाना शरण येण्यास भाग पडून झाशी काबीज केले. अनुपगिर गोसावी फौजेसह निघून गेला. मल्हाररावांनी नंतर दतियाकडे मोर्चा वळविला. दतियावर त्यांनी पुढचे बाजूस चारी तोफा, मध्यें घोडेस्वार व मागें पायदळ याप्रमाणें सेनेची रचना करून दतियावर हल्ला केला. दोन दिवसानंतर दतियाचा राजा शरण आल्याने त्यांस कैद करुन सुभेदारांनी पेशव्याच्या

नावाची द्वाही फिरवून त्या राजाकडून पंधरा लक्ष रुपये घेऊन आपला हस्तक म्हणून गादीवर बसविले. सुभेदार मल्हारराव होळकरांचा हा धाक पाहून येथील परिसरातील अमंलदार व संस्थानिकांच्या अधिकाऱ्याने पाच पाच लाख रुपये खंडणी देऊन शरण आले.

थोरले माधवराव पेशव्यांच्या अचानक मृत्यूमुळे १३ डिसेंबर १७७२ ला धाकटे बंधू नारायनराव यांना पेशवेपदाची वस्त्रे छत्रपतीकडून मिळाली. नजरकैदेत असलेल्या रघुनाथरावांना कुलाब्याच्या तुकोजी आंग्रेच्या नेतृत्वाखाली पाचशे सैनिकांने गारद्यांच्या थकित पगाराचा मुद्या समोर करीत शनिवारवाड्यात घुसून नारायणरावांचा खून केला. पेशव्यांचा सेनापती हरिपंत फडकेस कुलाब्याच्या रघुजी आंग्रे यांनी शिजत असलेल्या कटाची माहिती दिलेली होती; तरी ते संरक्षण करु शकले नाहीत. रघुनाथरावांनी भर दिवसा 'ध' चा 'मा' करुन गारद्यांमार्फत पेशवे नारायणरावांचा खून केला. रघुनाथरावांनी ३० ऑगस्ट १७७३ रोजी शनिवारवाड्यात मराठ्यांच्या इतिहासाला काळीमा फासविणरी घटनेतून मराठेशाहीचा नादानपणा उघडकीस आणला.

नारायनरावाची पत्नी याच वेळी गंगाबाई गरोदर होत्या. त्याना पूरदंर किल्ल्यात सुरक्षित ठिकाणी आश्रयास हलविण्यात आले. १८ एप्रिल १७७४ ला ती बाळंतीन होवून सवाई माधवरावाचा जन्म झाला. बारभाई मंडळीनी ४० व्या दिवसाच्या सवाई माधवरावाचा २८ मे १७७४ पेशवाईची वस्त्रे देऊन पूण्यांचा राज्यकारभार बारभाई मंडळीने सुरु केला. पुढे सवाई माधवरावांचा सांभाळ पार्वतीबाई सगुणाबाई व नाना फडणीसानी केला. तर नंतर २५ नोव्हेंबर १७९५ ला सकाळच्या वेळी शनिवारवाड्याच्या दुसऱ्या मजल्यावर असलेल्या महालातील दिवानखान्यात सवाई माधवरावास वाताच्या झटक्याने तोल गेल्याने ते सज्जातून खाली पडल्याने तिसऱ्या दिवशी निधन पावले. नाना फडणीसाचे स्वप्न भंग पावले. सतत तेवीस वर्ष पेशवाईचा कारभार संभाळुन मराठा साम्राज्याची सेवा केली. सवाई माधवरावांस रमाबाईसही मुलगी झाली. पण तो लहानपणीच वारली. तर यशोदाबाई या पत्नीस अल्पवयीन होती. म्हणजेच पेशवे निपुत्रीक होते.

थोरले बाजीराव पेशवे यांचे चिरंजीव असलेल्या रघुनाथरावांनी पुतण्याचा भर दिवसा रक्तरंजितपणा घडवून आणून स्वत:स १० ऑक्टोंबर १७७३ ला पेशवाईची वस्त्रे मिळविली. पुणे दरबारातील पेशव्यांनी नियुक्त केलेले न्यायाधीश न्यायमूर्ती रामशास्त्री प्रभूणे यांनी रघुनाथराव हे नारायणरावांचे खूनी आहेत असे सिद्ध करुन त्यांना पेशवे पदावरुन बडतर्फे केले. रघुनाथरावांचा मुलगा बाजीराव दुसरा यांनी बापाप्रमाणेच मराठेशाही इंग्रजांच्या दावणीस नेवून बांधली. 'हिंदूस्थानच्या इतिहासात रघुनाथराव एवढा नादान भ्रष्ट, मुर्ख आणि खुनी सत्ताधीश झाला नाही.[१५५] नाना फडणीसांनाही धुर्त इंग्रजांस ओळखता आले नाही. धुर्तपणा मुत्सद्दीपणा आणि दुरदृष्टीपणात इंग्रज जगात माहीर होते नाना फडणीसांचा सखा चुलत भाऊ मोरोबा फडणीस हा रघुनाथरावांच्या पक्षात होता.

धारच्या किल्ल्यामध्ये रघुनाथरावांची गरोदर पत्नी होती तिला १० जाने १७७५ ला एक मुलगा झाला. त्याचे नाव बाजीराव दुसरा असे ठेवले. यापूर्वीच रघुनाथरावांनी पुत्र होत नसल्याचे पाहून अमृतरावास दत्तक घेतलेले होते. त्यानंतर पून्हा रघुनाथरावास चिमणाजी नावाचा दुसरा मुलगा झाला. आनंदीबाई या मुलासह पुण्यात राहण्यासाठी आली. तेव्हा नाना फडणीसांनी तिला व तिच्या मुलास मंडलेश्वर येथे नजर कैदेत ठेवले. सवाई माधवरावांच्या दुसरी पत्नी यशोधाबाईच्या मांडीवर आनंदीबाईचा मुलगा चिमणाजीस बसवून दत्तक विधान करण्याचा प्रयत्न नाना फडणीसांनी सुरु केला. पण दुसरा बाजीराव जिवंत होता दत्तक घेण्याचा प्रश्नच नव्हता. पण नाना या अगोदर पेशव्यासाठी खूप मोठा कर्जाचा डोंगर किल्यामुळे त्यांना आपली जबाबदारी पेशव्यावर ढकलावयाची होती.पण बाजीराव दुसऱ्यांनी महादजी शिंदेच्या मदतीने नानाचा तर नानानी महादजी शिंदेच्या मदतीनेच बाजीरावांचा काटा काढण्याचा प्रयत्न जो तो करीत होता. पण महादजी शिंदेस काय जो खंडणी अधिक देईल त्यांची बाजू घेण्याचा प्रयत्न सुरु केला. एवढेच नव्हे तर शिंदेनी होळकरांच्या प्रदेशावर हल्ले करुन तो काबीज करण्याचा व होळकर शासक आपल्याच तंत्राने कसे चालतील यांचा चंग बांधला.

### ३.१.६६ गोहदवर हल्ला:

राणोजी शिंदेचे तीन मुले जयापा, दताजी व तुकोजी हे आब्दालीशी लढताना रणांगणावर गतप्राण झाले. त्यामुळे राणोजी शिंदेचा दासीपुत्र महादजी शिंदेस पेशव्यांनी सरदारकीची वस्त्रे दिली. त्यावेळी राघोबादादासोबत विठ्ठल शिवदेव विंचुरकर यांनी मल्हाररावास सहाय्य करण्यासाठी उत्तरेत निघाले. ग्वाल्हेर मार्गे ते बुंदेलखंड येथे येथून सुभेदारांना येऊन मिळाले. गोहदच्या जाटाने स्वतंत्र अमंल स्थापन करुन त्यांनी मराठयांचा प्रदेश ताब्यात घेत होते. तसेच ते मराठ्यांच्या प्रदेश वारंवार हल्ले करीत होते. तेव्हा मराठ्यांनी गोहदकडे मोर्चा वळविला. गोहदच्या धौलपूर येथे १३ मार्च १७६६ पासून लढाई सुरु झाली.

सात-आठ महिने झाले तरी जाट काही शरण येत नव्हता. कारण महादजी शिंदे जाटास आतून संघान साधून त्यास दारुगोळा व धान्याचा पुरवठा करीत होता. हे राघोबादादास समजताच त्यांना खूप राग आला. तेव्हा ते म्हणाले की, 'महादजीस मेखसू घालून ठार मारावा, ही बातमी अखबरनविसांनी पुण्यातील पेशव्याना कळविल्याने त्यांनीही एक सांडणी स्वार त्वरेने उत्तरेत पाठवून सुभेदारास व विचूंकरास कळविले. 'महादजींचा हरयुक्तीनें बचाव करावा' तेव्हा सुभेदारांनी महादजीच्या बचावाचा प्रयत्न सुरु केला. राघोबादादास भेटून सुभेदारांनी खूप समजावण्याचा प्रयत्न केला. तेव्हा राघोबादादा म्हणाले की, 'सुभेदार आपण या कामांत पडूं नका. गुलाम अखेर आपल्या जातीवर गेला!'

राघोबादादाने काही केले तरी ऐकत नसल्याचे पाहून शेवटी सुभेदारसह महादजी व मालेराव होळकर हात बांधून राघोबादादाच्या डेऱ्यासमोर सकाळच्या पारी जातात. त्यानंतर

राघोबादादा उठल्यावर हे दृश्य बाहेर येऊन पाहतात. तेव्हा तिघेही पायावर येऊन लोटांगन घालतात. तेव्हा राघोबादादानी सुभेदारासह दोघांनाही उठवून म्हणाले की, सुभेदार आम्हां तिघांसही आपण रायांचे (बाजीरावांचे) ठिकाणीं आहां. तशांत मजवर पुत्रवत् प्रेम करुन मला या योग्यतेस तुम्हींच आणिलें. असें असतां आपण आज हात बांधून मला दंडवत घातलें,[१५६] त्यानंतर या तिघांनाही पोषाख, कडा, चौकडे, शिरपेच, मोत्याचे तुरे व एक एक हाती देऊन गौरव करून परत पाठविले. त्यानंतर सुभेदार मल्हारराव होळकरांनी जाटाशी मध्यस्थी करुन तीन लाख रुपये खंडणी घेऊन जाट शरण आला.

**३.१.६७ सुभेदार मल्हारराव होळकरांचे निधनः**

सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या कानाचे दुखने वाढतच चालले. तेव्हा आलमपूर येथे सोबत राघोबादादा, महादजी शिंदे, नातू मालेराव पुतण्या व तुकोजीराव होळकर यांना जवळ बोलावून म्हणाले 'दादासाहेब मीं तर चाललो; परंतु या वेळीं माझा खंडू असता तर किती बरें झालें असतें! असों; इशेच्छा! (मालेरावाचा हात धरून) हा आहे हाच खंडू आहे! पण दादासाहेब' हें अगदीं अल्पवयस्क पोर असल्यामुळें त्यास नीट वागवून घ्या, व मालेरावाचा हात राघोबादादाच्या हातात हात दिला त्याच प्रमाणे महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांच्या हातात हात दिला तेव्हा तुकोजीस सुभेदारास म्हणाले की 'मी आपला चाकर असल्यामुळें माझे हात आपण बाबासाहेबांच्या हातांत देऊन सर्वोपरी मला वागवून घेण्याविषयीं त्यांस सांगण्याचें सोडून हें उलट कसें केलें? त्यावर मल्हाररावांस तुकोजी म्हणाले की, 'माझ्या मागें माझें गांव राखून श्रीमंतांची चाकरी तूंच करशील![१५७] इतके शब्द बोलून २० मे १७६६ ला ७४ व्या वर्षी आलमपूर येथे त्यांनी आपला प्राण सोडला.

मल्हाररावांच्या निधनामुळे पेशव्यांचे फार मोठे नुकसान झाले. घरातील कारभारी व्यक्ती नाहीसा झाला.त्यामुळे आपला 'दख्खनचा आधार!' गेला असे वाटत होते. त्यामुळे पुढे पेशवे कुटूंबात 'काका' म्हणून सर्व जन आदर देत. नानासाहेब पेशवे तर 'भीम' म्हणत असत. एवढेच काय उतरेत मल्हाररावाची मोहिम आली म्हणजेच की अर्धा राजे तर पराभव झाल्यासारखे शरण येण्याची तयारी करीत असत. दक्षिणेकडून इंग्रज पोर्तूगीज वायव्ये भारताकडून आदिलशहा व आब्दाली या दोघांना अठराव्या शतकात तोंड देण्याचा प्रयत्न केला. म्हणून भारताच्या इतिहासात अठरावे शतक महत्वाचे मानले जाते. नजीबखान रोहिला व शुजाउद्यौला यांना मुस्लीम सत्तेच्या पुनरुजीवनाची स्वप्न पाहून त्यांच्याशी मैत्री केली. पण त्यांना दोन हात करण्याचे सामर्थ्य संपूर्ण भारतात केवळ मराठ्याकडेच होते. हे सामर्थ्य त्यांनी बाजीराव, राघोबादादा, मल्हारराव होळकर व राणोजी शिंदेनी या सर्वानी केल्या पराक्रमामुळेच शक्य झाले.

महादजी शिंदेनी उत्तर मोहीम हाती घेऊन उतरेत आपला चांगलाच दबदबा निर्माण केलेला होता. तर पुणे दरबारात मात्र अराजकता, अनागोंदी, असंतोष, संशय व नेतृत्वहीन

झालेला होता. नागपूरकर भोसल्यांना पेशवेपद हवे होते. तर गुजरातच्या गायकवाडांनी या अगोदरच इंग्रजांशी संधान बांधलेले होते. धारच्या पवार केवळ नामधारी सुभेदार होते. तर इंदौरच्या होळकरशाहीस खंबीर सुभेदारच नव्हता. तुकोजीराव होळकर थकलेले होते त्यांची चारीही मुले अनियंत्रित व आडदाड स्वभावाची असल्याने महादजी शिंदे मन मानेल तसे वागण्यास मोकळा होता. काशीराव होळकरास हाताशी धरुन होळकरशाहीचे लचके तोड महादजी शिंदेनी सुरु केली होती. मातोश्री अहिल्याबाई खूपच थकलेल्या असल्याने त्यांना वाटत होते की, पूर्वजांनी मिळवलेले राज्य, लोकांची मने जिंकून कल्याणकारी कामे करुन आध्यात्माचे रक्षण आणि पालन करून चालविले पाहिजे. म्हणजेच अहिल्याबाईचे धोरण हे चढाईचे नव्हते तर भाईचारा, सामंजस्य, विश्वासहार्यता, संस्कृतीचे रक्षण, भुतदया व न्याय या तत्वावर आधारलेले होते.

**३.२ मालेराव होळकरः** (२१ मे १७६६ ते २७ मार्च १७६७)

मल्हाररावांनी नातु मालेरावास युध्दाचे व राज्यकारभाराचे शिक्षण देऊन तरबेज केले होते. सन १७६५ ते १७६६ च्या लढाईत त्यांनी आपल्या पराक्रमाची चांगलीच चुणुक दाखविली. मालेरावांना सांभाळण्याची जबाबदारी मल्हारावांनी तुकोजीवर सोपवली. त्यांनी मृत्यू समयी मालेरावांचा हात तुकोजीच्या हातात दिला. राज्यकारभारात तुकोजी हा अत्यंत विश्वासू व्यक्ती असल्यामुळे सुभेदारांनी सुखी प्राण सोडले.

मल्हाररावांच्या मृत्यू नंतर अहिल्याबाईनी पुत्र मालेरावास इन्दौर गादीवर बसवून स्वतः राज्यकारभार पाहू लागल्या. मालेरावांनी आपल्या अल्प कारकिर्दीमध्ये अनेक पराक्रम केले. माडंवगढची सनद मिळवली. सोनगीर व कोपाटणेची जहागीरी मिळवली, बंबडचा महाल मिळविला, सुलतानपूरची जप्ती उठविली, सदाशिव बारगळास तंबी दिली, जवाहरसिंगाचा बंदोबस्त केला, महादजी शिंदे यांच्या बरोबर उत्तरेच्या लढाईवर जावून पराक्रम गाजविला, आजोबा मल्हारराव यांच्या निधनाच्या वेळी युद्धमोहिमावर सोबत होते. साधारणतः दहाच महिने त्यांना राजकीय कारकिर्द लाभली.

२३ सप्टेंबर १७६६ रोजी पेशव्यांनी सुभेदारांच्या निधनानंतर होळकरांची सुभेदारीची वस्त्रे दिली त्यांचे पत्र—राजश्री भालेराव होळकर यांचे नावें सनद कीं, तुम्हाकडील मागील हिशेब स्वारीचा व बाबती सरदेशमुखी प्रांत माळवा व स्वदेशचे गांवचे इजारे याचा खेरीद बुंदी.सनखमस, व सीतसितैन दुसाला हिशेब, कीरकीर्द कैलासवासी मल्हारजी होळकर सरकारचा फडशा जाहला. तुम्हांकडे कांही लांझा राहिला नाही... बरहुकुम सरदारीचा बंदोबस्त करुन फौज सरंजामाची सेवा एकनिष्ठेन करीत जाणें....[१५८]

अहिल्याबाईंचा मुलगा मालेरावाला पेशव्यांनी सुभेदार केले. पण तो वाईट वर्तनाचा होता. अहिल्याबाईस खूप त्रास देई. त्याच्याजवळ ना आईचे सद्‌गुण होते ना आजोबासारखी कर्तबगारी नसली तरी ही त्यांनी बरेच कार्य कलेले होते. होळकर घराण्याचा वारस असूनही

राज्यकर्ता पदाला तो पात्र नव्हता. तो स्वभावाने स्वच्छंदी, चंचल बुध्दीचा, व विलासी असा होता. मालेराव आज ना उद्या सुधारेल अशी अहिल्याबाईला अशा वाटत होती. कारभाराकडे लक्ष द्यावे आजोबांची कीर्ती डोळयासमोर ठेवून काही कर्तृत्व दाखवावे असे नेहमी वाटत होते. मल्हारराव होळकर हे मालेरावावर अनेक युद्धाच्या व मोहिमेच्या जबाबदाऱ्या सोपवत असतं.

मल्हारराव बुलंदेखंडात गुंतल्याचे असले तरी त्यांची माळव्यातील समस्यांवर नजर होतीच मल्हाररावाकडून मालेरावास पत्रांनी आदेश धाडण्याची अनेक दाखले मिळतात. त्यात १९-०२-१७६१ रोजी मौजे सारंगाखेडे परगणे सुलतानपूरची जप्ती उठविण्यासाठी कळविलेले होते. ते पत्र- चिरंजीव विजयीभव राजश्री मालवा यांसी प्रती मल्हारजी होळकर आर्शीवाद उपरी मौजे सारंगखेडे प्रगणे सुलतानपूर येथील फतेसिंग राऊळ याची स्त्री अमरावतीनें तुम्हां पसी येऊन केसरीसिंग राऊळ फतेसिंगाचा भाऊ यांजला गावाकडून परांगदा करुन राऊलकीचे वतन जप्त करविले. त्यांस तेथील जप्ती तूर्त उठवून, देशास आलिया मनास आपले म्हणून मीराबान टोके यांनी सांगितलेवरुन तुम्हास लिहिले असे. तरी मौजे मजकुरचे राऊळकीची तुम्ही जप्ती करविली असेल ते सोडवून देणें आम्ही देशास आलिया मनास आणून करणें ते केले जाईल. तूर्त केसरीसिंगास आणूस त्याचे हातें राऊळकीचें कामकाज...[१५९] यापत्रावरून हे स्पष्टपणे होते की, मल्हाररावाने आपल्या पूर्ण विश्वासाने माळव्यातील जबाबदारी मालेरावावर सोपवली होती.

मालेराव देखील या दृष्टीने समर्थपणे पावले उचलत होते. सुभेदार मल्हारराव होळकरानंतर ३ जून १७६६ रोजी मालेरावास सरंजाम व वस्त्रे देण्यात आली. त्या काळात असलेल्या अनेक वयस्क व अनुभवी मंडळीना मालेरावांची योग्याता माहिती होती. म्हणूनच तर त्यांच्या विरूद्ध कोणीही लिहिलेले आढळत नाही. म्हटलं जातं की मालेराव त्रास देत होते. पण वैशाख १२ शके १६८८ रोजी अहिल्याबाईनी मालेरावास लिहिलेल्या पत्रावरून मालेराव हे आईला त्रास देणारे नव्हते तर ते एक कर्तव्यदक्ष सरदार होते.

“चिरंजीव मालबा... तुम्हास दोन-तीन पत्रे गेली आहेत. त्याप्रमाणे चित्तात समाधान राखावे. आता शोक करायचा प्रकार नाही. सरदारीचा विचार दौलत चालवायची आहे. विवके ठेवून कारभारात लक्ष घालून काम करावे. ज्याप्रमाणे तीर्थस्वरूप कै. सरदारी चालवत होते. त्याप्रमाणे पाय रोवून त्यांच्या प्रमाणे काम करून वडिलाप्रमाणे लौकिक होईल.तेच काम तुम्ही करावे मनात कोणताही संशय न ठेवता पूढे नजर ठेवून वडलापेक्षा अधिक किर्ती संपादन करावी. यात तुमचे कल्याण आहे. तात्यांच्या मर्जीने काम घ्यावे २५ जिल्हे ज. मोती बसूद. [१६०] असे हे बोलके पत्र पहावयास मिळते त्यात अहिल्याबाई व मालेराव यांच्यातल्या एकमेकाविषयीच्या संबंधविषयी कल्पना येते.

पेशव्यांचा मालेरावावर विश्वास होता. म्हणजेच त्यांच्याकडे राज्याकारभार सांभळण्याची लायकी असल्याची खात्री पेशव्यांना होती. तसेच पुढे झालेल्या पत्र व्यवहारावरून मालेराव

व्यवहार कुशल होते याची साक्ष मिळते. मालेरावांच्या मृत्युविषयी वेगवेगळी मते मांडली जातात. त्यात ब्रिटीश इतिहासकार माल्कन यांचे मत योग्य वाटते महेश्वरीत जरी काम करणारा एक कारागीर नेहमी काहीना काही कामानिमीत्य राजवाडयात येत असे. मालेरावांची एक दासी थोड्या चंचल स्वभावाची असल्यामुळे मालेराव तिच्यावर नेहमी पाळत ठेवत असतं. एक दोन वेळेस ती दासी कारागिराला चोरून बोलत असल्याचे मालेरावाच्या लक्षात आले. त्यांच्या त्यावरचा संशय अधिकच बळावला. एका दिवशी कारागीर चोरून दासीच्या महालाकडे जात असल्याचे मालेराव जेव्हा पहातात. तेव्हा त्यांचा राग आनावर झाला. याच रागाच्या भरात कारागीर मालेरावाच्या हातून मारला जातो. यात अहिल्याबाई नि:पक्षपातीपणाने चौकशी सूरू केली असं जॉन माल्कन म्हणतात. अहिल्यादेवीना चौकशी अंती अस लक्षात आले की, दासीचा व कारागिरांचा जरी कामानिमित्या नेहमी संबंध येत होता. त्यात चरित्र्यावर संशय घेण्यासारख काहीच नव्हतें.

आपल्या हातून एका निष्पाप माणसाचा खून झाला. या घटनेचा मालेरावांच्या हळव्या मनावर फार मोठा आघात झाला. याच मानसिक धक्क्याने मालेरावांना वेड लागले. अहिल्याबाईंचा दान धर्मावर विश्वास होता. त्यामुळे त्यांनी दानधर्म पुष्कळ केले. काहीच फरक पडला नाही. उलट त्यांचे जास्तच हाल होऊ लागले. अहिल्याबाईचा जीव बेचैन झाला. त्यांना आधार देण्यासाठी मल्हाररावही नव्हते. त्या बिछाण्यावर पडून रात्रदिवस चिंता करत असतं. शेवटी मालेरावांचे खूपच हाल हाल होऊ लागले. १० मार्च १७६७ रोजी इंदूर येथे मृत्यू झाला. पण आता राज्याचा वारसा कोणाला करावं? हा प्रश्न उभा राहिला.

**३.३ अहिल्याबाई होळकर:** (२८ मार्च १७६७ ते १३ ऑगस्ट १७९५)

भारतीय इतिहासामध्ये लोकमाता पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांचे कार्य भूतो न भविष्यति अशा स्वरूपाचे आहे. मराठयांच्या इतिहासामध्ये ज्या तेजस्वी विरांगणा होऊन गेल्या त्यांच्यामध्ये अहिल्याबाई होळकरांचे स्थान अद्वितीय आहे. एक भारतीय सत्वशील आयुष्याच्या प्रतिकूल जीवन प्रवाहातही मोठी कर्तबगारी करू शकते यांचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे पुण्यश्लोक अहिल्याबाई होय. जगात त्याच्या कर्तबगारीला तोड नाही. त्यांची पुण्यशीलता, देशप्रेम, धर्मप्रेम असामान्य होत. अहिल्याबाई हे नारीरत्न, धार्मिक, नितीपरायण, शिलसंपन्न होत्या. त्याच प्रमाणे त्यांची राजकीय कारकिर्दही तेवढीच महत्वपुर्ण अशी होती. अहिल्याबाईच्या खासगी जीवनात आप्तस्वकियांचे मृत्यू आणि राज्यावरील संकटे असतानाही स्थितप्रज्ञतेने राज्यकारभार केला.

मल्हारराव होळकर यांना खंडेराव हा एकुलता एक मुलगा होता. तो आपल्या वडीलासारखा शूरवीर तलवार बहाद्दर होता. पण तो वाईट संगतीने व्यसनाधीन निघाल्याने सुन अहिल्याबाईसच आपला मुलगा मानून त्यांनी तिला सर्व दौलतीचा व खाजगीचा कारभार शिकविला. दौलतीच्या उत्पन्नाविषयी व्यवस्थापन करणे, रसद पुरवठा करणे व दारूगोळ्यांचे

स्थलांतर करणे अशा प्रकारची सर्व कामे होळकर कारभाऱ्यानी मातोश्री अहिल्याबाईच्या आज्ञेप्रमाणे करण्याची सक्त ताकीद होती. अहिल्याबाई होळकर यांच्या कारभाराचे दोन भाग पडतात. खंडेरावाच्या मृत्यूनंतर ते मल्हारावांच्या मृत्यू पर्यंत व दुसरा मल्हाररावांच्या मृत्यूपासून ते त्यांच्या स्वत:च्या मृत्यूपर्यंत. अहिल्याबाईवर सासू सासऱ्यांनी उत्कृष्ट राज्यकारभाराचे संस्कार केले. तसेच त्यांना बालपणापासून वाचण्याची व लिहिण्याची आवड होती. सासरी आल्यावर राज्याचे प्रशासन, राजकारण, न्यायनिवाडा, लष्करी आणि मुलकी व्यवस्था त्यांचे त्यांना शिक्षण मिळत होते.

सुभेदार मल्हारराव यांची कर्तबगार सून म्हणून अहिल्याबाई होळकर यांचे कार्य महान स्वरूपाचे आहे. सुभेदार मल्हारराव होंळकर सोबत खंडेराव सुध्दा नेहमी युद्ध मोहिमावर जात असत. त्यावेळी गौतमाबाई होळकर अहिल्याबाईच्या मदतीने खाजगीचा व सरकारी दौलतीचा राज्यकारभार सांभाळत असत. सासूबाईच्या निधनानंतर अहिल्याबाईच सर्व राज्याचा कारभार पाहत असत. स्वत: आपल्या राज्याचा घोडयावर बसून फेरफटका मारत व सर्व परिस्थितीचा अतिशय डोळसपणे प्रत्येक घटकांची पाहणी करीत असत. तसेच सासरे सुभेदार मल्हारराव होळकर व पती खंडेराव युद्ध मोहिमावर गेल्यावर गौतमाबाई व अहिल्याबाई आपल्या राज्याचा स्वत: जातीने लक्ष घालून कारभार पाहत असत. आपल्या राज्याचे शासन व प्रशासन, सैन्यांची हालचाल, गोळा, बारूद, तोफा, धान्यसाठा, रसद पुरवठा व राज्याचा महसूल जमा करणे अशी अनेक कामे आपल्या मंत्र्याकडून करून घेत असत. अहिल्याबाईच्या दक्ष कारभारामुळे सर्वावर आपोआप एक प्रकारचा वचक निर्माण झाला. अहिल्याबाईचा दरारा इतका होता की त्यांच्या राज्याकडे वाकड्या नजरेने पाहण्याची आसपासच्या कोणाही राज्याची छाती केव्हाही झाली नाही! उलट अहिल्याबाईंच्या तेजापुढे सर्व राजे नमुन वागत असत.[१६१]

होळकरशाहीचा पाया मल्हाररावांनी घातला. यांच्या मर्जीशिवाय पेशव्यांचे पानही हालू नये इतका दबदबा त्यांनी स्वकर्तृत्वाने निर्माण केला होता. पण सासऱ्याच्या अचानक जाण्याने होळकरांच्या दौलतीचे रक्षण करण्याची जबाबदारी वैराग्य धारण करणाऱ्या अहिल्याबाईला उचलावी लागली. पती व सासरे यांच्या निधनाने अहिल्याबाईच्या आयुष्यातील दु:खाची मालिका पुढेही चालूच राहिली. तेव्हा त्यांनी २१ वर्षाच्या मालेरावास गादीवर बसवून राज्यकारभार सुरू केला; पण तो ही अल्पजीवी ठरला. मल्हारराव होळकरांच्या कुशल आणि ममत्वपूर्ण मार्गदर्शनाखाली युद्ध, नेतृत्व, प्रशासन, न्यायनिती या अंगानी परिपूर्ण झालेल्या अहिल्याबाईनी १७६७ ते १७९५ पर्यंत अठ्ठावीस वर्ष राज्य सांभाळले.

अठराव्या शतकात अखंड अठ्ठावीस वर्षे आदर्श राज्य करणारी राजमाता अहिल्याबाई होळकर ही पहिली महिला होवून गेली. 'सुभेदारची मी सून आहे.'[१६२] असे अहिल्याबाई होळकर नेहमी म्हणत असत. आपल्या मुलूखाचा विस्तार करण्यासाठी परमुलुखावर त्यांनी कधीही डोळा ठेवला नाही. अहिल्याबाईना उत्तम माणसे ओळखण्यांची

पारख होती. अहिल्याबाईना खाजगीचा सगळा कारभार स्वत:कडे ठेवून बाहेरचा कारभार तुकोजीरावांकडे सोपविला होता. म्हणजेच सेनापती पदी नियुक्त केले. दिवाणजी गंगाधर पंताच्या कुट्टीर कारस्थानास चोख उत्तर, राघोबादादांची फटफजितीत यश, तुकोजीरावांची चोख कान उघाडणी, स्त्रीयांची फौजेची उभारणी, भिल्ल व पेढांऱ्यांचा बदोबस्त, शिंदेचे पूर्ण पारिपत्य करण्यासाठी तात्काळ तुकोजीस रवाना करून पत्र लिहिले, 'निर्भयपणे लढून शिंद्याचा पराभव करा. रूपये आणि पैशाचा पुल बांधून देईन. मला पत्र लिहा, मी स्वतः युद्धात उतरेन.'[१६३]

### ३.३.१ भिल्ल दरोडेखोरांना सुधारण्याची संधी:

होळकर राज्यात चोर, डाकुंनी डोके वर काढून मोठ्या प्रमाणात धुमाकुळ घातल्याने जनतेला याचा फार त्रास होत होता. त्यामुळे जनता खूपच घाबरलेली होती. तेव्हा अहिल्याबाईंनी धुमाकुळ घालणाऱ्या दरोडेखोरांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी एक विलक्षण दवंडी पिटवली, 'जो दरोडेखोरांचा पुरता बंदोबस्त करील त्याला मी माझी मुलगी देईन.'[१६४] अशी भर दरबारात घोषणा केली. यामुळे स्वत:ची मुलगी प्रजेच्या हितासाठी पणाला लागली. ठग पेंढाऱ्याचा यशस्वीपणे जो कोणी बंदोबस्त करेल त्यास आपली मुलगी देईन अशी घोषणा भर दरबारात केली. तेव्हा यशवंतराव फणसे या वीरांनी हा पण यशस्वी करून दाखविला. तेव्हा त्याचा जात, पात, घराणे, पंथ, वंश, कुळ व धर्म याची कोणतीही तमा न बाळगता तुकोजी होळकर यांच्या सैन्यात काम करणारे सरदार श्री यशवंत फणसे या बहाद्दर तरूणाने हा 'पण' जिंकला. अहिल्याबाईंनी आपल्या मुक्ता या एकुलत्या एका मुलीचा विवाह सन १७६६ मध्ये त्याच्याशी लावून देवून त्याच्या पराक्रमाचा उचित गौरव केला. एवढेच नव्हे तर त्यास काही गावांची जहागिरी दिली. होळकर राज्याच्या शासक असलेल्या मातोश्री अहिल्याबाईंने मध्ययुगात आंतरजातीय विवाह घडवून आणला. या विवाहातून समाजासाठी समानतेचा व आंतरजातीय विवाहाचा संदेश दिला.

एखादया चोरी करणाऱ्या पोठासाठी वाईट व्यवसाय करण्याऱ्या माणसाला सरकाराचा पोलीस खात्याचा व न्यायलयाचा कितीही धाक असला तरी त्याला तो व्यवसाय करावाच लागतो त्यांने तो व्यवसाय नाही केला तर त्याच्या पूढे त्याच्या पोटाची खळगी भरण्याचा दूसरा मार्ग नसतो. त्यामुळे त्याला तो व्यवसाय ना विलाजाने करावाच लागतो त्याला त्या व्यवसायापासून दूर करायचे असेल तर पर्यायी व्यवसाय उपलब्ध करून दिला पाहीजे मग तो कूठे तो व्यवसाय सोडून देईल. हाच प्रयोग अहिल्याबाईनी भिल्ल जातीवर केला माणसाला हातपाती करून उपजीवीका भागवणाऱ्या भिल्लासारख्या जमातीला शेत जमीन देऊन शेती व्यवसायाकडे वळविले. याना जंगलातून प्रवास करणाऱ्या लोकांना मदत करून 'भिल्लकवडी' नावाचा कर वसूल करण्याचा अधिकार दिला. म्हणजेच भिल्ल जातीच्या लोकांना चोरी व्यवसायाला पर्यायी व्यवसाय निर्माण करून दिला. इतके करूनही जर कोणी लूटालूट

करण्याचा प्रयत्न केला तर, त्यास तोफेच्या तोंडी बांधून उडविण्याचा कायदा अंमलात आणला. कायद्याचा भंग करणाऱ्या भिल्लांच्या पूढाऱ्यांना तोफेच्या तोडी देण्यात आले.

### ३.३.२ होळकर राजधानीचे स्थलांतर:

सर्व आप्तइष्टांच्या दु:खद आठवणी इन्दौरमध्ये असल्याने त्यातून थोडी शांती व व्यवस्थीतपणे राज्यकारभार करता यावा. यापेक्षा होळकर राज्याची राजधानी ही पुढील धोक्याचा अंदाज येत होता व तो अनुभवास ही येत होते. म्हणून त्यांनी आपली राजधानी अधिक सुरक्षित राहवे यासाठी दूरदृष्टीकोन ठेवून अहिल्याबाईने इ.स. १७६७ पासून आपली राजधानी इंदौरहून महेश्वरला त्यांच्याच खाजगी वाड्यात नर्मदा नदी काठी स्थलांतर करुन काही वर्ष इथे वास्तव्य केले.[१६५]

१ मोंगलाईचें वेळी किल्ला मातीचा होता. संवत् १७९० त इ.स. १७३३ होळकरांचा अम्मल झाल्यावर दुरुस्तीचें काम सुरु झाले.

२ श्रीमंत आहिल्याबाई साहेबांची स्वारी इंदुराहून महेश्वरी संवत् १८२४ माद्रपदमासीं इ.स. १७६७ मध्ये येउन राहिली.

३ प्रथम सरकार वाडा बांधविला व श्रीनर्मदेचा घाट वाडयाखालील बांधविला. नंतर श्रीकाशीविश्वेश्वराचें मोठें देउळ शिखरबंद बांधवून स्थापन केली. त्यानंतर किल्यावर श्रीराम मंदीर बांधवून पूजा नथ्थूमट भिकंभटास सांगितली, त्यानंतर श्रीकृष्ण मंदीर बांधविलें व नंतर रेवाकाठी विठोबांचें देउळ बांधविलें.

४ प्राचीन किल्ला मातीचा होता त्याची डागडुगी थर बसविले, व दक्षिण पश्चिमची बाजू पक्के फतराची केली. कमानी दरवाजा मोंगली अमलाई पैकी दगडी होता तो पडल्यामुळें बुरुज वगैरे सुध्दा बांधविला...[१६६]

प्रजेची सेवा हिच मार्तन्डाची सेवा असे मानून सतत अठ्ठाव्वीस वर्षे रयतेच्या कल्यासाठी आपली प्रशासनावरची पकड मजबूत ठेवलेली होत्या. मराठा मातबर सरदार व पेशवे अहिल्याबाईना आदराने 'मातोश्री' म्हणत असत. अशा या शूर सरदाराने जे राज्य मिळवले. ते कोणाच्या मेहरबाणी ने नव्हे तर ते मिळविले स्वत:च्या तलवारीच्या जोरावर....!

अहिल्याबाई जेव्हा राज्यकारभारास सुरूवात केली. तेव्हा त्यांनी सर्वप्रथम जूनी देणे चालू खर्च देवा धर्माची व्यवस्था, देवाचा नैवेध, गायी वासरांची व्यवस्था इत्यादी प्रकारचे व्यवस्थापन करून त्यांनी राज्यकारभाराची घडी व्यवस्थित बसवली. शेतकरी, बारा बलूतेदार, व्यापारी यांच्या कामाची रक्कम अहिल्याबाई ताबडतोब देत असत.

### ३.३.३ गंगोबा तात्यांचे कारस्थान:

होळकरशाहीतील घराण्यातील पती, सासू, सासरे व मुलगा यांच्या अचानक झालेल्या मृत्यूमुळे अहिल्याबाईवर दु:खाचा डोंगर कोसळला. त्या धक्यातून केवळ प्रजेच्या सुखास आपले सुख मानून कसेबसे सावरले. तसे सर्वाचे लक्ष पोरके झालेल्या इंदौर राज्याकडेच होत.

पण काही अति स्वार्थी लोकांची वाईट नजर होती. दौलतीचे लचके तोडण्यासाठी राघोबादादासारखे लोभी पुरूष टपूणच बसलेले होते. तसेच होळकरांच्या राज्याचा दिवाणजी वा कारभारी गंगाधरपंत यशवंत चंद्रचूड यांनी चांगलीच मजल मारीत कटकारस्थाने सूरू केले.

दत्तक पुत्र गादीवर बसवून आपण तीर्थयात्रेला जावे. त्या तीर्थयात्रेचा सर्व खर्च राज्याच्या तिजोरीतून केला जाईल असा सल्ला दिवांणजी देवू लागले. त्यावर अहिल्याबाई दिवाणजीला रागात म्हणाल्या 'माझा एकुलता एक मुलगा गेला आणि आता आधार कोणाचा नाही अशा वेळी ब्राम्हाणांनी हरामखारी आरंभिली. मी बाई माणुस मी काय करणार हे कदापि ही मनात आणून हरामखोरी येवू नका. मी घोडयावर स्वार होवून बाहेर पडले म्हणजे मग श्रीमंतांचे दौलतीस जड जाईल. ब्राम्हाण म्हणतील होळकरांचे दौलतीचा अभिलाषा धरू तर ते कदापि घडणार नाही. ब्राम्हाण आहे म्हणून हरामखोरी माफ होणार नाही.'[१६७] दिवाण गंगाधर चंद्रचूड येथेच न थांबता तो राघोबादादाशी पत्रव्यवहार करून होळकर राज्य हडप करण्याचा प्रयत्न सुरू केला.

**३.३.४ राघोबादादावर मात:**

इ. स. १७६७ मध्ये मालेराव होळकर हे यांना दोन पत्नी होत्या, पण ते निपुत्रिक अवस्थेत मरण पावल्यामुळे होळकरांच्या गादीला वारस कोणी उरला नव्हता. मुक्ताबाई व अहिल्याबाई यांना धर्म प्रथेप्रमाणे गादीचा वारस होता येत नव्हते. अहिल्याबाई पुत्रशोकाच्या दु:खात असताना होळकरांचा गंगाधर चंद्रचूड या त्यांच्या दिवानाने परिस्थितीचा फायदा घेण्यासाठी राघोबादादा पेशव्याकडे गुप्त पत्र पाठवून एक कट रचला. पण या कटाचा सुगावा शिवाजी गोपाळ व राजाराम रणसोड यांना लागल्याने त्यांनी हा गुप्त संदेश अहिल्याबाईपर्यंत पोहचविला. अहिल्याबाई शोकात असतानांच आलेलं संकट पाहून बाकीच्या राज्यास मदतीस येण्याचे आव्हान केले.

राघोबादादानी होळकर राज्यावर शोक कळा पसरल्याचे पाहून ते राज्य आपण ताब्यात घ्यावे या हव्यासापोटी तो संधीची वाटच पाहत बसला होता. तेव्हा होळकरांच्याच राज्याचा दिवाणजी वा कारभारी गंगाधर पंत यशवंत चंद्रचूड गंगाधर यांनी राघोबादादास मोठे सैन्य घेऊन येण्यास गोपनीय निरोप पाठविला. अहिल्याबाई पुत्रशोकाच्या दु:खात असताना होळकरांचा गंगाधर चंद्रचूड या त्यांच्या दिवानाने परिस्थितीचा फायदा घेण्यासाठी राघोबादादा पेशव्याकडे गुप्त पत्र पाठवले की, 'होळकरांची ही दौलत आता बेतलमाल (बेवारस) झाली आहे. सगळे दु:खाने गालब (व्याप्त) आहेत. तेव्हा आपण उभयंतास ही अमृतसंधी आहे.'[१६८] या कटाचा सुगावा शिवाजी गोपाळ व राजाराम रणसोड यांना लागल्याने त्यांनी हा गुप्त संदेश अहिल्याबाईपर्यंत पोहचविला. पण अटकेपार झेंडे लावणाऱ्या राघोबादादा यांनी हव्यासापोटी हजारो सैन्यानिशी चाल केली. राघोबादादानी ५०,००० फौज घेऊन क्षिप्रा नदीजवळ उजैन येथेपर्यंत येवून धडकला. तेव्हा राघोबादादाच्या सैन्यातील सरदार म्हणाले स्त्रियाशी युद्ध करणे

हा क्षात्रियांचा धर्म नव्हे. आपण लढत असाल तर खुशाल लढावे. आम्ही स्त्रियांवर शस्त्र उपसणार नाही.[१६९] असे सैन्याचे धोरण पाहून राघोबादादाच्या वकीलास अहिल्यबाईच्या भूमिकेची बातमी कळताच राघोबास सल्ला दिला की, 'आपण यात जिंकलो तर एका विधवेचे राज्य गिळंकत्त केले असा दोषारोप होईल. जर आपण दुदैवाने हारलो तर एका दुबळ्या विधवा स्त्रीकडून मार खाल्ला असा आपला बदलौकिक होईल.'[१७०] अहिल्याबाईंनी यूद्धाची तयारी होताच राघोबाला निरोप पाठविला. मी बोलून चालून बाई—माणूस माझा युद्धात पराभव झाला तर मला कोणी नावे ठेवणार नाही. पण जर का तूमचा पराभव झाला तर सर्व जगात तूमचे हस्य होईल शिवाय एका अबलेस बरोबर यूद्धा केलेस तर जो कलंक तूमच्या नावाला लागेल तो जाणार नाही याचा विचार करुन लढाईच्या भरीस न पडता तर त्यांत तूमचे भले आहे.[१७१]

त्यावेळी मातोश्री महिलांच्या सैन्याची उभारणी करून आक्रमणास कणखरपणे प्रतित्तुर देण्याची तयारी करून सज्ज होत्या. त्यांनी स्वत: दांडपट्टा व तलवार चालविण्यात पारंगत होत्या. राघोबादादाने महादजी शिंदेस तुकोजीरावावर चालून जाण्यास सांगितले. पण त्यांनी ते मान्य केले नाही. तसेच भोसले, शिंदे, दाभाडे या सरदारांना गुप्त पत्रे पाठवून मदत मिळते का? ते अजमावून पाहिले. तर सर्वांनीच मदतीची तयारी दर्शविली. कारण सर्वावरच अहिल्याबाईचा कोणत्या न कोणत्या प्रकारचे उपकार होते. त्यामुळे ते या संकट समयी नकार कसे देणार? महाराणीने किल्ल्यावर लढाईच्या हत्याराचे जय्यत तयारी केली. राघोबादादा जर नर्मदेकडून आला. तर त्याला नर्मदेचो चढ—उतार व भोवरे कळू नये म्हणून सर्व नावाड्यांना किल्यात आणून ठेवले. याच कालावधीत राघोबाचे सैन्यानिशी बिनच्या मैदानात क्षिप्रा नदीपर्यत येवून पोहोचले होते. तेव्हा तुकोजीरावांनीही जय्यत तयारी करून राघोबादादाच्या मुकाबल्यासाठी क्षिप्रा नदी काठावर गेले. प्रथम तुकोजीने साडनी स्वार पाठवून इशारा दिली की, 'क्षिप्रा नदीवर उतरला असता तुमची आमची तलवार चालेल याचा विचार करून पाऊल टाकावे.'[१७२] राघोबाने महादजी शिंदेस तुकोजीरावावर चालून जाण्यास सांगितले. अनेक सरदार महाराणीच्या बाजूने असल्याचे राघोबास समजले तेव्हा त्याचे धैर्य खचले.

अहिल्याबाईने लगेच पुण्याला पेशव्याना पत्र पाठवून याबद्दल ताकीद करण्याविषयी कळविले. तत्पुर्वीच अहिल्याबाईने सेनापती तुकोजी होळकर, गायकवाड, शिंदे, भोसले व इतर पत्र पाठवून तात्काळ मदतीस बोलावून घेतले. व सरदार शरिफभाई यांच्या सहकार्याने महिलांची एक सैन्याची तुकडी उभारली. अहिल्याबाईनी वेळेचे भान ठेवून लगेच राजदरबार बोलावून त्या म्हणाल्या की, 'पुर्वजानी मिळवलेले स्वराज्य टिकवण्यासाठी माझं रक्त सांडल तरी चालेले. परंतु पेशव्याचे कपट कारस्थान चालु देणार नाही.'[१७३] अशा परिस्थितीमध्ये मोठ्या धैर्याने अहिल्याबाईने दौलतीचे रक्षण तर केलेच परंतु मल्हारराव होळकरांचा लौकिक कायम राखला. तिने राज्याची घडी विस्कटु दिली नाही. राघोबादादाशी अहिल्याबाईने दाखविलेला बाणेदारपणा हा असामान्य स्वरूपाचा होता. होळकरशाहीचे वैभव कायम राखले.

अहिल्याबाईंनी ताबडतोब शिवबाबाजी व राजाराम यांना बोलावून घेतले. व त्यांना म्हणाल्या 'ब्राम्हणाने हरामखोरी आरंभीली आहे परंतू मी बाई मनूष्य काय करणार हे मनात आनू नका? मी खादयावर भासडा (भाला) घेऊन उभी राहिले म्हणजे या श्रीमंताच्या दौलतीस अवघड पडे. ब्राह्मण म्हणतील दौलतीचा अभिलाषा करू तर ते होणार नाही. ही दौलत आम्ही खूशमस्करी करून मिळविली नाही तर ती कष्टाने मिळविली आहे.[१७४]

उत्तर भारतात मोहिमेवर गेलेल्या तुकोजीस लवकरात लवकर येण्याचा निरोप पाठवला. तर माधवराव पेशव्याकडे दादाजी वाघोलीकर यांना पाठवून राघोबाच्या कपटाविषयी सांगितले. श्रीमंत माधवराव पेशवे व सौ. रमाबाईसाहेबा हे दोघे मातोश्रीना श्राद्धास्थानी मानायचे त्यामुळे माधवराव कळवितात, राजश्री अहिल्याबाई होळकर यास राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ पेशवे पंतप्रधान अनेक आशीर्वाद. श्रीमंत दादासाहेब पेशवे, फौजेची तयारी करून नजराण्याच्या निमित्ताने नाशास प्रवृत्त होवून येत आहेत...सुभेदाराच्या दौलतीवर तुमचा पूर्ण हक्क असून त्याप्रमाणे दादासाहेबास निक्षून ताकीद झाली आहे. तरी तुमचक दौलतीविषयी जो पाप बुद्धी ठेवील त्याचे परिपत्य बेलाशक करावे. व तुम्हाकडील मुखत्यार दोघे हुजूर पाठवावे. तुकोजी होळकर यांचे नावे सनद व वस्त्रे तयार आहेत. आता कोणताही संदेश मनात न धरता सर्व सुरळीत चालवावे, स्वामी चाकरीत खंड पडू देऊ नये.'[१७५] या प्रकारचा निरोप येताच बाईंनी नारो गणेश, शिवाजी गोपाळ यास माधवरावाकडे पाठवून तुकोजीच्या नावे सरदारकीची वस्त्रे व स्वत:च्या नावे खाजगी सनद आणविली.

तेव्हा राघोबांनी महाराणी अहिल्याबाईंची तयारी पाहून मनातून घाबरलेल्या राघोबाने एकदम पवित्रा बदलून मातोश्रींनां कळविले की, 'मालेराव बाबा वारले म्हणून सात्वनास येत आहे.'[१७६] त्या वेळी महाराणी निरोप पाठवला की, 'आमचे सांत्वन करायला यायचं तर तर ५०००० फौज सोबत कशाला एकटे या पालखी पाठविते' अहिल्याबाईनी पुन्हा संदेश पाठविला की, आपणास स्त्री बरोबर युद्ध करणे बरोबर वाटते का याचा विचार आपण करावा असेही कळविले. असे आहे तर फौज घेवून येण्याचे कारण नाही. ऐकटयांने यावे.[१७७]

तसेच अनेक सरदार मातोश्रीच्या मदतीला आल्याचे पाहून राघोबादादा होळकरांची दौलत बुडविण्याचा बेत रद्द करून त्यांच्या भेटीस जातात. पेशव्यांना कोणत्यही अडीअडचणींच्या प्रसंगी मदत करणे हे आपले कर्तव्यच आहे. अशा अविरभावात राघोबादादा सोबत दहा पाच साथीदार घेवून पालखीतून अहिल्याबाईंकडे सांत्वनासाठी येतात. चार दिवस पाहूणा म्हणून राहतात. शेवटी जाती समयी ऑगष्ट १७६५ मध्ये आनंदवलीस येथे तुकोजीरावास सुभेदार पदाची वस्त्रे प्रदान केली.[१७८] तुकोजीने माधवरावांची पेशव्याची भेट घेवून मानाची सुभेदार पदाच्या वस्त्राचा स्विकार केला. त्या अहिल्यादेवीच्या आज्ञेप्रमाने वागत असल्याने सर्व सत्ता त्यांच्याच हाती होती. म्हणजेच मुलूखगिरीचे कार्य वा होळकर राज्याचे

सेनापती तुकोजीरावांकडे देऊन अहिल्याबाईंनी स्वत:कडेच होळकर राज्याचा मुलकी कारभार ठेवून राज्यकारभार सुरू केला.

**३.३.५ रामपूरचे चंद्रावताच्या बंडाचा बिमोड:**

उदेपुरा सुरवातीस माळव्याच्या मुसलमानाकडे होते. नंतर इ.स. १७२९ जयपूरचा राजा सवाई जयसिंगकडे आला. अहिल्याबाईच्या होळकर यांच्या काळात या रामपुऱ्यांत तीन वेळा होळकरांविरुद्ध बंड पुकारले गेले. नंतर त्याचा मुलगा माधवसिंगाने हा जिल्हा मल्हाररावास दिला. त्याच वेळे माधवसिंगानेही रामपूर मल्हाररावास दिला. त्यावेळी अहिल्याबाईच्या नेतृत्वाखाली तुकोजीराव होळकरांनी या बंडाचा बिमोड केला. तुकोजाच्या मदतीने अहिल्याबाईचा कारभार सूरळीत चालत असतानाच सौभाग्यासिंह चंद्रावत यांनी राजपूत राजाच्या मदतीने होळकरशाहीच्या विरुद्ध जाटानी उठाव केला त्यालाच चंद्रावतच बंड म्हणतात. चंद्रावताचे हे बंड अतिशय कुशलतेने अहिल्याबाईने मोडून काढले. मातोश्रींची यूध्दनीती, दरारा व राजनीतीने अनेक शत्रू नामोहरम केले. हे बंड अतिशय कुशलतेने अहिल्याबाईने मोडून काढले. या बंडाच कारणं असं. रामपूर हे उदेपूर राज्याच्या अधिपत्याखाली होते. संग्रामसिंहाने भाचा माधवसिंहाला रामपूरा हे काही दिवसासाठी जहागीर म्हणून दिलेले होते. ते मल्हारावानां रामपूर जहागिर देण्यापूर्वी माधवसिंहाने संग्रामसिंहाचा मुलगा जगदिशसिंह याला विचारून द्यावयास हवी होते. जगतसिंहाला हे माहीत होताच ते माधवसिंहावर खूप नाराज झाले; पण आता करणार काय? मल्हाररावांच्या अफाट सैन्यापुढे त्यांचे काही चालत नव्हते. रामपूरची व्यवस्था उदेपूर घराण्यातील चंद्रावत नावाचा व्यक्ती पाहत होता. मल्हारराव असे पर्यंत तो गप्प राहीला.

मल्हाररावानंतंर अहिल्याबाईच्या हाती राज्यकाराभार आला. तेव्हा मात्र उदेपूरवासीयांना एका धनगर स्त्रीचा अधिकार मान्य झाला नाही. त्यांनी अनेक राजपूत राजांना सोबत संगनमत करून होळकरांविरुद्ध बंड पूकारले. या बंडाचे नेतृत्व सैभाग्यासिंग चंद्रावत नावाच्या राजाने केले म्हणून त्याला चंद्रावत बंड म्हणतात.[१७९] बंडवाल्यांना माहित होते की, होळकरांचे सैन्य तुकोजी सोबत उत्तर भारतात गेलेले होते. त्याचप्रमाणे होळकरशाहीचा सध्या कारभार बाई एकट्याच पहातात. एक साधारण बाई माणूस काय करू शकणार? म्हणून बंडवाल्यांनी बंड पूकारले. अहिल्याबाईना हे माहीत होताच त्यांनी आपला विश्वासू सेनापती शरीफभाईला भरपूर सैन्य देऊन चंद्रावंताच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी पाठविले. जाते वेळी त्याला त्या म्हणाल्या, 'शरीफभाई तुम्ही युद्ध भूमीवर जाऊन बंडवाल्यानां चांगला धडा शिकवा अन् माझी अवश्यकता वाटल्यास मला पत्राने कळवा युद्ध करण्यासाठी येईन. परंतु हार पत्करून परत यावयाचे नाही.[१८०]

मंदसौरच्या मैदानात उभय सैन्यात घनघोर युद्ध झाले. या युद्धाची सर्व सूत्रे अहिल्याबाईच्या हाती होते. युद्धाचा सर्व व्यवहार त्याच्या मार्गदर्शनाखाली चालू होता.

होळकरांच्या कसलेल्या वीरांनी राजपूतांना पाणी पाजंवले. त्यात सौभाग्यासिंह चंद्रावताला कैद केले. दूसरा सरदार भवानीसिंह जीव वाचवण्यासाठी पळ काढला. अहिल्याबाईने सौभाग्यसिंह चंद्रवताला तोफेच्या तोंडी बांधून उडवले. यामुळे सारे बंडेवाले घाबरून गेले. आणि अहिल्याबाईला सर्वजन शरण आले. मातोश्री खूप दयाळू होत्या. त्यांनी सर्वांना क्षमा केले. अशा तऱ्हेने बंडवाल्याचा कठोरपणा बिमोड केले. अहिल्याबाईच्या पराक्रमाचा नाव लौकीक झाला. आणि आपल्या तलवारीचे पाणी भारत वर्षाला दाखवून दिले. अहिल्याबाईच्या पराक्रमाचे पोवाडे सर्व पेशवे दरबाराने मुक्त कंठाणे गायले. आता अहिल्याबाईच्या शौर्याची किर्ती दूर-दूर वर पसरत होती.

इ.स. १७८२ पुन्हा चंद्रवंत होळकरांना त्रास देत होता. तेव्हा अहिल्याबाईनी कृष्णाजी जानदेवाचा मुलगा लक्ष्मणराव कृष्णा यांच्या नेतृत्वाखाली बिजेसिंग शत्रूची चाल यांना भारी पडू लागली. तेव्हा लक्ष्मणरावांनी भोपाळवाले दोनशे पठाणी स्वार, हजार पायदळ, व इंदूरहून दोन तोफा बोलावून १७८३ चंद्रवंत मवासाचे पारिपत्य केले. तेव्हा महेश्वरला आल्यावर या पठाणांना अहिल्याबाईने त्यास मेजवानी देऊन त्यांच्या शौर्या बदल कौतुक केले.[१८१]

इ.स. १७८७ रजपूतानी शिंद्यांचा लालसोटा येथे पराभव केला. त्यानंतर त्यांनी होळकरांचा निंबाहेडा महाल ताब्यात घेतला. त्यामुळे येथील होळकरांचा सुभेदार शिवाजी नाना हा रजपूत राज्याशी शरण गेला. त्यावेळी अहिल्याबाईनी आबाजीपंत रणछोडला सैन्य देऊन पाठविले. चकारडया मुक्कामी या मराठा सैन्यावर राजपुताच्या सैन्यानी अचानक हल्ला केला. त्यात आबाजी पंत ठार झाले.

तेव्हा अहिल्याबाईने शरीफभाईस शंभर स्वार देऊन रवाना केले. त्यानंतर पाचशे स्वार शरीफभाईस मदतीस पाठवून दिले. तुकोजीरावास निरोप पाठविला. अहिल्याबाईनी शिवाजी नानाच्या मदतीस स्वत:चा भाऊ तुकोजी शिंदे यास पाच हजार स्वारासह पाठविले. होळकरांनी मंदसौरच्या किल्यास वेढा देऊन रजपुतावर हल्ला चढविला. त्या लढाईत रजपूताचा दारून पराभव होऊन अनेक रजपुताची कत्तल केली. त्या कत्तलीमध्ये राण्याचा प्रधान मालदास मेथा व पुष्कळशे सैन्याचाही समावेश होता. सादडी व कनोरचा ठाकूर यांस कैद करुन त्यांच्याकडून चार गावे दिल्यावर त्याची सुटका केली. या विजयानंतर मराठी फौजेने जावेद, निंबाहेडा राणीपूरा जाळून लूट केली. तेव्हा चंद्रावंत आमदेस पळून गेला. अहिल्याबाईने महेश्वरमध्ये बसून ही मोहिम फत्ते केली. त्यामुळे पुण्यातील नाना फडणीसानी तोफा उडवून आनंद व्यक्त केला.

### ३.३.६ महाराणी व तुकोजी होळकर

काही इतिहासकार तुकोजी होळकर यांचा मल्हारराव होळकर यांच्या सोबत काही संबंध नव्हता असे सांगतात. पण तुकोजी व मल्हारराव होळकर यांच्यात नात्यातले संबंध होते. मल्हाररावांचे आजोबा हिंगोजी यास महादजी आणि बापूजी हे भाऊ होते. त्यांत हिंगोजी

खंडूजी मल्हारराव तर हिंगोजीचा भाऊ महादजी या शिवाजी नावाचा मुलगा शिवाजी यांना बिरजी व बिरजीस तानूजी व तानूजी होळकररांस तीन मुले दहाजी, तुकोजी, संताजी म्हणजेच मल्हारराव तुकोजींना आजोबा होते. तरी पण ते मल्हाररावांना बहुतेक ठिकाणी पिता म्हणूनच लिहित असतं. परंतु तुकोजी होळकर यांचे दत्तक विधान झाल्याचा कूठेही ठोस पूरावा मिळत नव्हता. पण आपल्या शिक्यामध्ये तुकोजी 'श्रीम्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजी सूत तुकोजी होळकर'[१८२] अशी अक्षरे केली होती. यावरुन सरदेसाई आणि पारसनीस यांनी तुकोजीचे दत्तक विधान झालेले नव्हते असे मत व्यक्त केलेले आहे. होळकरांच्या कागदपत्रावरुन असे दिसून येते की, अहिल्याबाईने तुकोजीरावांचा दुसरा पुत्र मल्हारराव दुसरा यांस होळकरशाहीचा वारस करण्यासाठी आपल्या भावांच्या मुलीच्या मुलीशी १० फेब्रवारी १७८९ रोजी विवाह केला. या विवाह प्रसंगी उच्चार १) मल्हारराव २) खंडेराव ३) मालेराव होळकर पुत्र मल्हारराव या प्रमाणे केलेला होता. यात तुकोजीचे नाव पूर्णपणे वगळले होते.[१८३] म्हणजेच तुकोजीचे दत्तक विधान झालेच नव्हते. तरीपण त्यांच्या मुलाला वारस नेमलेले होते हे यावरून स्पष्ट होते.

तुकोजी होळकर लहानपणापासूनच मल्हाररावाच्या तालमित वाढलेला हूशार व शूर व पराक्रमी योद्धा होता. सुभेदार मल्हारराव हे नात्याने आजोबा असतांनाही ते एकमेकासोबत पिता पुत्रप्रमाणे वागत असे. तुकोजी हा मल्हाररावाचा एकमेव विश्वासू असल्याने मरते समयी मल्हाररावाने मालेरावाचा हात तुकोजीच्या हातात दिला. तुकोजीरावास पेशवेदरबारातून त्यांच्या नावे सरदारकीची वस्त्रे मिळाली. त्यानंतर तुकोजीरावांनी सैन्याची व्यवस्था पाहणे व युद्धावर जाणे ही जबाबदारी सोपविलेली होती. तर होळकर राज्याची अंतर्गत व्यवस्था व राज्यकारभाराचे काम विकासाच्या योजना आखण्याचे व पूर्ण करण्याचे काम, मुलकी व्यवस्था स्वत: अहिल्याबाई पाहत होत्या. तुकोजीपेक्षा अहिल्याबाई वयाने लहान असल्या तरी तुकोजी अहिल्याबाईस आईच मानत असतं. म्हणूनच अनेक पत्र व्यवहारात 'गंगानिर्मल मातोश्री'[१८४] असा उल्लेख केल्याचे दिसून येते. सरदारकीची वस्त्रे मिळताच तुकोजीला स्वतंत्रपणे वागण्याची लहर उठली. तसा तो भोळया स्वभावाचा होता. याचा या स्वभावाचा बरोबर फायदा धन लोभी स्वार्थ पारायण असलेल्या नारो गणेश यांनी घेतला. बाईच्या विश्वासतला कामविसदार शिवाजी गोपाळ यांची पूणे दरबारात बदली केली. पण यांची अहिल्याबाईला अजीबात कल्पना नव्हती.

### ३.३.७ महादजी शिंदेचा समाचार:

अहिल्याबाईना आपल्या सैन्यावर व सेनापती तुकोजी होळकरावर प्रचंड आत्मविश्वास होता. तुकोजीला साथ महादजी शिंदे यांची होती. महादजी यांना अहिल्याबाईच्या हातातून होळकर शाहीचा सत्ता काढून संपूर्ण मालक तुकोजीस करायचे होते. तुकोजीच्या भोळया स्वभावाचा फायदा घ्यायचा होता. पण महाराणीच्या चतुर बूद्धीपूढे थोडेच लपणार होते. यांचा कूटनितीचा डाव उघडकीस येतांच, अहिल्याबाईने विठठ्ल रामराज यांना तशाप्रकारचे

कळविले. अहिल्याबाईचा निरोप मिळताच त्याच्या मनातला राग दूर करण्यासाठी तुकोजी होळकर महादजी शिंदेकडे जावून समझोता करण्यासाठी विनंती केली. तेव्हा तुकोजी होळकरांच्या विनंतीस मान देऊन दोघांच्यामध्ये निर्माण झालेल्या तेड मिटवण्यासाठी प्रत्यक्ष महादजी शिंदे महेश्वरास येतात. आणि अहिल्याबाईची भेट घेतात.

अहिल्याबाई महादजी शिंदेशी बोलून गप्प केले. त्यावेळी महादजीने शांत राहणे पसंत केले. तेव्हा त्यांनी अहिल्याबाईस बहीण मानून त्यांच्या पायाशी लागले. अहिल्याबाई बहीण मानून त्यांच्या पायाशी लागले. धर्मभोळया वाटणाऱ्या हया अहिल्याबाईची हिम्मत त्यांना समजली. त्यांनी पुन्हा मात्र बाईच्या विरोधात जाण्याच धाडस केलं नाही. अहिल्याबाईनेही त्यांना मोठया उदार अंत:करणाने माफ केले. पुढील काळात तुकोजी अहिल्याबाईच्या सांगण्याप्रमाणे काम करत गेला. त्यांच्या पराक्रमाने होळकरशाहीची कमान चढत गेली. आणि त्यांच्या वरचा अहिल्याबाईचा विश्वास वाढत गेला.

एकदा तुकोजी होळकर चौथाई वसुलीसाठी जयपूरकडे जाताना शिंदे यांनी होळकरावर अचानकपणे आक्रमण केले. तेव्हा तुकोजींने अहिल्याबाईस पत्र पाठवून सैन्याची व पैशाची मागणी केली. तेव्हा अहिल्याबाईने तात्काळ पन्नास हजार रूपये व अठरा हजार सैन्य पाठवून दिले.[१८५]

### ३.३.८ हरीपंत तात्या फडकेचा होळकर दौलतीचा मोह:

पेशव्यांचा अधिकारी हरीपंत तात्या फडकेचा होळकर दौलतीचा मोह झाला. तेव्हा त्याने महेश्वरला येवून कष्णाजी पंत या होळकर सेवकास वश करून आपले काम करण्यास सांगितले.अशा संकटाना सामोरे जाण्यासाठी जो कणखरपणा लागतो तो अहिल्याबाई जवळ होता. शिवाय राजकीय डावपेच व मुत्सुद्दीपणा असावा लागतो, तो ही अहिल्याबाईकडे होता. हे या विजयावरून दिसून येते. त्यांच्या चोख राज्यकारभाराची चर्चा पुणे दरबारात कायम होत असे. १३ ऑगस्ट १७९५ ला श्रावण महिन्यात महेश्वर येथे मातोश्री अहिल्याबाईचे निधन झाले. होळकर राज्याची गादी तुकोजीस मिळाल्याने होळकर राज्याच्या सुभेदाराची वस्त्रे मिळाली.

### ३.४ सुभेदार तुकोजीराव होळकर: (१४ ऑगस्ट १७९५ ते १५ ऑगस्ट १७९७)

अहिल्याबाईंनी मल्हारराव यांच्या मृत्यूनंतर अल्पवयीन पुत्र मालेरावास इन्दौरच्या गादीवर बसवून स्वत: राज्यकारभार पाहू लागल्या. पण मालेरावांची अल्प कारकिर्दीनंतर इन्दौरच्या गादीचा वारस तुकोजी असल्याची भावना सर्वत्र होती व तसा व्यवहारही चालत असे. पण त्यांचा यथाविधी दत्तक विधान मात्र कधीही झालेले नसले तरी, अहिल्याबाईच्या विद्यमाने तुकोजी होळकर यांनी 'श्रीम्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजीसुत'[१८६] असा प्रशासनासाठी शिक्का तयार करून वापरला जात होता.

राघोबादादा व चंद्रचुड यांनी होळकरशाहीचे स्वामी होण्याचे दिवास्वप्न पाहून उज्जैनपर्यंत येताच तुकोजीरावांनी राघोबास निरोप पाठविला. क्षिप्रा ओलांडताच आमची तलवार तुमच्या तलवारीला भिडेल.[१८७] असे स्पष्ट बजावले. मातोश्री नंतर राजे तुकोजीराव इंदौराच्या गादीवर १४ ऑगस्ट १७९५ रोजी बसले. तुकोजीराव थकलेल्या असल्यामुळे वाफगावी राहूनच कारभार पाहु लागले.

### ३.४.१ महादजी शिंदेचे होळकराच्या प्रदेशावर हल्ले:

तुकोजीराव होळकर हे दक्षिण मोहिमेत गुंतल्याचे पाहून महादजी शिंदेनी होळकराच्या प्रदेशावर हल्ले करण्यास सुरुवात केली. तुकोजीरावांनी पुत्र काशीराव यास होळकरशाहीचा वारस ठरवून त्याच्यावर थोडी थोडी जबाबदारी सोपवू लागले. त्यात काशीरावाकडे मेवाड व पंजाब प्रांताची व्यवस्था पाहणे. नोव्हेंबर १७८९ होळकर शाहीतील छोटे छोटे वाद मिटविण्याचे कामेही सोपविल्याने तो ती कामे यशस्वी पणे करू लागला. तसेच युद्ध मोहिमावर तो वडीलांच्या सोबत राहू लागला. शिंदे सोबत राजपुतान्यातील सुशैली व अलवरे येथे झालेल्या युध्दात तुकोजीरावासोबत काशीराव ही सहभागी होता. होळकरांच्या ताब्यातील प्रदेशामध्ये शिंदेच्या प्रतिनिधीने हस्तक्षेप करून दादागिरीने जबरदस्ती करून चौथाई वसूल केल्याने तुकोजीरावांनी शिंदेच्या सरदारांवर आक्रमण केले. तेव्हा महादजी शिंदे पुण्यात असून देखील त्यांच्या सरदारांकडून तुकोजी व पुत्र काशीराव पराभूत होवून परत आले. या सुशैलीच्या युध्दामुळे शिंदे होळकरांच्या मनातून कायमचे उतरले.

तुकोजीराव थकल्यामुळे होळकरशाहीची सुभेदारी आपल्या जेष्ठ पुत्र काशीराव यांस द्यावी. यासाठी पेशव्यांकडे पाठपुरावा करीत होते. पण खुद पेशवा बाजीराव दुसरा हाच दौलतराव शिंदेच्या नजरेत कैदेत असल्याने त्यांनी निर्णय काहीही घेतला नाही.

### ३.४.२ लाखेरीचे युध्द:

जेव्हा तुकोजीरावांनी मल्हारराव दुसरा यांस सेनापती म्हणून लाखेरीच्या युद्ध मोहिमेवर सोबत निघून गेले. तेथून पराभूत होवून वापस आल्यानंतर मात्र मल्हारराव दुसऱ्याने आपणांस होळकरशाहीचे सुभेदार पदाची वस्त्रे मिळवीत यासाठी पेशव्यांकडे मागणी केली. पण सध्या स्थितीमध्ये खुद पेशवा बाजीराव दुसरा हा दौलतराव शिंदेच्या ताब्यात होता. मल्हारराव दुसऱ्यांने लाखेरीच्या युध्दात शिंदेवर चालून आल्याने शिंदेचा अग्र शत्रु मल्हारराव दुसरा हा होता. तेव्हा मल्हारराव दुसऱ्याने सुभेदारी पदाचे वस्त्रे मिळणे दुरचे होते. तुकोजीराव व पुत्र मल्हारावसह लाखेरी येथे चढाई केली. ही तुकोजीरावांची शेवटची लढाई ठरली, जी की अपयशी ठरली. तुकोजीरावांस सतत आपल्या चारीही मुलांची काळजी वाटत होती.

म्हणजेच या दोन्ही युध्दात शिंदेचे वैरी तुकोजीरावाचे मुले ठरली. हा कायम सल शिंदेनी मनात ठेवून होळकरशाही संपविण्याचा प्रयत्न करीत होता. महादजी शिंदे उत्तरेतील पराक्रम पाहून दिल्ली बादशहा शहाआलमनी शिंदेची भेट घेतली. तेव्हा महादजीने बादशहाच्या

पायावर नतमस्तक होवून बादशहास १०१ सोन्याच्या मोहरा भेट दिल्या. बाहशहानेही शिंदेचा मोठा सन्मान करत 'वकील ई मुतालीक' ही सर्वोच्य पदवी दिली. त्यामुळे शिंदेस बादशहाचा 'मीर बक्षी' व 'वजीर' या पदाचे अधिकार वरील पदवीत आपोआप मिळाल्याने बादशहाच्या अंतर्गत व बाहय शत्रूपासून संरक्षण करण्याची जबाबदारी शिंदेवर आलेली होती.

पुण्यात शिंदे आल्यावर सवाई माधवरावांनी पुण्यात मोठा सन्मानसाठी भव्य समारंभ करुन सन्मान केला. त्यावेळी शिंदेनी पेशव्यांची पादत्राणे स्वत:च्या मस्तकावर ठेवली. म्हणजेच आपण दिल्ली बादशहाचे संरक्षक असूनही पेशव्या विषयी किती आदर आहे. हे दाखविण्याचा प्रयत्न केला. पुणे मंडळात 'महादजी दि ग्रेट मराठा' म्हणून प्रसिध्द झाले.[१८८] पेशवे, होळकर नाममात्र असल्याने महादजीचा पराक्रम मुत्सद्देगिरी, निदर्यपणा वाढत गेला. मराठेशाहीतील महापराक्रमी सुभेदार यांनी होळकर व पेशव्याच्या दुर्बलतेच्या फायदा घेण्यास सुरूवात करून पेशवे व होळकरांचे उपकाराचा विसर पडलेला होता. पेशव्यांच्या दुर्गण आणि दुर्बलतेमुळे महादजी थोर झाले. आणि हाच थोरपणाचा वारसा दस्तक पुत्र दौलतराव शिंदेना मिळाला. जसे रघुनाथरावांचे पाप बाजीरावांच्या डोक्यावर आले. तसेच महादजीचे पाप, दौलतराव शिंद्यांच्या डोक्यावर आणि खांद्यांवर आले.

सध्या स्थितीमध्ये तुकोजी होळकरांपेक्षा महादजी शिंदेची ताकत वाढलेली होती. तरी ही नाना फडणीसांना तुकोजीचा आधार घेण्याशिवाय पर्याय नव्हता. महादजी शिंदे पुण्यात आल्यावर आपल्यास महादजीकडून काही दगा होवू नये. यासाठी तुकोजीस पुण्यात बोलावून घेतले. कारण महादजीस तुकोजी होळकरांशिवाय कोणीही रोखू शकणारे नव्हते! होळकर हे लढावू, विश्‍वास, विनम्र, मेहनती व आज्ञाधारक होते. नाना फडणीसांची बुध्दी आणि होळकरांची ताकद यामुळे पुण्यात महादजी कांहीही आगळीक करु शकला नाही. ही होळकर फडणीसांची जोडी ऐतिहासीक ठरली. महादजी शिंदे पेशव्यांचा व नानाचा वाद सोडविण्यासाठी पुण्या जवळच्या वानवडीस मुक्कामाला होते. पण महादजीचा तापामुळे ६७ व्या वर्षी १२ फेब्रुवारी १७९४ रोजी पुण्याच्या जवळ वानवडी येथे मृत्यू झाला.

शिंदेच्या मृत्यू नंतर निपुत्रिक असलेल्या शिंदेनी दौलतरावास १३ वर्षाच्या दौलतारावास लक्ष्मीबाई मांडीवर बसवून दत्तक विधान २६ फेब्रुवारी १७९४ झाले. हा दौलंतराव महादजी शिंदेचा चुलत पुतन्या आंनदराव शिंदेचा मुलगा होता. महादजी शिंदेस नऊ बायका होत्या मृत्युच्या वेळेपर्यंत फक्त भगीरथीबाई, यमुनाबाई व लक्ष्मीबाईनी या तीन बायका जिवंत होत्या. महादजीने आपल्या निपुत्रीक असल्याने मृत्यू पूर्वीच नात्यातील दौलतरावास दत्तक घेतलेले होते.

राघोबादादास तीन मुले होती. त्यातील पहिला स्वत:स मुल होत नसल्याचे पाहून अमृतराव यांस दत्तक घेतले. पण त्यांना नंतर बाजीराव दुसरा व चिमणाजी असे दोन मुले झालेली होती. नाना फडणीसांनी नंतर अमृतराव व बाजीराव यास आलटुन पालटुन पेशवे पदी

बसवुन राज्यकारभार केला. तर २५ ऑक्टोंबर १७९५ ला सवाई माधवरावांचा मृत्यू झाल्याने, नाना फडणीस पुण्याचे सत्ताधीस कारभारी बनले. पेशवा बाजीराव दुसरा यास दौलतराव शिंदेच्या पुर्णत: अंकीत होता. दुर्दैवाने दौलतरावांस महादजी शिंदे होता आले नाही. महादजीने दिल्ली बादशहास आपल्या वर्चस्वाखाली आणलेले होते. तसे दौलतरावांस पुण्याच्या पेशव्यास आपल्या वर्चस्वाखाली आणावयाचे होते.नाना फडणिसांनी दौलतराव शिंदेच्या भिती पोटी साताऱ्यास निघून गेले. नानांनी जाता जाता पेशवे पदी चिमनाजीस पेशवे पदी बसवुन गेले. त्यानुसार चिमनाजीस २ जून १७९६ ला पेशवे पदाची वस्त्रे मिळाले.

नाना फडणीसांनी शिंदे पासून स्वत:स वाचविण्यासाठी साताऱ्याहून महाड येथे गेले. तेथून त्यांनी निजाम अली मुशीर-उल-मुल्क इंग्रज वकील मॅलेट यांच्याशी दोस्ती करुन दौलतराव शिंदेच्या विरोधात एक युती उभी केली. तसेच या युतीत नानानी आपल्या समर्थक असलेल्या तुकोजी होळकर, रघुजी भोसले व नानाजी काकडे इत्यादींना सहभागी करुन घेतले. आणखीन शिंदेच्या गोटातील रायाजी पाटील, रामजी पाटील व आबा चिटणीस नानाच्या युतीमध्ये सहभागी झाले. एवढेच नाही तर, नानांनी टिपु सुलतान, जंजीऱ्याचा सिध्दी व कोल्हापूरचे भोसले यांची ही मदत घेतलेली होती. येथेही नाना थांबले नाहीत तर, दौलतराव शिंदेच्या नजर कैदेत असलेल्या बाजीराव दुसरा या माजी पेशव्याशी ही संधान बांधुन होते. या शिवाय सर्जेराव घाटगे या सैतानी, क्रुर व भयंकर माणसास नानांनी शिंदेच्या विरोधात फळी निर्माण केली. दौलतराव शिंदे सारख्या बेईमान व मातब्बरांच्या उच्याटनासाठी नानानी अफाट प्रयत्न केले. इ.स. १७९६ मध्ये नाना फडणीस विरुद्ध दौलतराव शिंदे असा भीषण राजकीय व सामाजिक रणसंग्राम पानिपतच्या पेक्षाही अधिक विनाशकारे रणसंग्राम पुण्यात घडला.

अमृतराव हा रघुनाथरावांचा दत्तक पुत्र तर दुसरा बाजीराव हा रघुनाथरावांचा पुत्र असल्याने ६ डिसेंबर १७९६ मध्ये बाजीराव दुसरा हा पेशवा बनला. पण तो अतिशय चंचल स्वभावाचा, संशयी वृत्नीचा, नाच गाण्यात रममान होणारा, स्वार्थासाठी वाटेल ते करणार बाजीराव दुसरा असल्याने त्याचे व कारभारी नानाचे मतभेद होवु लागले. परिणामी तो नानाचे न ऐकताच निर्णय घेवु लागल्याने, मराठी सत्तेच्या ऱ्हासाच्या सुरूवात झाली. नानाचे बंधु मोरोबा फडणीस यांस आपली कारभारी म्हणून नियुक्त केले. याशिवाय मराठ्याच्या कैदेत असलेल्या मुशीर-उल-मुल्कची सुटका केली.

पुण्यामधील अंतर्गत राजकारणात शिंदे व पेशवे यांच्यातही संघर्ष सुरू झाला दौलतराव शिंदेनी पेशवे बाजीरावास सर्जेराव घाटगे यांच्या ताब्यात देवून नजर कैदेत ठेवले. पेशवे चिमणाजी व सेनापती परशूराम पटवर्धन यांनाही मांडवगडाच्या किल्ल्यात डांबून ठेवले. मग बाजीरावाकडून प्रचंड खंडणी घेऊन बाजीराव दुसऱ्याची सुटका करून पेशवे पदी बसविले. बाजीरावाकडे स्वत:चे सैन्य नसले तरी ब्रिटीश सेनापती कॅप्टन बॉईडच्या मदतीने सैन्याची

उभारणी केली. तरी बाजीरावास शिंदे व घाटगेच्या मदतीशिवाय पेशवे पदी स्थिर होता येत नव्हते. तरीही बाजीराव पेशव्यांच्या जागी इंग्रज व छत्रपतींच्या जागी दौलतराव शिंदे बसल्यासारखा राज्यकारभार चालु होता.

दौलतराव शिंदेनी कपटकारस्थान करून सर्जेराव घाडगे मार्फत बोलणी सुरू करून शिंदेच्या छावणीत नाना फडणीस आले असता. ३१ डिसेंबर १७९७ ला नानास कैद करून पुण्यात सैन्य घुसविले. व घाटगेनी नानाच्या वाडयात राहण्यासाठी गेले. तर नाना फडणीसांचें समर्थक बळवंतराव मेहेंदळेनी आपलाही छळ होईल या भितीने आत्महत्या केली. शिवाय अमृतरावांनी सात लक्षाची भिवंडी जहागिरी घेवून कायमचे राहण्यास गेले. तर नाना फडणीसांच्या बायकोस जिऊबाईला लोहगडावर आश्रय घ्यावा लागला. म्हणजेच तुकोजीरावांनी या विजयातून अहिल्याबाईचा दबदबा पुन्हा निर्माण केला. असे महान पराक्रम गाजवित संपूर्ण आयुष्य शत्रूंशी लढाय्या करत तीस वर्ष रणांगणावरच गेले. पण सुभेदार तुकोजीरावांच्या पश्चात भावाभावांत कलह सुरू झाले. अशात वृध्दपकाळाने तुकोजीराव यांचा १५ ऑगस्ट १७९७ पुण्याजवळील खडकी येथे मृत्यू झाला.[१८९]

**३.५ काशीराव होळकर:** (१६ ऑगस्ट १७९७ ते १६ नोव्हेंबर १७९८)

अहिल्याबाईचा वृध्दापकाळाने निधन झाल्यानंतर होळकर शाहीचे सेनाधिकारी सरसेनापती तुकोजीराव होळकर हे होळकर शाहीचे सुभेदार बनले. पण तुकोजीराव हे ही अहिल्याबाईच्या वयाचे असल्याने सात दशके त्यांनीही आपले जीवन व्यतित केल्याने ते ही थकले होते. तरी पण तुकोजीराव सुभेदार झाले खरे, पण तुकोजीरावांना सतत युद्ध मोहिमावर सुरौली, लाखेरी व निजामाशी खर्डा लढाई यामुळे वारसा प्रश्न कायमचा सोडविण्यासाठी वेळच भेटला नाही. पण मातोश्री अहिल्याबाईनी रामराव अप्पाजी यांच्याशी सल्लामसलत करीत असत. तेंव्हा त्यांनीच रामराव अप्पाना दरबाराचे दरखदार म्हणून नेमलेले होते. या दरखदाराच्या कामाचा इ.स. १७९८ मध्ये ठरविण्यात आला तो या प्रमाणे सरकारी महाल व सरंजामी, पागा व कराखाने, हशमीलोक, वगैरे यांजपासोन दर शेकडा रुपये २ याप्रमाणें घेत जावें. इतलाखी शिलेदार वगैरे यांजपासून दर वरातीस रु २ शिस्तेप्रमाणे घेत जावे.[१९०]

पण नंतर तुकोजीरावांनी पत्र काशीरावांच्या नावाने होळकर शाहीची सुभेदारी मिळावी. यासाठी २९ जानेवारी १७९५ ला पेशव्याकडे राजवस्त्राची मागणी केलेली होती. यातून त्यांनी आपला उत्तराधिकारी काशीराव असेल असे जाहिर केलेले होते. सुभेदार तुकोजीराव होळकर पुण्यास जाण्यासाठी निघाले. त्यावेळी ते म्हणाले की, ‘‘हे पाय पुन:कधीं दिसतील.’’[१९१] पूण्यातून तुकोजीराव होळकर सारखी इंदूरची चिंता करीत होते. म्हणून त्यांनी पळशीकरांना ता २० सप्टेंबर १७९५ रोजी पत्र लिहिले. “चिरंजीव काशीराव यांस ज्याचे काम त्याचे हातें घेऊन कारभार तुम्हांस घेऊन करण्याविषयी समक्ष आज्ञा करुन चिरंजीवास लिहीण्यांत आलें आहे. आणि हल्लीं लेखन केलें असे तरी तुम्ही दूरंदेशी करुन जो कारभार तेथें कर्तव्य

त्याजविशी, अगोदर सरकारांत लिहून आज्ञा घेत जाणें. येथील आज्ञेखेरीज कोठील मामल्याची घालमेल अथवा लहान मोठे कामाची फेरबदली अगर वरात एकरुप न करणें पेशजीपासून कागदपत्र पुरता करणें तो राजश्री बाबाजी अनंत करीत आल्याप्रमाणे करतील तुम्ही त्यास मन न घलितां आपलें ओहद्याचे काम व तेथील कारभार करुन होईल वर्तमान दर पै लिहीत जाणें. ".

त्यानंतर ही तुकोजीरावांनी बाळाजी कृष्ण जे पळशीकरांबरोबर कारभार करणारे होते. त्यांना ही लिहिले. इत:पर तुह्मी कारभारांत एकरुप न जातां जुने कागदपत्रांचे काम लागल्यास चिरंजीवास माहीत करुन देत जाणें. उभयतांनी जो कारभार कर्तव्य तो समजावून घेऊन चिरंजीवास समजावून कोणेविशी शदू न ये, सरकार नुकसान न होय, अशा चालींने करीत जाणें.[१९२] तुकोजी रावांची शारीरीक प्रकृती वरचेवर ढासळत चाललेली होती. तेंव्हा त्यांनी खंडो महादेव व पारशरदादाना जवळ बोलावून सल्ला विचारला त्यावर ते तुकोजीरावास म्हणाले की, ''सांप्रत काळी शरीराची दशा या प्रकारची घटकेचें शाश्वत नाहीं दौलतीची अव्यवस्थिता या प्रकारची या प्रकारची. तेव्हा पुढें दौलतीचे ओझें कोणाचे माथा द्यावें दौलतीचे थाडगे कायम ठेवून चार जुनी माणसें वडिलांचे व आपले हातची जनलाज मनलाज धरुन काशीराव होळकर वागवील वरकड प्रसर झाल्यावर जुने माणसांस देशांतर करावें लगेल. हे ऐकून तुकोजीरावाने आनंदराव माधव निस्बत बुळे यांना महेश्वराला पाठवून काशीरावास घेऊन येण्यास सांगितले. त्या सोबतच त्यांनी पळशीकरांना पत्र लिहितो की, ''हुजरातजागा व पागापथकें व हशमी, शागीर्दपेशा यांचे समाजविसीचा व दूंदरनेक फरासिस याचे रोजमु—याचा ऐवज देणें तुझी यादी व पत्रार्थ मनन करुन त्याऐवजी तोडमोड मामलेदारची पत राखून काढणें चिरंजीव राजश्री काशीराव इकडे यावयाचें करतील मागें किल्ल्याचा महेश्वराचे वगैरे जाबता राखणें यास माहितगार आणि आळयाचा माणूस पाहिजे चिरंजीव मारमळ होळकर यांचा तेथें हामशी वगैरे माणसांत आळा पेशजीपासून आहे. याजकरितां ज्यांजला हाताखालीं ठेवून किल्याचे चौकीपहाऱ्यांचा वगैरे बंदोबस्त त्यांजकडे सांगून तुह्मीही बरचेवर देखरेख करीत जाणें.[१९३]

याच अस्थिरतेच्या काळात काशीरावास मुलगा झाला. त्यामुळे महेश्वर येथे पुत्रोत्सव मोठ्याउत्साहात साजरा होत होता. यामुळे दिवसांमागून दिवस चालल्याचे पाहून तुकोजीरावांना अधिकच चिंता वाटू लागली तेंव्हा त्यांनी काशीरावास दुसरे पत्र ''चिरंजीवाचे निघणें पत्र पावताच होय ते करणें...चिरंजीवास उचलून घेऊन येणे." असे १० एप्रिल १७९६ ला पाठविले. तरीपण काशीराव पुत्र प्रेमापुढे ते वडिलांकडे येण्यास उशीर होत होता. तेंव्हा तुकोजीरावांनी बारगळ, लांबहाते व बोराडे यास सर्व हातातील कामे सोडून चिरंजीव काशीरावास उचलून आण्यासाचा हुकुम दिला. त्याप्रमाणे बारगळ हे मंडळी पूण्याहुन निघाले. पण मनमाड नजीक पोहचताच दुसरा निरोप आला की, "जेवीत असाल तर पाणी येथें येऊन

घ्यावें.” तुकोजीरावाची प्रकृती फारच बिघडलेली होती. त्या काळात यशवंतरावानी त्यांची सेवा करीत होते. काशीराव पुण्यात येताच समोर जावून मल्हारराव दुसरे यांनी त्यांचे स्वागत केले. तुकोजीरावानी अगोदरच सुभेदारी पदाची वस्त्रे तयार करुन ठेवलेली होती. दिवाण, फडणीस, वगैरे या सर्वा देखतां काशीराव होळकर यांस सुभेदारांनी वस्त्रें पुणें मुक्कामी दिली. (जानेवारी सन १७९७)

सुभेदार तुकोजीराव होळकर यांना पुणे मुक्कामी असताना स्वतःच आपल्या जेष्ट पुत्र काशीराव यांस जानेवारी १७९७ ला सुभेदारीची वस्त्रे दिवाण, फडणीस वगैरे यांच्या समक्ष बहाल केली. आतापर्यंत मल्हारराव होळकर, मालेराव होळकर, तुकोजीराव होळकर यांना पूण्याचे पेशवे सुभेदाराचे वस्त्रे पुण्याहून मिळत होती. पण आता मात्र सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर पेशवे पदाची वस्त्रे अद्याप कोणसच मिळालेली नव्हती. नाना फडणीस ना वाटत होते की सवाई माधवरावांच्या पत्नींच्या मांडीवर राघोबादादाच मुलगा चिमाजीस दत्तक घेऊन कारभार चालवावा. पण पटवर्धन मंडळीना बाजीराव दुसरा या राघोबादादाच्या मुलास पेशवे बनवावे यात वाद झाल्याने पेशवे पद कित्येक महिने रिक्त असल्याने तुकोजीरावांनी घाई करीत स्वतःचे इ.स. १७९६ सुभेदारीचे वस्त्रे काशीरावास येवून घरातील प्रश्न मिटतील असे वाटेल. पण मल्हारराव दुसरे नाराज झाले. तर पेशव्यानी ती वस्त्रे ता. २९ सन १७९७ दिली. यामुळे १७९६ च्या अखेरीस होळकरशाहीत भाऊबंदकी सुरू झाली.

यावेळी तेथे उभ्या असलेल्या मल्हाररावांनी हात जोडून विनंती करीत वडिलांस म्हणाले की, ‘‘मजला आज्ञा काय? सुभेदारानीं म्हाटलें “काशीराव यास माझे ठिकाणी मोजून चाकरी कर तो तुजला आज्ञा करील.”[१९४] त्याप्रमाणे स्वत: काशीराव गादीस कुर्निसात करुन गादीवर बसले. त्यावेळी तिथे होळकरांचे सर्व मंडळी उपस्थित होते. नाना फडणीसांना सुभेदारीची वस्त्रे काशीराव हा वडील असला तरी, तो वेडसर व तेवढा शूरवीर नसल्याने त्याऐवजी मल्हारराव दुसरा यांस द्यावीत असे वाटत होत. पण बाजीराव दुसराव शिंदे यांस मात्र होळकरशाहीवर आपले वर्चस्व असावे. या स्वार्था पोटी त्यांनी सुभेदारीची वस्त्रे काशीरावांकडेच देऊन होळकर घराण्याचे बशिगिरी म्हणजे सैन्याचा अधिकार बापू होळकर यांस दिले. त्यामुळे नाना फडणीसांचे काहीही न चालल्याने काशीराव काशीराव व बापू होळकरांस त्यांची वस्त्रे पुण्यात समारंभ भरवून देण्यात आली. ती अशी

| | |
|---|---|
| १२ | श्रीमंत सुभेदार काशीराव बाळासाहेब यांस वस्त्रें ५ तिवट हैदरपैठणी १, शेला हिरवी पैठणी १, किनखाप १, महमुद्या जोड २, भूषणें ३, शिरपेंच १, मोत्यांची कंठी १, जीगा ढाल १, तलवार १, हत्ती १, घोडा १, येकूण नग १२, बारा. |
| ७ | बापूजी होळकर यांस ५ वस्त्रें व १ कंटी मोत्यांची १ शिरपेंच एकूण सात.[१९५] |
| **१९** | |

त्यामुळे मल्हारराव दुसरे हे नाराज होऊन नव्या सुभेदारास कुर्निसात करुन आपल्या डेऱ्यात रागारागात निघून गेले.

### ३.५.१ शिंद्याच्या आश्रयास:

काशीरावांनी कोणासही काहीही न सांगता आपल्या भावाभावाच्या वारसा प्रश्नाच्या वेळी सरळ दौलतराव शिंदेची मदत मागितली. हे मल्हारराव दुसरे, विठोजी व यशवंतराव यांना आवडले नाही. पण दौलतराव शिंदेस मात्र ही मागणी त्यांच्या पथ्यावर पडली. काशीरावांच्या या मदतीत अंतिम फायदा आपलाच होणार हे शिंदेनी हेरले होते. तर काशीराव पुण्यातच ठाण मांडून शिंद्याकडे राहून पेशवे आपल्यालाच होळकरशाहीच्या गादीवर बसवतील अशी अपेक्षा ठेवून होता. पण तो होळकरांचे महाल एका मागून एक जप्त करीत जावू लागला. हे काशीरावांस समजत नव्हते. तर काशीरावांची पत्नी आनंदीबाई आपली कन्या भागाबाई जेजुरीच्या दर्शनासाठी गेल्या. तिकडे महेश्वरात कारभारी पळसीकर होळकर राज्य सांभाळत होते. तेंव्हा त्यांच्या समोर अनेक अडचणी होत्या. त्या सोडविण्यासाठी खुद काशीराव यांनी नाना फडणीसांना कळविले. पण नानाचे कोणी ऐकत नसल्याने परिस्थिती तशीच चालत होती. तेवढयात त्यावेळी काशीरावाने महेश्वरला पळशीकरांना पत्र पाठवून होळकर राज्याचा कारभार खंबीरपणे चालवावे असे कळविले. तसेच भारमलदादासही वेगळे पत्र पाठवून होळकर राज्याचा बंदोबस्त ठेवण्याचे कळविले. या दोघा भावातील मतभेद विकोपास गेले. त्यावेळी दोघांनाही आपल्या वडिलांची उत्तरक्रिया वेगवेगळी केले.

तुकोजीरावांच्या मृत्यू काशीरावांचे नेतृत्व होळकरी प्रजा मान्य करायला तयार नव्हते. तसेच शिंद्यांचाही तिरस्कार करित होते. तर माळवा व खानदेश प्रांतातील भिल्ल व पेंढारी हे लढवये काशीरावाची कोणतीही आज्ञा ऐकत नव्हते. त्यांची स्वतंत्र होण्याची प्रक्रिया सुरू झालेली होती. तेथील नागरिकांनी कर व नजरांने देणे ही थांबविले होते. शिवाय शिद्यांनी होळकरांचे सारे प्रांत महाल जप्त करण्याचा हुकूम काढल्याने त्यांनी होळकरांने बरेचशे महाल आधीच बळकाविलेले होते. होळकर शाही पेशव्यांमार्फत शिंद्याच्या घशात जाणार होती.

होळकर शाहीत दोन गट सुभेदार काशीराव, बापू होळकर, चिमाजी बुळे व रघुपंत खंडेराव तसेच मदतीस दौलतराव शिंदे व पेशवे हे होते. तरमल्हारराव दुसरे, विठोजी होळकर, यशवंतराव होळकर तसेच नाना फडणीस व अमृतराव होळकर याचा गट होता. काशीरावास आपल्या मातबर तीन्ही भावाची मोठी भिती वाटु लागल्याने त्या सर्वांचा केवळ बंदोबस्त करण्यासाठी शिंद्याचे साहय घेण्याचे ठरवून शिंदयाच्या गोटात जावून स्वत:चे आसन स्थिर करण्याच्या नादात आपलेच आप्तइष्ठाच्या नाशास कारणाीभूत ठरला.

मल्हाररावास पकडण्याबददल पांच लाख रुपये दौलतरावास देण्याचें काशीरावानें कबूल केलें. होते ती रक्कम काशीरावाकडून येईना: तेव्हां शेख कलीम फौजदार म्हणून दौलतरावाच्या कृपेंतला एक गृहस्थ होता, ज्यातला दौलतरावानें काशीरावाजवळ धरणें धरण्यास

ठेवून त्याचा अतोनात जाच केला. तेव्हां बाळोबा तात्यानें दौलतरावाची समजूत घातली कीं, होळकरांस बुडविण्याचा हा प्रयत्न चांगला नाहीं. त्यांची दौलत बुडाल्यास आपली तरी कशी टिकेल? असा बुध्दिवाद करुन शेख करीम यास बाळोबानें तोफेच्या तोंडीं दविले.[१९६]

दौलतरावासह काशीरावाचे गोटांत जाऊन उभयतांने सौरस्य करुन यशवंतरावाची समजूत काढण्याच्या प्रयत्न मनापासून चालविला असतांच, बाळोबाचें बस्तान बिघडून सर्जेरावाचा पगडा कारभारांतझाल्यानें होळकरांचे प्रकरण पुन: विकोपास गेलें. काशीराव होळकर व बाजीराव दुसरा हे दौलतराव शिंदेच्या हातातील बाहुले बनल्याने आतापर्यंतच्या सैन्याच्या खर्चाची पंधरा लाखची वरात होळकरांवर तर बाजीराव पेशव्यावर चार लाख बाकी काढून ती वसूलीसाठी तगादा लावला. तर दौलतरावांचा सेनापती सर्जेराव घाटगेनी आपल्या कंपुसह हल्ले करुन लुट सुरु केली.

महादजी शिंदेच्या भगीरथीबाई, यमुनाबाई व लक्ष्मीबाईनी दौलतराव शिंदेविरूद्ध बंड पुकारले. तर सातारा व कोल्हापूर येथील दोन्ही छत्रपतींनी दौलतराव विरूद्ध बंड पुकारले. या शिंदेच्या संकुचितपणामुळे मराठा मंडळात यादवी निर्माण होवून कायमची फुट पडली. व मराठा मंडळाच्या एकसंघतेला तडा गेली. यासर्व घटनेने व्यक्तीत झालेल्या नाना फडणीसांचा कैदेत १३ मार्च १८०० रोजी मृत्यू झाला. सर्जेरावांनी सासरेपणाचा पुरेपुर फायदा घेऊन अनेक अनैतिक कार्य, अत्याचार व अन्याय करून नानाच्या घराचा ताबा घेतला. नाना फळणीसांच्या वाडयात राहुन घर बाटविले. जावायाच्या मातेवर अन्याय, अत्याचार, व्याभीचार केला. महादजी शिंदेंच्या कारभाऱ्यास कैद करून ठार केले.[१९७] विठोजी होळकरांस हालहाल करून ठार केले. सांगलीचे सरदार परशुराम भावांच्या जहागिरीत व मुलखात लुट केली.

नाना फडणीसांची जहागिरी बाजीरावांनी सर्जेरावांच्या सांगण्यावरून जप्त केली. एवढेच काय महादनी शिंदेचे कारभारी बाळोबा तात्यास व त्यांच्या दोन भावास धोंडीबा व नारायण यांनाही नगरच्या किल्यात कोंडले. तेथेच बाळोबा तात्याचा मृत्यू झाला. तर धोंडीवास तोफेच्या तोंडी दिले. व नारायणरावाचा निर्घृणपणे हालहाल करून ठार केले. बाजीराव दुसऱ्या पेशव्यांनी १५ लाख रू खंडाणी देऊन दौलतरावास पुण्यातून जाईल या उद्देशांने दिले. पण शिंदे काही गेला नाही. मुर्ख बाजीरावास देखील दौलतरावास व सर्जेरावास नकोसा व्हावा यावरून दोघांनी उंची मोजावी लागते. १७९८ ते १८०२ या काळात पुणेकरांनी व मराठा मंडळानी सदस्यांनी महाभारतातला दुर्येधिन आणि दुशासन अनुभवला हेच खरे. इराणचा बादशहा नादीरशहा व अहमदशहा आब्दाली यांनी देखील त्यांच्या हिंदुस्थानातील स्वाऱ्यांच्या वेळी राजपत्न्यांचे केस धरून फरफटत महिलांना राजवाड्यांच्या बाहेर आणलेले नाही. मात्र मराठे मंडळातील सर्जेराव व दौलतरावाने यांनी पेशवे बाजीराव दुसऱ्याच्या साक्षीने अपकिर्तीचा अत्युच्य कळस गाठला. सर्जेरावाच्या व दौलतरावांच्या अन्याय व अत्याचारास कंटाळून बाजीरावासारखा मुर्ख माणूस हा इंग्रजाच्या आश्रयास दुर्दैवी निर्णय यामुळेच घेतला होता.

**३.६ यशवंतराव होळकर (पहिले):** (१७ नोव्हेंबर १७९८ ते २७ ऑक्टोबर १८३३)

'भारतीय नेपोलियन' म्हणून यशवंतराव होळकरांना ओळखलं जातं होते. यशवंतराव होळकरांनी देशाच्या इतिहासात दैदीप्यमान कामगिरी केली आहे. मुस्लीम सत्ताधीशांनी जिंकलेल्या संपूर्ण भारतात एकमेव होळकरांची सत्ता ही इंग्रजाना तह करण्यास भाग पाडले.[१९८] यशवंतरावांचा काळ हा अखंडपणे चाललेल्या लष्करी मोहिमांचा काळ होता. महादजीचे पश्चात् यशवंतराव हा एकच कर्तबगार पुरुष मराठी राज्यांत निर्माण झाला. पण त्याच्या पराक्रमाचें चीज करणारा मालक कोणी नव्हता हें राष्ट्राचें दुदैव होय.[१९९] तसेच यशवन्तरावाबरोबर होळकराच्या घराण्यांतले कित्येक लेकावळेही त्याच्या तोडीनें पराक्रम गाजवितांना आढळतात. कुंवर हरनाथसिंग, अचबेसिंग, भारमलदादा इत्यादी मंडळींचा उल्लेख यशवंतरावाच्या हकिकतींत येतो.

यशवंतराव होळकर हे शिंदे, पेशवे व काशीरावांशी भांबुडर्याच्या लढाईत पराभूत झाल्याने यंशवतराव नौकर धर्माकुंवर व बापु प्रभु या दोघांना घेऊन १६ सप्टेबर १७९७ ला रात्रीला पुणे सोडले आणि पायीच जेजूरी गाठली. तेथील होळकरांच्या जूना बाडयातवहिवाटदार सिदो बापूजी राहत होता पण त्याने मदत न केल्यामुळे ते खंडोबाच्या मंदिराचे पुजारी गोपाळभट खाडे यांच्याकडे आश्रय घेतला. दुसऱ्या दिवशी ते जेजुरीहून नागपूरचे रघुजी भोसले यांच्याकडे आश्रयास गेले. जेजुरी मार्गे नागपूरचे रघुजी भोसले यांच्याकडे आश्रयास गेले.. नागरपुरचे रघुजी भोसले हे काही काळ पेशव्याचे सुभेदार होते. पण नंतर स्वतंत्र राजे झाले. हे साताऱ्याच्या छत्रपतींच्या कुटूंबीयांपैकी एक होते. पुण्यातील शिंदेशाही पेक्षा पेशवाई हजार पटीने चांगली म्हणावी लागेल. शिंदे प्रथम स्वत:चा स्वार्थ साधून राष्ट्रवादासाठी नंतर पुढे येतात. मात्र पेशवे प्रथमत: राष्ट्रास प्राधान्य देऊन शेवटी स्वार्थ हित साधत असत. पेशव्यांचा राष्टवाद शिंद्यांपेक्षा श्रेष्ठ आणि अनुकरणीय असा होता.

दौलतराव शिंदे बाजीराव दुसऱ्याची पेशवाई घशात घालण्यासाठी विशाल सैन्यासह पुण्यात तळ ठोकून होता. रघोजी भोसले नागपुरकरांनी तुकोजीरावास कायम स्वरूपी मैत्रीचे वचन दिलेले होते. म्हणून यशवंतरावांनी आपल्या कठीण प्रसंगी हे मदत करतील म्हणून नागपूरला गेले. यशंवतराव नागपूरला राघोजी भोसलेकडे गेल्याचे कळताच त्यांस दौलतरावांनी दम दिला. तेव्हा यशवंतरावाची कैद होण्याच्या आधी निसटून गुरगांव येथील गुरू चिमणभाऊ यांची भेट घेऊन पुढे मार्गक्रमण सुरू ठेवला. बापू विठठल प्रभूच्या सल्ल्याने यशवंतराव पुढे जाताना, भवानी शंकरची भेट झाल्याने दोघे खानदेशात पोहचले. तेथेही पेशव्याचे सैन्य चालून येत असल्याचे पाहून यशवंतरावांनी तेथूनही पळ काढला.

यशवंतराव मजल दर मजल करीत करीत ते खानदेश व सुलतानपूरपर्यत शिंद्याच्या फौजेचा पाठलाग करीत होते. पण यशवंतराव त्यास चुकवून कुंकरमुडा येथे झुंजार नाईक भिल्ल यांच्या आश्रयाने लुटालुट करीत सैन्य जमविले.[२००] यशंवतरावानी आपला राज्याच्या

अस्तित्वासाठी खानदेशातून लढा सुरू केला. त्या काळात माळव्यात दुष्काळाचे सावट कोसळयाने यशवंतरावास आपल्या सैन्याच्या खर्चासाठी होळकर संस्थानातील प्रांतावर स्वाऱ्या करून श्रीमंताकडून खंडण्या वसूल करण्यासाठी मोहीम काढल्या. विठोजी होळकरांनी पेशव्यांच्या प्रदेशात हल्ले करून लुट केली. सुलतानपूर प्रदेशातून काशीरावाच्या फौजेने यशवंतरावास हसकावून लावले.

नंदुरबार मार्गे धारचे संस्थानिक आनंदराव पवार यांच्याकडे गेले. पुढे ३०० स्वारानिशी धारच्या आनंदराव पवार यांच्याकडे चाकरी स्विाकरली. धारचा राजा आनंदराव पवार त्यांच्या विरूध्द मंत्र्याने बंड पुकारले. तेव्हा राजेसाहेब व त्यांचे दिवाण रंगराव ओढेकर यांत संघर्ष सुरू झाला. त्याचा बिमोड करण्यासाठी पवारांनी यशवंतरावास मदतीस येण्याची विनंती केली. तेव्हा यशवंतरावानी मदतीस जावून बंडाचा बिमोड केल्याने दोघाच्या मैत्रीत भर पडली. यावेळी यशवंतरावाकडे फक्त दोन हजार घोडदळ व पाच हजार पायदळ असे होते. या सैन्याच्या बळावर यशवंतरावांनी धारच्या राजास मदत करून संघर्ष मिटविला. यशवंतरावांच्या फौजेत यशवंतरावाचे शौर्य व गनिमी काव्याने प्रभावित होवून अनेक सैन्य पुढे सामील होवू लागले. तेव्हा यशवंतरावाच्या वाढत्या पराक्रमामुळे पेशव्याची धास्ती वाढू लागली.

नेमवाड, हंडिया, भिकनगाव यावर अतिशय गतिमान हालचाली करून नर्मदानदी ओलांडुन एका मागून एक हल्ले चढवत ही गावे जिंकली. त्यात लुटही मिळाली. यावेळी शिद्यांनी इन्दौरच्या दक्षिणेस चिवालिएर डंडरनेकच्या नेतृत्वाखाली बलाढया कवायती फौज व देशी फौज तयार ठेवलेली होती. यशवंतरावांनी कासरोद येथील डंडरनेकच्या नजीक व तेलंगा या दोन बटालियनवर डिसेंबर १७९८ च्या अखरेस अचानक हल्ला करून त्यांचा धुव्वा उडविला. त्योना काही कळण्याच्या आतच कवायती फौजची दाणादाण उडाली. त्यांना युध्दसाहित्य जागीच सोडून पळ काढावा लागला. तेव्हा डंडरनेकला घाबरून महेश्वर सोडून इन्दौरला जावे लागले. यशवंतरावानी महेश्वरच्या बाहेर आपला तळ ठोकला. डंडरनेकच्या अधिकाऱ्यांना निरोप पाठवून शरण येण्यास भाग पाडले. ते शरण येवून यशवंतरावाच्या सैन्यात सामील झाल्याने आता यशवंतरावाकडे पायदळ पंधरा हजार व आठ हजार घोडदळ तयार झाल्याने यशवंतरावाच्या ताकतीत व प्रतिष्ठेत वाढ झाली.[२०१] यांची माहिती दौलतरावांस कळताच आनंदराव पवारांस धमकीचे पत्र आल्याने यशवंतराव धार सोडून दौलतरावांच्या माळव्यात लुटालुट सुरू केली.

यशवंतरावानी सैन्याची जमवा जमव करून मंहेश्वर गाठले. महेश्वरमध्ये आल्यावर सर्व होळकर संस्थानची व उत्तर भारतातील जनतेने होळकर शासक म्हणून घोषित केले. तर तिकडे काशीराव पुण्यात दौलतरावांच्या नजर कैदेत होता. दौलतराव शिंदे हा ही बऱ्याच दिवसापासून पेशवे पदाच्या लालचेने पुण्यातच ठाण मांडून बसलेला होता. शिंदेस पुण्याचे पेशवे पद बळकावण्याच्या नादात तो स्वत:चे उत्तर भारतातील राज्य ही विसरून गेलेला होता.

त्यामुळे त्याचे राज्य बरेच दिवस झाले बेवारस होते. अशा स्थितीमध्ये यशवंतराव होळकर महेश्वरमध्ये आल्याचे पाहून सर्व उत्तर भारतातील नागरिकांत व मराठा मंडळात आंनद झाला. यशवंतराव सारखा शूरवीर धाडसी तडफदार गुणग्राहक व पराक्रमी होता. यशवंतरावानी महेश्वरची स्थिती पाहून व काशीरावाची पुण्यातील नजर कैद पाहून काशीरावास सुभेदारी पदावरून बेदखल केले.

यशवंतरावांनी महेश्वर ताब्यात घेऊन शिवाजी महाराजा प्रमाणे यशवंतराव होळकर यांनीही स्वतःचा वैदिक पध्दतीने १२ जानेवारी १७९९ मध्ये स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला.[२०२] त्यामुळे राज मान्यता मिळविलेली होती. यांचा राज्यभिषेक हा होळकरशाहीतील एकमेव होता. होळकरशाहीच्या सुभेदारीपदी स्वर्गवाशी मल्हारराव दुसरा यांचा कैदेत असलेला मुलगा खंडेराव हा होळकर दौलतीचा मालक आहे. त्यांच्या नावांनी घोषणा करून खंडेराव होळकर हा होळकर संस्थानचा खरा सुभेदार आहे असे जाहीर केले. यशवंतराव होळकर हे सुभेदार खंडेरावांचे पालक व संरक्षक असल्याचे ही घोषित केले.यशवंतरावांनी सुभेदार मल्हारराव यांच्या ताब्यात असलेल्या पण सध्या शिंदेनी काबीज केलेल्या प्रदेशाचा ताबा घेण्यासाठी पुण्यातील पेशव्यांकडे तो प्रदेश मिळण्याची विनंती केली. तसेच काशीराव विरूध्द बंड पुकारले. होळकर संस्थानातील जनतेस यशवंतरावासारखा कर्तबगार शासक हवा होता. काशीरावासारखा शिंदेच्या ओंजळीने पाणी पिणारा राजा होळकर प्रजेस व सरदारास अजिबात नको होता. होळकरांचे अनेक जुने सरदार शामराव महाडीक, पिंपळे बालाजी कमलाकर हे यशवंतरावास सामील झाले. हरकुंवरबाई भारलदादा यशंवतरावाकडे आले. हरकुंवरने स्वतः कडील धन व संपती यशवंतरावास दिली.

मल्हारराव दुसरे यांचे सुपुत्र खंडेराव शिंदेंच्या कैदेतून सुटे पर्यत त्यांच्या नावाने गादी चालविण्यास सुरूवात केली. यशवंतरावांनी इन्दौर संस्थानाचा कारभार सांभाळला. त्या दिवसापासून तो अहोरात्र घोड्याच्या पाठीवर बसून राज्याची व राज्यातील प्रजेची सेवा करण्यासाठी होळकरांच्या राज्याची धुरा आपल्या खांद्यावर घेऊन ब्रिटीशांना सळो की पळो करून सोडले. वयाच्या १९ व्या वर्षी यशवंतरावानी निजामाविरूध्द खडर्याच्या लढाईत दहा हजार सैन्यानिशी हल्ला करून त्याचा पराभव करून निजामास शरण येण्यास भाग पाडले. ऐवढा मोठा पराक्रम ऐन तारूण्यात यशवंतरावांनी केला. विठोजी होळकर हे यशवंतरावास येवून मिळाले.

### ३.६.१ होळकर व शिंदे संघर्षः

महाराणी अहिल्याबाईच्या काळात शिंदे होळकरांचे संबंध सलोख्याचे होते. सुभेदार महादजी शिंदे यांनी आपल्या स्वपराक्रमावर पानिपतच्या मैदानावर गेलेली प्रतिष्ठा पुन्हा वाढविली. पराक्रमी आणि मुत्सद्दी महादजी शिंदे मराठा मंडळाचा अभिमान होते. या उलट त्यांचे दत्तक पुत्र दौलतराव शिंदे होते. दौलतराव शिंदे उत्तर भारतातील मराठ्यांचे राज्य

बेवारसपणे टाकून केवळ पुण्याची सत्ता, पेशव्याचा कब्जा आणि सर्जेराव घाडग्यांची कन्या बायजाबाईवर नजर ठेवून मराठा मंडळात अराजकता व दहशत माजविण्याचा उद्योग दौलतरावांनी पुण्यात सुरू केला. त्यामुळे जनतेमध्ये अप्रिय आणि तिरस्कारणीय बनला. दौलतरावांच्या स्वार्थी संकुचित वृत्तीमुळे त्यांच्या पुर्वजांना नाहक कलंक लागला. याच्या वर्तणुकीमुळे अख्ये शिंदे खानदान बदनाम झाले. दौलतरावानी सर्जेरावासारख्या दुर्गूणी माणसाची संगत करून आणखीन ते बदनाम होत गेले. पुढे शिंदयांच्या राज्याचा बराच भाग इंग्रजांनी घेतला. तेव्हा शिंद्यांनी राज्याविस्तारासाठी होळकरांच्या राज्याची लूटा-लूट व जाळपोळ करण्यास सुरूवात केली. काशीरावाच्या काळात शिंद्यांचे असले धंदे चालले. परंतु यशवंतसारखा योद्धा असा प्रकार सहन कसे करणार? त्यांनी दौलतराव शिंदे यांना जोरदार विरोध केला. यातूनच नर्मदा काठी मोठी जंगी लढाई झाली. यात शिंद्यांच्या सैन्याने माघार घेतली. तरी होळकरांच्या सैन्याची बरीच हानी झाली होती.

यशवंतरावांनी शिंद्यांला चांगला धडा, शिकवायचे ठरविले. एकदा शिंद्याचे सैन्य नर्मदा ओलांडून जात होतं. यशवंतरावानी बरोबर अर्ध्या सैन्यासह जाऊन अचानक त्यांच्यावर हल्ला चढविला. पुढे नर्मदेचा पूर वाढलेला होता तर पाठीमागून होळकरांच्या तोफेचा मारा सुरू होता. शिंदे पळून जवळ असलेल्या किल्ल्यात शिरले. यशवंतरावानी किल्ल्याला वेढा देऊन किल्ल्यावर तोफा डागल्या शिंदे समेटाची भाषा करू लागले. पण अचानक उज्जैनला गोंधळ उडाल्यामुळे यशवंतरावांना वेढा उठवावा लागला.

### ३.६.२ दौलतराव शिंदे उत्तरेकडे:

पुण्यातील दौलतरावांनी महादजीच्या उज्जैन मधील बायका यशवंतरावास भेटू नये. यासाठी ताबडतोब तो उत्तरेकडे पूणे सोडून निघाला. दरम्यान प्रवासात जांब येथे दौलतरावांची तिसरी पत्नी बायजाबाई बाळंतीण झाल्याने त्यांना जून ते नोव्हेंबर १८०० मध्ये जांबलाच मुक्काम टाकावा लागला. मे १८०१ ला जांब सोडून धुळकोट नर्मदा तीरी येवून पोहचले. तेव्हा यशवंतराव शिंदेची वाटेत वाट पाहताच होते. नर्मदा तीरी दोघांत संघर्ष सुरू झाला. शिंदेकडून इंग्रज असलेला सेनापती डॉ. पेरॉन कर्नल, जॉन होसिंग, जुरूस फिरंगी, मैकिन्टायर युरोपीयन अंमलदार व मेजर ब्राउनरिंग्चा तोफखाना एवढा अवाढया लवाजमा शिंदेकडे होता. शिवाय पुण्याहून सर्जेराव घाडगेस मदतीस प्रचंड फौज घेऊन येण्याचे कळविले होते. पण सर्जेराव पेशवे बाजीरावाकडून ४३ लक्ष रूपयांच्या खंडणी वसूलीसाठी शनिवारवाडयात ठाण मांडून बसलेले होता. होळकर सुभेदार यशवंतराव व शिंदे सुभेदार दौलतराव दोघेही २२ वर्षाचे तरूण होते. बाजीराव पेशव्यानी यशवंतरावाचा वाढलेला प्रस्थ पाहून पुढे मुक्कामी असलेल्या काशीरावांचा सर्व सरंजामा जप्त केले.

मात्र यात धार्मिक स्थळे वा मंदीरे यांना सुरक्षित ठेवून यशवंतराव शिंदेच्या प्रदेशात व राजधानी उज्जैन मध्ये जाळपोळ लुटालुट सुरू केली. याचा बदला म्हणून शिंदेनी बाजीराव

पेशव्याशी हाताशी धरून विठोजी विरूद्ध मोहिम उघडली. त्यात विठोजीस कैद करून हत्तीच्या पायास बांधून शनिवारवाडयात दाखल करून हालहाल करून हत्तीच्या पायाखाली देऊन ठार केले. यशवंतरावाना भाऊ विठोजी बातमी कळताच शिंदेच्या फौजेच्या धूव्वा उडविण्यास सुरूवात झाली.

सर्जेरावांस पेशव्यांकडून खंडणी मिळत नसल्याचे पाहून त्यांनी आपले छळयंत्र सुरुच ठेवले. तर बाजीराव व सर्जेरावांचा कारभारी बाळोजी कुंजीर यांनी सर्जेरावांच्या खुनाची योजना तयार केली. म्हणजे सर्जेराव हा बाजीराव दुसरा व सर्जेरावांचा कारभारी बाळोजी कुंजीर यांना नको होता. कारभाऱ्याने सर्जेरावास २६ जून १८०१ ला जेवण्याच्या निमित्याने घरी बोलावले. जेवणानंतर चर्चेसाठी आतल्या खोलीत दोघे चालत होते. योजनेनुसार कारभाऱ्याचे निवडक चार पाच माणसे सर्जेरावाच्या दिशेने मागे येत असल्याचे समय सूचकता सर्जेरावांनी पाहून कारभाऱ्यांचाच गळा धरून तलवारीच्या जोरावर सर्वांना संपविले. याचा बदला घेण्यासाठी सर्जेरावांनी तात्काळ आपले सैन्य पूण्याच्या रस्त्यावर उभे करुन शनिवारवाडा व पूणे शहर जाळून राख करण्याची भाषा करु लागला. तेंव्हा बाजीराव पेशव्यांनी शिंदेच्या पाया पडून पूणे वाचविण्याची विनंती केली.

यशवंतराव होळकर मात्र शिंदेचा उत्तरेतील मुलुख बेचिराग करण्याचे सत्र सुरुच होते. तेंव्हा सर्जेराव नाईलाजाने १२ जुले १८०१ ला पूणे सोडून उत्तरेकडे निघाला. तरीही पूर्व खंडणीसाठी आपला मुलगा हिंदूराव व अप्पा देसाई निपाणकर यास पेशव्यांच्या दारात बसविले.[२०३] सर्जेराव बुरहाणपूर मार्गे नर्मदानदी काठी शिंदेस भेटले. शिंदेनी होळकरंची राजधानी इंदौर लुटले व उध्वस्त केले.[२०४] नर्मदा नदी किनारी यशवंतरावानी शिंद्यांच्या फौजावर अचानक हल्ले करुन धास्ती निर्माण केली. नंतर यशवंतरांव उज्जैनकडे वळले. उज्जैनला शिंद्याचा हेसिंग या सरदाराकडील अवाढव्य पाच पलटणीवर यशवंतरावानी अचानक गनिमी काव्याच्या तंत्राचा वापर करुन दोन दिवस युद्धकेले. शिंद्याच्या सैन्याकडून तोफाचा भीडमारा सुरु झाला. तेंव्हा यशवंतरावांना माघार घ्यावी लागली. लगेच धुवाधार पाऊस सुरु झाल्याने तोफा थंडावल्याने यशवंतरावातील पुन्हा चढाई केली. होळकरांचा बदला घेण्यासाठी ऑक्टोबर १८०१ मध्ये दौलतराव शिंदयांनी सर्जेराव घाटग्याच्या नेतृत्वाखाली इंदूरवर चाल केली. यशवंतराव त्यांच्या प्रतिकारासाठी धावून गेले. पण विजय शिद्यांच्या पदरात पडला. शिंद्याच्या सैन्याला कोंडीत पकडून चांगलं ठेचून काढण्याचा डाव यशवंतरावांनी रचला. त्यानुसार डाव यशस्वी होऊन विजय बिलकूल होळकरांच्या नजीक आलेला. परंतू विजयापूर्वीच आनंदाने होळकर सैन्य लूटा-लूटीच्या मागे लागले. आतापर्यंत पिछाडीवर असणाऱ्या शिंद्यांच्या सैन्याने एकदम मूसांडी मारली. अस्ता-वेस्त पसरूण लूटा-लूट करणाऱ्या होळकर सैन्याची दाणादाण उडवली. आपल्या सैन्याची ही अवस्था पाहून यशवंतराव शत्रूवर तुटून पडले.अनेक सैन्याची कत्तल करून पायदळी तूडविले. जणू त्यांनी रूद्रावतारच धारण केलेला होता. ही हात घाईची

लढाई बराच वेळ चालली. शेवटी दिवस मावळल्यांमुळे ती थांबली. यातून त्यांच्या अंगी असलेल्या शौर्याचा प्रत्यय येतो.

३० ऑक्टोंबर १८०१ ला उज्जैन जवळ सर्जेराव व यशवंतराव यांच्यात घनघोर युद्धहोवून सर्जेरावाचा पराभव झाला. तेंव्हा शिंदेनी यशवंतरावाशी समझोत्यासाठी बोलणी सुरु केली. तेंव्हा यशवंतरावानी सक्त नकार दिला. पूर्वी श्रीमत तुकोजीरावांशी जे करार मदार झाले आहेत. ते सर्व तुम्ही तंतोतंत पाळण्यास कबुल असाल तर तुमची आमची गोडी होणे शक्य आहे अन्यथा कदापी नाही.[२०५] शिंदेनी बाजीरावास मध्यस्ती करण्यासाठी बोलावले दरम्यान अहिल्याबाईच्या हाताखाली काम केलेले व यशवंतरावांचा मोठा साक्षीदार शामराव महाडीक आजारी पडून निधन पावले.

यशवंतरावांनी इशारा करताच भालाघाटीतील होळकरी सैन्य शिंद्यांच्या फौजेवर तुटून पडले. हे शिंद्याचे सैन्य पावसात तोफा व बंदूका बंद पडल्याने त्याचे तीन हजार सैन्य गाळात पळतांना ठार झाले. तर बारापैकी आठ युरोपियन सेनानी ठार झाले. हेसिंग पळून गेले. तर काहीना होळकरांनी कैद केले. शिंद्याच्या साठ तोफा व प्रचंड युद्ध सामुग्री होळकरांच्या हाती लागले. यशवंतरावांनी शिंद्याची राजधानी उज्जैन लुटून घेतले. यशंतवरावाना पुढील काळात भवानीलाल शंकर, फत्तेसिंग माने, हरनाथसिंग, अमीरखान व पारशरदादाजी (होळकरांचा मुख्य कारभारी) इ.ची यशवंतरावास चांगलीच साथ होती. यशवंतरावांनी शिंदेला मोठी आदल घडविण्यानंतर १८०२ मध्ये पूण्याकडे आपला मोर्चा वळविला. यशवंतरावांचा कारभारी पारशर दादाजी पूण्याचे पेशवे बाजीरावांशी बोलणीसाठी गेले. तसेच नागपूरच्या रघुजी भोसले यांनीही आपला वकील पाठवून शिंदेवर दबाव ठेवा व यशवंतरावास न्याय द्यावा. असे कळविले. तसेच पाराशर दादाजी, गोविंदपंत गानु व शामराव शिवाजीने यशवंतरावांची कैफियत बाजीराव पेशव्यांपुढे मांडली. शिंद्यांच्या जुलमाविरुध्द दाद मागण्याकरितांच आपण पुण्यास श्रीमंतांच्या पायापाशी जात आहोंत.[२०६]

यशवंतरावांचा कारभारी पारशर दादाजी पुण्याचे पेशवे बाजीरावांशी बोलणीसाठी गेले. तसेच पाराशर दादाजी, गोविंदपंत गानु व शामराव शिवाजीने यशवंतरावांची कैफियत बाजीराव पेशव्यांपुढे मांडली. पुण्यात विठोजीस ठार केल्याचे कळताच यशवंतरावांनी फत्तेसिंग माने व शहामतखान यांना फौज देऊन पूण्यावर चालून जाण्यासाठी पाठवले. सर्जेराव घाटगेनी खंडेराव व जयाबाईस अशेरीच्या किल्यात कैदेत ठेवलेले होते.[२०७]

### ३.६.३ हडपसरच्या युध्दः

यशवंतरावानी पन्नास हजार फौज, २०० तोफा व प्रचंड घोडेस्वार घेऊन पुण्याच्या दिशेने निघाले पुण्याकडे जाताना दौलतराव शिंदेच्या महाल ताब्यात घेऊन तेथे आपले अंमल बसविला. तेथून यशवंतरावांनी आश्विन व १४ शके १७२४ (२५ ऑक्टोबर १८०२) या दिवाळीच्या दिवशी पुण्यावर हल्ला केला.[२०८] एक लाख चौरेचाळीस हजार सैन्यानिशी विजेच्या

वाऱ्यासारखे पुण्यास आले. हडपसर व वानवडी या दोन्ही ठिकाणच्या मैदानावर दोन्ही बाजूनी सैन्य गच्च भरलेले होते. हडपसर येथील मैदानावर शिंद्यांच्या फौजा व यशवंतराव स्वतः आपल्या फौजेनिशी लढण्यासाठी ऐकमेकासमोर जय्यत तयारीने उभ्या होत्या. पहाटे नरक चतुर्थीचे सुग्रास भोजन आटोपून पेशव्याचे सैन्य शनिवारवाडयातून शिंद्यांच्या तळावर दाखल झाले. दिवस निघताच युद्धाला तोंड फुटले. यशवंतरावांनी आपल्या सैन्यास आदेश दिले की, जोवर ते पंचेविस तोफा डागत नाहीत, तोवर आपण युद्धसुरु करायचे नाही. यात आपली हानी होऊ नये म्हणून थोडे मागे सरकरण्याची वा जाण्याचा आदेश दिले. सकाळी साडेनऊच्या जवळपास शिंद्याच्या गोठातून पहिली तोफ डागली गेली.पुर्वीप्रमाणे पेशव्याकडील पंचविस तोफेचे गोळे उडेपर्यत यशवंतरावांनी हानी सहन करून पेशव्यांचा आदर केला.यामुळे शिंद्यांच्या सैन्यास वाटले की, आपला शत्रू आपल्यास घाबरला असे वाटल्याने त्यांना अधिकच चेव चढला. जसे पंचेविस वार संपले त्याच क्षणी यशवंतरावानी इशारा केला मग होळकरांची फौज त्वेषान शिंद्याच्या सैन्यावर तुटून पडली.[२०९] युद्धाची मजा पहाण्यासाठी व यशवंतरावाचा उत्सव कसा साजरा करायाचा हया विचारात पंतप्रधान बाजीराव कोतवाल चावडीपर्यत पोहचून बाजीराव दुसरा हा पर्वतीवरून हे युद्ध आनंदराने पाहत उभा होता. तिथेच त्यांना युद्धाचा समाचार समजला. मग काय युद्ध भूमीवर जाण्याच तर सोडाच, ते शनिवारवाडयात सुद्धा गेले नाहीत. बाजीराव सरळ पर्वतीच्या माळावरून सिंहगडाकडे पळ काढला. पंतप्रधानानी पूणे सोडू नये. अशी यशवंतरावाची इच्छा होती. पण त्यांच्या नामांकित घोडे स्वारापासून बचाव करण्यासाठी श्रीमंताकडे पर्याय कूठं होता?

या युद्धात शिंदेच्या डी बोईन व सदाशिव भास्करने फारच कडवी लढत दिली. मिरखान लढत असतांना त्यांचा घोडा ठार झाला. तेंव्हा ते खाली उतररुन लढत होता. तर कर्नल हार्डिंग आपल्या बटालियनसह पुढे येऊन मिरखानला साहय केले. व कल्बअलीच्या ब्रिगेडला परत हादरवून सोडले. यशवंतराव होळकर हे निरीक्षण करीत करीत आपणही सैन्यात उतरुन एकच धुमरचक्री सुरू होती. यशवंतरावास शिंद्याच्या सैन्यांनी पाहताच पळत सुटले. तेंव्हा यशवंतरावानी अत्यंत चपळतेने शिंद्यांच्या तोफखान्यांवर हल्ला करुन तोफखाना बंद पाडून ते पुढे कुल्बीच्या कुल्बी, डी बोईन व डेग्ज हे सरदार लढत होते. यशवंतरावांनी तोफखान्याला आज्ञा दिली. एका दमात आठ हजार तोफेचे गोळे उडविण्यात आले.[२१०] जवळ-जवळ अर्धी लढाई लढली गेली. यशवंतरावाने घोडदळाचा हल्ला शिंदयांच्या तोफखान्यावर चढवून गोलंदाजाची कत्तल केली. शेवटपर्यंत शिंद्याचे सैन्य लढत होते. पेशव्यांचे सैन्य तर यशवंतरावास पाहूनच काढता पाय घेतला. सासरे सर्जेराव व जावाई दौलतरावाच्या संयुक्त फौजेचा दाणादाण उडवून सोडली. शिंदेचे चार पैकी तीन युरोपियन अधिकारी ठार झाले. तर होन्रो नावाचा फ्रेंच अधिकारी पळून शिंद्याच्या वानवडीतील वाडयात

लपून बसला. फत्तेसिंग माने यांच्या सैन्यांनी पळणाऱ्या सैन्याचा पाठलाग करून मारले. शिंद्याच्या फौजेचा धुव्वा उडाला. तेंव्हा त्यांनी माघार घेऊन पळत सुटले.

तेव्हा शनिवारवाडयातील बच्चेवीरांना पळता भूई कमी पडू लागली.शिंद्याचे या युध्दात पाच हजार सैन्य ठार झाले. तर हजारो सैन्य जखमी झाले. तर पूण्यात पेशवा पळाला. ही बातमी वाऱ्यासारखी पसरल्याने पुणे आणखीन घाबरुन गेले. हडपसरच्या युध्दात त्यांनी स्वतः ऐन जंगेत उतरुन जो पराक्रम गाजविला त्याचे कौतूक त्यांचा कट्टर शत्रू मालकमही करतो.

युद्धातून पळता-पळता शिंद्याच्या सैन्यानी पूणे लूटण्यास सूरूवात केली. या विजयानंतर यशवंतरावास सुचविले की, पूणे लुटण्याची आज्ञा द्यावी असे मीर खानाने सुचवले. पण यशवंतरावांनी त्यास मनाई केली. वानवडी तेथेच सर्व सैन्यानी व सरदारांनी थांबावे पूण्याकडे कोणीही जाणार नाही असे स्पष्ट आदेश दिले. याउपर कोणीही पूण्याकडे गेला, एकाही नागरीकाची साधी कवडी जरी लुटली वा स्त्रियांच्या अब्रुला हात घातला तर त्याचे हात पाय तोडून भर रस्तयात फेकले जाईल...[२११] असे कठोर आदेश दिले. या हूकूमाचे पालन दोन पठाणाने न केल्यामुळे एकाचा हात तोडून तर एकाच नाक कापून उंटावरून धिंडे काढण्यात आली. स्वतः यशवंतराव हे अत्यंत कडक शिस्तीचे असल्याने त्यांचा त्यांच्या सर्व सैन्यावर फार मोठा वचन होता. यामुळे होळकर सैन्यात असलेल्या पेंढारी व पठाणी सैन्यास शांतच राहणे भाग पडले. पुण्याभोवती चौक्या बसवूनसामान्याच जीवन सूरळीत करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तसेच आपल्या बाजुच्या नाना फडनीस व त्यांचे समर्थकांना कैदेतून सुटका केली.

यशवंतराव गडावर चढाई करणार या भीतीने श्रीमंत गडावरून कोकणात उतरले. महाडनजीक असलेल्या वीरपाडीत एका भिक्षूकाच्या घरी मुक्काम ठोकला. भोवतालच्या प्रदेशाची लूटालूट करत कसंतरी आठ दिवस काढले. पूढे वीस दिवसं महाडला राहिले. होळकरांच सैन्य आपल्या मागावर असल्याची बातमी पेशव्यांना कळतांच ते खूप घाबरले. त्यांचा इंग्रजाशी पत्रव्यवहार चालूच होता. आपणाला महाडहून लवकरात-लवकर घेऊन जाण्याची विनंती वसईच्या इंग्रजांना केली. पूण्यात कधी पायी न चालणारे श्रीमंत कोकणात माळरानांनी पायपीट करू लागले. म्हणजे बाजीरावांनी शिंदे—होळकरांच्या युध्दात कोणाचा पराभव झाला, वा कोणाचा विजय झाला. हे पाहण्यासाठी सुध्दा थांबला नाही. इंग्रजासोबत आठ दिवसाचा जल प्रवास करून पेशवे शेवटी वसईस पोहोचले.[२१२]

**३.६.४ पुण्याची व्यवस्थाः**

तोपर्यंत पेशवा कारभारी बाळोजी कुंजीर व अन्य दरबारी मंडळी इंग्रजाकडे डोणजकडे गेल्याची माहिती यशवंतरावास कळताच त्यांनी त्यास परत सन्मानाने आणण्यासाठी व रसद घेऊन मदतीस पाठविले. पण पेशव्यांने आपल्यावर चालून येत असल्याचे समजून तो कधीच यशंवतरवास भेटला नाही. तसेच यशवंतरावांनी पुण्याभोवती आपल्या चौक्या बसवून नाना

फडणीसांचे समर्थक लोक कैदेत टाकलेले होते. त्यास त्यांनी सुटका केली. त्यात फडके बंधू, मोरोबादादा, मोरोपंत चक्रदेव बजाबा शिरोडकर यांची सन्मानाने सुटका केली. याशिवाय ही यशवंतरावानी शिंद्याचे व पेशव्यांचे समर्थक लोक, सल्लागारही सोडून दिले. म्हणजेच कोणावरही कोणताही अन्याय होणार नाही. याची पूर्णपणे यशवंतरावानी दक्षता घेतलेली होती. तरीही विजयी महाराजा यशवंतरावावर आरोप लावलेले आहेत. यशवंतरवांनी पूणे लुटले, खणत्या लावल्या, पुणे जाळले व प्रजेवर अनन्वीत अत्याचार केले. जे पूर्णतः बीन बुडाचे आहेत. यशवंतरावांनी फक्त शिंद्याचे वा त्यांच्या समर्थकांची घरे वा वाडे लूटले वा जाळले. पण कोणत्याही स्त्रीयांवर अत्याचार केलेले नाहीत. यशवंतरावांनी वाडा जाळाला, तो दौलतरावांचा सरदार अंबुजा इंगळे याचा वाडा म्हाळूंग्याला होता. तो वाडा पूण्यात नव्हता. त्यांनी या आरोपांची तमा न बाळगता सर्वसामान्यांचे हित करून केवळ शिंदेवर दहशत बसविली. तसा पूण्यात वा परिसरात यशवंतरावांनी कोणताच जाळपोळ वा लूटालूट केली नाही. तरीही असे म्हणटले जाते. तशा स्वरुपाचा एकही पूरावा अस्तिवात नाही. उलट यशवंतरावांनी पूण्यातील जनजीवन सुरळीत करण्यासाठी स्वतः प्रोत्साहन दिले. बाजारपेठ सुरु केल्या.[२१३]

आपल्या कुटुंबकबिल्यांची मातोश्री यमुनाबाई, पत्नी लाडाबाई, मुलगी भिमाबाईची कैदेतून सुटका केली. तसेच कै. विठोजी यांचे कुटुंब म्हणजेच मुलगा खंडेराव व त्यांच्या मातोश्री अन्य ठिकाणी कैदेत होते त्यांचाही सुटका केली. पुण्यातून बाजीराव पळाल्यानंतर पेशवाईचा कारभार कोणी संभाळायचा हा प्रश्न निर्माण झाला. बाजीराव दुसरा हा पुण्यात येण्यास तयार नव्हता. मग यशवंतरावांनी एक युक्ती काढली. त्यावेळी बाजीराव पेशव्यांचे वडील दत्तक बंधू अमृतराव हे जून्नर येथे राहत होते. यांचा बाजीरावा इतकाच मान होता. तेंव्हा यशवंतरावांनी पेशवे पदी बसविण्यासाठी मोरेबा दादा व बाबा फडके यांच्या मार्फत रघूनाथरावांचे दत्तक पुत्र अमृतरावास निमंत्रण पाठवून जुन्नर येथून बोलावून घेतले. त्याचा मुलगा विनायक याला मुख्य पेशवा करून त्यांना दिवाणगिरी देण्याचे ठरविले.यशवंतरावांना आपल्या प्रतिनिधीस साताऱ्याहून पेशवे पदाची वस्त्रं आणण्यास पाठविले. तिथे छत्रपती वस्त्रं देण्यास तयार होईनात. तेव्हा यशवंतरावांनी साताऱ्याच्या किल्ल्यावर तोफा चढविल्या तोफेच्या भीतीने छत्रपती वस्त्रे तयार झाले. वस्त्रे पुण्यात आणले गेले.

कै. सवाई माधवरावांची पत्नी यशोदाबाईस मुक्त करुन तिच्या मांडीवर अमृतरावाचा मुलगा विनायक बापू यांस बसवून दत्तक विधान करुन त्यास पेशवे पदाची वस्त्रे साताऱ्याच्या छत्रपतीकडून आणून दिले. या बाल पेशव्यांचा प्रतिनिधी म्हणून अमृतरावांनी पूण्याचा सर्व कारभार पहावा. अमृतरावांस यशवंतरावानी पूर्णपणे संरक्षण देऊन शिंद्याचा पूरता बंदोबस्त करावा. या बदल्यात अमृतराव कारभाऱ्यांनी यशवंतरावांस युद्धखर्च म्हणून एक कोटी रुपये

द्यावे असे करारात ठरले होते. त्यानुसार १२ नोव्हेंबर १८०२ ला अमृतरावानी पुण्याचा कारभार हाती घेतला.[२१४]

इंग्रजाच्या संरक्षणामुळे बाजीराव दुसरा या पेशव्यांची भीती नाहीसी झाली. परंतु मराठेशाहीला मात्र भीती निर्माण झाली. कारण या काळात तीन वर्षापासून रेंगाळत पडलेली इंग्रज पेशव्यांतील वाटाघाटीची बोलणी पूर्ण झाली. याचं फार मोठे दु:ख यशवंतरावाना झाले. त्यांनी बाजीरावांना वेळोवेळी इंग्रजासोबत मैत्री न करण्याची विनंती केली. पण पेशवे बाजीराव त्या सूचनेकडे दूर्लक्ष करत होते. इंग्रज पेशव्यांनी बोलणी झाल्याची वार्ता यशवंतरावाना समजली. तेव्हा त्याना खूप वाईट वाटले. ब्रिटीशांची फौज बाणकोटच्या खाडीत असल्याने मातोश्री यशोदाबाईची सुटका यशवतरावांस करता न आल्याने फत्तेसिंग माने यांनी साताऱ्यास पाठवून अमृतरावांच्या नावाचे पेशवेपदाची वस्त्रे छत्रपतीकडून आणली. पण अमृतराव ही वस्त्रे घेण्यास घाबरत होता. त्याच प्रमाणे ठरल्यानुसार तो पैसे देण्याचेही टाळाटाळ करू लागला. तेंव्हा यशवंतरावांनी दबाव त्याच्यावर आणला. तेंव्हा अमृतरावांनी आपला सरदार हरिपंत भावे यास नेमूण पुण्यातील श्रीमंत लोकाकडून पट्टी बसवून पंचेवीस लाख रूपये जमा करण्याचे ठरले. पण त्यांच्या मदतीस यशवंतरावानी आपले काही लोक द्यावेत अशी विंनती केली.

तेंव्हा यशवंतरावांनी सरदार नागो जीवाजी, हरनाथसिंग व शेखजी या तिघांना मदतीसाठी पाठवून दिले. सर जॉन माल्कम यांनीही यशवंतरावांनी पुण्यात प्रवेश केल्यानंतर पाहिले दोन महिने म्हणजे डिसेंबर १८०२ अखरेपर्यंत कसलीही वसूली केली नाही. असेच म्हणटलेले आहे. बाजीराव व इंग्रज यांच्यात वसईचा तह झाल्यांची बातमी कळाल्यानंतर अमृतरावांकडे आपले तीन सरदार पाठवून वसूली केली. १३ मार्च १८०३ ला यशवंतरावानी पुणे सोडले.[२१५] त्यानंतरही अमृतरावांनी पुण्यात घुसून लुटालूट व जाळपोळ घडवून आणली. यशवंतराव पुण्यात निघून गेल्यानंतर बाजीराव इंग्रजी फौज घेऊन बाजीराव पुण्यात येईपर्यंत अमृतरावांनी पुण्यात लूट सुरुच ठेवली होती.

यशवंतराव पुण्यातून निघाल्यावर वाटेत असताना बाजीरावांनी इंग्रजांशी वसईचा तह करुन पेशवाई संपविली. ही बातमी कळाल्याने त्यांसं संताप आल्याने त्या संतापात औरंगाबद पैठण व बीड येथे लूट करीत करीत ते पुढे गेले. हा सर्व प्रदेश निजामाचा होता. निजमाची वा निजामाच्या प्रदेशाचे संरक्षण करण्याची जबाबदारी इंग्रजावर होती. तेंव्हा इंग्रजांच्या फलटनी उधळून लावून लुट करीत ते पुढे जात होते. यामुळे लॉर्ड वेलस्ली अस्वस्थ झाला. त्यानंतर बाजीराव पेशवा व दौलतराव शिंदे हे दोघेही पूण्याकडे येत असल्याचे पाहून अमृतरावांनीही १९ एप्रिल १८०३ ला पूणे सोडून जातांना वाटेतील चाकण, राहूरी, संगमनेर पंचवटी नाशिक या प्रदेशातही प्रचंड लूट केली.[२१६] यशवंतरावानी पुणे सोडल्यावर अमृतरावांनीच दोन महिन्याच्या कालावधीमध्ये पुण्यात मोठ्या प्रमाणात लूट व जाळपोळ केली व शेवटी ते धन-संपत्ती अमृतरावांनीच सोबत नेली. याचा अर्थ होळकरांनी पुण्यात जाळपोळ, लूटालूट

केलेली नसून ती अमृतरावांनी केलेली होती हे स्पष्ट होते. १३ मार्च १८०३ ते १९ एप्रिल १८०३ पर्यंत पुणेकरांकडून सक्तीचे वसूली केली. बाजीराव पुण्यात येण्याच्या काही दिवस अगोदरच पुणे सोडले.

पुण्यातील घडामोडीची माहिती आपल्या सरदारांस वा मालकास देणारे व्यंकट बल्लाळ या असबारनविस म्हणजे बाजीरावाने हरी विठ्ठल मालकास पत्र लिहिले. त्या तो म्हणतो की, पदरचे सरदार होळकर व शिंद यांची लढाई पूण्यावर होवून महाराज वसईस गेले. या पत्रात एवढाच उल्लेख असुन त्यात होळकरी दंगा वा लूटलूटीचा कसलाही उल्लेख नाही. इतिहासकार जदुनाथ सरकर Fall of Mughal Empire Vol-5 यात होळकरांनी उज्जैन, कोटा, मंदसोर, भानसोडा... अशा अनेक ठिकाणी खंडणी वसूल केले. तर पुण्यात मात्र कसलीही प्रकारची लूट झाली नसून फक्त ठराविक श्रीमंतावर पट्टी लावून जे देत नव्हते. त्यांच्याकडून सक्तीने वसुली केले. असे स्पष्ट केलेले आहे.[२१७]

इंग्रजांचा रेसिडेंट बॅरी क्लोज, नंतरचा एल्फिस्टन यांनी सुध्दा त्यावेळी केलेल्या पत्रांत यशवंतरावांनी पुण्यात लूटालूट जाळपोळ केल्याचे नमूद केलेले नाही. म्हणजेच पूण्यात खरी लूट अत्याचार यशवंतरावांनी केलीच नव्हती. त्यामुळे त्यांना आपल्या पत्रात उल्लेख करण्याचा हेतू नव्हता. शाहीर खाडीलकरांनी १ ऑक्टोंबर १९४३ ला यशवंतरावांचा पोवाडा यात यशवंतरावांचे संपूर्ण जीवन चित्रित केलेले आहे. त्यातही पूण्यातील होळकरी दंगा जाळपोळ वा लूटलून याबदल कसलाही उल्लेख नाही.[२१८]

बाजीराव पेशवे पदी वसईच्या तहानुसार बाजीराव सोबत इंग्रजांची फौज घेवून तो पुण्यात आल्यावर १३ मे १८०३ ला तो पुन्हा पेशवे पदी विराजमान झाला. म्हणजेच पुण्यात यशवंतरावानी लूटालूट करून ते पुणे उध्वस्त केले असते. तर बाजीराव पुण्यात येऊन मुडद्यांच्या वा आसोड शहरात येऊन गादीवर बसला नसता. म्हणजेच पुण्यात सर्व काही अलबेल होते. ६ डिसेंबर १८०३ बाजीरावांनी इंग्रजांचे सार्वभौमत्व मान्य केले या तहात पेशवाई खऱ्या अर्थाने बुडाली ईस्ट इंडिया कंपनीचा ब्यरी क्लोज व एलफिस्टनने २० एप्रिल १८०३ पूण्यात बाजीरावास आणून पेशवे पदी बसविले.[२१९]

यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरोधात आणखीन शिंदे व भोसले यांच्याशी पत्रव्यवहार चालूच ठेवला होता. त्यानुसार पेशव्यांला इंग्रजांच्या कचाट्यातून सोडविणे व आपले सार्वभौमत्व राखणे, हे त्यांनाही पटलेले होते. इंग्रज हे आपल्या सर्वांना परके आहेत. त्यांना आपल्या सर्वांच्या अंतर्गत भानगडीत नाक खुपसण्याचा अधिकार नाही. याबदल ते सर्वजण सहमत होते. कारण पेशवा हा सर्व मराठा मंडळाचा अधिकृत नेता होता.

**३.६.५ इंग्रजांशी लढा:**

पेशव्यांने इंग्रजांचे सार्वभौमत्व स्विकारले म्हणून एका अर्थाने सर्वच मराठा मंडळातील सरदारांची मान्यता होय. उलट बाजीराव पेशव्यांनी देशद्रोहाचा गुन्हा केलेला आहे. त्यातून

त्यास वाचवून सुटका केली. तरच आपले 'मराठा मंडळ' अबाधित राहिल. म्हणून यशवंतरावांनी अनेक महिने अनेक मराठा मंडळातील सर्व सरदारांना एकत्र येण्याचे व इंग्रजांशी सामना करण्याचे महत्व पटवून देत होते. याशिवाय स्वत: यशवंतराव स्वत:चे सैन्यबळ ही वाढवित होते. त्यासाठी शत्रुच्या प्रदेशात लुट केली. तरी इंग्रजांनी स्टिव्हसनला यशवंतरावांशी युद्ध करण्याचे टाळावे. असे सुचित केलेले होते. जर युद्ध झाले. तर ते तिघे एकत्र येवून आपला पराभवही करतील. व केलेला वसईचा तह ही मोडेल. अशी लॉर्ड वेलस्लीस याची भिती वाटत होती.

यशवंतराव नंतर इंदौरला जाऊन सैन्याची जमावजमव सुरुच ठेवून शिंदे भोसलेंना पत्र व्यवहार चालूच ठेवला. आपण तिघे एकत्र येवून जलचरांना (इंग्रजांना) नेस्तनाबूत करु... आपापसातील सारे वाद नंतर सोडवू...[२२०] या विचाराने तिघे एकत्र येण्याचे ठरले. तिघांच्या योजनेनुसार होळकर, शिंदे व भोसले यांच्या फौजा नर्मदा नदीकाठी जमा झाल्या. तत्पुर्वी दौलतरावांनी यशवंतरावांच्या कुटूंबातील जे कैदेत होते त्याची सुटका करुन एकमेकांनी एकमेकांचे जिंकेलेले प्रांत, महाल परत करावे असे ठरलेले होते. सर्व एक होवून इंग्रजांशी लढण्याच्या तयारीत होते. तेंव्हा दौलतरावांनी मनात कपट कारस्थान चालू ठेवले. त्यानुसार दौलतरावांनी अमृतराव पेशव्यांच्या हस्ते बाजीराव पेशव्यांना एक पत्र लिहून कळविले की, त्यांचे युद्ध आता इंग्रजाशी आहे. इंग्रजांच पाडाव होताच भोसले व तुमच्यासह (पेशवा) आपण यशवंतरावांचा विनाश करु.[२२१] अमृतरावांनी हे पत्र पेशव्यांकडे पाठविण्याऐवजी लॉर्ड वेलस्लीकडे पाठविण्याचे ठरविले. कारण इंग्रजाकडून अमृतरावच पेशवा म्हणून वर्षाला सात लाख रुपये तनखा देण्याची शिफारस केलेली होती. त्या सात लाख रुपयाच्या लालसेपोटी सर्व मराठा सरदार एकत्र येण्याचे वृत इंग्रजांना कळण्याअगोदरच हे दौलतरावांचे पत्र चुकून यशवंतराव होळकरांच्या सैन्याच्या हाती लागले. तेंव्हा यशवंतरावास दौलतराव, भोसल, पेशवे बाजीराव व अमृतरावांच्या गुप्त कटाचा सुगावा लागला. तेंव्हा या तिघांना एकत्र आणण्यात काहीच अर्थ नाही. हे यशवंतरावांनी पक्के ओळखले.

आता तिघांनी एक होवून लढण्याचा विचार यशवंतरावांनी सोडून स्वत: एकटेच इंग्रजांशी लढण्यासाठी यशवंतराव आपला तळ नर्मदा नदीवरुन तडक इंदौरला हालविण्यासाठी निघाले. इंग्रजांना हे तिघे एकत्र येण्याचे व यशवंतराव निघून गेल्याचे कळताच लॉर्ड वेलस्लीने कर्नल कॉलिन्समार्फत शिंद्यांना धमकावयास सुरुवात केली. तसेच ६ ऑगस्ट १८०३ ला लॉर्ड वेलस्लीने शिंदे व भोसले विरूध्द युद्ध घोषित केले. जनरल लेकच्या नेतृत्वाखाली उत्तर मोहीम व स्वत: लॉर्ड वेलस्ली दक्षिण मोहीम हाती घेतली.[२२२] त्यानुसार एका मागून एक शिंदे व भोसलेचे प्रदेश ब्रिटीश फौजा जिंकत पुढे पुढे जात होत्या. लासवाडी येथील शिंद्यांच्या फौजेचा पराभव केला. तर २३ सप्टेंबर १८०३ ला असई व त्यानंतर वेलस्लीने लगेच आडगाव येथे शिंदे व भोसल्यांचा दारूण पराभव केला. तेंव्हा नागपूरच्या भोसलेंना १७

डिसेंबर १८०३ ला देवगाव येथे इंग्रजाशी तह करणे भाग पडले. तर दौलतराव शिंदे यांना ३० डिसेंबर १८०३ ला सुर्जी अंजनगाव जेंव्हा तह करणे भाग पडले.[२२३]

या तहामुळे मातबर मराठा सरदारांनी इंग्रजापुढे आपली शरणागती पत्कारुन स्वत:चे स्वातंत्र्य गहाण टाकले. व गुजरातपासून बुंदेलखंडापर्यत ओरीसा, राजपूताना व पंजाब प्रांतात इंग्रजांचे वर्चस्व आपोआप निर्माण झाले. शिंदे व भोसलेंना इंग्रजानी अंकीत करुन त्यांनी दिल्लीचा बादशहा शहाआलम दुसरा यास ही आपल्या वर्चस्वाखाली इंग्रजांनी आणले. यशवंतरावांनी या घटनेचे बारकाईने निरीक्षण करुन इंग्रज एक-एका सत्ताधीशास संपुष्टात आणत आहेत. त्यामुळे सर्वांना एक होण्याची गरज आहे. हे यशवंतरावांनी ओळखूण शिख, राजपूत, बादशहा, राजे राजवाडे व इतर सरदार नवाब यांना एकत्र येण्याचे स्वत: भेटून वा पत्रव्यवहार करुन आव्हान करीत होते. तोपर्यंत बऱ्याच जणांनी इंग्रजांशी करार करुन अंकीत बनलेले होते. यशवंतरावाचे वाढते सामर्थ्य पाहून इंग्रजांनी मैत्रीचा डाव समोर केला. त्यानुसार इंग्रज होळकरांचे सार्वभौमत्व मान्य करत त्यांच्या प्रांतात हस्तक्षेप करणार नाही, आक्रमण करणार नव्हते. त्याबद्दल यशवंतरावांनी इंग्रजांशी वा त्यांचे मांडलिकत्व स्विकारले आहे. त्यांच्याशी, युद्धकरायचे नव्हते. पण चतुर यशवंतरावांनी इंग्रजांचे खायचे दात वेगळे व दाखवायचे दात वेगळे हे ओळखूण जनरल लेक या इंग्रजांकडेच यशवंतरावांनी उलट मागण्या कळविल्या. म्हणजे इंग्रजांच्या मैत्रीचा तह मान्य न करता राजपूत व अन्य राजवाड्यांकडून चौथाई वसुल करण्याचा चालत आलेला आपला हक्क इंग्रजांनी मान्य करावा. दोआबातील १२ परगणे, बुंदेलखंडातील एक परगणा तसेच इटावा आणि हरियाना हे परगणे आमचे आहेत. ते आमच्याकडे चालावेत. शिंद्यांशी ज्या अटीवर तह झाला आहे, तशाच अटीवर आमच्याशी तह करावा.[२२४] जनरल लेकने या मागण्या पाहून त्या धुडकावून लावल्या. तेंव्हा यशवंतरावांनी पुन्हा लेकला एक पत्र पाठविले 'माझा देश आणि माझी संपत्ती माझ्या घोडयाच्या खोगिरावर आहे. ज्याही दिशेला माझ्या पराक्रमी सैनिकाचे घोडे वळतील त्या दिशेचा सर्व देश आम्ही जिंकून घेऊ. जर तुम्ही शहाणे आणि विचारी असाल तर माझे प्रतिनिधी सांगतील त्या महत्वाच्या विषयांच्या आधी फडशा पाडाल... जनरल लेकने हे पत्र पाहून हबकूणच गेला. २२ मार्च १८०४ ला लॉर्ड वेलस्लीला पत्र पाठवून यशवंतरावांविरूध्द युद्ध करण्याची परवानगी मागीतली. त्यात तो म्हणतो की, जर होळकराला आताच नष्ट केले नाही, तर पावसाळयानंतर तो कमालीचा उपद्रवी ठरेल. या राक्षसाने मला जेवढे अस्वस्थ केले आहे. तसे कधीही कोणी केले नसेल. हा माणूस इंग्रजांचा सर्वात घातक शत्रू आहे. यात शंका बाळगू नये. अशा दरोडेखोराचे कौतुक करतांना मला संकोच वाटतो आहे. तो स्वत: माझ्यावर चालून येणार नाही, असेच दडपण वाढत राहिले... आणि जर मी त्याच्यावर चालून गेलो, तर तो हुलकावण्या देत सरळ आपल्याच प्रदेशात घुसून वाटेत आडवे येईल ते उद्‌ध्वस्त करत पुढे जाईल.[२२५]

यावरून असे स्पष्ट होते की, जनरल लेक सारखा सेनापती यशवंतरावांना किती घाबरतो. व यशवंतराव हे इंग्रजाना किती भारी पडतील व इतरही राज्यांना एकत्र आणून इंग्रजाशी लढा पुकारले तर आपली हार नक्की आहे. हे लेकनी पूर्णपणे ओळखलेले होते. त्याचप्रमाणे यशवंतरावांनी इंग्रजरूपी राक्षसास आताच देशातून हाकलून नाही दिले. तर ते पुढे मराठ्यासह देशातील सर्व राज्यांचे सार्वभोमत्व नष्ट होणार. असे दूरगामी विचाराचे यशवंतराव होळकर हे तत्कालीन एकमेव भारतीय राज्यकर्ते होते.

तरीही लॉर्ड वेलस्लीने आताच यशवंतरावाविरूध्द लढाईची परवानगी दिली नाही. जरी वेलस्लीने स्वत: शिंदे भोसले व बादशहास लढून अंकित बनविले. तरी त्यांचीही यशवंतरावांशी लढण्यास सध्या तरी हिम्मत होत नव्हती. जनरल लेक आपल्या स्तरावरुन आपल्या गुप्त हेरामार्फत यशवंतरावाची शक्ती कमी करण्यासाठी त्यांच्या सरदाराना लाच देऊन फोडण्याचा प्रयत्न करीत होता. त्यात त्या गुप्त हेरांस यशवंतरावानी इंग्रजांविरूध्द राजेराजवाडयांना एकत्र येण्याचे आवाहन देणारे पत्र हाती लागले. त्यात यशवंतरावानी लिहिले होते, इंग्रजामुळे सारी संस्थाने कशी खालसा होत आहेत. आणि आता त्याला उखडले नाही तर, हिंदूस्थानातील हिंदू धर्माच काय इस्लामही उरणार नाही... तेंव्हा सारे एकत्र या... माझा घोडा आघाडीला आहे. आपण सारे या शत्रूला समुद्रावार हाकलण्यास संक्षम आहोत... अशा प्रकारची यशवंतरावांनी प्रचंड जिद्द मनी बाळगून इंग्रजाना काही केले तरी भारतातून हाकलून लावण्याचा छंद बांधला. पण इतर भारतीय राज्यकर्त्यांनी त्यांचे ध्यैय जाणून न घेता स्वार्थ हितात ते गुंतून पडले. त्यामुळे त्यांना कोणीही वेळेवर मदतीसाठी एकत्र आले नाहीत. जनरल लेकने लॉर्ड वेलस्लीस ताबडतोब ४ एप्रिल १८०४ ला पत्र पाठविले, आणि निर्वाणीचा इशारा दिला. की जर एक जरी राजा, यशवंतरावांना सामील झाला, तर इंग्रजांचे भारतातील बस्तान उखडून फेकले जाईल.[२२६] तसेच सोबत यशवंतरावांचे ते सापडलेले पत्रही पाठवून दिले. तेंव्हा लॉर्ड वेलस्लीने नाईलाजाने होळकरांशी लढण्याची तयारी केली. जनरल लेकने यशवंतरावाविरूद्ध १६ एप्रिल १८०४ ला युध्द पुकारले.[२२७] तेंव्हा होळकरांच्या सेवेत जे व्हिकटर्स, डॉड व यान असे तीन युरोपियन अंमलदार होते त्यानी इंग्रजाशी लढण्याचे नाकारले. तेंव्हा यशवंतरावानी त्यांचा शिरच्छेद करून डोके कापून दहशत बसविली. त्यानंतर यशवंतरावानी आपलाच पहिला हल्ला व विजय मिळविण्यासाठी बुंदेलखंडात कुच जवळ कर्नल फॉसेटचा आठ हजार सैन्याचा तळ होता. त्यावर यशवंतरावांच्या अमीरखान या सरदाराने अचानक फॉसेटच्या फौजेवर २२ मे १८०४ हल्ला करुन दोन बटालियन कापून काढल्या. तेंव्हा फॉसेट घाबरुन बेटवालाकडे पळाला. त्याच्या अनेक तोफा व युद्ध सामुग्री यशवंतरावांच्या हाती सापडले.

इंग्रजी फौजेचा सर्वच आघाडयावर अनेक सरदारांच्या पराभवामुळे जनरल लेक तर आणखीनच घाबरुन गेला. लॉर्ड वेलस्लीने यशवंतरावाविरूध्द भली मोठी फौज जमा केली.

कारण या लढाईच्या विजयानेच इंग्रजांचे भारतातील भवितव्य ठरणारे होते. म्हणून देशभरातील लष्कर बोलवून हळूहळू यशवंतरावांकडे सरकु लागल्या. तेंव्हा जनरल जेरार्ड लेक उत्तरेकडून, लॉर्ड वेलस्ली दक्षिणेकडून, कर्नल मुरे गुजरातकडून तर कर्नल मॉन्सन जयपूरकडून सर्व इंग्रजी फौजा यशवंतरावावर चालून येत होत्या. शिवाय यांच्या मदतीस भारतातील अंकित झालेले शिंदेसह इतर राजे राजवाडे सोबत होते. मात्र यशवंतराव हे एकटे ऐतियदेशीय राजे परकीय इंग्रजांशी जगाच्या साम्राज्यांवाद्याशी लढा देण्यास सक्षम होते. यशवंतरावानी इंग्रजांच्या सर्व फौजा चौहूबाजूने एकत्र येण्याच्या आतच एका-एका फौजेचा सडकून पराभव करण्याची योजना तयार केली. कर्नल मॉन्सनने येतांना वाटेत यशवंतराव होळकरांचे टोंक रामपूरा विभाग जिंकून घेतले.

कर्नल मॉन्सन व कर्नल मरे एकत्र येण्याअगोदरच यशवंतरावांच्या फौजेवर आक्रमण केले. तेंव्हा यशवंतरावांनी माघार घेत थोडे थोडे मागे हटविले. तेंव्हा मॉन्सला वाटले की, होळकरी फौज घाबरुन पळत आहे. हे पाहून पाठलग करीत ते मुंकदरा घाटातून ते पुढे येत पन्नास मैलावर येत होते. तर यशवंतरावही मागे मागे सरकत येत असल्याचे पाहून त्याच दिशेला मरेची छावणी होती. त्यास वाटले की, यशवंतरावांची फौज येत असल्याचे पाहून त्यांनी माघार घेत पळत सुटले.

मॉनसन यशवंतरावांवर चढाई करीत बराच अंतर मध्ये आला. पण त्यास अन्नधान्याची व इतर रसद कमी पडत असल्याने उपासमारीची वेळ आली. व कॅप्टन मरेकडून वेळेवर रसद पूरवठा होण्याऐवजी तोच परत यशवंतरावाच्या भितीने परत फिरला. त्यामुळे मॉनसनकडे परत फिरण्याशिवाय कोणताच मार्ग नव्हता. तेंव्हा कर्नल मॉन्सनने तर यशवंतराव होळकरांच्या गनिमी काव्यापुढे हात टेकले.[२२९] तो परत मागे फिरताच आपल्याकडील अवजड तोफखान व इतर साहित्य कॅप्टन ल्यूकान या अधिकाऱ्याकडे सोपवून परत मुकंदरा खिंडीकडे फिरताच यशवंतरावांनी आपल्या पूर्ण सैन्यानिशी कॅप्टन ल्यूकानवर हल्ला चढविला. त्यात ल्युकानचा एक साधा शिपाई वाचू शकला नाही. स्वतः ल्यूकान यामुकत्यार हत्तीवरच मारला गेला. त्यांचे सर्व तोफखाना व अवजड सामान यशवंतरावांच्या हाती सापडले.

नंतर लगेच यशवंतरावानी आपला मोर्चा कॅप्टन मॉन्सनच्या पळणाऱ्या फौजेवर हल्ला करण्यासाठी अत्यंत वेगवान कुच सुरु केली. १० जुलै १८०४ ला यशवंतरावांनी मुकुंदरा खिंडीजवळ गाठले. तर कॅप्टन मॉन्सनला वरुन आदेश होता की, आग्राकडे निघून जा.[२२९] पण थॉम्सनकडील रसद संपल्याने उपासमार सुरु झाली. त्यात पावसाळा सुरु झाल्याने मैदानी भागातील गाळातून प्रवास करणे, आणखीन कठीण होऊन बसले. तेंव्हा वाटेत मॉन्सनने कोटयाचा राजा जालीमसिंगकडे मुक्काम करुन त्यांच्याकडून नाव घेऊन चंबळ नदीचा पूर पार करण्यात यश आले. पण यशवंतरावांनीही नदी पार करुन कर्नल मॉन्सनचा पाठलाग चालूच ठेवला. पण चिखलात मॉन्सनचा तोफखाना, हत्ती, उंट वेगवान हालचाली करु शकत नसल्याने

त्या मागेच सोडून तो पूढे निघून जाताच यशवंतरावांनी त्या आपल्या ताब्यात घेतल्या. २३ जुलै १८०४ ला पूढे मॉन्सनला पून्हा एक चंबळी ओढ्यास आलेल्या पूरामुळे तिसऱ्या दिवशी कर्नल डॉनसह ओढा पार करण्यात यश आले. तेंव्हा स्वत: मॉन्सन वेगळ्या मार्गे रामपुऱ्याकडे गेला. तर कर्नल डॉन दुसऱ्या मार्गे रामपूरा येथील किल्ल्यात आश्रयास गेला. पण यशवंतराव पाठीमागून सारखाच पाठलाग करीत येत असल्याचे पाहून २० ऑगस्ट १८०४ ला पुन्हा मॉन्सनला रामपूराचा किल्ला सोडून पळून जावे लागले.[२३०] पण पुढे बनास नदीस पूर आल्याने मॉन्सनने यशवंतरावांच्या भितीपोटी आपले सर्व सैन्यासह व साहित्यास नदी पार केली. पण यशवंतरावांनी अगोदरच पुढून मॉन्सनला तिन्ही बाजूनी वेढा दिल्याने दोघात घनघोर लढाई झाली. मॉन्सनचे या लढाईत तेरा सेनानी ठार झाले. तर बरेच सैन्य कापून काढण्यात यशवंतरावांस यश आले. पण कर्नल मॉन्सन कसाबसा कुशलगडला निवडक सैन्यासह निसटून पळाला. पण यशवंतरावांनी पुन्हा त्यांचा पाठलाग सुरु केला. तेंव्हा त्यांनी आग्राकडे कुच केली. पण घाबरलेले सैन्य लढण्याच्या स्थितीत नव्हते. मॉन्सनचे अनेक अधिकारी मॉन्सनला सोडून पळून जाऊ लागले.

हया हलाखीच्या परिस्थितीत होळकर सैन्यानी वेगवान हालचाली करून मॉन्सनच्या सैन्यावर फत्तेहपूरला २८ ऑगस्ट १८०४ निर्णायक लढाई होवून कर्नल मॉन्सनला शरणागती पत्कारावी लागली.[२३१] या कर्नल मॉन्सनच्या पाठलगात आतापर्यंत होळकरांकडून मॉन्सनचे दहा हजार सैन्य व दोन ते तीन हजार बाजारबुणगे ठार झाले. तर कर्नल मॉन्सन यास ३० ऑगस्ट १८०४ रोजी स्वत:चा जीव वाचविण्यासाठी केवळ दोनशे ते तिनशे सैनिकांसोबत आग्राला आग्राकडे पळून जावे लागले.

यशवंतरावांनी इंगंजी फौजांची केलेली धोबी पछाडने भारतातील सर्व कर्नल वा अधिकारी तर हादरुन गेलेच होते. शिवाय यांचे पडसाद इंग्लड मध्ये उमटले. एवढा धक्का देणारा यशवंतराव हा पहिला मराठा सुभेदार ठरला. यशवंतराव हा जन्मत:च अत्यंत धाडसी वृत्तीचा होता. त्याचे व्यक्तीमत्व विलक्षण होत. प्रचंड निर्णय क्षमता, अतिशय चपळ हालचाली, प्रचंड पराक्रमी वृत्ती, मुत्सद्यीपणा, विलक्षण महत्वकांक्षी व महापूरातही स्वत: पहिल्यांदा नदी पार करुन अचाट साहस दाखविणारा शासन कर्ता होता. इंग्रजांविरूध्द सर्व भारतीय शासकांना एकत्र येण्याचे आव्हान देणारा पहिला भारतीय होय. म्हणजेच यशवंतराव हे अदितीय कर्तुत्व गाजविणारा एकमेव होळकर शासक होय.

महाराज यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या फौजेस पराभूत केल्यानंतर त्यांनी संपूर्ण भारताची राजधानी असलेल्या शहराआलम दुसरा यास इंग्रज बंधनातून मुक्त केले. दिल्लीच्या तखतावर पुन्हा बादशहास विराजमान करून व ब्रिटीशांची भारतातील राजधानी कलकत्ता येथून कायमची हकलापटी करणे हे यशवंतरावां समोरचे मोठे ध्येय होते. दिल्लीच्या मुघल पातशहा हा नामधारी जरी असला. तरी त्यांच्या मान्यतेशिवाय संपूर्ण भारतातील इतर सत्ताधिशांना

कायदेशीर मान्यता नसे. म्हणून पराभवाने खचलेल्या ब्रिटीशांना व त्यांची फौज तयारी करण्याअगोदरच आपल्या साठ हजार घोडदळ, पंधरा ते सोळा हजार पायदळ व दोनशेच्या जवळपास तोफखाना घेऊन दिल्लीकडे कुच केली. वाटेतील मथुरेवर हल्ला करताच तेथे इंग्रज अगोदरच पळून गेले. तेथून खंडणी वसूल करुन दिल्लीला ८ ऑक्टोंबर १८०४ ला वेढा दिला. तेंव्हा दिल्लीच्या संरक्षणासाठी कर्नल ऑश्टर्लनीव लेप्टनंट कर्नल बर्न होते. त्यांनीही प्रतिकार सुरु केला. मथुरेकडून कर्नल लेक दिल्लीच्या बचावासाठी निघाला. दिल्लीस सर्व बाजूनी वेढा देऊन ऑश्टर्लनी व बर्नशी लढा सुरू केला. त्याअगोदरच दिल्लीच्या बादशहाकडून यशवंतरावास 'महाराजाधिराज, राजराजेश्वर आणि अलिजाबहाद्दर' अशी पदवी बहाल केलेली होती.[२३२] होळकर दिल्लीवर ताबा घेण्याअगोदरच होळकरांचा बंदोबस्त करण्यासाठी वेगवान हालचाली सुरू झाल्या. त्यामुळे यशवंतरावांनी १८ ऑक्टोंबर रोजी दिल्ली सोडून दुआबच्या सधन प्रदेशाकडे कुच केली.

### ३.६.६ डिगच्या किल्ल्यास इंग्रजी फौजेचा वेढा

यशवंतराव होळकर मॉन्सनचे लचके तोड पाहून भरतपूरच्याराज्यानी होळकरांशी मैत्री केली त्यामुळे होळकरांची बरीच फौज भरतपूरच्या किल्ल्याच्या आश्रयास गेली. २० नोव्हेंबर १८०४ ला इंग्रज जनरल लेकने डीगच्या किल्यास वेढा घातला. यावेळी डीगच्या किल्ल्यात होळकरांची काही थोडीशीच फौज बाकी होती बाकी सर्व व यशवंतरावांची फौज भरपूरच्या किल्ल्याकडे रवाना झालेली होती.[२३३] लेकने डीगच्या किल्ल्यावर मारा करण्यासाठी मोठे खंदक खोदून तोफांचा भडीमार सुरू केला. किल्ल्याच्या भिंतीस सुरूंग लावण्याचा प्रयत्न करीत होता. तेंव्हा होळकरांच्या सैन्यानी कडवा प्रतिकार केला. पण तोफखानांच्या व बंदूकांच्या माऱ्यामुळे अनेक सैन्य ठार होऊ लागले. तेंव्हा २३ नोव्हेंबर १८०४ ला इंग्रजांच्या फौजेत किल्ल्याच्या तिन्ही बाजूनी आग्र्याहून खास तट फोडण्याऱ्या तोफा मागवून हल्ला करुन तोफखान्याचा मारा करुन किल्ल्याच्या भिंत्तीला भगदाड पाडण्यात यश मिळवले. तेंव्हा किल्ल्यातील सैन्य बाले किल्ल्यात निघून गेले. चौथ्या दिवशी मात्र होळकरांच्या सैन्यांनी इंग्रजी फौजला प्रतिकार करीत असतांना अनेक सैन्य मरत असल्याचे पाहून माघार घेऊन किल्ला सोडून ते भरतपूरच्या किल्ल्याकडे निघाले. लगेच जनरल लेक ही भरतपूरच्या किल्ल्याकडे होळकरी सैन्याच्या पाठलाग करीत निघाला.

भरतपूरला २ जानेवारी १८०५ ला पोहचला. पण यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनप्रमाणे आपलेही हाल होतील. याची भिती जनरल लेकला होती. म्हणून त्यांनी अनेक बटालियनला बाहेरुन मदतीसाठी बोलाविले होते. जनरल लेकने किल्ल्याला वेढा देऊन ७ जानेवारी १८०५ ला किल्ल्यावर तोफाचा भडीमार सुरु केला. यशवंतरावांच्या कणखर प्रतिकारामुळे इंग्रजी फौजांना सुरंग लावण्यात अपयश येत होते. सतत प्रयत्न करुनही काही केले तरी, किल्ल्यास सुरंग लावून किल्ला सर करणे अशक्य होत चालले. यात इंग्रजांचे कर्नल मेटलॅड, कॉसवेल

व रूध्देना हे अधिकारी जागीच ठार झाले. तर चारशे पेक्षा अधिक सैन्याही ठार झाले होते. तर होळकरांचे फक्त बावीस सैन्य कामी आलेले होते.[२३४] तरी जनरल लेक माघार घेण्यास तयार नव्हता. तेंव्हा यशवंतराव आपल्या काही निवडक सैन्यासह बाहेर होते. तेंव्हा यशवंतराव लेकच्या सैन्यावर गनिमी काव्याच्या आधारे भरतपूरच्या किल्ल्याच्या वेढा उठविण्याचा तो कमकुवत करण्याचा प्रयत्न करीत होते. या गनिमी काव्यांच्या हल्ल्यामुळे जनरल लेक अधिकच घाबरुन गेलेला होता. तरी त्यांने ही लढाई प्रतिष्ठेची करुन निकराचा लढा चालूच देऊन तोफाचा मारा मोठ्या प्रमाणात सुरु केला. लेप्टनंट कर्नल मॅक्रायकडे एका तुकडीचे नेतृत्व देऊन किल्ल्याचे दरवाजे तोडून जोपर्यंत किल्ल्यात इंग्रजी फौज शिरकाव करणार नाही. तोपर्यंत होळकरांच्या सैन्याचा पराभव करता येणार नाही. म्हणून खंदक ओलांडता लेप्टनंट कर्नल मॅक्राय व पाचशेच्यावर सैन्य ठार झाले.

यशवंतरावांनी फितूरीच्या वाटेवर असलेल्या अमीर खानला इंग्रजांच्या बुंदेलखंडच्या भागात जावून लूट करण्यायसाठी पाठवून दिले. कारण या अमीरखनाने गोपनिय करार इंग्रजांशी करुन यशवंतरावासोबत राहून तो खबऱ्याचे काम करीत होता. म्हणून त्यांस इंग्रजांच्याच प्रदेशावर पाठवून दिले म्हणजेच अमीरखान दोघांकडेचे काम करीत होता. याच अमीरखाने फारूखाबाद व डीगच्या लढाईतून काढता पाय घेऊन पळून गेला. त्यामूळे यशवंतरावास हार मानावी लागली होती. आता जनरल लेकला आपल्या सैन्याचे व तोफखान्याचे दोन भाग करुन एक तुकडी बुंदेलखंडाकडे अमीरखानच्या नेतृत्वाखाली होळकरी सैन्याचा पराभव करण्यासाठी पाठवावे लागल्याने एक महिण्यापर्यंत लेकने किल्ल्यावर हल्ला करण्याशिवाय गप्प बसून बुंदेलखंडावरील तुकडी परत येईपर्यंत वाट पाहावी लागली. व बाहेरुन यशवंतरावांच्या हल्ल्यास तोंड देऊनच हैराण झाला. तरी लेकने मोठ मोठे मचाण ऊभारुन त्यावर तोफा चढवून भरतपूरच्या किल्ल्यावर हल्ले करुन भगदाड पाडल. कॅप्टन टेलरच्या नेतृत्वाखाली आपले सैन्य किल्ल्यात घुसवण्याचे आदेश दिले.[२३५] पण होळकरांच्या प्रतिहल्ल्याचे त्यांना माघार घ्यावी लागली. यात इंग्रजांचे चारशे पाचशे सैन्य ठार झाले. दुसऱ्या दिवशी पून्हा निकराचा लढा चालू झाला. त्यात पून्हा किल्ल्यावरून होळकरांच्या मारामुळे बरेच इंग्रज सैन्य ठार झाले. म्हणजेच जनरल लेकला आपले तीन हजार दोनशे ब्यान्नव सैनिक गमावून माघार घेऊन परतावे लागले. यात जनरल लेकचे कॅप्टन टेलर, लेप्टनंट कर्नल, डॉन व कॅप्टन ग्रांट यासारखे लहानमोठे एकशे तीन इंग्रज अधिकाऱ्याचा समावेश होता. ते या युध्दात मारले गेले. यशवंतराव होळकर एकट्याने तर कधी राजा रणजितसिहच्या मदतीने इंग्रजांना अनेक हल्ल्याचा लढाईत पराभूत करुन जगजेत्या इंग्रजांना यशवंतराव होळकर यांच्यापुढे मात्र माघार घेऊन 'फोडा व झोडा' या नितीचा अवलंब केल्याशिवाय यशवंतरावांवर विजय प्राप्त होत नाही. हे जाणून इंग्रजानी राजा रणजिंतसिंहास फोडण्याचा प्रयत्न सुरु केला.

यशवंतराव होळकरांचा इंग्रजावरील भरतपूरचा विजय हा नेपोलियन बोनापार्ट पेक्षाही किती तरी मोठा होता. कारण तत्कालीन यशवंतरावांची परिस्थिती अतिशय बिकट होती. तरीही ते न डगमगता इंग्रजांशी अतिशय निकराचा लढा देऊन सर्व बाजूने इंग्रजांचा पराभव केला. यशवंतरावांमुळे इंग्रजाना जीवीत व तोफखान्याची हानी सहन करावी लागली. यशवंतरावांविरूध्द 'फोडा आणि झोडा' या नितीचा अवलंब करतच यशवंतरावांस एकाकी पाडून ऐन युध्द प्रसंगी होळकरांच्या सरदारास फितूर करुन लढाई जिंकणे इंग्रजाना अवघड होते. भवानी शंकर खत्रीस फितुर केले. इंग्रजांनी शिंदे, भोसले व पेशवे यास अगोदरच मांडलिक बनवलेले होते. यशवंतरावांस मदत करणाऱ्यास धमकी, अमिष व इतर लालूच लावून फितूर करणे, हाच इंग्रजाचा हेतु होता. त्यात जाट राजा रणजितसिंह व अमीरखान यासारखे अनेक लढवय्ये निघून गेले. तर काही फितुर केले, तरी यशवंतरावास इंग्रज पराभूत करू शकले नाहीत.

भारतातील इग्रंजाना एक यशवंतराव होळकरांसारखा एक संस्थानचा राजा पराभूत होऊ शकला नाही. त्यामुळे भारताचा गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्लीला परत मायदेशी बोलावण्यात आले. त्या जागी भारताचा गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवालिसची नेमणूक ३० जुलै १८०५ मध्ये केली. तो भारतात आला पण, त्यांचा ५ ऑक्टोंबर १८०५ ला गाझीपूर येथे अचानक मृत्यू झाल्याने त्यांच्या जागी ब्रिटीश कंपनी सरकारने जॉर्ज बार्लीस नेमणूक करुन भारतात पाठविलेले.[२३६] या काळात यशवंतरावांनी भरतपूरचा किल्ला सोडून ते डीगच्या दिशेन निघाले. कारण या रणजितसिंहाने इंग्रजाशी गुप्तपणे करार केलेला होता.

### ३.६.७ इंग्रजाना तह करण्यास भाग:

यशवंतराव होळकरांशी उघडपणे युद्ध करणे महागात पडते हे ओळखूण इंग्रजांनी यशवंतरावाशी शांततेचा करार करण्यावर भर दिला. त्यासाठी होळकरांचे संपूर्ण राज्य हे स्वतंत्र व सार्वभौम मानावयास इंग्रज तयार होते. याशिवाय ही होळकरांच्या राज्यात शिंदे वा इतर कोणीही हस्तक्षेप करणार नाही. तसेच होळकरांच्या भूमीवर इंग्रज यशवंतरावाच्या परवानगी शिवाय पाय ठेवणार नाहीत. तसेच आतापर्यंत झालेल्या लढयाचा युद्ध खर्चही घेणार नाही. उलट यशवंतरावांचा जयपूरवरील चौथाईचा हक्कही मान्य करण्यास तयार होते. पण यशवंतराव होळकर हे भारतातील इतर म्हणजेच जाट, शिंदे, भोसले, निजाम, बादशहा या सारखे आपमतलबी, स्वार्थी व संकुचीत वृत्ती नव्हते. त्यामुळे त्यांनी इंग्रजांना शांतात कराराची साधी भिक सुध्दा पदरी पडू दिली नाही. ते केवळ देश प्रेमासाठी भारतातील इतर राजे महाराजे बादशहा नवाबाना एकत्र आणून इंग्रजाशी लढा देण्याच्या तयारीने सत्त धडपडत होते. पण भातातील तमाम राजे महाराजे इंग्रजांना शरण जाऊन तैनाती फौज स्विकारून एक प्रकारचे मांडलित्व स्विकालेले होते. इंग्रज सांगतील तसेच त्यांना आपले धोरण ठेवावे लागत होते. हे यशवंतरावांनी वेळीच जाणले होते. यशवंतरावानी इंग्रजांचे डावपेच व नितीस

ओळखूण दूरगामी परिणामाची चिंता करून पुन्हा नव्या जोमाने सर्व भारतातील तमाम राजाना व सत्ताधीशांना इंग्रजाविरूध्द एक होवून लढा देण्याच्या योजनेत सहभागी होण्याचे आवाहन करीत होते. त्यासाठी त्यांनी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष भेटी देऊन किंवा पत्र लिहून इंग्रजाविरूध्द मतपरिवर्तन करण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

यशवंतरावांच्या या आव्हानास साथ देऊन दौलतरावा शिंदे होळकरांच्या भेटीस निघाले असताना इंग्रजानी पुन्हा शिंद्यावर २३ नोव्हेंबर १८०५ ला आणखीन एक करार लादून शिंद्याकडून अधिकारचा प्रदेश बळकावला. तेव्हा यशवातरावानी शिंद्याचा विचार मनातून काढून ते थेट लाहोरकडे निघाले. त्यावेळी राजपूत राजा मानसिंग हा यशवंतरावास आपल्या फौजेसह येवून मिळाला. जनरल लेक हा यशवंतराव होळकरांचा पाठलाग करीत होता. पण यशवंतरावावर हल्ला करण्याची त्याची हिम्मत होत नव्हती. आपल्या कुटनितीचा अवलंब करुन यशवंतरावासोबत राजपूत शिख राजे मिळाले तर, त्यांच्या ताकतीत आणखीन भर पडेल. व आपल्याला भारतातून गाशा गुडाळावा लागेल. या भितीने खास तातडीचे खलिते पाठवून शीख राजा रणजितसिंहाचे मन वळविण्यात यश मिळविले. त्यानुसार महाराजा रणजिंतसिहांशी इंग्रजांनी मित्रत्वाचा करार केला. इंग्रजानी यशवंतराव होळकरास एकटे पाडण्याचा प्रयत्न यशस्वी केल्याने पुढे काही दिवसातच रजपूत राजा मानसिंह यशवंतरावास सोडून निघून गेला. तेंव्हा संपूर्ण भारतात इंग्रजाविरूध्दच्या लढयात यशवंतराव एकटेच पडले. तरीही यशवंतरावांनी धीर सोडला नाही. इंग्रजांच्या मनात यशवंतरावानी एवढी धास्ती निर्माण केली होती की, त्यांना यशवंतरावांशी शांततेचा तह केल्याशिवाय शांत बसता येत नव्हते. यासाठी जनरल लेकवर वरुन तसा सत्त दबाव पडत होता. यशवंतरावांच्या युद्धनितीसमोर आपला निभाव लागणार नाही, हे त्यांच्या लक्षात आलेले होते. त्यामुळे इंग्रज सत्त शांततेचा तह करण्यासाठी प्रयत्नात होते. याचीच परिणीती म्हणजेच व्यास नदीच्या काठी राजपूर घाट येथे दिनांक २४ डिसेंबर १८०४ रोजी इंग्रजाशी शांततेचा तह केला.

२४ डिसेंबर १८०५ रोजी इंग्रज व बहाद्दर यांचे सरदारासी व महाराजांची दोस्ती मुकरर जहाली... गव्हरनर जनरल सर जार्ज हलरोवालों बारोनेट साहेब बहादूर यांजकडील मुखत्यार लार्ड लिक, साहेब बहादुर त्याजकडील मुखत्यार कर्णल जानमालकम साहेब बहादूर यांचे विद्यमानें व महाराजे यशवंतराव होळकर यांजकडील सेख हवीबुल्ला व बालाराम शेट यांचे विद्यमाने करार ठरला. करारनामेचीं कलमें ठरलीं

१ महाराजे मोसूफ करार करितात कीं सरकार कंपनी इंग्रेज बहादूर यासी व त्यांचे इलाखेदारासी व दोस्तासी कोणे प्रकारें शतृत्वाची मसलत करणार नाहीं व ज्यामध्यें त्याचें इलाखेदारासी व दोस्तासी कोणें प्रकारें शतृत्वाची मसलत करणार नाहीं व ज्यामध्यें त्यांचे नुकसान तें करणार नाहीं.

२ रामपुरा व टोक व बुंदी व लाखेरी व समधी व मालोगांव दतिया वगैरे मुलूख बुंदीचे पाहडाचे उत्तरेस आहे तो आजपर्यंत सरकार दौलतमदार कंपनी इंग्रेज बहादूर यांचे इलाख्यांत कायम आहे तया मुलकाचा दावा करणार नाहीं व आस्ता धरणार नाहीं.

३ होळकरांचे खानदानचा कदीम तालुका व मुलूख माळव्यांत व दुसरे राजे मेवाड व मारवाड व हाडोती व चंबलनदीने दक्षणेस राजे आहेत त्यांचे मुलुखात, त्यांस उपद्रव देणार नाहीं व अम्मल दखल करणार नाहीं आणखी करार करीत आहेत की होळकरांचे तालुक्यांचा बाहदुर यांजकडील सरदाराचे हस्तगत आहे तो महाराज यशवंतराव होळकर यांचे सरकारांत माघार द्यावा. चांदवडचा किल्ला व परगणा अंबाड व सेवगांव व गंगा गोदावरीचे दक्षिणेकडील गांवदी मकानें मात्र सरकार कंपनी इंग्रज बहादूर यांचे स्वाधीन राहतील परंतु होळकरांचे खानदानाचे थोरपणावर नजर देउन करार केला जातो. महाराजे यशवंतराव होळकर यांजकडून दोस्ती कायम राहील कंपनी इंग्रज बाहदूर व त्यांजकडील इलाखेदार व दोस्त यांचे तालुक्यात उपद्रव न लागल्यास मुलूखमजकुरही दिडावर्षानी माहराजे यशवंतराव होळकर यांचे स्वाधीन केला जाईल.

४ परगणे कोंच बुंदेलखंडाचा जिल्हा आझी सोडला.याचा दावा करणार नाहीं. परंतु सरकरा कंपनी इंग्रज बहादुर यांचे सरदार करार करितात कीं, महाराजे मबसूफ यांजकडील दोस्तीची मजबुती यथास्थित राहिल्यास ज्याप्रमाणें, बाळाबाईस जहागीर दिल्ही आहे त्याप्रमाणें कोंच महाराजे मौसुफ यांची कन्या भीमाबाई यांस दोन वर्षानंतर कंपनी सरकारांतून जाहगीर दिला जाईल.

५ सरकार कंपनी इंग्रज बाहदुर यांचा मुलूख व यांचे सरदारांनी घेतलला मुलूख व त्यांचे इलाखेदार व दोस्त यांचे तालुकियासी कोणविसी दावा करणार नाहीं.

६ सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे रजाबंदीशिवाय कधीही कोणेयेक फिरंगी यांचे मुलखातील माणूस नोकर ठेवणार नाही.

७ सर्जेराव घाटगे यानी लबाडी करुन मुलाखाची खराबी केली त्यांहीमध्ये सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांसी लबाडया बहुत अयोग्य केल्या याजकरितां सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बहादुर यांचे सरदारांनी ल्यावदजाताचे लबाडीचा इस्तहारनांमा लिहून पाठविला यास्तव सर्जेरावमजकुर याजला आपले इलाख्याचे मुलाखाचे मसलतींत घेणार नाहीं व चाकरीस ठेवणार नाहीं.

८ सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बाहदुर यांजकडील सरदार करार करितात कीं, महाराजे यशवंतराव होळकर सलाह मुकरर करुन तहनामे दुरुस्त जाहल्यावर आपले तालुक्याकडे कूच करुन जातील. त्यांस आझाकडून कोणही मुजाहिम होणार नाहीं. गोष्टीविषयी अडथळा होणार नाहीं व त्यांचे कोणत्याही कामांत दखल करणार नाहीं. परंतु यास शर्य की त्यांनी आपला तहनामा दुरस्त होतांच पाठिवाले व खटल वगैरे तालुके सरकार व

जयपूरचे राजे डावे हाताकडे टाकून दरकूच आपले तालुक्यांत जाथें मार्गामर्धी सरकार वगैरे मुलुख लागल्यास रयतीस कोणेविशीं उपद्रव होउ न पावे आपले फौजेपासून त्याची रखवाली करावी.

९ येणेप्रमाणे तहमाना नौ कलमाचा छ २ शवाल ता. २४ दिसंबर सन १८०५ इ.स. १२२० हिजरी बियास नदीचे तीरी घाठांवर उभयपक्षी मसलितीनें लिहिण्यांत आला. महाराजे यशवंतराव होळकर यांचे मुखत्यार सेख हबिबुला व बाळाराम सेठ यांचे मोहर दस्कतानिशी लिहून जनरल लार्ड लीक साहेब बहादूर यांचे हवाला केला. व एक करणेल मालकम साहेब बाहदूर यांचे मोहर दस्तखतीनिशी लिहून होळकरांकडील मुखत्यारास दिला.[२३७]

या तहाच्या मागचा यशवंतरावाचा उद्‌देश हा सैन्य शक्तीत व युद्ध साहित्यात वाढ करण्यासाठी होता. तसेच सैन्य प्रबळ करणे ही काळाची नितांत गरज लक्षात घेवून, तहाच्या अटी इंग्रज वकीलांकडे सादर केल्या. त्या तहातील अटीवर काही दुरुस्त्या सुचविण्याने तो ६ जानेवारी १८०६ ला परत आला. तेंव्हा यशवंतरावानी त्या तहात शिंदे होळकरांच्या प्रश्नात इंग्रज लक्ष घालणार नाहीत असेही अट कबूल करुन घेतली. अखेरीस यशवंतराव व इंग्रज यांच्या ६ फेब्रुवारी १८०६ ला राजघाट येथे शांततेचा तह झाला.

या तहानुसार यशवंतरावाचे सारे प्रांत इंग्रजांनी परत देऊन त्यांवर यशवंतरावाचे सार्वभौमत्व मान्य केले. तसेच जयपूर, उदेपूर, कोटा आणि बुंदीवरील यशवंतरावांच्या चौथाई वसुलीचा हक्क मान्य केला. होळकरांच्या राज्यात इंग्रज हस्तक्षेप वा लक्ष घालणार नाहीत. असा करार इंग्रजांना संपूर्ण भारताच्या इतिहासात कोणत्याही राजशी वा सत्ताधींशाशी केलेला नव्हता. इंग्रजांना स्वत:हून नमते घेण्यास पाडणारे हे यशवंतराव होळकर हे भारतातच नव्हे जगातील एकमेव राजे होते. म्हणूनच त्यांना इंग्रजांचा कर्दनकाळ म्हणून संबोधले जाते.

यशवंतराव होळकर इंग्रजांशी वाटाघाटी करुन परत येतांना १५ फेब्रुवारी १८०६ तंजावरच्या व्यंकोजी राजे भोसले यास पत्र पाठवून इंग्रजाविरूद्ध एकत्र येण्याचा आग्रह धरला. यावरुन यशवंतरावांचा इंग्रजाबद्‌दल इतरांची मदत ऐन वेळी मिळावी. यासाठी इंग्रजाविरुद्ध त्यांच्या मनात किती उद्रेक होता. हे स्पष्ट दिसून येते. राजश्री व्यंकोजी भोसले सेना धुरंधर गोसावी यास सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य, स्नेही यशवंतराव होळकर रामराव विनंती उपरी स्वराजात जलचरांच्या प्रसार विशेष झाला... कळेल त्याप्रमाणे फौज व कंपू वाढवून... रात्रदिवस इंग्रजांशी मुकाबल्यांचा प्रसंग घडत आला... मेवाड प्रांती आलियावर ताम्रांस चोहोकडून पायबंद देऊन हारीस आणावे यास्तव पंजबापावेतो यावयाचे केले... इकडील तयारी पाहून सोबत्यांनी राजे रजवाडे अनुकुल करुन दिल्लीचे सुमारे येवून शह द्यावा,... पूर्वी स्वराज्यात ऐक्यता बहूत. येणे करोन आज पावेतो व्यंग न पडता एकछत्री अमंल फैलावला होता.[२३८]

इंग्रजांशी राजघाटचा तह करुन यशवंतराव आपल्या राज्यात परत येवून शांत न बसता उलट मोठ्या दमाने पूढील कार्यास लागले. प्रथमत: त्यांनी आपली राजधानी मंदसोर जिल्ह्यातील भानपूरा येथे सुरु केली. गद्यार असलेल्या सरदार अमीर खानास जवळ न ठेवता टोकची जहागिरी देऊन दूर ठेवले. यशवंतरावांनी मोठ्या प्रमाणात सैन्य भरती करुन त्यास आधुनिक प्रशिक्षण देऊन तयार केले. जुन्या बटालियन्स बरखास्त करुन त्या ठिकाणी नव्या बटालियनची निर्मीती केली. त्यासाठी त्यांनी उत्तम प्रतीचे घोडे खरेदी केले. एक लाखपर्यंत प्रशिक्षित सैन्य उभारण्याचे त्यांचे लक्ष्य होते. तोफा ओतण्याचे काम रात्रदिवंस सुरु ठेवले. यासंदर्भात यशवंतरावांचा कटटर विरोधक माल्कम म्हणतो स्वत: यशवंतराव अनेकदा फाऊंड्रीत तोफा ओतण्याचे काम करत असत ध्येयाशी एवढी निष्ठा कोणातही आढळून येणार नाही. आपल्या राज्यात आल्या आल्या खरे तर एवढी दोन अडीच वर्षाची दौड, सत्तची जीव घेणी युध्दे, जीवावाची संकटे, यातून निघालेल्या कोणत्याही मानसाने शांततेचा उपयोग काही काळ तरी विश्रांतीसाठी केला असता... पण तोफा ओतण्याचे काम वेगाने चालू होते. २०० लहान मोठ्यातोफा ओतून झाल्यावर अजून दोनशे तोफा ओतायचे काम त्याने हाती घेतले...[२३९]

त्यासाठी यशवंतरावांनी तोफाच्या साच्यासाठी पाच खंडी मेण मागविण्यासाठी पत्र पाठविले ते असे— १९ ऑगस्ट १८०७ महाराज यशवंतराव होळकर यांजकडून रघुनाथ हरी दिमत पागा चिमणाजी कृष्ण यांस सरकारांत नव्या तोफा ढालावयाच्या याजकरितां सांचे करावयास मेण वनज पांच खंडया देवळे प्रतापगढ वगैरे जागा खरीदी करुन जल्द पाठवून देण्याविषयी राजश्री लखमीधर मुरलीधर याचे नांवे अलाहिदा पत्र लिहून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे. तरी तुझी मशारनिल्हेचें पत्र त्याजला देउन सदरहु पांच संख्या मेण निकट करुन घेउन भानपुरचे मुक्कामी पोहचवून देणें या कामास दिवगत लागल्यास मर्जी राहणार नाही. असें समजोन मेण जसजसें मिळत जाईल तसें वरचेवर पाठवून देणें.[२४०]

२ नोव्हेंबर १८०७ महाराजा यशवंतराव होळकर यांजकडून व्यंकटराव कृष्ण यांस... भानपुरियास आल्यावर नवीन तोफा जिनसीच्या पंचवीस व पलटणीच्या शंभर येकूण सव्वाशें तोफा ठरुन धातू वगैरेचा सरंजामाचा मेळ पाहून कारखाना चालून पंचवीस, तीस तयार झाल्या. बाकीच्याही तैयार होतील. पेशजीचे दोनकंपु होते, त्यांतून निवडक माणसें छाटून सहा पलटणें परी भरलीं. व आणिकजागीहून निवडक माणसांची भरती आणोन सहा पलटणी तेही भरल्या. येकूण बारापलटणी व सामान दारुगोळयासह तैयार आहेत: व आणखीही पांचसहापलटणीची भरती आपणावयास अफिसर लोक जागोजाग गेले आहेत. फौज मराठी दरोबस्त, व कांही पठाण आहेत. देशीहूनही चारपांचहजार फौज येणार आहे.[२४१] या पत्रावरून हे दिसून येते की, यशवंतराव भानपूरियास आल्यावर नवीन तोफा जिनसीच्या पंचेवीस व पलटणीच्या शंभर एकूण पंचेवीस तोफा तयार झाल्या.

७ नोव्हेंबर १८१० महाराज यशवंतराव होळकर यांजकडून बाळकृष्ण वासुदेव कमाविसदार रामपूर यांस... भरतपूर व हिंडोन पैकी बारुद खातेचे दास्तान सरकारी किल्ले रामपुर येथे आहे त्याज पेकी हुजूरचे तोफखान्याकडे बारुद वनज २५० अडीचशें मण याची वरात पेशजी छ. २९ जमादिलखरी जाहली. ते गैरविलेस पडली सबब हल्ली बारुद सरकारी दास्ताना पैकी हुजूरचे तोफखान्याकडे राजश्री विठठल महादेव जोग यांचे विद्यमानें देऊन पावती घेणें.[२४२]

यावरून यशवंतरावांचे उच्च कोटीचे राष्ट्रीय ध्येय स्पष्ट होते हेच हे सिध्द होते. यशवंतरावांना सरळ इंग्रजांच्या राजधानी असलेल्या कलकत्यावर हल्ला करुन कायमचे इंग्रजांना भारतातून हाकलून लावण्याची दूरदृष्टीची योजना यशस्वी करावयाची होती. त्यासाठी एक लाख सैन्य व दोनशे तोफा तयार करण्याच्या कार्यात ते रांत्र दिवस ते प्रयत्नशील होते.

यशवंतरावांनी भारत इंग्रजांच्या तावडीतून सोडविण्याचा चंग बांधून भारत इंग्रजांपासून कायमचा मुक्त करण्याचे वेड लागलेले होते. त्यामुळे त्यांनी अचाट पराक्रम गाजवून इंग्रजाना सळो की पळो करूनत्यांच्या मनात मोठी धास्ती निर्माण केलेली होती. यशवंतराव होळकर हे पंजाबला जावून इंग्रजांशी शांततेच्या तहावर शिक्का मोर्तबासाठी जात असताना ३ फेब्रुवारी १८०६ रोजी त्यांच्या पुतण्या खंडेराव (दुसरा) आजारपणात शाहूपुरा येथे मृत्यू झाला होता. तर १८०८ मध्ये बिजागड येथे काशिरावाचाही ह्दयविकाराने मृत्यू झाला.[२४३] पण यशवंतरावांचा कट्टर विरोधक मेजर जॉन माल्कम यांनी यशवंतरावास बदनाम करण्याच्या उद्देशाने यशवंतरावांनीच वेडाच्या भरात खंडेराव व काशीरावांचा खून केल्याची अफवा पसरविली. म्हणजेच त्या वेळी यशवंतराव पंजाब मध्ये होते ते इकडे येवून खून कधी करतील. यशवंतराव वेडे असते. तर इंग्रजांना तहात आपल्या मागण्या मान्य करण्यास भाग पाडले नसते. यशवंतरावांनी स्वबळावर होळकर राज्य मिळवले. त्याच वेळी काशीरावांच्या हक्काचा प्रश्न संपला. एवढा बलाढय इंग्रजांशी सत्त दोन अडीच वर्ष कट्टर संघर्ष करुन होळकर राज्य अबाधित ठेवलेले होते. काशीराव थकलेला, दुबळा व परावलंबी तो काय होळकर राज्यावर आपला हक्क सांगणार?

यशवंतराव आपल्या पराक्रमामुळे पेशवे, शिंदे व इंग्रजापेक्षा वरचढ ठरले. त्यामुळे हे तिघेही यशवंतरावाचा व होळकरांचा द्वेष करुन बदनाम करण्याचा प्रयत्न करीत होते. पण ज्या वेळी खंडेरावांचा मृत्यू झाला. त्यावेळी यशवंतराव माळव्यात नव्हतेच शिवाय यशवंतरावांनी पेढाऱ्यांच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी ते आपल्या सैन्य शक्ती वाढविण्यात कार्यमग्न होते. तोफा ओतण्याचे कार्यात प्रसंगी स्वतः काम करीत होते. जयपूरच्या राजास धडा शिकविला होता. राज्यातील प्रजेस अहिल्याबाईंच्या कारकिर्दीप्रमाणे न्यायनिष्ठेने चालवित होते. यशवंतरावांनी इ.स. १८०९ पर्यंत सैन्याची उभारणी करून त्यांना प्रशिक्षण देत होते.

इंग्रजांना शिंदे होळकरांच्या भांडणात शिंद्याना मदत करून होळकरांचा प्रदेश मिळवून

द्यावयाचा होता. त्या बदल्यात शिंद्यांचा आपल्या ताब्यातील प्रदेश कायमचा गिळंकृत करायचा होता. शिंद्यांचा बाजून इंग्रज होळकरांच्या विरूद्ध उतरले आणि होळकर इंग्रज यांच्यातच युद्ध जूंपले.

गव्हर्नरकडून १६ एप्रिल १८०४ रोजी मॉन्सन या सेनापतीला युद्धाचा अधिकार मिळाला. अधिकार मिळताच मॉन्सन यशवंतरावांना धमकी देण्याचा प्रयत्न करतो. यशवंतराव त्याला न भीता उद्धटपणे उत्तर देतात. यशवंतरावांना धडा शिकविण्यासाठी मॉन्सन होळकरांचा मुक्काम असलेल्या जयपूरकडे चाल करतो. तेव्हा यशवंतराव तेथून मुक्काम उठवून कोटयाच्या दिशेने निघतात. इंग्रज सैन्य आपल्या पर्यत पोहचू शकणार नाही. इतक्या अंतराने त्यांची दौड होती. जेव्हा इंग्रज होळकरांच्या मुक्कामावर हल्ला चढविण्यासाठी जायाचे, तेव्हा ते स्थळ होळकरांनी केव्हाच सोडलेले असायचे. महाराजांनी याच काळात आपला सेनापती मीरखान याला इंग्रजाच्या बूंदेलखंडात अचानक धूमाकूळ घालण्यास सांगितले. त्याला रोखण्यासाठी इंग्रजांनी सैन्य पाठविले. या प्रतिकारासाठी आलेल्या इंग्रजांची होळकरांनी अक्षरश: कत्तल केली. त्यामुळे इंग्रजांची आपोआपच शक्ती घटली. इंग्रजासोबतच्या युद्धात यशवंतरावानी छत्रपती शिवाजी महाराजांच्या व सुभेदारानी अवलंबविलेल्या गनिमी काव्याचा वापर करण्याचे ठरविले.

मॉन्सन जेव्हा होळकरांच्या कोटा मुक्कामावर चालून येतो. तेव्हा ते मुकूदरा घाटात होते. कोटयाला बरीच मदत मिळवून मॉन्सन ज्यावेळी मुकूदरा घाटाच्या पूढे आलेले होते. त्यावेळी यशवंतराव त्यांच्या पासून चौरेचाळीस मैलावर चंबळ नदीकाठी होते. ७ जूलैला यशवंतराव अफाट सैन्य घेऊन, येत असल्याची बातमी इंग्रज सेनापतीला कळली. तो मनातून घाबरला. त्याच्याकडे असलेल्या सैन्याला पूरेल इतका धान्यसाठा उपलब्ध नव्हता. त्यातच भर म्हणून शिंदयांचे तीन हजार सैन्य मॉन्सनला मिळाला.[२४४] आता परत फिरण्याशिवाय त्याच्याकडे पर्याय नव्हता. घाटाकडून चंबळकडे निघालेले सैन्य माघारी घाटाकडे वळविण्यात आले. पिछाडी सांभाळण्यासाठी बापू शिंदे व लूकनला ठेवले होते. मॉन्सन घाटाकडे फिरताच यशवंतरावांनी पिछाडीची दाणादाण उडविली.

१० जुलैला होळकरांनंतर मॉन्सनवर हल्ला चढविला. तो कोट्याकडे पळ काढला. कोटेकरही त्यांना थारा देईनात. कोट्यापासून जवळच्या परिसरात अन्न धान्य गोळा करण्यासाठी गेले. तिथेही कोणी मदत करण्यास तयार नव्हते. पावसाळ्याचे दिवस असल्याने मूसळधार पावसाची सूरूवात झाली. चहूकडे दलदल माजली. इंग्रज सैन्याला जागचे हालताही येईना. त्यामूळे त्यांच्या तोफा निकामी झाल्या कसतरी वाट काढतं काढतं ते एका ओढ्या काठी आले. ओढे दूथडी भरून वहात होते. त्यातचं यशवंतरावांनी हल्ला चढविला, पण तो पावसामुळे तितका प्रभावी ठरला नाही.

२२ ऑगस्टला इंग्रजांचे सैन्य बनास नदीकाठी पोहचले. बनास नदीला पूर आलेला होता. दोन होड्या मिळवून मॉन्सनने आपला खजिना नदीपलीकडच्या खूशालगडाकडे पाठविला. नदीचा पूर कमी होताचं इंग्रज नदी पार करू लागले. नेमके त्याच वेळी यशवंतरावांनी त्यांना गाठले. होळकरांनी इंग्रजांना वेडा देऊन एकदम तोफेचा भडीमार केला. ही धडक इतकी जबर होती की, इंग्रज तोफखाना व इतर अवजड शस्त्रे टाकून खूशालगडाकडे पळ काढले. यशवंतरावांनी युद्ध साहित्य जप्त करून खूशालगडावर तोफा डागल्या. खूशालगडच्या शिंद्यांनी इंग्रजांना मदत तर केलीच नाही. उलट होळकरांनाच शिंद्यांचे व इंग्रजांचे सैन्य येऊन मिळाले. हीच इंग्रजाची शोकात्मक व्यथा होय. खूशालगडही असूरक्षित वाटत असल्यान`मॉन्सन बिंनच्या घाटाकडे वळला. जाताना वाटेत यशवंतरावांनी त्यांच्यावर दोन-तीन वेळा हल्ले चढवले. भितीने इंग्रज सैन्याला काय करावे सूचेना ते गोंधळून आग्ऱ्याच्या दिशेने पळ काढले. यशवंतराव बऱ्याच अंतरापर्यत पाठलाग केले. याच्यात जे बचावले ते आग्ऱ्यापर्यत जाऊन पोहचले. होळकरांनी अशी इंग्रजाची ससे होलपट केली.

### ३.६.८ शांततेचा तहः

यशवंतरावांनी इंग्रजांच्या 'फोडा आणि झोडा' या युध्दा नितीपेक्षा गनिमी काव्याचा केवळ डोगरी किंवा पहाडी प्रदेशातच उपयोगी केला नाही तर, सपाट मैदानी भागातही गनिमी काव्या यशस्वीपणे वापर केला. तेंव्हाचे इंग्रजांचे सैन्य हे होळकरांच्या सैन्यापेक्षा खूप प्रशिक्षित आणि अत्याधुनिक शस्त्रांस्त्रांनी सुसज्ज होते. यशवंतरावांस पराभूत करण्यासाठी जनरल जेरार्ड लेक या सारख्या अत्यंत अनुभवी व कडव्या सेनानीस ही यशवंतारावनी भरतपूरच्या लढाईत अनेक वेळा पराभूत केले. तेव्हा जनरल लेक ला सुध्दा स्वत:चा जीव वाचविण्यासाठी पळावे लागले. यशवंतरावांनी आपल्या केवळ गनिमी काव्याच्या तंत्राने जनरल स्मिथ, कर्नल, मॉन्सन, कर्नल मरे, कर्नल फॉसेट व लेक यासारख्या दिग्जांचा यशवंतरावांनी आपल्या मोजक्या सैन्यानिशी इंग्रजांचा पराभूत करुन माघार घेण्यास भाग पाडले. इंग्रजाकडे शांततेचा तह करण्या शिवाय त्याच्याकडे कोणताच पर्याय यशवंतरावानी ठेवलेला नव्हता.[२४५]

यशवंतरावांनी पेंढाऱ्या सारख्या बेशिस्त व बेबंद सैन्यास प्रशिक्षण देऊन कडवी शिस्त निर्माण केली होती. यशवंतरावांनी हडपसरची लढाई जिंकून देखील सैन्यातील पेंढाऱ्यांना पूणे लूटण्यास मज्जाव केला त्यावरुन त्यांची सैन्यावरील पकड व शिस्त दिसून येते. याशिवाय सैन्य व्यवस्थापन क्षमतेचे चुणुक दिसते. इंग्रजांनी छ. शिवाजी महाराजांनाही लुटारुच म्हणटले तसेच यशवंतरावांस ही दरोडेखोर, बंडखोर व लुटारु असे म्हणटले होते. पण यशवंतरावांनी शत्रूच्या प्रदेशात रीतसरपणे खंडणी वसुल केल्या यात गोर गरीब वा स्त्रीयांवर कोठेही अन्याय होऊ दिला नाही. ज्या श्रीमंतानी खंडणी देण्यास नकार दिला, त्याचा महाल वा विभाग लुटला. संपूर्ण भारतात फक्त यशवंतरावांनी राष्ट्रीय भावनेतून इंग्रजाविरुध्द राष्ट्रीय लढा उभारण्याचा प्रयत्न केला. तत्कालीन शिंदे, पेशवे, गायकवाड, निजाम, टिपू सुलतान, शीख

राजे, नवाब, रजपूत व दिल्लीचा बादशहा या सर्वास एक होवून लढा देवू असे आव्हान करुन देखील त्यांनी स्वत:च्या प्रदेश, संस्थान, राज्य व जहागिर सांभाळून इंग्रजांचे मांडलिकत्व स्विकारले. पण या राजांनी दूरदृष्टीकोन न ठेवता केवळ स्वार्थ हित ते ही संकुचित असल्याने यशवंतरावास आपली राष्ट्रीय लढ्याची योजना यशस्वी करता आली नाही.

यशवंतरावांनी इंग्रजाच्या विरोधी सर्व राजे रजवाड्यांना व शिंदे भोसलेंना पत्र पाठवून येण्याचे आवाहन केले त्याबाबत ते म्हणतात. पहिले माझे राष्ट्र, माझा देश, आज धर्म, जात, प्रदेश यांच्या पलीकडे जावून देश राष्ट्रहित पाहण्याची गरज आहे. माझ्या सारखेच तुम्हा सर्वांना इंग्रजाविरुध्द संघर्षाने उभे राहिले पाहिजे.[२४६] यशवंतरावानी इंग्रजांशी चालू केला लढा हा केवळ स्वत:च्या वा स्वत:च्या राज्याच्या संरक्षणासाठी केलेला नव्हता. म्हणजेच यशवंतरावांनी इ.स. १८०३ नंतरच्या सर्व लढाया इंग्रजाशीच सुरु केलेल्या होत्या. यशवंतरावांनी इ.स. १७९७ ते १८०३ या सुरुवातीच्या काळात स्वत:चे राज्य स्थापन करणे व आपल्या कुटूंबियाची कैदेतून सुटका करण्यासाठी लढा देऊन आपल्या होळकर शाहीचे अस्थित्व निर्माण केले. तर १८०३ ते १८११ या काळात सर्व भारतीय सत्ताधीशाना एकत्र येण्याचे आव्हान करत इंग्रजाविरुध्द लढा पूकारला. त्यात इंग्रज रथीमहाराथी ना ही हार खावी लागली. तर भारताचे गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्लीची भारतातून हाकालपट्टी करावी लागली. त्या ठिकाणी आलेल्या गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवालिसने यशवंतरावाशी लढण्या ऐवजी शांतात कराराचा मार्ग हितकारक समजले.[२४७] यावरून असे स्पष्ट होते की, यशवंतरावाचा प्रखर स्वराष्ट्र हितासाठी पुकारलेला लढा इंग्रजाना काही केल्याने थांबविता येत नव्हता तेव्हा या नव्या गव्हर्नर जनरलनी काळाची पावले ओळखूण काही काळ शांत बसण्याचा मार्ग निवडला.

अभिमानाने जगावर राज्या करणाऱ्या इंग्रजांचे यशवंतरावांनी गर्वहरण केले. जसे नेपोलियन बोनापार्टने यूरोप खंडात इंग्रजांस हैराण करून सोडलं होते. तसे भारतात यशवंतारावांनी इंग्रजांना हैराण केले म्हणून यशवंतरावांना भारतीय नेपोलियन असे म्हणता येते. भारतीय जनतेची मदत यशवंतरावांना लाभली असती तर भारतातून इंग्रजांना केव्हाच गाश्य गुंडाळावा लागला असता. इ.स. १८०९ यशवंतरावांच्या डोके दु:खीचा व स्मृती भ्रंशाच्या त्रासाचा फायदा माल्कमने घेऊन यशवंतरावांस बदनाम करण्याचा प्रयत्न केला. यशवंतरावांना डोकेदुखीमुळे २८ ऑक्टोंबर १८११ ला भानपूरा येथे मृत्यू झाला.

इंग्रजांना यशवंतराव होळकरांनी आपल्या देशातून हाकलून लावण्यासाठी संपूर्ण जीवन खर्ची पाडले. एकट्या यशवंतरावांनी केवळ एका हिंदू राजाच्या मदतीने १८०३ ते १८०६ या काळात इंग्रजांच्या मातबर सेनानी मॉन्सन, लेक व इतरांशी सतत अठरा युध्दे करुन नमोहरण करण्याचा प्रयत्न यशवंतरावांनी यशस्वीपणे केला. याशिवाय भरतपूरच्या युध्दात इंग्रजांचा पराभव करून इंग्रजांची जगात नाचकी केली.

पण यशवंतरावाची तब्येत १८०९ ते १८११ दरम्यान ठीक नसल्याने या आजारापणात तुळसाबाईने होळकर राज्याकडे लक्ष दिले. केसरबाई वारल्याने माधवराव तिसरा हा पोरखा झाल्याने सावड आई तुळसाबाईने त्यांचा सांभाळ केला.

**३.७ मल्हारराव दुसरे होळकर:** २८ ऑक्टोंबर १८११ ते २७ मे १८३३

यशवंतरावांच्या मृत्यू नंतर तुळसाबाईनी आपल्या सवतीचा ४ वर्षाच्या मुलगा मल्हारराव तिसरा यास होळकर गादीवर २८ ऑक्टोंबर १८११ रोजी बसवून अमीरखानाच्या सहायाने राज्यकारभार सुरु केला.[२४८] पण हा केशरबाईचा मुलगा अल्पवयीन असल्याने आजी तुळसाबाईने पालन कर्ता म्हणून होळकर राज्याची सर्व सत्ता सुत्रे आपल्या हाती घेऊन राज्य कारभार सांभाळला. त्यांच्या पश्चात् त्यांचे चिरंजीव श्रीमंत मल्हारराव दुसरे गादीवर आले. ते अल्पवयस्क असल्यामुळे तुळसाबाई ह्या बाळारामांच्या विचारानेंच प्रथम कारभार पहात होत्या. त्यावेळी मुख्य दिवाण गणपतराव नारायण होते. त्यांच्या व्यतिरिक्त तात्या आळेकर, कुशाबापु बक्षी, सदरदीन हवालदार, वामनदाजी फडणीस, पागनीस दिनकराव, व अमीरखान ही मंडळी कारभार करण्यास मदत करीत होते. तुळसाबाई ही महानुभव पंथांची अनुयायी होती. होळकर राज्याच्या विरोधात कार्य करणाऱ्यांना व कारस्थान करणाऱ्यांना तिने चांगलाच चोप दिला. पहिली सहा सात वर्षे फौजेच्या बखेडयांतच गेली.

मल्हारराव होळकरांना आपली छावणी शामगडावरुन हालवून रामपूऱ्यास केली. पण तेथे शिलेदारांनी मोठा वाद निर्माण केला तेवढयात अमीरखान आल्याने वाद वाढतच गेला. तेव्हा गुगलछबडा व निंबहेडा हे दोन महाल नवाबास देऊन समजूत काढली. तर मैनाबाईनी बाळाराम शेटशी संगनमत करुन पैशांची काही सोय होईल. या अपेक्षेने तात्या आळेकरांस ग्वाल्हेरला पाठविले. तेंव्हा पुन्हा हे कळाल्याने मैनाबाईनी रामदीन व माखनलाल या दोन्ही बंधूना हाताशी धरुन सैन्यांचा बंदोबस्त करता येईल असे वाटले. मल्हारराव होळकरांची छावणी गंगराड येथे असतांना पलटणवाल्यांनी हल्ला करुन गणपतराव दिवाण यास धरुन दरवाज्यावर आणले. त्यामुळे तात्या जोग तात्काळ प्रसंगावधान ओळखूण किल्यावर गेले. या मुस्लीम सैन्यास अमीरखान फुस देत असावा. म्हणून तुळसाबाईनी हूकूम दिला. त्यानुसार तुळसाबाईच्या पक्षात मंत्री तात्या जोग, मराठे शिलेदार सरदार व पागा तर गफुरखानच्या पक्षात होळकर लष्कारातून हाकलून दिलेले असंतुष्ट मुसलमान असे दोन पक्ष दरबारात पडले. तात्या जोगनी मंदसौर येथे जावून दौलतराव शिंद्यांची भेट घेऊन लष्करी मदत घेतली. त्या बदल्यात दर महा ठराविक रक्कम ठरवून ती अदा करण्यात येवू लागली. या शिंद्यांचे फौजेचे नेतृत्व अंबाजी यांच्याकडे होते. त्यांनी होळकर व गफुरखानास आतुन सामील होता. तात्या जोग यांनी गफुरखाना विरुध्द मोहिमे हाती घेतली यात दौलतराव व अमीरखान यांनी गफुरखानास आतून साहय करीत होते. त्यामुळे दोघांचे ध्यैय ही वेगळी असल्याने ते एकत्र येवू शकले नाहीत. जालमसिंग ने होळकरांस साहय केले.

होळकरांचे दिवाण गणपतराव व तुळसाबाई यांनी पेशव्यांची मदत घेऊन इंग्रजांशी सामना करावा असे वाटत होते. तर सेनापती अमीरखानास सोबत घेण्याचे ठरले. पण त्यांनी चार लाखाची मागणी केली. या संधीसाधू सेनापतीस मोठे आमिश देऊन गुप्त करार केला. ब्रिटीश सेनापती अक्टर लोणीने यानुसार अमीरखान ऐन युद्धाच्या वेळी नुसता तटस्थच राहिला नाही, तर होळकरांच्या सैन्याची फाटाफुट केली. त्यावेळी दिवाण गणपतराव व तुळसाबाईने दीड लाख रुपये लष्करात वाटून त्यांनी समजूत काढून पूढे दक्षिण स्वारीची आशा दाखावून शांत केले त्यावेळी मराठ्यांची बेंबद शाही पाहून पेंढाऱ्यांनी कारस्थान करायला सुरुवात केली. त्यामुळे इंग्रज गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जनी दोस्त संस्थाविकास पेढाऱ्यांच्या विरोधात मदतीचे आव्हान केले. त्यानुसार होळकरांची फौज महत्पुर येथे जमा झाली. पण इंग्रजांची आग्राजवळ छावणी होती. त्यांना आणखीन मोठी कुमक उत्तरेतून निघाली तर दिल्लीच्या इंग्रज आक्टरलोणीने होळकरांस निरोप पाठविलेला होता.

इंग्रज माल्कम मेजरनला होळकरांचे राज्य हडप करणे अवघड झाले. तेंव्हा इंग्रजांनी तुळसाबाईवर दबाव आणण्याचा प्रयत्न केला. तरी ही तूळसाबाई दबत नसल्याचे पाहून तिला बदनाम करण्याचा प्रयत्नही सुरु केला. एवढयावर इंग्रज माल्कम मेजर थांबला नाही. तर त्यांनी आपल्या 'फोडा आणि झोडा' नितीचा अवलंब करुन यशवंतरावांन तयार केलेल्या फौजेस उघडपणे हारविता येत नव्हते. तेव्हा होळकर शाहीचा कारभारी धर्मा कुंवर तसेच होळकरांच्या दरबारातील अमीरखानचा प्रतिनीधी गफुर खान यास फितूर करून इंग्रजांनी त्यास जावऱ्याची जागीर देण्याच्या बदल्यात गफुरखानाला विकत घेतले. (९ नोव्हेंबर १८१७) तुळसाबाई, मल्हाराव व अन्य होळकरी कुटूंबातील सदस्यांना ठार मारण्याचे कारस्थान रचले गेले.[२४९] त्याप्रमाणे गफुरखानाने तुळसाबाई व मल्हारराव यांस कैद करुन जावऱ्याकडे जात असल्याचे वृत कै. यशवंतरावाचा विश्वास सेनानी धर्मा कुंवर यास कळताच त्यांनी पाठलाग करुन हल्ला केला. पण यात धर्माचा पराभव होवून तो मारला गेला. गफुरखानाने उलटा प्रचार करुन तुळसाबाई व मल्हारराव यांची धर्माच्या कैदेतून आपण सुटका केली. म्हणजे धर्मा कुंवरने या दोघांची कैद केली होती. त्यांची सुटका करण्यासाठी धर्मास संपवावे लागले. गफुर खानाने १९ डिसेंबर १८१७ रोजी तुळसाबाईना त्यांच्या महालातून बाहेर काढून क्षिप्रा नदीकाठी नेवून तिथे त्यांचा तारीख २० डिसेंबर सन १८१७ च्या रोजी रात्री तुळसाबाईचा खून करून त्यांचा अत्यंसस्कार न करताच प्रेत नदी पात्रात फेकून दिले.[२५०] याकाळात होळकरांचे सर्व सेनानी व मल्हारराव, भीमाबाई व इतर सरदार इंग्रजांच्या आक्रमणाचा बंदोबस्त करण्यासाठी महिदपूर येथे जमा झाल्याचे पाहून गफुर खानाने आपला डाव साधला.

**३.७.१ नत्थु फणसेचे बंड:**

सुभेदार तुकोजीराव होळकर यांचा थोरला बंधु महिपतराव होळकर यांच्या खासा व विदुर असलेल्या दोन्ही मुलास हाताशी धरुन होळकर राज्यात नत्थू फणसे यांनी बंड पूकारले.

या नत्थू फणसेला बाजीराव दुसरा यांची आतुन फुस होती. त्यामुळे यांच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी तात्या आळेकर यांच्या नेतृत्वाखाली फौज सेंधण्याच्या घाटातून तापी नदी पार करून गेली. तेव्हा मल्हाराव होळकरांची ही फौज डोईजड होईल या भितीपोटी पेशव्यांनी नत्थू फणसेस व दोन्ही मुले खंडु महादेव यांना होळकरांच्या स्वाधीन केले. नत्थू फणसे व पेशव्यांनी होळकरांची फौजेस पत्र पाठविले, त्यानुसार पेशव्यांचा आदेशान्वये खंडो महादेव यांनी त्रिवर्गास होळकरांचे सपुर्द केले.

**३.७.२ महिदपूरचे युध्दः**

२० डिसेंबर १८१७ रोजी ब्रिटीश जनरल हिस्लॉप व कर्नल माल्कम यांनी क्षिप्रा नदी ओलाडून होळकरांशी लढण्याची तयारी केली. होळकरांचे परिपत्य करण्यासाठी इंग्रजांची प्रचंड फौज सर थॉमस हिस्लॉपच्या नेतृत्वाखाली महिदपूर होळकरावर स्वारी केली. या लढाईत होळकरांचे नेतृत्व मल्हाराव दुसरे यांनी केले. महिदपूर येथे लढाई सुरू होण्याअगोदरच कर्नल माल्कम यांनी मल्हाररावांना शरण येण्याचे आदेश दिले. तेंव्हा बारा वर्षाच्या मल्हाररावांनी इंग्रजास प्रत्यूत्तर दिले की, होळकरांचे सैन्य कसे असते हे तुला रणांगणावर दाखवू होळकरांची सर्व फौज इंग्रजांविरुध्द एक होवून महिदपूर येथे २० डिसेंबर १८१७ ला होळकर इंग्रज यांच्यात युद्धसुरु झाले. स्वतः भिमाबाई घोडदळाचे नेतृत्व करीत होत्या तर स्वतः मल्हाराव हत्तीवर बसून आपल्या सैन्यास प्रोत्साहन देत होते.[२५१]

तसेच या युध्दात त्यांच्या सोबत चुलत भाऊ म्हणजे कै. विठोजीरावांचा मुलगा हरीराव वीस वर्षाचा होता तो ही या युध्दात आघाडीवर होता. तसेच बहीण भीमाबाईनेही मोठा पराक्रम गाजवित होत्या. त्यावेळी जालमसिंग कोटेकर व लालजी बल्लाळ गुळगुळे हे सरदार येवून होळकरांकडे सामील झाले.युध्दाच्या पहिल्या प्रहरी होळकरांच्या सैन्याने प्रचंड बाजी मारीत इंग्रजी सैन्याचा धुव्वा उडविण्यास यश येत असतानाच धुर्त इंग्रजांनी ऐन युध्दात खेळी खेळून होळकराकडील गफुरखान यास फितूर केल्याने तो सैन्यासह पळ काढला. यामुळे होळकरांचे सैन्यात अफरातफर व संभ्रम निर्माण झाला. तेंव्हा पळणाऱ्या होळकरांच्या सैन्यावर इंग्रजांनी तोफांचा मारा सुरु केला. त्यात होळकरांना माघार घेण्याशिवाय पर्याय नव्हता.

पण लढाईतून होळकरांची फौज इंग्रजांशी सामना करतांना पराभूत झाले. त्यावेळी होळकरांचे व इंग्रजांचे अनुक्रमे तीन हजार व सात-आठशे सैन्य रणागंणावर कामी आले. तेंव्हा त्यांना अलोट मार्गे गडगू येथे येवून पोहचले. पण त्यावेळी होळकरांच्या सैन्यात दाणापाणी नव्हते म्हणून, कृष्णामासाहेबांनी स्वत:कडील जो ऐवज शिल्लक होता. तो त्यातून घोडयास चंदी व सैन्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली. परिस्थिती अतिशय हालाखीची निर्माण झालेली होती.त्यावर उपाय म्हणून विठ्ठल महादेव किबे यांना पलटणीतून सन्मानपूर्वक आणुन त्यांना दिवाण पदाची वस्त्रे देण्यात आली. त्यानंतर तात्या जोग यांना ब्रिटीश कर्नल माल्कम साहेबांकडे वाटा घाटीसाठी पाठवून दिले. त्यानुसार होळकरांचे प्रतिनिधी दिवाण तात्या जोग व

गव्हर्नर जनरल ईस्ट इंडिया कंपनीतर्फे सर जॉन व इंग्रजांचा प्रतिनिधी माल्कम पॉलिटिल एजंट यांच्यात ६ जानेवारी १८१८ रोजी तह घडून आला. त्यास मंदसौरचा तह असे म्हणतात.[२५२]

### ३.७.३ मंदसौरचा तह:

महाराज मल्हारराव होळकर यांसी कंपनी सरकारचा तह झाला त्यानुसार बिग्रेडियर जनरल सरंजान मालकम पोलिटिकल एजंट हे ईस्ट इंडिया कंपनीचे प्रतिनिधी होते. तो तह पुढील प्रमाणे होता. ६ जानेवारी सन १८१८ श्रीमंत महाराज मल्हारराव होळकर... ब्रिगेडियर जनरल सरजानमालकम पोलिटिकल एजंट,गव्हरनरजनरल इस्ट इंडिया कंपनीचे तरफेनें सर जान मालकम हे, पोलिटिकल एजंट, गव्हरनर जनरल इस्ट इंडिया कंपनीचे तरफेनें सर जान मालकम हे, लेप्टनेंट जनरल सर टामस हिस्लाप बारोनेट सेनापती मद्रास,आणि दक्षण फौज,त्यांचे आज्ञेवरुन संपूर्ण मुखत्यारी मोस्ट नोबल फरासीस मारक्वीस हेस्टींग्ज अंग्रज पाल्ल्याचे मंत्री गव्हरनरजनरल कौन्सील कंपनी बहादूर यानीं नेमलेले सोर हिंदुस्थानचे कारभारावर यांजकडून, आणि ताल्याजोग पूर्ण मुखत्यार महाराज होळकर यांजकडूनः—

१ ...माझी फौज लावून हरयेक दुसरे रीतीने ज्याप्रमाणे लागेल त्याप्रमाणें सहाय झेईल आण इंग्रज सरकार वारंवार तद्वत सहाय होतील...

२ इंग्रज सरकारानीं नबाब मीराखनासी बंदोबस्त केला आहे तो आम्हांस मान्य आहे. इग्रंज सरकारनें जामीनगिरी, नवाब अमीरखान व त्याचे वारिस यांजवर आमचा दावा वेदावा केला आहे.

३ प्रगणे पंचपाहाड व डीग व गंगाराड व आहूर वगैरे जेराजा जालमसिंग कोठेवाले यांस भाडयांने दिल्हीआहे ती महाराज मल्हारराव होळकरानें त्या सरदारास आक्षय देउन आपला संबंध सारा प्रगणे सोडून दिल्हे.

४ माझेंसारें घेणे खंडणीचे आणि सवेंरीतीचे जमाबंदीचे जे मजकडे आहेत किंवा होते,राजपुतान्यात हा रीतीचे राजे उदेपूर, जैपूर, जोतपूर, कोटे, बुंदी, करोली वगैरे सारे इग्रंज सरकारांस देतों.

५ रामपुराबसंत, रानीपुरा, बेलिया, भीमसराई, इंद्रगड, बुंडी, लाखेरी, समेदी बनयगांव वगैरे ठिकाण बुंदीचे पहाडाचे उत्तरेस आहेत त्या गांवांवरुन मल्हारराव होळकर आपली सत्ता सोडून देतात.

६ सातपुडयाचे पहाडाचे दक्षिण देशास सर्व जी गांवें आहेत व त्यांजवरील सारी सत्ता सेंधव्याचे किल्ल्याचें सहवर्तमान दोनहजार वासलातसुध्दा आणि खानदेशातील गांव जे आहेत ते आणि दुसरे गांव आंबाड व निजाम व पेशवे यांचे मुलुखांत मिश्रित जाहले आहेत ते इगंज सरकारास सोडून देतात.

७ मल्हारराव होळकरांचे मुलखांतील सलामती ठेवण्याकरिता परके दुष्मान दूर ठेवावया करितां फौजेचे साहयता करावी. ही फौज अशी सामर्थ्याची असावीकीं जो योग्य आसेल. जेथें

इंग्रज सरकार निश्चय करील की जागा बरी आहे तेथें आणि महाराज मल्हारराव होळकर कबूल होतात कीं, कांही चांगली जागा बंदोबसताची तिचे सरंजाम ठेवावयास द्यावी

८ इंग्रजी फौज जी कांही आपले मुलखा संबंधी लढणार तिनें सर्व प्रकारचे सामान विकत सामान विकत घ्यावें दाणा आणि खान्याचा रकमा आणि सर्व जातीच्या वस्तु, पोशाख, गुरें, गाडे, उंट हया फौजेत लागतील तेवढे याजवर जकात घेउ नये.

९ कंपनी सरकार दोस्त व आश्रित व हरयेक दुसरे रोजे यांजवर कोणे येक प्रकारें लढाई करु नये. कदाचित वाद पडल्यास कंपनी सरकार काढयांत तोलून जेंठरवील तें महाराजानीं मान्य करावें. महाराज कबूल करतात की, इंग्रज सरकारचे मान्यते बिना वकील हरयेक पर राज्यांत पाठवूं नये आणि येउं देउ नये. व परराज्याची व्यवहार ठेउं नये.

१० इगंजसरकार कबूल करितात कीं,माहराजे यांचे मुलें सोइरे आश्रित,रैयत,सेवक हयांचा कोण रीतीनें आह्मांसी संबंध नाहीं. त्यांस महाराज मुखत्यास आहेत.

११ फौज आहे ती काहहून टाकावी जमाबंदीच्यानें समावेल यापेक्षा अधिक ठेउ नये तीन हजार घोडयापेक्षा चाकरीत कमी ठेउ नये. जी इंग्रज सरकारचे फौजे संर्गे लढेल त्या फौजेचा रोजमुऱ्याचा चांगला बंदोबस्त केला पाहिजे.

१२ ठग्रंज सरकार बाहदरी देतात की नवाब गफुरखा त्याची सांप्रात जायदाद संजीत, मल्हारगड, ताल, मंडावल ,व जावरा, बर्डावदा हे सर्व गांव पिंपल्या खंडणी आणि सर्वाचे उत्पन्न हामुलुखा त्यांचे वंशपरंपरा नवाब आणि त्याचे वारसास सिबंदी प्रगण्याची आणि स्वत:चे चाकर यासिवाय सरकारचे चाकरीस सहाशे. घोडे निव्वळ चाकरीकरितां हमेश ठेवावे. आणि गांवांचे उत्पन्न वाढल्यास फौजही वाढवीतजावी.

१३ ठंग्रज सरकारचे हुकुमासिवाय मल्हारराव होळकर कबूल होतात की, चाकरीस बिलायती मकरानी लोक ठेउ नये.

१४ हया प्रमाणे करुन दोस्तीचा संबंध जाहला आहे, तो वृध्दी होउन चालवा हयाणोन कबुलायंत जाहली आहे की, इंग्रज सरकारचा येक अब्रूदार मंत्री महाराज यांजकडे राहावा आणि महाराजांस आज्ञा आहे की आपला वकील गवरनर जनरलकडे पाठवावा.[२५३]

तसेच लेफ्टनेंट जनरल सर टामस हिस्लाप बारोनेट सेनापती मद्रास आणि दक्षिण फौज त्यांचे आज्ञेवरून संपूर्ण मतानुसार मल्हाररावांनी इंग्रजांना जयपूर, कोटा, बुंदी, उदेपरचा प्रदेश कायमचा मुलूख दिला. तसेच हा कडील बराच मोठा भाग ही द्यावा लागला. मल्हाररावाकडे फक्त साबुवा व नरसिंगगढचा प्रदेश ताब्यात राहिला. याशिवाय इंग्रजांनी आपला वकील इंदूर दरबारात ठेवला. होळकर राज्याच्या संरक्षणासाठी व शांततेसाठी ब्रिटीश फौज महूला तैनात केली. त्यामुळे महुला सैनिक छावणीचे स्वरूप आले. मंदसोरच्या या तहाने शांतता प्रस्थापित झालीं. त्यांनतर सहा सात वर्षे तात्यांचे कामगिरीमुळे गाडी मार्गावर आली. तात्यांच्या पश्चात् सहा सात वर्षात तितकेच कारभारी आले व गेले. अप्पाजी कृष्णराव सन १७२७ ते १७३१ व

१७३२ ते १७३३ या कांही कर्तृत्ववान कार्य केले. यशवंतरावाच्या निधनानंतर मल्हाररावाचे वार्षीक उत्पन्न पाच लक्ष रूपयांचे होते त्यात वाढ करुन सत्तावीस लक्ष रुपयापर्यंत केले.

त्यानंतर होळकरांची छावणी ढाबळा येथे हलविली. त्यानंतर त्यांनी आपली छावणी कोहळया गावाजवळ केली. त्यावेळी त्यांच्या छावणीत अग्नीकोप होवून वडीलोपार्जीत कागदपत्रे व जडजवाहिर भस्मसात झाले. म्हणून त्यांनी आपली छावणी जवळच्या भानपूर इंद्रगडाखाली हलविली. पण तेथेही महामारीने थैमान घातल्याने होळकरांचे अनेक माणसे ठार झाली. त्या त्रासाला कंटाळून अर्ध्यारात्रीच कुच करुन शामगड तालुके गरोढ येथे इ.स. १८१३ मध्ये छावणी केली. त्या तहानुसार माल्कमनी होळकरांच्या सैन्या खर्चासाठी मदत केली. त्यानंतर होळकरांची सर्व फौज भानपूऱ्याहून इंदूरला आली.

त्यात होळकरांचे स्वतंत्र सार्वभौम असलेले राज्य नष्ट झाले. होळकरांचे अनेक प्रांत इंग्रजांनी मिळाले. हे केवळ अमीरखान व गफुरखान यांना फितुरी केल्यामुळेच मालकमला जिंकता आले. त्यामुळे हे युद्ध जिंकत असतानाही होळकरांना हार खावी लागली. या आत्मघाती गफुरखानास इंग्रजांनी फितुरीबदल पंधरा लाख व जावऱ्याची जहागीर जनरल माल्कमने दिली. कारभारी तात्यांनी नतंरचे कारभारी अप्पाजी कृष्णराव यांनी व मंदसौरच्या तहाने राज्याची घडी नीट बसल्याने शांतता प्रस्थापित झालेली होती.

इंग्रजाविरुध्द लढणारे शेवटचे होळकर घराणे ही इंग्रजांनी आपल्या कुटनितीचा अवलंब करुनच विजय मिळवावा लागला. इंग्रजांनी रणांगणावर विजय होळकर सैन्याकडून कधीच मिळ शकत नाही. हे ओळखूनच भवानी शंकर खत्री, अमीरखान, गफुरखान या गंद्दार विश्वासघाती देशद्रोही निमकहराम व मित्रद्रोहीमूळेच होळकरांना हार खावी लागली. होळकरांच्या पराभवाने इंग्रजांनी संपूर्ण भारतात आपल्या अमंलाखाली आणून संपूर्ण भारतवासीच इंग्रजांच्या पारतंत्र्यात लोटले. यास संपूर्ण भारतातील राजे महाराजे, बादशहा, नवाब, जबाबदार होते. हे इंग्रजरुपी भूत फक्त होळकर घराण्यातील शासकांना समजले होते. बाकीचे केवळ आपला स्वार्थ मतलबीपणा, हट्ट व इतर शेजारी राजास संपविण्याच्या नादात स्वत: ही संपले व इतरांनाही संपविले स्पष्ट होते.

तात्या जोगची हुशारी व प्रामाणिकपंणा पाहून केशरबाईनी मल्हारावांचा कारभारी बनविले. तात्या जोगनी अंतर्गत बंडाल्या व उपद्रव्य इंग्रजांच्या साहय्याने मोडून काढण्यात यशस्वी झाले. पण लवकरच तात्या जोगचा मृत्यू झाला. त्यामुळे होळकर राज्याची आर्थिक स्थिती डबघाईस येवू लागली. तेंव्हा ब्रिटीशांच्या मदतीने मल्हाररावांनी माळाव्यात अफुची शेती करुन तो माल परदेशात पाठविला जाऊ लागला. मल्हारराव होळकर दुसरे यांनी इंदूरला आपल्या जुन्या वाडयांची डागडूजी केली. तसेच पंढरीनाथांच्या मंदिराची स्थापना केली. मल्हारराव दुसरा हा निपुत्रींक होता. तेंव्हा यांच्या मृत्यूनंतर मार्तंडराव यास दत्तक घेण्यात आले होते.

महत्पूरच्या लढाईने होळकरांचे मुलूखगिरी धोरण आपोआप संपूष्टात आल्याने त्यांना केवळ आपल्या इंदूर राज्यापुरतेच स्मित होवून राज्य करावे लागले. म्हणजेच होळकरांचे बहि:पराक्रम ऊर्फ फॉरेन पॉलिसी मुलूखगिरी बंद झाली. त्यामुळे आता केवळ अंतर्व्यवस्था (होमपॉलिसी) पाहणे हेच राहिलेले होते.[२५४] तेही ब्रिटीश रेसिडेंटच्या सल्ल्याने कार्य पार पाडावे लागत होते. होळकरांचे राज्य संस्थापक मल्हारराव होळकर यांनी इ.स. १७१८ पासून मूलूखगिरी गाजवित शत्रूचा प्रदेश जिंकण्यात गेले. म्हणजेच 'काय घेऊं आणि किती घेऊं या विचारांत राहून अजापालचे प्रजापाल बनले.' पण एक शतकानंतर मात्र होळकरांचे हेच धोरण मल्हारराव होळकर दुसरे (तिसरे) यांच्या कारकिर्दीत 'दिले तितकें घेऊन स्वस्थ बसले.' एवढा फरक एका शतकात होळकरांच्या पर मुलखाबाबत पडला. म्हणजेच रानावनांत उन्हतहान सोसून वाढणार वटवृक्ष कोणीकडे आणि कुंडीत कलम करुन लावलेंले व छायेंत ठेवलेले रोपटें कोणीकडे? अशी अवस्था होळकर राज्याची इंग्रजामुळे झाली. सुभेदारमल्हारराव होळकरयांच्या कारकिर्दीपासून तुकोजीराव होळकर यांच्या दरम्यानचा काळ हा होळकर संस्थानच्यादृष्टीने अतिशय समृध्दीचा व भरभराटीचा होता. सन १८१८ च्या तहाने होळकरशाहींचे स्वरुप पार बदलून गेलें. सन १७१८ पासून १८१८ पर्यंत ही राजवट सर्व हिंदूस्थानभर कांही विशिष्ट धोरणानीं स्वत:चे बुदीनें वावरत होती. पण नंतर तुकोजीरावाच्या चार मुलात वारसा संघर्ष व दौलतराव शिंदे, बाजीराव दुसरे पेशव्यांचे धोरण यामुळे इसवी सन १७९७ पासून सन १८१८ पर्येतचे वीस एकवीस वर्षोस 'गर्दीका वक्त'[२५५] म्हणून ओळखले गेले. यात यशवंतरव होळकर आणि मराठयांची व होळकर राज्याची स्थिती सुधारणांचा महाप्रयत्न केला. तसेच सर्व राजानां एक संघ होवून सर्वांनी मिळून इंग्रजांशी लढा देण्याचा प्रयत्न केला पण ते शक्य झाले नसल्यामुळे यशवंतराव होळकरांनी एकटया प्रयत्न केला. पण इंग्रजांच्या 'फोडा व झोडा' या नितीस तमाम भारतातील राजे महाराजे आपमतलभी धोरणामुळे ते इंग्रजाच्या राजवटीस बळी पडले. पण त्यानंतर आलेले होळकर राजे स्वार्थी सरदारामुळे राज्याची नीट घडी बसविता आलेली नाही. बालराजा, स्त्रियांचा कारभार, चार कारभारी चार परीचे, लष्करात आवरणारा कोणी नाही. लष्करांत आणि दरबारांत 'सोबाती' पूर्वपार संबंध विसरुन स्वार्थी व आकुंचित बुध्दीचे, अशा स्थितींत समोरील पक्षाकडे चौकस, पाताळयंत्री व राजनीतीच्या सर्वासानीं अशा सामुग्रीनें सज्ज ईस्ट इंडिया कंपनी. अशा एकंदर प्रंसगांत 'सर्व ताशे समुत्पत्रें अर्धे ल्यजति पंडित' या न्यायानें श्रीमंत कृष्णा मासाहेब व विठठल महादेव जोग किबे यानीं दौलत राखिली.[२५६]

इ.स. १८१८ ला इंग्रजांच्या होळकर यांच्यात जो करार झाला. त्या कराराने होळकरशाहीचे खरे स्वरुप पूर्णपणे बदलून होळकर गादीवरचा व्यक्ती तोच पण त्याची कार्यदिशा भिन्न स्वरुपाची होती. श्रीमंत पेशंवे अगर त्यांचे वंशज यांस महाराजे होळकरांवर अगर त्यांचे वंशजांवर कोणचाही राजकीय हक्क सांगणे अगर चालविणें हें करुं देणार नाहीं.

या लढाई पूर्वी होळकरांची दौलत चौसष्ठ लक्षांची होती. ती तहानंतरच्या व्यवस्थेंने पंचवीस लाखांवर उतरली आहे. आणि तीही मेघराज यांचे कृपेवर अवलंबून 'राज्याचे' बनलेले 'संस्थान' इंदूर आता त्याची व्यवस्था राजश्री विठठलपंत तात्यांचे हातांत आली.
संस्थानची सर्वस्वीसत्ता विठठलपंत तात्यांचेच हाती आली होती.[२५७]

**३.७.४ होळकर राज्याची वाटणी:**

मंदसौरच्या तहाने होळकर राज्याचे ब्रिटीशांनी आपापसात वाटणी करून होळकराकडे केवळ २३७९८२० महसूलचा प्रदेश ठेवला. त्यामुळे या तहाने होळकराचे राज्य विघटन होवून एका छोटया इंदौर संस्थानात रूपांतर झाले.

तेरीज एकंदर मंदसोरच्या तहामुळें राज्याची वाटणी झाली ती:—

| | |
|---|---|
| २५,६६,००० | कंपनी इंग्रेंज यांजकडे |
| २३,७९,८२० | होळकर सरकार यांजकडे |
| ६५,००० | श्रीमंत भिमाबाई बुळे यांजकडे संस्थान झाबवे थांदले पेटलावद चिखलदे. |
| १०,३५,००० | नवाब मीरखान, पिढावे, टॉक, सिरोंज, निंबाहेडा, गुगलछवडा व रामपुरा |
| ४,१००० | खुर्द. |
| ———————<br>६४,५५,८२० | नबाब गफूरखांन मल्हारगड, जाबरे, बर्डावद,पिंपलोद तालमडवल व संजीत.[२५८] |

होळकर संस्थानाकडे मंदसौरच्या तहानंतर हे जे चोवीस लाख राहिले ती गणती कागदोपत्रीच होती प्रत्यक्ष हातात नऊ लाखांपेक्षा देखील कमीच पडले होते. आठ लक्ष तेवीस हजार सहाशे एकवीस हा महाराजांचा स्वतःचा कुटुंबाचा व नौकराचा खर्च होता. तर तीन हजार लष्कर महाराजानी ठेविले पाहिजे असे तहातील कलमात स्पष्ट होते. त्या लष्कराचा खर्च सोळा लक्ष बेचाळीस हजार एकशे बासष्ट म्हणजे एकंदरीत होळकर संस्थानचा खर्च चोवीस लाख पासष्ट हजार सातशे त्र्यांऐंशी एवढा होता.

**३.७.५ होळकर राज्य व संस्थान:**

मल्हारराव होळकर यांनी पेशव्याकडून इ.स. १७२३ ला माळव्याची जहागिरी मिळाली. त्या वेळेपासून होळकरांच्या जहागिरीत पेशव्यांच्या संमती सतत प्रादेशीक वाढ होत गेली. त्यामुळे होळकर जहागिरीचे रुपांतर मोठ्या राज्यात झाले. त्यात अनेक परगणे व महाल यांचा समावेश होत होता. संपूर्ण भारतातील अनेक राजे इंग्रजांचे मांडलिकत्व स्विकारले, पण होळकर राज्याने सर्वांच्या शेवटी मांडलिकत्व स्विकारले. इंग्रजांनी होळकर राज्य जिंकून त्यातील बराच मोठा भाग आपल्याकडे ठेवून थोडा भाग होळकर सत्ताधीशाकडे ठेवला. त्यामुळे मोठ्या राज्याचे विघटन होवून इंदूर या छोटाशा संस्थानात रूपांतर झाले. यामुळे होळकरांचे मोठे राज्य इंग्रजांनी ताब्यात घेतले. म्हणजेच इंदूर सत्ताधीशांना फक्त सरंजामी खर्च

भागविता येईल, ऐवढाच प्रदेश होळकरांच्या ताब्यात ठेवला. बाकी सर्व प्रदेश इंग्रजांनी आपल्या ताब्यात घेतला.

आग्म्यूसाहेबांचे मतें देवीअहिल्याबाईची कारकीर्द हा होळकर राजवटीचा सुवर्णकाळ होता. आग्न्यू साहेब आपल्या अहवालाचे अखेरीस सन १८१८ चे आकडे देऊन देवी अहिल्याबाईसाहेबांच्या कारकीर्दीचेही आंकडेवारीवरून स्पष्ट होण्यास मदत होते. ते पुढीलप्रमाणे

| | **इ.स. १८१८ चें उत्पन्न** | **श्री देवीअहिल्याबाईचे कारकीर्दीतील उत्पन्न** |
|---|---|---|
| होळकरांची आमदनी | ७,६९,५०० | २२,२१,५०० |
| खंडणी | १,१५,००० | २,३५,००० |
| मीरखानाची जायदाद | ५,७०,००० | २,३५,००० |
| गफूरखानाची जायदाद | ३,००,००० | ४,१०,००० |
| जालमसिंगाची देणगी | १,३०,००० | ३,३०,००० |
| ब्रिटीश सरकारला दिलेल्या | ७,५०,००० | ७,५०,००० |
| प्रांताची खंडणी ब्रिटीश सरकारास | ४,६८,००० | १८,३२,००० |
| दिलेल्या प्रातांचे उत्पन्न | ३१,०२,५०० | ६७,२८,५०० |

[२५९]

या वरील तक्त्यावरून असे स्पष्ट होते की, होळकरांच्या राजकीय करकिर्दीमध्ये मोठी भरभराट होती पण नंतर मात्र त्यात मोठी घट झालेली होती यास मुख्य कारण मराठा राज्यातील मराठामंडळाची ढिली झालेली पकड व आपसातील हेवदावे व अतिस्वार्थीपणा हा नडला त्यामुळे होळकर राज्याचे उत्पन्न निम्म्यावर आलेले होते.

अहिल्याबाई जवळ भरपूर गंगाजळी होती, आतां गंगाजळी शुष्क झाली आहे. देवीची साधनसामुग्री, माणसाचा पाठपुरावा अखंड होता. आज ही दोन्हीही नाहींत असें म्हणावे लागते देवीचा दरारा व वशिला अखंड होता. आज त्यांतील काहीच उरलेले नाही. तात्या आशावादी आहेत, प्रयत्नवादी आहेत त्याबददल ते कौतुकास पात्र होतात. पण त्यावेळी सगळया दौलतीत हा एकच कर्ता पुरूष होता. बेचिराग झालेली खेडी पुन: त्यानी बसविली आहेत. महत्पूर, देपाळपूर, नारायणगड, बेटमा, हासलपूर, आणि असेच काही दुसरे परगणे दीर्घकालाच्या पटयाने दिलेले आहेत. इ.स. १७९६ ते इ.स. १८१८ या दरम्यानच्या काळात तुकोजीराव, यशवंतराव व मल्हाराव दुसरे यांच्या कारकिर्दीत जी इनामे जहागीर धर्मादाय व इस्तमुराद अशा एकोणतीस वंशजाना सनदा देऊन गावे देण्यात आली. मंदसौर करारानुसार होळकरांच्या राज्यांत होळकर राजास आपला राज्यकारभार करता येईल.

३० जाने १८१८ ला चर्मनवती नदीकाठी सर जॉन मालकम व विठ्ठल महादेव किबे यांच्यात झालेल्या करारानुसार महालनिहाय होळकरांकडे तेवीस लाख एकोणऐंशी हजार आठशे वीस रुपयांचा मुलुख तर भीमाबाई बुळे यांच्याकडे पासष्ट हजार रुपयांचा, नवाब मीरखान यांच्याकडे दहा लाख पस्तीस हजार, नवाब गफुरखानकडे चार लाख दहा हजार रुपयांचा मुलूख ठेवून इंग्रजांनी स्वत:कडे पंचेवीस लाख सहासष्ट, हजार रुपयांचा प्रदेश ताब्यात घेतला. होळकर राज्यातंर्गत जवळपास आडूसष्ट परगणे ताब्यात होते. त्याचे उत्पन्न चौसष्ट लाख पंचावण्ण हजार आठशे वीस पैकी एक तृतीयांशच जवळ राहिले. तर दोन तृतीयांश बाहेर गेले. त्यामुळे मंदसौरच्या तहानुसार राजपुतान्यातील राजे होळकरांच्या मांडलिकत्वातून मुक्त झाले. तर काही होळकराचे चाकर आता काही प्रातांचे राजे म्हणून स्वतंत्र कारभार पाहू लागले. या तहामुळे मराठयांच्या साम्राज्य विस्ताराची गती पूर्णत: बंद पडली. त्यामुळे होळकरांचे राज्याच्या स्थितीबदल मेजर व्हयान्स आगन्यु इ.स. १८१८ सर जॉन माल्कन ला पत्र लिहितो.

### ३.७.६ तात्या जोग होळकर संस्थानास वरदान:

तात्या जोगमुळेच होळकर शाहीचे देव देव्हाऱ्यात बसविले. होळकर शाही राजवट मराठे शाहीचे एक विशिष्ट अंग म्हणून जन्मास आले. तर मराठेशाहीचे प्रमुख चालक कर्तव्य पराडमुख झाल्याने पेशवाई अस्तास गेली. पण होळकरांशी तात्या जोग सावरली. तात्या जोगच्या रुपाने होळकर राजवटीचे होळकराची राज्याची चौसष्ट लाखाची दौलत ही मंदसौरच्या तहानंतर तेवीस लाखावर आल्याने एक संस्थान बनले. त्यावेळी मल्हारराव होळकर यांचे वय अठरा वर्षाचे असल्याने केशरबाई दिवाण गणपतराव यांच्या मार्फत कारभार पाहत होत्या. पण खऱ्या अर्थाने पूढे मेजर आग्नु साहेब आपल्या अहवालात असेही लिहितात की, २६ या तहाने होळकरांची मूलूखगिरी कायमची बंद पडली. या अगोदर होळकरांचा वर्ष भराचा कार्यक्रम हा आठ महिने युद्धमोहिमा वा छावणीत तर बाकीचे फक्त चार महिने पावसाळयात घरी राहत होते. पण आता त्यामुळे बारा महिने घरीच बसावे लागले. मंदसोरचा तह झाल्यावर होळकराशाहीच्या व्यवस्थेसंबंधांत जो पत्रव्यवहार तात्यांनी केला त्यांत कुशलता दिसून येते. पैशापेक्षां मान, दर्जा, आणि कौटुंबिक अभिमान यांस पायरीपायरीनें अधिक मानून दक्षिणेंतील होळकरांचे हक्क शाबूत राहतील अशी दक्षता त्यांनी घेतलेली होती. होळकर राजवटीचें गंडांतर दूर करणारा तो धन्वंतरीच भेटला असें म्हाणतां येईल. शब्दार्थानें आणि लाक्षणिक अर्थानें ही हें सत्य आहे की तात्यांनी होळकरांचे देव देव्हाऱ्यांत बसविले. तात्या १८२६ त स्वर्गवासी झाले सन १८०५, १८०६ त श्रीमंत महाराज होळकर आणि ब्रिटीश सरकार यांमध्ये दोस्तीचा तह झाला त्यावेळी बाळाराम शेट हे कर्ते मुत्सदी होते.[२६०]

### ३.८ मार्तण्डराव होळकर (दत्तक): (१७ जानेवारी १८३४ ते २८ मे १८३४)

मल्हारराव दुसरा निपुत्रिक असल्यामुळे यांच्या निधनानंतर बापु होळकरांचा पुत्र मार्तण्डरावास होळकर गादीवर बसविण्यासाठी रेसिडेंट मार्फत कलकत्याहून परवानगी आणण्यासाठी सरकारातूनही चकती पाठवून तेथून सदरचा जाब आणून, नंतर थें मुहुर्ताची योजना करुन मार्तण्डराव यांस पौष शुध्द ७ शुक्रवारी संवत १८९० शके १७५५ ता. १७—१—१८३४ इ. चा नेम ठरुन ताईसाहेब मल्हाररावांची बायको गौतमाबाई यांचे मांडीवर देऊन दत्तविधान करुन गादीवर मुलास बसवून नाव मार्तंडराव होळकर ठेवून दरोबस्तानीं नजरा करुन कारभार चालीस लागला.[२६१] चौदा दिवस झाल्यावर मासाहेब यांनी रखमाबाईस किबे बोलावून खात्री करून फौजेस त्यांजकडून खर्चास देवविले. आणि कारभार रखमाबाई किबे व सरकारतर्फे सखारामबापू कापडनीस करू लागले.

पण यांस अनेक जणांचा विरोध होता. तसेच गौतमाबाईची या दत्तकास आतून अनुकुलता नव्हती. तरीही त्यांना होळकर गादीवर बसविले. पण मल्हारराव दुसरे यांनी अंतकाल समयी आप्पाजी कृष्णराव यांना महेश्वरी हरिराव होळकर आहेत. त्यांजला आणून गादीवर बसवावे. असे सांगितले होते. त्यानुसार या गादीचा खरा वारस हा विठोजी होळकरांचा मुलगा हरिराव हा असल्याने मार्तण्डरावास आपले पद सोडावे लागले.

### ३.९ हरिराव होळकर: (२९ जानेवारी १८३४ ते ६ ऑगस्ट १८४३)

मल्हारराव दुसरे हे निपुत्रिक असल्याने होळकरशाहीचे खरे वारसदार हे यशवंतरावांचा भाऊ विठोजी होळकर यांचा मुलगा हरिराव हा असताना मध्येच मार्तण्डराव हे पदावर आले. तसेच मार्तण्डराव होळकर हे निष्क्रिय निघल्यामुळे राजदरबारातील लोकांचा त्यांस विरोध होता. यामुळे खऱ्या वारसास गादीवर बसविण्यासाठी होळकर राज्यात मार्तण्डरावांच्या विरोधात इंदूरमध्ये बंड होवून होळकर गादीचा खरा वारस हरिराव हा आहे. म्हणून त्यांची कैदेतून सुटका केली. इंदूर राजवाडयात मोठे स्वागत केले. फाल्गुन शुध्द ५ पंचमीस स्वारी कूच होऊन शुध्द ८ अष्टमीस ता. १८ मार्च सन १८३४ ला येऊन दाखल झाले. गणेश विठठल किबे यांच्या वाडयात श्रीरामनवमीच्या मुहूर्तावार सूर्योदयापूर्वी दत्तविधान होऊन मासाहेबांचे मांडीवर बसवून ‘यशवंतराव सुत हरीराव होळकर’ याप्रमाणे झाल्यावर कचेरीत गादी घातली. तेथे सरकार येऊन गादीवर बसले. यशवंतराव सुत हरीराव होळकर याप्रमाणें झाल्यावर कचेरीत गादी घातली तेथें सरकार येऊन गादीवर बसले. त्याप्रसंगी रेसिडेंट ब्याग, सोरटीन, राबीनसन व जानसन असे बारा साहेब हजर होते. होळकरशाहीचा कारभारी म्हणून माजी प्रधान रेवाजी फणसे यांची मुलगा राजाभाऊ फणसे यांची नेमणूक केला.[२६२] त्यावेळी तोफांचे आवाज केला त्यानंतर आमखास दरबार भरवून अनेक मृत्सद्यी मंडळीनी नजराने भेट देऊन मासाहेबांच्या पायी डोके ठेवून आशीर्वाद घेतला. वैशाखमासी रेवाजी बापू फणसे यांजला दिवाणगिरीची वस्त्रें देऊन कारभारास आरंभ केला. तर श्रीमंत हरिराव होळकर यांनी

बडीसाहेबांनी रेसिडेंटकडे दिवाणगिरीपदी रेवाजी बापु फणसे हा नसावा असा आग्रह धरला. त्यामुळे फणसेस पदावरुन दूर करुन आबाजी बल्लाळ किबे यांस दिवाणगिरीची वस्त्रे दिली. तर दुसऱ्या दिवशी भवानीदास यास बक्षीगिरीची वस्त्रे देण्यात आली. पुढे दोघांनी सर्व कामे एका विचाराने करण्याचे सांगून देखील भवानीदिनच सर्व कामे मुखत्यारीने करीत असल्याने दिवाण पद फक्त नावालाच उरलेले होते. पण भवानीदीनने राज्यात जुलूमी धोरण राबविल्याने रयतेतून अनेकांच्या तक्रारी महाराजांकडे आल्यावर महाराजांनी खात्री करुन किंबे व भवानीदीन या दोघांस ही कैदेत टाकले. त्यावेळी होळकरांच्या राजकोषात बरीच खणखणाट होवून सैन्याचा रोजमुरा देण्याचा प्रश्न निर्माण झाला.

राजाभाऊ फणसे हा हरिराव यांचे जावाई होते. हरिराव होळकर यांनी आपल्या राज्याच्या जमिनीचा महसूल वाढविला. तसेच आपल्या राज्यात शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी इंदूर मदसा नावाची शिक्षण संस्था स्थापित केली. हरिराव होळकरांची होळकर गादीवर येताच राज्यात अनेक सुधारणा घडवून आणल्या त्यामुळे ब्रिटीश गव्हर्नर जनरलनी त्यांचा गौरव केला. हरिराव हे निपुत्रिक होते. तेव्हा सन १८४१ मध्ये प्रकृति थोडी बरी दिसतांच नारायणराव पळसीकर यांस दिवाणगिरीची वस्त्रें दिलीं.

इ.स. १८४१ ला हरिराव होळकर यांनी इंग्रज रेसिडेंट साहेबांच्या सुचनेनुसार राज्यकाभार सुरु केला. प्रथमतः त्यांनी आपल्या विश्वासातील माणसाची नेमणूक करण्यास सुरूवात केली. अब्दुल रहिम यास मुन्शीगिरीचे कामे सोपविली. हाफीजखा यास बक्षीगिरीच्या पदी दरमहा दोनशे रुपये तनखा देऊन फौजेचा बंदोबस्त व त्यांची व्यवस्था, पगाराचे वितरण, हत्यार पाहणी, घोडे व्यवस्था, सैन्याची कवायती घेणे इत्यादी कामे सोपविले. त्रिंबक गिरमाजी यास चिटणिसांच्या पदी मुक्रर करुन दर महा शंभर रुपये तनखा देऊन त्याकडून सरकारी पत्रे, दस्तऐवज, सनदा व माली मुलकीचे कामे सोपविली. नारायण राम पळसीकर यास दिवाणगिरी पदी नियुक्त करुन त्यास पाचशे रुपये तनखा देऊन मुलखाच्या रयतेच्या संरक्षणाची व कल्याणाची जबाबदारी सोपविली. बाळाजी नाईक यास ओहदे शागिर्द पेशाचे काम मुक्रर करुन दरमहा दोनशे रुपये देऊन दप्तराची कामे पाहण्याची जबाबदारी सोपविली. हरिरावांची प्रकृती वरचेवर खालावत चाललेली होती. त्यामुळे रेसिडेंसीमध्ये चर्चा सुरू झाली. वारस म्हणून मुलगी सौभाग्यवती सकुबाई व मार्तण्डराव होते. पण मार्तण्डरावास पदावरून अगोदरच काढल्यामुळे त्यांचा वारस म्हणून निवडणे कठीण होते. तर सकुबाई या स्त्री असल्याने त्या तत्कालीन प्रथेनुसार गादीवर बसू शकत नव्हती. तसेच त्यांचे पती हे ढवळाढवळ करतील म्हणून ही सर्वाना अडचण वाटत होती. तेंव्हा गव्हर्नर जनरल साहेबानी सर क्लाड साहेबांस दत्तकाचा प्रश्न निकालांत काढण्यासाठी पूर्ण अखत्यार दिला.

### ३.१० खंडेराव होळकर (दत्तक): ०६ ऑगस्ट १८४३ ते ३१ ऑक्टोंबर १८४३

केशर मासाहेब व गौतमाबाई साहेब या उभयतांनी श्रीक्षेत्र महेश्वरी जाऊन राहवें असे हरिराव यांना वाटत होते. बापुजी होळकर यांचे चिरंजीव खंडेराव होळकर यांस मांडीवर घेण्याचा विचार श्रीमंत हरिरावांचा आहे असे रेसिडेंट साहेबास कळाले. त्यानुसार पळशीकर व बाळाजी नाईक यांस पाठवून आषाढ शुध्द १४ शुक्रवारी ता. २ जुलाई सन १८४१ पंधरा घटकेस मूळ नक्षत्रावर सिंव्हलग्नी दत्तविधान झालें मुलांचे नाव खंडेराव होळकर होतें तेंच कायम केलें.[२६३] त्याप्रमाणे मैनाबाई साहेबांच्या मांडीवर तेरा वर्षाच्या खंडेरावास बोलावून हे दत्तक विधान पार पाडले. तेंव्हा सव्वाशे तोफांची सलामी देवून सर्वत्र साखर वाटप केली. नंतर खंडेराव मासाहेबांकडे जावून आशीर्वाद घेतला. पण खंडेरावांच्या कारकिर्दीमध्ये दिवाण नारायणराव पळशीकर यांचा मृत्यू झाला. त्यांनतर त्यांचा मुलगा रामराव त्या जागी आला. रेसिडेंट साहेबांनी खंडेरावांविषयी वयोवृध्द असलेल्या गोपिकाबाईकडे खात्री करुन घेतली. आषाढ वद्य ३० ता.२६ ऑगस्ट १८४२ ला मैनाबाईचा क्षयरोगाच्या आजाराने मृत्यू झाला.[२६४] त्यावेळी रामराव नारायण दिवाण व गोपाळराव बाबा गानू या खाजगी दिवाण यांनी ही सन्मानाची वस्त्रे दिली. पण तापाच्या आजाराने ६९ त्यावेळी दौलतीचे दिवाण पळसीकर व खाजगीचे दिवाण यादोघांनी जाऊन घेऊन आणले. कार्तिक वय ६ ता. १३ नोव्हेबंर सन १८४३ सोमवार पुष्य नक्षत्रावर वृश्चीक लग्नांत श्रीमंत महाराज खंडरोव होळकर गादीवर बसले. त्यावेळी त्यांना पूजाकरुन गादीवर बसले. तेव्हा सव्वाशे तोफांची सलामी देण्यात आली. महुचे जनरल लाट साहेबांची एकवीस वस्त्रें व कंठी सिरपेच व तुरामोत्याचा, व दोनपोच्या व तलवार महाराजांस दिली. आणि हत्ती इंग्रेजी हौदी चांदींचा सोनेरी मुलामा, व घोडा नजर केला. त्यावर साहेब लोक रेसिडेंट्यानी फणशे यांस सात सात वस्त्रें दिली. साडेतीन वस्त्रें दिली. मोत्याच्या कंठ्या व पोच्या दिल्या. रामराव नारायण दिवाण व गोपाळराव बाबा गानू चिमजीची अप्पा बुळे यांजला साहेबानी सात वस्त्रें व मोत्याची कंठी व पोच्या दिंल्या. तर होळकर सरकाराकडून लाटसाहेबांस एकवीस वस्त्रें व कंठी सिरपेच, जीगा, व पौच्या जोड दिला. रेसिडेंट साहेबांस नऊ वस्त्रें, कंठी, सिरपेच तुरा मोल्याचाए व पौच्या जोड याप्रमाणे दिल्हे. तर जर्नेल साहेबांस वस्त्रें, कंठी, सिरपेच, घोडा, हत्ती व तलवार याप्रमाणे दिले.[२६५]

तेंव्हा श्रीमंत मासाहेब व बडेसाहेब रेसिडेंन्टच्या आज्ञेत राहून राजोजीराव फणसे कारभार पाहू लागले. तर गणपतराव फणसे यास सरनौबतीची वस्त्रे दिली. ४एप्रील सन १८४४ रोजी रेसिडेंटाचे जागी नेमलेले हामिल्टनसाहेब खजराण्यास आले. तेथें पेशवाईस राजोजीराव फणशे. खाजगी दिवाण व नारायणराव दिवाण साहेबांसह होळकर राज्याचा कारभार पाहू लागले.[२६६]

दौलतीचे कारभारी नारायणराव पळसीकर दिवाण यांचे निधन झाल्याने त्यांचा पुत्र रामराव नारायण दिवाण व गोपाळराव बाबा गानू यांस खाजगीच्या कामावर रूजू झाले. रेसिडेंट यांनी फणशे यांस सात सात वस्त्रें दिली. साडेतीन वस्त्रें दिली. रामराव नारायण दौलतीचा दिवाण व गोपाळराव बाबा गानू खाजगी दिवाण या उभयतास मोत्याच्या कंठया देऊन सन्मान

केला. तसेच चिमाजी अप्पा बुळे यांजला साहेबानी सात वस्त्रें व मोत्याची कंठी व पोच्या देण्यात आले. त्याचप्रमाणे लाटसाहेबांस एकवीस वस्त्रें व कंठी सिरपेच, जीगा, व पौच्या जोड दिला. तर रेसिडेंट साहेबांस नऊ वस्त्रें, कंठी, सिरपेंच तुरा मोत्याचा व पौच्याजोड देऊन सन्मान करण्यात आला. पुढे काही फारच कमी दिवसात खंडेराव होळकरांचे निधन झाले.

**३.११ दुसरे तुकोजीराव होळकर: (**९ नोव्हेबर १८४३ ते ३१ ऑक्टोबर १८८५)

खंडेराव होळकर यांच्यानंतर होळकरांच्या गादीचा वारस चार महिने बारा दिवस रिक्तच राहिले. तेंव्हा मार्तण्डराव होळकर हे पुण्यास होते. त्यास आणून गादीवर बसवावे असे मासाहेबांस वाटत होते. पण ताईसाहेबास व रेसिडेंटचा त्यास विरोध होता. तसेच राजोजीराव फणसे यांना आपला दुसरा मुलगा हरकुबाईसाहेबांच्या मांडीवर बसवावे असे वाटत होते. पण रेसिडेंट साहेबांनी उलट त्याला गव्हर्नर जनरल साहेबांकडून हूकूम आणला. त्यानुसार खंडेरावांच्या मृत्यूनंतर होळकर गादीवर आषाढ शुद्ध १२ द्वादशी गुरुवार शके १७६६ ता. २७ जून सन १८४४ रोजी पंधरा घटकेस श्रीमंत मातोश्री कृष्णा मासाहेब यांचे मांडीवर मुलगा बसविला. त्याचें नाव तुकोजीराव होळकर ठेविलें लाटसाहेबाकडील वस्त्रें देऊन गादीवर स्थापन केली.[२६७]

त्यानंतर लाट साहेबाकडील वस्त्रें १८ व कंठी मोत्याची तुरा, सिरपेच हातांतील भुजबंद दोन घोडे व एक हत्ती व पालखी बंदुक विलायती पिस्तूलजोढी याप्रमाणें देऊन नंतर राजोजीराव फणशे व सरदार दरखदार मंडळीस वस्त्रें कंठया बहुमान झाला. सरकारांतून लाट साहेबांकरिता १८ वस्त्रें व कंठी सिरपेच तुरा पोच्याजोडी बडे साहेबांची स्वाधीन केली रेसिडेंट साहेबांसही वस्त्रें ११ दिल्ही व कंठी सिरपेच पवच्याजोड दिले. अवंतर साहेबलोकांस योग्यतेनरुप पोशाख व एक एक डागिना दिला. यांनी स्वत:चा 'यशवंतरासुत तुकोजीराव होळकर' असा शिक्का सुरू केला.[२६८]

तुकोजीराव होळकर काहीं निवडक मंडळीसोबत प्रवासास निघाले. तो भानपूर, पाटण, भरतपूर, आग्रा, मथुरा, मिरत, रुडकी, हरिव्दार, पानीपत, दिल्ली, जयपूर, किसनगड, अजमेर, पुष्कर, नसिराबाद, चितोड, जावद, महत्पूर, जगोटी व बाणगंगा असा प्रवास करून तीन चार महिन्यानीं स्वारी मुक्कामास परत आली... तुकोजीराव यांना सन १८५२ ता. ८ मार्च रोजी श्रीमंतांस पूर्ण अखत्यारी मिळाली.[२६९]

इंदूर शहरात दवाखान्याची सोय पहिल्यांदा करून सामान्य रयतेची सोय केली. इंग्रजांना शह देण्यासाठी तोफाव बंदुकाचे कारखाने काढून लढा दिला. तसेच त्यांनी अनेक सुधारणा घडवून आणल्या. होळकर राज्यात १८५७ ला बंड झाले ते तुकोजीरावांनी मोठ्या ध्यैर्याने बंडाचा बिमोड केला.

१ महत्पूरच्या फौजेस इनामा बाबद रुपये ३०० छावणींत पाठवून दिले.

२ स्वरुप नारायण वकील छावणी यांस साडेतीन वस्त्रें दिली व कारकुनांस पोशाख

३ दिवाण नहारसिंग चंद्रावत रामपुरा यांस एक गांव अनाखेडीची सनद व कंठी सिरपाव पांच

४ वस्त्रें त्याचप्रमाणे चिरंजीव तेजसिंगास वस्त्रें दिली.

५ उम्मेदसिंग मुनशी यांस दोनगांवांची सनद. गिरोता फुलाण सात वस्त्रें कंठी सिरपेच पालखी हत्ती अंबारीसहित घोड चवरी अबदागिरी वगैरे

६ पळसीकर दिवाण पांच वस्त्रें कंठी सिरपेच घरखर्चास एक गांव अकाशेचा दिला.

७ रामचंद्रभाऊ रेशीमवाले पांच वस्त्रें कंठी सिरपेच दोन गांव बेटमेपैकी घोडा चोपदार पालखी अबदागिरी वगैरे

८ काशीरावदादा होळकर वस्त्रें कंठी सिरपेच अबदागिरी चौरी घोडा व एक गांवांची सनद शिवणी

९ बक्षी खुमानसिंग पांच वस्त्रें कंठी सिरपेच म्याना व एक गांव बेटमें पैकी बाळकृष्णराव कर्णेल पांच वस्त्रें कंठी सिरपेच व एक गांव बेटमे पैकीची सनद

१० भीमगिरबाबा पांच वस्त्रें कंठी सिरपेच व एक गाव बेटमे पैकीची सनद शिवचंद कोठारी पांच वस्त्रें कंठी सिरपेच चौरी व एक गांव इस्तमुरार रामपुर पैकी

११ शिवचंद कोठारी पांच वस्त्रें कंठी सिरपेच दोन हजार जमेचा गांव गरोठपैकी.

कृष्णा नाईक, भवानीसिंग जमादार गोविंदराव दफेदार जिवाजी नाईक व नाउजी हुजरे विठुजी हुजरे ओंकारसिंग जमीनदार हसलपूर हुमराज बाणी टीकाराम जमादार, रामगोपाल सावकार काठाफोड गणु गुजप्पा रुस्तम भिस्ती व मेजर इमदादअली यांस पोशाख कांहीस इनाम जमिनी दुपठा पागोटे वगैरे हया देणग्यांशिवाय नगदी बक्षिसें वगैरे आहेत.[२७०] श्रीमंत दुसरे तुकोजीराव होळकर सज्ञान होईपर्यंत इन्दौर संस्थानची राज्यव्यवस्था 'रजिन्सि कॉन्सिल' पाहत होते. पण तुकोजीराव महाराज सज्ञान झाल्यावर त्यांनी स्वत: जातीने प्रशासनात लक्ष घातल्यामुळे इन्दौर राज्यात चांगलीच पूर्वीची सधनता व भरभराट निर्माण झाली. त्यामुळे संस्थानाच्या फौजेचे व इतर अंमलदाराचे तनखे नियमित देण्यात येवू लागले. राज्याचा खजिना चांगला वाढल्याने इतरांचे देणे देऊन रयतेच्या हितांच्या सुधारणा करण्यावर अधिक जोर देण्यात आला.

त्यासुधारणा थोडक्यात पुढील प्रमाणे करण्यात आल्या इंदौर शहरासाठी म्युनिसिपालिटीची स्थापना केली. इन्दौर राज्यात शैक्षणिक अनेक ठिकाणी संस्था व सरकारी दवाखाने सुरु केली. इंन्दौर शहरात महाराजांनी स्वखर्चातून एक मोठे सुतयंत्र सुरु केले. इन्दौर संस्थानची नवी टाकसाळ सुरु केली. चांगल्या दळणवळणासाठी सडका व रेल्वे मार्गाचे निर्माण कार्य हाती घेतले. इन्दौर संस्थानचा एक मोठा नकाशा तयार केला. तसेच शिक्षण मंडळाची स्थापना केली. सर्व इन्दौर संस्थानात तलाव विहीरी व पाटबंधारे बांधून शेतीसाठी जलसिंचनाच्या सोयी निर्माण केल्या.

इन्दौर संस्थानातील परगणे इसाऱ्याने देण्याची पध्दती दूर करुन इसारदारांस असलेले दिवाणी व फौजदार अधिकार काढून घेतले. इन्दौर संस्थानातील सर्व जमिनीची रितसर मोजणी

व प्रतवारी करुन तिचा पोत ठरवून त्यानुसार दस्तऐवज तयार केले. सायर खात्याची पुर्नघटना तयार केली. व महाराजांनी स्वत:कडे रेव्हिन्यू व फायनान्स खाते ठेवून जातीने लक्ष घालून सर्व सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. या सुधारणा कार्यासाठी सर टी. माधवरावासारखा ध्येयवादी दिवाण महाराजांच्या सोबत होता. महाराज महसूल खात्यात दिवाणाचेही काहीही ऐकत नसत. इतर खात्याच्या सुधारणामध्ये दिवाणास हस्तक्षेप करण्याची परवानगी होती. पण महसूल खात्यात मात्र नाही. इन्दौर संस्थानात दिवाणाने महाराजांच्या संमतीने दिवाणी कोर्टाची निर्मीती करुन त्यावर योग्य त्या पात्रतेच्या अधिकाऱ्यांची किंवा न्यायाधीशांची नेमणूक केली. [३२०]

पोस्ट खात्याची निर्मीती करुन इंजिनियरिंग खात्याताही योग्य त्या सुधारणा घडवून आणल्या. तसेच दराबारातील कामाचे स्वरुप, रचना, गट पध्दतीने सुरुवात केली. इन्दौंर संस्थानची अनेक जिल्ह्यात विभागणी करुन तर प्रत्येक जिल्हयाची पुन्हा परगण्यात विभागणी करुन त्यावर एक सुभा या अधिकाऱ्यांची नेमणूक प्रत्येक परगणे निहाय एक कामीन या अधिकाऱ्याची नियुक्ती केली. या सुभा व अमीन अधिकाऱ्यांना फौजदारी स्व:पातचे पूर्ण अधिकार दिले. याशिवाय पोलीस खात्याची पूनर्घटना करुन याही यंत्रणेस व्यवस्थेत स्वरुप दिल्याने प्रशासनात अनेक सुधारणांचा परिपाक म्हणून इन्दौर संस्थानात शांतता व भरभराटीस आली.

सर टि. माधवराव या दिवाणानंतर दिवाणपदी दि.ब. आर. रघुनाथराव यांची महाराजांनी नियुक्ती करुन ब्रिटीशांच्या धर्तीवर आपल्या संस्थानास अनुकूल व योग्य त्या पुढील अनेक सुधारणा संस्थानात घडवून आणल्या. फौजदारी व दिवाणी खटल्यांचे निवाडे पंचायत पध्दतीने लावण्यास सुरुवात केली. म्हणजेच श्रीमत दुसरे तुकोजीराव महाराज यांनी इन्दौर संस्थानात पायाभूत सुधारणा आपल्या कारकीर्दीमध्ये घडवून आणण्याचे भरीव कार्य केले.

### ३.१२ शिवाजीराव होळकर: (३० ऑक्टोबर १८८५ ते १३ जून १९०२)

तुकोजीराव होळकर दुसरे यांच्या निधनानंतर शिवाजीराव होळकर यांचा ३० ऑक्टोबर १८८५ मध्ये राज्याभिषेक करण्यात आला.[३२१] यांनी होळकर संस्थानच्या गादीवर येताच राज्यात अनेक कामे सुरू करून इंदूरात बरीच लोकोपयोगी कार्ये केली. चोऱ्या दरोडे घालणाऱ्या काही जातीच्या लोकांना शेती करण्याकरिता जमिनी दिल्या वस्तीच्या ठिकाणी विहिरी खोदून पिण्याच्या पाण्याची सोय केली. सरकारी कमी पगाराच्या नोकरांना योग्यतेनुरुप पगार वाढविले, शिक्षण, दवाखाने, जनतेच्या सुखसोयीकडे यांनी विशेष लक्ष पुरविले.

वडील तुकोजीराव दुसरे यांच्या गावाचा मोठा दवाखाना उभारला तो आज तागायत सुध्दा महाराजा तुकोजीराव हॉस्पिटल या नावाने चालू आहे. त्यास प्रेस क्लब म्हणून ओळखले जाते. त्यांनी आपल्या काळात अनेक इमारती बांधून इंदूरचे सुशोभीकरण केले.

त्यात लालबाग पॅलिस, हवा बंगला, सुखनिवास, यशंवतराव निवास पॅलेस, होळकर कॉलेज, राळामंडळ बंगला इ. आहेत. तसेच नदी किनारी दर्या महाल, नर्मदा महालांचा समावेश होता. एवढेच नाही तर आपल्या सैन्यासाठी सुध्दा इमारती बांधून दिल्या. शिवाजीराव होळकर यांनी महाराष्ट्रातील अनेक कुटूंबाना इंदूर राजधानीत आणून बसविले. तसेच महाराष्ट्रात दुष्काळ पडला तेंव्हा पूणे सोलापूर नगर या भागात अलाधान्य पटवून गोरगरीबांचा मदत केली. तसेच साधूसंताना कावडी व लोटे दान दिले.

श्रीमंत दुसरे तुकोजीराव महाराजानंतर श्रीमंत शिवाजीराव महाराज हे इन्दौर संस्थानाच्या गादीवर आल्यानंतर बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या रयतेस जाचक असणारे व्याजमनुती व रहदारीवरील कर कमी केले. यामुळे व्यापाऱ्याच्या उत्पन्नात जरी तूट पडली. तरी त्यांचा व्यापार वाढीस पूरक ठरल्याने व्यापार वृध्दी होण्यास मदत झाली. दिवाणी कायद्यात बदल करुन दिवाणीचे सर्व अधिकार 'अमीन' या अधिकाऱ्याकडून काढून घेऊन त्या ऐवजी दिवाणी कायद्याचे सकळ ज्ञान असणाऱ्या वहिवाटदाराकडे सोपविण्यात आले. इन्दौर शहरासाठीच 'औननरी न्यायाधीश' याचे नवीन पद निर्माण करुन त्या पदावर इन्दौर मधील प्रतिष्ठीत लोकांची नेमणूक केली जाऊ लागली.[३२२] मीने, सेंद्रीय व मोघे. यासारख्या गुन्हेगार जातीसाठी स्वतंत्र अशा खास अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखाली स्वतंत्र वसाहती स्थापन करण्यात आल्याने त्या गुन्हेगार लोकांची पिढ्यान पिढ्या गुन्हे करण्याची प्रवृत्तीत सुधारणा होवून जनतेस समाधान लाभले. एकमेकांच्या राज्याचे गुन्हेगार लोकांची देवाण घेवाण करण्यासाठी वायली साहेबांचे एक्स्ट्रॉडिशनचे नियम अंमलात आणण्यासाठी इतर राज्यांशी व सत्ताधीशांशी नवे करार करण्यात आले.

श्रीमंत शिवाजी महाराजांच्या संपूर्ण कारकिर्दीत बऱ्याच महत्वपूर्ण सुधारणा घडवून आणल्या. त्या अशा इन्दौर म्युनिसिपालिटीतील लोकास काही ज्यादा स्वरुपाचे हक्क बहाल केले. इन्दौर शहराच्या पाणी पुरवठयाची व उघडया ड्रेनेजची योजना कार्यान्वीत केली. इन्दौर शहरात मोठ्यादवाखान्याची स्थापना करुन संस्थानच्या इतर भागात ही दवाखाने सुरु केले. इन्दौर म्युनिसिपालिटीवर नेमणूक करुन शहराच्या आरोग्य रक्षणाची जबाबदारी सोपविली. इन्दौर संस्थानात प्राथमिक शिक्षण संस्थाची वाढ करुन इंदौर येथे होळकर कॉलेजची स्थापना केली. इन्दौर शहरात व शहराच्या जवळपास पण सोयीच्या ठिकाणची निवड करुन तेथे भव्य इमारती बांधून संस्थानच्या सौदर्यात व ऐश्वर्यात वाढ केली.

श्रीमंत शिवाजीराव महाराजांनी आपल्या इन्दौर संस्थानच्या सुभेदार पदाचा त्याग केल्यामुळे ब्रिटीश सरकार इंदौर संस्थान सांभाळण्याची जबाबदारी रीजन्सी कॉन्सिलवर पडली. या काळात इंदौर संस्थानात रीजन्सी कॉन्सिलने अनेक सुधारणा व बदल घडवून आणले. इन्दौर संस्थानातील त्तकालीन हल्लीचे चलन बंद करुन ब्रिटीशांचा शिक्का सुरु केला. तेथे रीजन्सी कॉन्सिलची सत्ता असली. तरी या सर्व शासन व्यवस्थेबदल संस्थानचा मुख्य दिवाण

हाच संस्थानच्या योग्य शासनाबद्दल पुर्णतः जबाबदार धरण्यात येवू लागला. या संस्थानाच्या रियासतीतील वेगवेगळी खाती निरनिराल्या मेंबर्सच्या ताब्यात देण्यात आली त्यामुळे त्या खात्याच्या राज्य कारभाराबहद्दल त्या खात्याच्या मेंबरला जबाबदार समजले जावू लागले. सोबत या मेंबरच्या हाताखाली वेगवेगळे लहान मोठे अधिकारी नेमूण दिले. त्यांची जबाबदारी व अधिकार निश्चित करण्यात आले. या अधिकाऱ्यांच्या कक्षे बाहेरचे कामे करण्यापुर्वी ते रीजन्सी कॉन्सिलपूढे ठेवून त्यांची मान्य घ्यावी लागत असे. तसेच काही खास कामाच्या बाबतीत रीजन्सी कॉन्सिलाही रिसेंडेंट साहेबांच्या संमती घेवूनच निर्णय द्यावा लागत असे.

शिवाजीराव होळकरांचा स्वभाव हा अतिशय लहरी स्वभावाचा होता. तसेच अतिशय परोपकारी, स्वतंत्र मनाचे, अभिमानी, धस्टपुस्ट शरीर स्वास्थ्य होते. तरीही त्यांना राजा बनून राहण्यात स्वारस्य नसल्याने त्यांनी इ.स. १९०३ ला तृतीय तुकोजीरावांना गादीवर बसवून स्वतः राज्यऋषीप्रमाणे बडवाह येथे नर्मदा नदीकाठी राहिले. तसेच त्यांचा इ.स. १९०८ ला निधन झाले.[३२३] .

**३.१३ सवाई तुकोजीराव (तृतीय):** (१४ जून १९०२ ते १० जुलै १९२५)

इंदौर संस्थानच्या शासक पदी श्रीमंत शिवाजीराव महाराजांच्या नंतर रीजन्सी कॉन्सिलने काही काळ कारभार पाहिल्यानंतर श्रीमंत तुकोजीराव होळकर तिसरे हे १४ जून १९०२ ला होळकर संस्थानच्या गादीवर आले.[३२४] हे सत्तारुढ होताच रीजन्सी कॉन्सिलचे अस्तित्व संपल्यावर त्यांने आता केवळ सल्लागार मंडळ म्हणून कार्य करु लागले. व बाकीचे सर्व अधिकार महाराजांनी तसेच ठेवून पूर्वी सारखेच अधिकार व पदे अबाधित ठेवले. इ.स. १९२२ मध्ये महाराजांनी या रीजन्सी कॉन्सिलला म्हणजेच सल्लागार मंडळास काही विशिष्ट अधिकारी देऊन त्यांचे 'कॉन्सिल' या नावाचा बदल करुन त्यास 'कॅबिनेट' हे नवीन नाव दिले. संस्थानच्या मुख्य कारभाऱ्यास मिनीस्टर न म्हणता 'प्रायमिनिस्टर' म्हणण्यात येवू लागले. श्रीमंत शिवाजीराव महाराजांनी आपल्या कारकिर्दीत 'लेजिस्लोटिव्ह कमिटीची' स्थापना करुन त्या कमिटीचा अध्यक्ष व बाकीचे आठ सदस्य हे संस्थानच्या वेगळेवेगळचा मतदार संघातून निवडले जात असत. या आठपैकी एक सदस्याची नियुक्ती ही सरकार मार्फत केली जाई, तर याचा अध्यक्ष हा सरकारी अधिकारी असावे अशी रचना तयार केली. त्याचप्रमाणे महाराजांनी 'हूजूर प्रीव्ही कॉन्सिल' स्थापन करुन इंदौर संस्थानाचे सर्व मिनिस्टर्स व काही सरदार लोक या कॉन्सिलचे सभासद असत.[३२५] म्हणजेच महाराजांनी न्याय खाते व अंमलबजावणी खाते ऐकमेकांपासून वेगवेगळी केली. खऱ्या अर्थाने संस्थानातील जनतेस स्थानिक स्वराज्याचे हक्क मिळूवन देण्यासाठीच इन्दौर शहर म्युनिसिपालिटीचा कायदा व डिस्ट्रिक्ट म्युनिसिपालिटीज ॲक्ट कॉटन रीसर्च ॲड प्लॅंट इंडस्ट्री निर्माण करण्यात आली. त्यामुळे रयतेस शेती करण्यासाठी बि बीयाणे, सुधारलेली शेती अवजारे, खते यांची माहिती व प्रयोग करण्यास भरीव मदत शेतकऱ्यास झाले.

महाराजांनी 'को-ऑपरेटिव्ह सोसायटीज व बॅकांची' स्थापना करुन शेतकऱ्यास आणखीन मदत करण्यात आली. त्यामुळे शेतकऱ्यास खाजगी सावकारांच्या जाचक व्याज व लुटीपासून सुटका होण्यास मदत झाल्याने या बॅकांचा फायदा समस्त व्यापरी वर्गासाठी झाला. तसेच उद्योगपतीना नवे कारखाने व गिरण्या सुरु करण्यास मदत झाली. या सर्व सुधारणेमुळे इन्दौर संस्थानच्या नाव लौकिक हिंदूस्थान भर पसरला. इ.स. १९२६ ला महाराजांनी इंन्दौस संस्थानच्या राजपदी त्याग केल्याने पुन्हा 'कॉन्सिल ऑफ रिजन्सीची' सत्ता स्थापन होवून ए. जी. जी. साहेबांच्या नियंत्रणाखाली इंन्दौर संस्थानचा राज्यकारभार चालू झाला.[३२६] पण कॉन्सीला फारच क्वचित विषयासाठीच ए. जी. जी. साहेबांची मान्यता घ्यावी लागत होती. या काळात इंन्दौरमध्ये कॉन्सिलने इन्दौर शहराकरीता नवीन गंभीर वॉटर वर्क्स व ड्रेनेजची योजना सुरु केली तसेच ग्लॅन्सी पॉवर हाऊस सारख्या विद्यूत गृहाची सुरुवात केली. आणि महिदपूर शहरास पाणी पुरण्याची सोय केली.

### ३.१४ हिज हायनेस द्वितीय यशवंतराव होळकर:

(११ जुलै १९२५ ते १६ जून १९४८)

तुकोजीराव होळकर तिसरे यांच्या नंतर द्वितीय यशवंतराव होळकर तिसरे हे होळकर ११ जुलै १९२५ ला गादीवर आले.[३२७] इन्दौर संस्थानची सत्तासुत्रे, श्रीमंत महाराज तुकोजीराव यांच्यानंतर इ.स. १९३० मध्ये श्रीमंत यशवंतराव होळकर यांनी स्विकारली व रयतेच्या हिताचे महत्वपूर्ण कामे हाती घेतली. संस्थानच्या राज्यातील गावागावातील पाटलाना श्रीमंतानी इमानदार करुन त्यांचा दर्जा वाढविला. तसेच रेव्हेन्यू खात्याकडे अधिक लक्ष दिले. व या खात्याचा कारभार जुन्या नियमाने व आदेशानेच चालत होता. त्यात श्रीमंतानी लॅड रेव्हेन्यू ॲण्ड टेनन्सी ॲक्ट अंमलात आणून या खात्यात चालणाऱ्या सर्व कामाचे एकसुत्रीपणा घडवून आणली कल्टिव्हेटर्स फंड नावाची योजना राबवून या फंडास स्वतजःचे दोन लाख रुपये देणगी दिले त्यामुळे या फंडा मधून संस्थानामधील शेतकऱ्यास उपयोगी ठरणाऱ्या घटकाबाबत श्रीमंतानी स्वतःस लागणाऱ्या खर्चाबद्दल त्यांनी सिव्हीललिस्ट तयार करुन त्याप्रमाणेच तेवढाच खर्च केला. तसेच होळकर सिव्हील सर्व्हीस व पब्लिक सर्व्हिस कमिशनची सुरुवात करुन योग्य व लायक नोकर भरतीची सुरुवात केली. ते १६ जून १९४८ पर्यत होळकर गादीवर बसले. ते होळकरशाहीचे शेवटचे शासक ठरले.[३२८]

होळकर घराच्यातील प्रमुख सरदार वा शासकांचा गौरवशाली कर्तृत्वाचा आढावा घेण्यात आला आहे तत्पुर्वी होळकर घराण्याची स्थापना व तदनंतर त्यांच्या कार्याचा संक्षिप्त आढावा घेण्यात आलेला आहे. होळकर शासकांचा कर्तत्वाचा आढावा घेत असताना असे निदर्शनास आले की, सर्व होळकर राज्यकर्त्यानी स्वबळावर पेशवे यांच्या सहकार्याने उत्तरेतील शत्रूच्या प्रदेशात स्वतःचे राज्य निर्माण केले. हे करीत असताना त्यांच्या मधील काळानुरुप निर्णय घेण्याची क्षमता, गनिमी काव्याची निपुणता, स्वराज्य विस्ताराची धमक, दुरदृष्टी व

कार्याशी एकनिष्ठता ही प्रखरतेने दिसून आले. होळकर शासकांनी स्वत:ची अशी शासन प्रणाली लागू केली. ती प्रजेच्या हितावह होती. होळकर शासकांनी इतिहासातच नव्हे तर, जनतेच्या मनातही आपले वेगळे असे स्थान निर्माण केले. हे करीत असताना विविध संकटाना तोंड देत त्यांनी त्यांचे अलौकिक कार्य तडीस नेले. त्यामुळेच मराठी सत्तेच्या साम्राज्य विस्तारात व उत्कृष्ट प्रशसासनात होळकर शासकांचा अमुल्य वाटा आहे.

होळकर शासकानी पेशव्याच्या खाद्याला खांदा लावून परकीय आक्रमनांना झुंज दिली. उत्तरेस मराठ्याचा दबदबा प्रस्थापित करण्यात मल्हारराव होळकर आणि यांच्या सैन्याचा मोठा वाटा होता. छत्रपती शिवाजी महाराजांप्रमाणेच मल्हारावांना उत्तरेस गनिमी काव्याच्या युध्द शास्त्राची परंपरा सुरु ठेवली. होळकराची उत्तरेस दहशत होती. यांच्या फायदा मराठेशाहीला अनेकदा झाला. मल्हाररावानंतर यशवंतराव होळकर यांनी ही मराठेशाहीला जिवंत ठेवण्याचे काय केले. त्यानंतर अहिल्याबाईनी केलेला कारभार हा होळकरशाहीच्या इतिहासातील सर्वात महत्वाचा टप्पा होता. मल्हारराव होळकर, यशवंतराव होळकर आणि अहिल्याबाई होळकर हे तीन राज्यकर्ते होळकरशाहीचा कणा आहेत. त्यांनी केलेले कार्य उत्तरेत मराठेशाहीला अधोरिखीत करणारे ठरले. शिवाजी महाराजांची आदर्श राज्यकारभार पध्दती अहिल्याबाईनी त्याच्या संस्थानात अमलात आणली आपल्या संस्थानाबाहेरील लोकभिमूख कामे करण्याचा त्या पहिल्या राज्यकर्त्या होय. आदर्श राज्यकारभार करुन शेवटी सर्व संपत्तीवर पाणी सोडणाऱ्या अहिल्याबाईचे कार्य दुर्देवाने फार कमी प्रमाणात शब्दाबध्द झाले आहे.

## संदर्भ सूची


१ डॉ. कोलारकर श. गो., मराठ्याचा इतिहास, (१६००—१८१८), श्रीमंगेश प्रकाशन, नागपूर, २००९, पृ.१८२

२ डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, नागपूर, १९९० पृ.१२

३ सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-६, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १९४

४ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२१९

५ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखाना, इदौर, १९८७, पृ.२

६ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन, पुणे, २०१३, पृ.१२

७ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशन, पुणे, २०१५, पृ. ७९

८ सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तर खंड-२२, गव्हर्मेट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३२, लेखांक २४ पृ.१०८

९ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर. १९४४, पृ.२८

१० आयुक्त, पुरातत्व एवं संग्रहालय मध्यप्रदेश, इन्दौर, भण्डारी ऑफसेट प्रिंटर्स, भोपाळ १९९२, पृ.४

११ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर १९४४,.पृ.७

१२ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ. १७—१८

१३ डॉ. भावे श्री. मा., (संपा.), त्रैमासिक, कल्पना मुद्रणालय, भारत इतिहास संशोधक मंडळ पुणे, १९९५, पृ.१६

१४ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन, पुणे, २०१३, पृ.६०

१५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२०

१६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—१ (१६९३—१७९७), होळकर

गव्हर्नमेंट प्रेसः इन्दूर. १९४४, पृ.२७२

१७ कित्ता, पृ.३०

१८ कित्ता, पृ.३३

१९ सरदेसाई गो. स., मराठी रियासत पेशवा बाजीराव, १९४२, पृ.१३६—१३७

२० बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, भारत गौरव ग्रंथमाला, मुंबई, १९३०, पृ. १६०

२१ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ८

२२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.६३

२३ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ७

२४ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.६४

२५ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ९

२६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.३०

२७ कित्ता, पृ.३१

२८ कित्ता, पृ.३२

२९ कित्ता, पृ.३४

३० सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.६९

३१ डॉ. खोबरेकर वि.गो. मराठा कालखंड भाग २ १७०७ ते १८१८ महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.१०१

३२ सरदेसाई गो. स., संपा., पेशवे दप्तर खंड-३०, गव्हर्मेंट सेंट्ल प्रेस मुंबई, १९३३,पृ २९३.

३३ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.७१

सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड—३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. ४५७

३४ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७),

होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.४३

३५ कित्ता, पृ.४३

३६ कित्ता, पृ.४७

३७ कित्ता, पृ.५५

३८ कित्ता, पृ.५६

३९ कित्ता, पृ.५९—६०

४० ओक प्र.ग., (संपा.), पेशवे घराण्याचा इतिहास, केसरी प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती, १९९२, पृ.२

४१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.६९

४२ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७ पृ.८—९

४३ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशनः पुणे. १९५४, पृ. १२

४४ पारसनीस दत्तात्रय बळवंत (संपा.), १९१०, महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें भाग—१ निर्णयसागर प्रकाशनः मुंबई. पृ.२६

४५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.७३—७४

४६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.४०

४७ कित्ता, पृ.४१

४८ कित्ता, पृ.४२

४९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.७६—७७

५० कित्ता, पृ.७८

५१ कित्ता, पृ.७९

५२ कित्ता, पृ.८०

५३ कित्ता, पृ.८०

५४ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१०८

५५ जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे,१९६५ आठवी आवृत्ती, पृ.२

५६ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१११

५७ कित्ता, पृ.१११

५८ जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे,१९६५ आठवी आवृत्ती, पृ.४

५९ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड-४, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.४६८.

६० सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.११३—११४

६१ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे,१९६५ आठवी आवृत्ती, पृ.६

६२ कित्ता, पृ.८

६३ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.११६

६४ कित्ता, पृ.११७

६५ कित्ता, पृ.११७—११८

६६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.६०

६७ आपटे द. वि. ओतूरकर. रा. वि., १९४१, महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे. पृ.९३

६८ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.११८

६९ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड.४, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.४६९

७० कित्ता, पृ.४७१.

७१ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.३१४—३१५

७२ हेरबाडकर रघुनाथ विनायक, पेशव्याची बखर, व्हिनस प्रकाशन, पूणे, १९७८, पृ. २५४

७३ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.३१५

७४ क्याप्टन डेविड केपन साहेब, मराठ्यांची बखर: क्याप्टन ग्रांट डफ साहेब, तुकाराम

जावजीचा छापखाना, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९१६, पृ.१६२

७५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.९२

७६ डॉ. खाबेरेकर वि.गो, मराठा अमंलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, १९८८ पृ.१४०

७७ कित्ता, पृ.१६७

७८ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशनः पुणे. १९५४, पृ. १३

७९ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.९७

८० डॉ. खाबेरेकर वि.गो, मराठा अमंलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, १९८८ पृ.१७१

८१ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.९९

८२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१००

८३ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१०३

८४ डॉ. खाबेरेकर वि.गो, मराठा अमंलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, १९८८ पृ.१७१

८५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१०३

८६ डॉ. खाबेरेकर वि.गो, मराठा अमंलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, १९८८ पृ.१४७

८७ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.३१८

८८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.८१

८९ कित्ता, पृ.८६—८७

९० कित्ता, पृ.८७—८८

९१ कित्ता, पृ.८९

९२ कित्ता, पृ.९०

९३ कित्ता, पृ.९९

९४ कित्ता, पृ.९१

९५ कित्ता, पृ.९२

९६ डॉ. खाबेरेकर वि.गो, मराठा अमंलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, १९८८ पृ.१३०

९७ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१२०—१२१

९८ कित्ता, पृ.१२५—१२६

९९ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, २०१७ पहिली आवृती, पृ.२८०

१०० डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास, खंड-२, (१७०७ ते १८१८) म. रा. सा. सं. मं. मंडळ, प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ.२४४

१०१ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.३३९

१०२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१२७

१०३ कित्ता, पृ.१२९

१०४ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.४०

१०५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१३५

१०६ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. २१

१०७ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७ पृ. १६

१०८ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. २१

१०९ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७ पृ. १६

११० केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. २१

१११ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर,

१९८७ पृ. १६

११२ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. २४

११३ भागवंत अनंत नारायण, होळकरांची कैफियत, होळकर सरकारचा छापखान, इदौर, १९८७ पृ. १७

११४ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. २९

११५ कित्ता, पृ.१७

११६ कित्ता, पृ.२५

११७ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१४६

११८ कित्ता, पृ.१४७

११९ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.५९

१२० बर्वे एम. डब्ल्यू., हिज हायनेस महाराजा तुकोजीराव होळकर द्वितीय, रुलर ऑफ इन्दौर (१८३५–१८८६) ई हिस्ट्री ऑफ दि होळकर डायनेस्टी ऑफ इन्दौर, पृ.९७

१२१ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१५२

१२२ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.८५

१२३ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१५५

१२४ कित्ता, पृ.१५७

१२५ कित्ता, पृ.१५८

१२६ कित्ता, पृ.१६३

१२७ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.१००

१२८ प्रा. कुलकर्णी भीमराव, संपा., भाऊसाहेबांची बखर, एस.जी.कुलकर्णी प्रकाशन, पुणे, १९६५, पृ १०८–०९

१२९ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.१०१

१३० सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१६४

१३१ प्रा. कुलकर्णी भीमराव, संपा., भाऊसाहेबांची बखर, एस.जी.कुलकर्णी प्रकाशन, पुणे, १९६९, पृ ११०

१३२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१६६

१३३ हेरबाडकर रघुनाथ विनायक, पेशव्याची बखर, व्हिनस प्रकाशन, पुणे, पृ.२६८

१३४ कै. जोशी श. ना., (संपा.) भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.१०६

१३५ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१७३

१३६ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.११२

१३७ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१७९

१३८ कित्ता, पृ.१८२—१८३

१३९ कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.१२२

१४० कै. जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, १९६५ आठवी आवृत्ती, पृ.१२२—१२३

१४१ कित्ता, पृ.१२६

१४२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१८७

१४३ कित्ता, पृ.१८९

१४४ कित्ता, पृ.१९०

१४५ कित्ता, पृ.१९७

१४६ शेळके नीलेश केदारी, होळकरांची थैली, अक्षरवेध प्रकाशन, गडहिंग्लज, २०१५, पृ.१६

१४७ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१९८

१४८ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१९९

१४९ गोपाळराव देशमुख, सुभेदार मल्हारराव होळकर: एक राष्ट्पुरुष, कौशल्य पब्किेशन सोलापूर, २०१७, पृ.३१७

१५० सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३,पृ.२०३

१५१ कित्ता, पृ.२१३

१५२ कित्ता, पृ.२१७

१५३ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.२९९

१५४ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकर: मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.२२१

१५५ कित्ता, पृ.२२३

१५६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४,. पृ.१५३

१५७ कित्ता, पृ.९६—९७

१५८ सर जॉन मालकम, मेमायर्स ऑफ सेंट्रल इंडिया खंड—१, किंगब्युरे ॲड प्रोब्यरी ॲड ॲलन लंडन, १८२४ पृ.१५८

१५९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.३४७

१६० केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ४३

१६१ लंभाते—अवचरे रूपाली, संपा., लोकमाता अहिल्यादेवी विशेषांक, यशोदीप पब्लिकेशन्स, पुणे, पृ.५

१६२ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास: डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.११४६

१६३ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ४३

१६४ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.१८—१९

१६५ जोशी तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री, मराठी विश्व कोश खंड—६ व खंड—७ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन, १९७७, पृ.५६

१६६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१८

१६७ गोखले वा. द., अहिल्याबाई होळकर चरित्र, ग. ल. ठोकळ प्रकाशक, पुणे, गोखले वा. दा., १९४९, पृ.२१

१६८ डॉ अंजनीकर भगवान, निवडक महापुरूष, विश्वभारती प्रकाशन, नांदेड, प्रथमावृत्ती, २०१४ पृ.९९

१६९ टिकेकर सुजाता गानू, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे, २०१३, पुनर्मुद्रण, पृ.२७

१७० गोखले वा. द., अहिल्याबाई होळकर चरित्र, ग. ल. ठोकळ प्रकाशक, पुणे, गोखले वा. दा., १९४९, पृ.२६

१७१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१३७

१७२ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ४६

१७३ केळकर यशवंत नरसिंह, होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे. १९५४, पृ. ४५

१७४ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१३७

१७५ डॉ अंजनीकर भगवान, निवडक महापुरूष, विश्वभारती प्रकाशन, नांदेड, प्रथमावृत्ती, २०१४ पृ.९९

१७६ जहागिरदार विजया, महाराष्ट्राचे शिल्पकार तेजस्विनी अहिल्याबाई होळकर, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई, २००३, पृ.३५

१७७ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड-७, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.१५

१७८ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड-८, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.१६

१७९ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१६९

१८० पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.१३७

१८१ सौ. मोडक प्रमिला, अहिल्याबाई होळकर जीवन आणि कार्य, सुधा प्रकाशन, अहमदनगर, प्रथमावृत्ती, २०००, पृ.६०

१८२ सोनवणी संजय, (संपा.), सुभेदार थोरले मल्हारराव होळकरः मुरलीधर मल्हार अत्रे, पुष्प प्रकाशन पुणे, १७ मार्च २०१३, पृ.१०७

१८३ डॉ. बंडे शारदा गोविंदराव, मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००९, पृ.२१७

१८४ सौ. मोडक प्रमिला, अहिल्याबाई होळकर जीवन आणि कार्य, सुधा प्रकाशन, अहमदनगर, प्रथमावृत्ती, २०००, पृ.१०३

१८५ कित्ता, पृ.१०४

१८६ डॉ. बंडे शारदा गोविंदराव, मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००९, पृ.२१६

१८७ भागवत अनंत नारायण, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, खंड—६, होळकरांची कैफीयत, होळकर सरकारचा छापखाना, इंदूर, १९२९, पृ.३२

१८८ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३१३

१८९ कित्ता, पृ.३३०

१९० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.३

१९१ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१

१९२ कित्ता, पृ.२

१९३ कित्ता, पृ.३

१९४ कित्ता, पृ.४

१९५ कित्ता, पृ.५

१९६ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड-८, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.१८५

१९७ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३४८

१९८ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे, २०१६, पहिली आवृती. पृ.१०७

१९९ गर्गे स. मा., (संपा.), मराठी रियासत, खंड-८, गो. स. सरदेसाई, नवीन संदर्भासह संपादित आवृती, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ.१८५

२०० प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३५०

२०१ शूरनर गोविंदराव, आद्य क्रांतीकारी राजे यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन, नांदेड, द्वितीयावृत्ती, २०१५, पृ.७७

२०२ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे, २०१६, आवृत्ती, पृ.३७

२०३ कित्ता, पृ.३८

२०४ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३५६

२०५ कित्ता, पृ.३५७

२०६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.६३

२०७ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३५८

२०८ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे, २०१६, आवृत्ती, पृ.५७

२०९ कित्ता, पृ.५७

२१० कित्ता, पृ.५८

२११ कित्ता, पृ.११९

२१२ ओक, पृ.१२६

२१३ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे, २०१६, आवृत्ती, पृ.६०

२१४ कित्ता, पृ.६१

२१५ कित्ता, पृ.६३

२१६ कित्ता, पृ.६६

२१७ कित्ता, पृ.६६

२१८ कित्ता, पृ.६७

२१९ कित्ता, पृ.७०

२२० कित्ता, पृ.७२

२२१ कित्ता, पृ.७३

२२२ कित्ता, पृ.७४

२२३ कित्ता, पृ.७५

२२४ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.५५०

२२५ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,

२०१६, आवृत्ती, पृ.७१

२२६ कित्ता, पृ.७८

२२७ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.५५०

२२८ कित्ता, पृ.५५१

२२९ सोनवणी संजय, भारतीय स्वातंऱ्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.८१

२३० कित्ता, पृ.८३

२३१ कित्ता, पृ.८४

२३२ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.५५२

२३३ सोनवणी संजय, भारतीय स्वातंऱ्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.९१

२३४ कित्ता, पृ.९३

२३५ कित्ता, पृ.९६

२३६ कित्ता, पृ.१००

२३७ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.५५६

२३८ सोनवणी संजय, भारतीय स्वातंऱ्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.१०४—१०५

२३९ कित्ता, पृ.१०६

२४० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५,पृ.६३

२४१ कित्ता, पृ.६४—६५

२४२ कित्ता, पृ.८१

२४३ सोनवणी संजय, भारतीय स्वातंऱ्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.११०

२४४ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३७९

२४५ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशन: पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.१२१

२४६ कित्ता, पृ.१२३

२४७ प्राचार्य सलगरे मधुकर, हिंदूस्थानी यशवंताचा इतिहास, ॲड. गिरीष शंकरराव सलगरे प्रकाशक, लातूर, पहिली आवृती, २०१७, पृ.३९६

२४८ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.६३३

२४९ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशन: पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.११४

२५० डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.६३३

२५१ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशन: पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.११५

२५२ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), (१७०७ ते १८१८), महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९. पृ.६३४

२५३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरांच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१११—११३

२५४ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास: डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३७

२५५ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१६४

२५६ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास: डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२२२

२५७ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१६४—६५

२५८ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२०६

२५९ कित्ता, पृ.२०७

२६० कित्ता, पृ.२१४

२६१ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३०

२६२ आयुक्त, पुरातत्व एवं संग्रहालय मध्यप्रदेश, इन्दौर, भण्डारी ऑफसेट प्रिंटर्स, भोपाळ १९९२, पृ.५

२६३ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीचा इतिहास भाग—२ (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२७१

२६४ कित्ता, पृ.२७३

२६५ कित्ता, पृ.२७५—२७६

२६६ कित्ता, पृ.२७७

२६७ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४. पृ.२३९

२६८ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६.पृ.२८३—८४

२६९ कित्ता, पृ.२९१

२७० कित्ता, पृ.२९१—२९२

२७१ कित्ता, पृ.२९३

२७२ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.५७

२७३ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६.पृ.२९३

२७४ कित्ता, पृ.२९४

२७५ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.५७

२७६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६.पृ.२९४

२७७ कित्ता, पृ.२९५

२७८ सोनवणी संजय, भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते यशवंतराव होळकर पुष्प प्रकाशनः पुणे,२०१६, आवृत्ती, ४ पृ.५७

२७९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४, पृ.३७२

**प्रस्तावनाः**

छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराजांची स्थापना करुन आपल्या दरबारात अष्टप्रधान मंडळ नियुक्त करुन त्यावर स्वराज्याच्या राजकारभाराची जबाबदारी सोपविली. छत्रपती शिवाजी महाराजांच्या प्रशासन व्यवस्थेत 'छत्रपती' हेच मराठी राजसत्तेचे सर्वोच्च पद होते. औरंगजेबाच्या दक्षिण मोहिमेस प्रत्युत्तर म्हणून मराठा सरदारांनी आपल्या सैन्याचा खर्च हा परमुलखातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करुन मोगलांना शह देण्यासाठी छत्रपती राजाराम, ताराबाई यांनी जहागीरी पद्धतीचा अवलंब करुन स्वराज्याचे एक प्रकारे रक्षण केले. अनेक मातब्बर सरदार मोगली प्रदेशात मुसांडी मारुन जहागीरी, सरंजामदारी, वतने वा इनामे मिळविले. पण नंतरच्या काळात मराठा राज्यात छत्रपती हे तेवढे शूरवीर नसल्याने त्यांची सत्ता पेशव्यांनी आपल्या हाती घेण्यासाठी आपल्या अधीन सरंजामशाही सरदार वा वतनदार बनविले. 'सरंजामी' हा शब्द मुळचा अरबी शब्द असून सरंजाम म्हणजे कोणत्या तरी समझोत्यासाठी विशेष अटी व सामग्री असा होतो. पण मराठा राज्याच्या प्रशासनात सरंजाम म्हणजे एक प्रकारची आर्थिक वसूली असा सरळ घेण्यात येऊ लागला.[१] मराठा राज्यात प्रधानमंत्री पेशवे हे रणमैदानी व शौर्यवान निघाल्यामुळे त्यांनी आपल्या ध्येय धोरणांची अंमलबजावणी करण्यासाठी नवतरुण पराक्रमी सरदारांना हाताशी धरुन शत्रूचा प्रदेश जिंकून त्यांना त्या त्या प्रदेशात स्थीर केले. लष्करी किंवा कोणत्याही प्रकारची सरकारी सेवा करणाऱ्यास त्यांच्या सेवेच्या मोबदल्यात रोख रक्कमेऐवजी शत्रूचा जिंकलेला भूप्रदेश सरंजामदारी म्हणून त्यास दिली जात असे. त्यामुळे काळाच्या ओघात छत्रपती ऐवजी पेशवे पदास महत्व आले. या पेशव्यांनी मराठा दरबारात आपले वर्चस्व असावे यासाठी आपल्या अधीन असणाऱ्या सरदारांना अधिकची जहागिरदारी देऊन मराठी राज्यास व आपल्यास पाहिजे तेव्हा संरक्षण देण्यासाठी प्रेरीत केले. शत्रू प्रदेशात आपले वर्चस्व निर्माण करुन त्यांनी जिंकलेल्या या प्रदेशास जहागीर म्हणून देण्यात येऊ लागल्याने त्या जहागिरीचा राज्यकारभार व सैन्याचा खर्च स्वत:कडे ठेऊन बाकीचे उर्वरीत लूट व खंडणी पेशव्यांकडे जमा करावी लागत असे. त्यास सरंजामशाही म्हणत असत.

शाहू महाराजांच्या सुटकेनंतर बाळाजी विश्वनाथ यांनी शाहूंचा पक्ष बळकट करण्यासाठी अनेक मातबर सरदारांना आपलेशे करण्यासाठी आणखीन मोठ्या प्रमाणात जहागीरी वा सरंजामदारी देण्याचे धोरण स्विकारले. यासाठी पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनी मराठा मंडळ निर्माण करुन शिंदे, होळकर, पवार गायकवाड व दाभाडे या शूरवीर सरदारांना मोगलांच्या माळवा सुभ्यात युद्ध मोहीमा काढण्यासाठी प्रत्येक सरदारांना प्रोत्साहान देऊन त्यांना त्या जिंकलेल्या प्रदेशाचे वा जहागिरीची सनद त्यांना देऊन त्यास शाहूंच्या पक्षात ठेवण्याचा कसोशीने प्रयत्न केला.[२]

सरदेशमुखी म्हणजे त्या त्या विभागाचा ठरविलेला उत्पन्नाचा दहावा हिस्सा आपल्याकडे ठेऊन उरलेला हिस्सा सरकारात जमा करणे होय. पेशव्यांनी असा अधिकार बादशहाच्या दक्षिणेतील सहा सुभातून वसूल करण्याचा अधिकार मराठ्यांना दिलेला होता. चौथाई म्हणजे उत्पन्नाचा चौथा हिस्सा होय. मोगलांच्या दक्षिणेतील बुऱ्हानपूर, वऱ्हाड, विजापूर, कर्नाटक, बिदर व हैद्राबाद या सहा मोगल सभ्यातून एकूण उत्पन्नाच्या चौथा भाग स्वत: कडे ठेऊन बाकीचे तीन हिस्से सरकारात जमा करणे.[३]

मराठा राज्यात सैन्यास वा सर्व अधिकाऱ्यास छत्रपती शिवाजी महाराजानी रोख पगार देण्याचा प्रघात सुरू केला. त्यामुळे त्यांनी सरंजामशाही वा वतनदारी पद्धतीचा त्याग केला. पण मराठा शासकांनाही काळाची गरज लक्षात घेऊन इतर शासकांप्रमाणे सरंजामशाही पद्धतीचा स्विकार करावा लागला. मराठ्यांचे पेशवे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांनी उत्तर दिग्विजयाचे धोरण अवलंबून शत्रूचा प्रदेश ताब्यात घेण्यासाठी जहागिरदारी, सरंजामदारी, वतनदारी देऊन आपल्या कर्तबगार सरदारासह उत्तर मोहीमा हाती घेऊन जहागिरदारी वा सरंजामशाही पद्धतीचा अचुकपणे उपयोग करुन घेतला. याच धोरणातून पुढे शिंदे, होळकर, पवार, गायकवाड इत्यादी नवसरदार उदयास आणले.[४] बाळाजी विश्वनाथ व बाजीराव या पेशव्याच्या काळात सरदार खंडेराव दाभाडे, उदाजी पवार, राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर चांगलेच नावारुपास आले. त्यांनी पेशव्यांच्या संमतीने माळवा व गुजरातमध्ये सरंजाम म्हणून दिलेल्या प्रदेशात आपले राज्य स्थापन केले. त्यातील मल्हाररांव होळकर यांनी मराठेशाहीच्या उत्तर विस्तारात अतिशय महत्वाची भुमिका बजावली त्याचप्रमाणे होळकर घराण्यातील नंतरच्या सुभेदारांनीही रणमर्दानकी गाजविली. अनेक युद्ध मोहिमा, चपळ हालचाली व गनिमी काव्याच्या जोरावर शत्रूवर नेहमी मात करण्यात यशस्वी झाले. हे कार्य कर्तव्य गाजविताना त्यांची महसूल व्यवस्था, लष्करी प्रशासन, न्यायिक प्रशासन, टाकसाळ, टपाल व्यवस्था, दळण वळण इत्यादी चांगल्या प्रकारे व सुव्यवस्थीत राबवून आपल्या राज्यातील व परराज्यातील सर्व धर्मियांच्या रयतेचे कल्याण साधण्याचा प्रयत्न त्यांनी केले. अशा महत्वपूर्ण बाबीचा अभ्यास करणे तेवढेच महत्वपूर्ण आहे. जे की आजपर्यंतच्या संशोधनात होळकरांच्या प्रशासनाविषयी फारशे संशोधन झालेले नाही. मल्हारराव होळकर, अहिल्याबाई होळकर, तुकोजीराव होळकर, यशवंतराव होळकर यांच्या युद्ध मोहिमा, धार्मिक धोरण, आर्थिक धोरण, राज्याच्या धोरणा विषयी कार्य व कर्तृत्व, त्यांचा उदय व अस्त याविषयीच मोठ्या प्रमाणात संशोधन झालेले आहेत. पण या संशोधनात होळकरांचे प्रशासन याच बाबीवर भर देऊन तत्कालीन स्थितीत, होळकर सरदारांचे मुलकी, लष्करी व न्याय विषयीचे प्रशासन या अंगाने या संशोधनात अभ्यास केलेला आहे. त्यामुळे या संशोधनात होळकरांच्या दोनशे वीस वर्षाच्या यशस्वीतेच गमक त्यांच्या प्रशासन व्यवस्थेत होते अशा होळकरांच्या प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास या प्रकरणात केलेला आहे.

बाळाजी विश्वनाथ यांनी मार्च १७१९ मध्ये नव मराठा सरदारास सोबत घेऊन उत्तर मोहिम हाती घेऊन सरळ दिल्लीवर धडक मारली. तेंव्हा सय्यद बंधूच्या मदतीने मराठ्यांना दिल्लीच्या बादशहाकडून चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य या तीन सनदाची प्राप्ती केली. त्यामुळे मराठा दरबारात पेशव्यांचे महत्व वाढले. शाहू महाराजांनी स्वराज्याची जबाबदारी पेशव्यांवरच संपूर्णपणे सोपविले. तो कारभार इ.स. १८१८ पर्यंत पुण्यातून पेशव्यामार्फत चालूच होता. त्यात स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीचा समावेश होतो. चौथाई वसूल करण्याचा हक्क हा दक्षिणेतील हैद्राबाद, विजापूर, बिदर, वऱ्हाड, खानदेश व औरंगाबाद या सहा सुभ्यातून वसूल करण्याचा हक्क मिळाला. त्यानुसार दक्षिणेत परत आल्यावर पेशव्यांनी आपल्या सरदारास चौथाई व सरदेशमुखी वसूलीसाठी माळव्यात प्रवेश करुन शिंदे, होळकर व पवार यांनी मोगलाचा माळवा सुभा जवळपास जिंकून घेतला. तो प्रदेश त्या तीन सरदारामध्ये सरंजामासाठी त्यांच्यात वाटून दिला. त्यामुळे शिंदे, होळकर व पवार यासारखे सरदार स्वतःचा सरंजाम बाळगून वंशपरंपरागत सरंजामदार बनले. त्यांनी स्वतःच्या राज्याचे प्रशासन स्वतः पाहू लागले व पेशव्यांना लष्करी मदत करीत करीत स्वतःच उत्तर मोहिमा फत्ते करुन अमाप खंडणी, चौथाई व सरदेशमुखी वसूल करु लागले. त्यांचा वाटणी पेशव्यासह आपापसात व्यवस्थतपणे करुन घेऊन आपले राज्य सांभाळत असते. स्वतः छत्रपती शाहू महाराज असेपर्यंत पेशव्यावर व पेशव्यांचा इतर सरदारावर वर्चस्व वा मजबूत पकड होती. पण छत्रपती शाहू महाराजांनतर पेशवेच सर्वेसर्वा बनले. त्यामुळे सर्व सरंजामदार, जहागिरदार, वतनदार पेशव्यांना आपले मालक मानून त्यांच्या आदेशाचे पालन करुन स्वतःच्या राज्याची व प्रदेशाची प्रशासकीय कामकाज पाहू लागले. छत्रपती व पेशव्यांच्या काळात मध्यवर्ती सत्तेचा शासन यंत्रणेवरील प्रभाव कमी कमी होत गेल्याने मराठी राज्याची पकड निखळू लागली. त्याकाळात जहागिरदार, सरंजामदार व वतनदार स्वतःच आपापल्या राज्याचे सत्ताधीश बनले.

राघोबादादा, सवाई माधवराव, अमृतराव, बाजीराव दुसरे व बारभाई मंडळ यांची धरसोड व स्वार्थी वृत्ती वाढली. ह्या चुकीच्या धोरणामुळे छत्रपती शिवाजी महाराजांनी मराठा राज्याची निर्माण केलेली केंद्रीय सत्ता पेशव्यांच्या काळात पूर्णतः खिळखिळ झाली. पर्यायी ही केंद्रीय सत्ता मराठा सरदार वा सुभेदार याच्याकडे हस्तांतरीत झाली. जेंव्हा रघोबादादा यांनी सालबाईचा व बाजीराव दुसरा यांनी इ.स. १८०२ ला इंग्रजांशी वसईंच्या तह केला.[५] पेशव्यांनी स्वतःच्या स्वार्थासाठी मराठी सत्ता इंग्रजांच्या पायाशी नेऊन ठेवली. व त्यामुळे इंग्रजांना मराठा सत्ता एका एका सरदाराशी वा सुभेदाराशी लढ्या करुन त्यांना पराभूत केले. त्यामुळे राज्याच्या प्रत्येक सरदाराशी इंग्रजांनी स्वतंत्र राजाप्रमाणे करार केले. त्यांना स्वतंत्र संस्थानाचे वा छोट्या राज्याचे मालक बनवून त्यांची मुलूखगिरी पूर्णतः बंद करुन केवळ अंतर्गत व्यवस्था ब्रिटीश रेसिडेंटच्या सल्याप्रमाणे राज्यकारभार करण्यास भाग पाडले.

अठराव्या शतकातील राजकीय सत्ताधीशाची कारकीर्द म्हणजे अस्थिरता व अराजकता असलेली काळ होता. तरी पण पेशव्यांनी वा इतर सुभेदारानी प्रशासनाची घडी नीट बसवून राज्यकारभार केला. पेशव्यांच्या प्रशासन व्यवस्थेत थोडा फार बदल करुन सुभेदारांनी राज्य कारभार केला. कोणत्याही राज्याचा विस्तार, विकास व वैभव निर्माण करावयाचे असेल तर त्या राज्यातील मुलकी प्रशासकीय व्यवस्था मजबून असावी लागते. उत्कृष्ट प्रशासन हे राज्याच्या विकासाचा गाभा असतो. अशाच प्रकारचे प्रशासन हे मराठा सुभेदार होळकरांच्या राज्यात निदर्शनास येते. होळकर राज्यातील प्रशासन हे प्रजेचे हित केंद्रबिंदू ठेवून निर्माण केलेले होते. होळकरांच्या प्रशासनाचा मुळ गाभा हा प्रजेचा संबंध म्हणजे आई मुलाच्या संबंधाप्रमाणे असतो असे होळकर शासक मानत होते. प्रशासनाची मुलभूत जडणघडण ही देशातील बहुजन समाजाची, दीन, दु:खी, दुबळ्यांची, प्राणीमात्रांची, सेवा करणे हे होय असे ते मानीत होते. होळकरांचे प्रशासन हे राजकीय व सामाजिक जाणीवेचे प्रतिबिंब आहे. हे त्यांच्या प्रगल्भ व विशाल कार्यातून अधोरेखित होते. होळकर शासकांनी मुलकी प्रशासन क्षेत्रामध्ये केलेले कार्य उल्लेखन्नीय व परकीय राज्याशी सलोख्याचे संबंध प्रस्थापीत करणारे होते. त्यांच्या मुलकी प्रशासनाचा हेतु हा समाज उपयोगी व समाज केंद्री होता. म्हणजेच होळकर शासकांचे प्रशासन हे राज्यकेंद्री नसून समाजकेंद्री होते.[६]

या प्रकरणामध्ये होळकर राज्यातील मुलकी प्रशासन व्यवस्थेचा अभ्यास केलेला आहे. होळकर संस्थानामध्ये होऊन गेलेल्या अनेक सुभेदारांनी अथवा संस्थानिकांनी आपला राज्यकारभार करताना मुलकी प्रशासन व्यवस्था निर्माण केली. होळकर संस्थानच्या सुंभेदारांना पुण्याचे पेशवे इतर सुभेदाराप्रमाणे सुभेदारीचे वस्त्रे देत असत. होळकर संस्थानातील संस्थानिकांनी आपला राज्यकारभार चालविताना लोककल्याण करताना आपली एक विशिष्ट प्रशासकीय चौकट निर्माण केली होती. प्रजेच्या हितासाठीच होळकर शासक राज्याचा कारभार करीत होते. हे त्यांच्या मी आज जें कांहीं सामर्थ्याच्या व सत्तेच्या बळावर करीत आहें. त्याचा मला परमेश्वरापाशीं जाब द्यावा लागेल.[७] या विधानावरून स्पष्ट होते. त्यांचा नियोजनबद्ध कार्यक्रमाद्वारे प्रशासन चालविले जात होते. रयतेचे हित समोर ठेऊन निर्णय घेतले जात होते. होळकर शासकांना आपल्या अधिकार शक्तीचा अत्यंत कुशलतेने वापर करीत होते.

छत्रपती शाहू महाराजांना या मराठा मंडळावर देखरेख ठेवण्यासाठी केंद्रीय सत्तेमार्फत दरकदार हा अधिकारी नियुक्त केलेला होता. मराठा मंडळाने स्वराज्याचे रुपांतर मराठी साम्राज्यात करण्याची मोठी ऐतिहासिक कामगिरी पार पाडली. या मराठा साम्राज्यात गुजरात, माळावा, बुंदेलखंड, राजपुतांना, गोंडवाना व ओरीसा व इतर भाग येत होता.

मराठा मंडळापैकी मल्हारराव होळकर हे एक माळवा प्रांताचे सुभेदार होते. माळव्याचे होळकर हे पेशव्यांच्या अधीन राहून आपला राज्यकारभार करीत असत. माळव्याच्या सुभ्याचे सर्व अधिकार सुभेदार मल्हाररावास होते. होळकर राज्यामधील शासकांना सतत युद्ध मोहिमावर

जावे लागत असल्याने राज्याची मुलकी प्रशासन व्यवस्था खंबीरपणे सांभाळण्याचे काम त्या त्या शासकांच्या राणीस करावे लागे. सुभेदार मल्हारराव यांच्या कारकिर्दीमध्ये होळकर राज्याचा कारभार गौतमाबाई व त्यानंतर अहिल्याबाईनी चांगल्याप्रकारे सांभाळलेले होते. अठराव्या शतकात होळकर शासकांनी पंचायतराज स्थापन केले होते. त्यानुसार होळकर राज्याचे परगणा (जिल्हा) व महाल (तालुका) असे भाग पाडले. प्रत्येक विभागावर योग्यताधारक अधिकाऱ्याची नेमणूक करून यांच्या मार्गदर्शनाखाली ग्रामपंचायतीचे कामकाज नि:पक्षपातीपणे आणि नि:स्वार्थीपणे चालत होत. होळकरांचे राज्य मोठ्या विस्तृत प्रदेशात पसरलेले होते. त्या प्रदेशाची नीट व्यवस्था लावण्यासाठी पेशव्याप्रमाणेच पण थोडीशी वेगळी केंद्रीय प्रशासन व्यवस्था सुरु केलेली होती. त्यांचप्रमाणे होळकरांचे राज्य हे मोगल साम्राज्यातील माळवा व उत्तर भारतातील प्रदेशावर निर्माण झाल्याने मोगलांच्या प्रशासन व्यवस्थेचा थोडासा प्रभाव पडलेला होता. मल्हारराव होळकरांनी सुरूवातीच्या काळात मोगली प्रदेश ताब्यात घेऊन एक पेशव्याचे प्रतिनिधी म्हणून राज्यकारभार पाहत हाते. पण पेशव्यांनी मल्हाररावांना सुभेदार म्हणून वस्त्रे देण्यात आली. त्यानुसार होळकरांच्या अधिपत्याखालील जो सरंजामी प्रदेश किल्ले, सैन्य व वित्त येत असल्याने युद्ध मोहिमात मिळालेल्या खंडणी वा लूट यातून मिळालेल्या एकूण रक्कतेतून ठरलेला हिस्सा पेशव्याना देऊन उरलेल्या हिस्स्याच्या आधारे स्वत:च्या राज्याची प्रशासन व्यवस्था सांभाळणे, पेशव्यांच्या आदेशान्वये लष्करी मोहिमा यशस्वी करणे, आपल्या राज्यात न्याय विषयक कार्य पार पाडणे, राज्यात सांस्कृतिक व सामाजिक कार्य पार पाडणे. तसेच राज्यातील जनतेच्या हिताचे व कल्याणाचे कार्य करणे हे होळकर राज्याचे सत्ताधीश म्हणून कार्य पार पाडावी लागत असत. हे मल्हाररावानंतर अहिल्याबाई व तुकोजीराव यांना पार पाडावी लागली, पण नंतर मराठा राज्यात वाढता बेबनाव निर्माण झाल्यामुळे यशवंतराव होळकर यांनी पेशव्यांचे वर्चस्व झुगारुन स्वत:च्या नेतृत्वाखाली राज्यकारभार सुरु केला. पण नंतर स्वतंत्र राजा म्हणून आपल्या अधिपत्याखालील प्रदेशावर ते राज्यकारभार करू लागले. त्याचप्रमाणे होळकर आपल्या राज्यात ही सरंजामदार नेमणूक करु लागले. त्यासाठी आपल्या मर्जीतील शुरवीर सरदारांना वतने, इनामे, व जहागीरी ही देत असत.

**४.१ केंद्रीय प्रशासन व्यवस्था:**

पेशवेकाळात केंद्रीय प्रशासनाचे प्रमुख पेशवे होते. तरी पण स्वत: पेशवे त्यांचा न्यायाधीश, फडणीस व इतर अधिकारी विचारविनिमय करुन न्यायदानाचे कार्य करीत असत. ‘छत्रपती’ हे पद शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत सर्वोच्च पद मानले जाई. पण छत्रपती शाहू महाराजानंतर या पदाचे महत्व कमी होऊन पेशवा हे पद सर्वोच्च पद बनले. भट घराण्यापासून पेशवे हे पद वंशपरंपरागत बनले. मराठ्यांच्या राज्यकारभारामध्ये पेशवे पद हे अत्यंत महत्वाचे

व प्रतिष्ठेचे मानले जाई. मराठा राज्याचा कारभार खऱ्या अर्थाने पेशवाच पाहत होते. बाळाजी विश्वनाथ हे पेशवे पदावरील सातवे पेशवे होते.

चौथाई ही स्वराज्याबाहेरुन गोळा केला जात असे. सरदेशमुखी ही स्वराज्यापुरतीच वसूल केला जात असे. स्वराज्यातून वेगवेगळया स्वरुपात महसूल गोळा करण्याचा हक्क या सनदेने मिळाला. यात पुणे, बारामती, इंदापूर, वाई, मावळ, सातारा, कसाराबाद, खटाव, माण, फलटण, मलकापूर, तारळे, पन्हाळा, आजरे, जुन्नर व कोल्हापूर या सोळा प्रातांचा समावेश होतो.

शाहू महाराजांनी प्रधानामध्ये अधिकारांची विभागणी—

१ पेशवा यांना २५ लाख १० हजार रुपयांचा सरंजाम, १६ महाल, व दोन किल्ले शिवाय ५ महलांची सादेशमुखी दिली.

२ सचिवांकडे एक महाल, एक किल्ला व एक वतन सरंजाम म्हणून दिले.

३ प्रतिनिधी यांना १६ महाल व ३५ किल्ले देखरेखीसाठी दिली.[८]

पेशव्यांचा कारभार अठरा कारखाने अंतर्गत चालत होता. त्यात तोफखाना, पीलखाना, उष्ट्रखाना, शिलेदार (शस्त्रागार), कोठी फरासखाना, लकडखाना, इमारत, बागा, कुरणे, रथखाना, पुणे पेढा थट्टी (दुभती जनावरे) पोते व जमादारखाना, जिन्नसखाना, वैद्यशाळा, पुस्तकशाळा व खाजगी इ. होते. मामलतदारांचा दर्जा राज्यपालासारखा होता. मामलतदार व कमाविसदार यांना मुलकी कारभारासोबत न्यायदान करण्याचे कार्य ही करावे लागत होते. तसेच गुन्हेगारांपासून प्रजेचे रक्षण करणे ही फौजदारीचे कामेही करावी लागत होती. मराठा राज्यात ज्या प्रमाणे काळाच्या ओघात छत्रपती नामधारी बनून पेशवे हे सर्वेसर्वा बनले. त्यानंतर काळाच्या ओघात पुढे पुढे पेशवे दुबळे, नामधारी बनल्याने सरंजामदार, जहागिरदार स्वत:च्या राज्याचे सर्वेसर्वा मालक बनले. त्यामुळे या छोटया छोटया राज्यात स्वार्थी वृत्तीने हेवेदावे वाढल्याने या संधीचा फायदा ब्रिटीश सत्ताधीशांना सहज घेता आला. म्हणजेच जो सरजामशाही वा जहागिरदारी मराठी सत्तेच्या विस्तारास वा उत्कर्षास कारणीभूत ठरली तिच सरंजामदारी मध्यवर्ती मराठी सत्तेच्या विनाशाचे महत्वाचे कारण ठरली.[९] मराठा छत्रपतीच्या अकार्यक्षमतेमुळे मराठी सत्तेतील पेशव्यांनी सर्व सत्ता आपल्या अधिपत्याखाली घेतली. याचप्रमाणे पुढे पेशव्यांच्या नाकर्तेपणामुळे ही व्यवस्था संरजामदारांकडे गेली. त्यानंतर भारतात आलेल्या इंग्रजांनी भारतातील सर्व सरंजामदारांची आपापसातील एकी व सूसुत्रता नसल्याचे पाहून त्या राज्यास पराभूत करून आपले मांडलिक बनवून स्वत:ची प्रशासन व्यवस्था निर्माण केली. या पराभूत राजा वा सरंजामदारांकडील बराच मोठा प्रदेश स्वत:कडे घेवून त्यांना छोटेशे संस्थानिक बनविले. या संस्थानिकांकडे केवळ सरासरी पंचेवीस टक्केच भाग वा उत्पन्नाचा प्रदेश राहील यांची खबरदारी इंग्रजांनी घेतली. त्यामुळे अशा संस्थानिकास स्वत:चा राजकीय खर्च सुद्धा भागविणे कठीण होऊन बसले.

अशा छत्रपती, पेशवे व इंग्रज यांच्या वर्चस्वा खाली सरंजामदारांना आपल्या राज्याचा राज्यकारभार करावा लागला. होळकर सरदाराना आपल्या राज्यात छत्रपती शाहू महाराज पेशवे बाजीराव, नानासाहेब, माधवराव, सवाई माधवराव, राघोबादादा व बाजीराव यांच्या कारकिर्दीत आपल्या राज्यात प्रशासन व्यवस्था खंबीरपणे चालविली. राजा (छत्रपती) केवळ एक बाहूले म्हणूनच काम करीत असे त्यांच्या खाजगीतील हिशोब पेशवा इतर विभागापेक्षा जास्त काटेकोरपणे पाहत असे. रोजच्या हालचालीवर नियंत्रण ठेवणारी अनेक बंधने पेशव्यांनी घातली होती.[१०] त्या प्रशासन व्यवस्थाचा अभ्यास या संशोधनात केलेला आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्यांची स्थापना केली. त्यावेळी छत्रपती हे या पदास सर्वोच्च महत्व होते. म्हणजे मराठी सत्तेच केंद्रीकरण छत्रपतींच्या हाती एकवटलेले होते. पण नंतर छत्रपती दुबळे व सरदार वा सेनापती रणमैदान गाजवू लागल्याने मराठी मध्यवर्ती सत्तेत तेच प्रभावी ठरु लागले. मराठा राज्यकारभाराच्या प्रमुख केंदस्थान पुणे बनले. येथेतूनच संपूर्ण राज्यकारभार चालत होता. यास हूजूर दप्तर असे म्हणटले जाई. या दप्तराच्या राज्यकारभारासाठी अनेक खात्याची निर्मीती करण्यात आली. पेशवे दप्तरात २०० च्या आसपास कारकून काम करीत होते.

पेशवे काळात छत्रपती हा मराठी सत्तेचा प्रमुख म्हणून फक्त मानाची वस्त्रे देण्यापुरतेच पद राहिलेले होते. त्यामुळे पेशवा हाच वास्तविकदृष्ट्या मराठी राज्याचा सर्वोच्च प्रमुख बनत गेला. म्हणजेच पुण्यात पेशव्यांकडून राज्य कारभाराची सत्तासुत्रे ज्या कार्यालयातून चालत असत. त्यास हुजूर दप्तर म्हणण्यात येऊ लागले. तर या हूजूरात दस्तरातील अधिकारी व कारकून ज्या ठिकाणी काम करीत त्या ठिकाणाला 'फड' म्हणून संबोधले जाई. त्या जमाखर्च विभागाचा अधिकार फडणीस असे.[११] हा फडणीस म्हणजेच राज्याचा मुख्य सचिव याप्रमाणे काम पाहत असे. या फडणीसाचे मुख्य कार्य म्हणजे राज्याचा महसूल पाहणे हे होते. या हुजूरात दप्तराचे दोन विभाग होते. चालत्या दस्तर या विभागात परत तीन उपविभाग पाडलेले होते. ते बेहडा, फड व संरजाम असे होते. बेहडा विभागात सुभ्यापासून खेड्यापर्यंतच्या जमा खर्चाचा हिशोब ठेवला जात असे. फंड विभागात राज्याच्या सर्व प्रकारच्या रोजकिर्दी ठेवल्या जात असत. संरजाम विभागात सर्व सरंजामदारांचे सर्व प्रकारचे हिशोब ठेवले जात असत. बेरीज दप्तर विभागात सर्व जमाखर्च व शिल्लक यांची नोंद ठेवली जाई. तसेच हिशोबाच्या खतावण्या तयार केल्या जात असत.[१२]

पेशव्यांच्या काळात मराठा सरदार मल्हारराव होळकर यांनी होळकराचे राज्य निर्माण झाले. त्यांनी पेशव्यांच्या ध्यैय धोरणास अनुसरुनच आपल्या राज्याची प्रशासकीय चौकट निर्माण करुन राज्य कारभार केला. म्हणजेच पेशव्यांच्या केंद्रीय प्रशासन व्यवस्थेप्रमाणेच होळकर राजांनी आपलीही केंद्रीय प्रशासन व्यवस्था निर्माण केले.

शिवाजी महारांजाच्या काळातील छत्रपती पद व पेशवे काळातील छत्रपती पद यात ाख बनले. पुढे मराठा सरदार वा सरंजामदार तलवार बहाद्दर निघाल्याने ते स्वत:च रणमैदान गाजवू लागले. त्यामुळे ते त्यांच्या राज्यात वा प्रदेशात स्वतंत्ररित्या राज्य कारभार करु लागले. म्हणजेच जो रणमैदान गाजविल, त्याच्या हाती राज्याच्या ध्येयधोरणाची व कारभाराची सुत्रे येत होती. त्याप्रमाणेच होळकर राज्यात त्यांच्या वारसात असेच धोरण दिसून येते. होळकर राज्य संस्थापक मल्हारराव होळकर, त्यानंतर मालेराव, अहिल्याबाई, तुकोजीराव, काशीराव, यशवंतराव, मल्हारराव दुसरे (तिसरे), मार्तण्डराव (दत्तक), हरिराव, खंडेराव (दत्तक), तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, सवाई तुकोजीराव (तृतीय) व द्वितीय यशवंतराव याप्रमाणे राज्याचा वा संस्थानाचा राज्य कारभार सांभाळला. अहिल्याबाईनी खाजगी कारभार आपल्याकडे राखून ठेवला होता. आणि बाहेरचा कारभार तुकोजीच्या स्वाधीन केलेला होता. मातोश्री अहिल्याबाई या तुकोजीरावांना युद्ध शस्त्रासंबंधी मोहिमा, तह करार या महत्वपूर्ण गोष्टीत स्वत: लक्ष देत असत.

**४.१.१ होळकर राज्याची राजधानी:**

होळकर राज्याची राजधानी ही प्रथमत: इंदूर ही होती. मल्हारराव होळकर यांनी आपल्या राज्याची राजधानी इंदूर करून आपला राज्यकारभार सुरू केला. पण नंतर अहिल्याबाईंनी अधिक सुरक्षिततेसाठी व इतर कारणास्तव आपल्या राज्याची राजधानी इंदूरवरून निसर्गरम्य नर्मदा नदी काठी असलेल्या महेश्वर येथे स्थलांतरीत करून इ.स. १७६७ पासून राज्यकारभार करायला सुरूवात केली.[१३]

**४.१.२ होळकरांची राजमुद्रा:**

मराठेशाहीतील प्रमुख सरदार मल्हारराव होळकर यांनी स्वत:चे सैन्य उभारणे, राजचिन्ह, निशान व वेगळी नाणी पाडण्यास अनुमती मिळालेली होती. होळकर घराण्याचे राजचिन्ह शौर्याचे आणि त्यागाचे प्रतिक होते. त्यांनी स्वत:ची राजमुद्रा बनविली होती. त्या राजमुद्रेत छत्र, सूर्य, बैल, घोडा, भाला, तलवार, गहू व अफू इत्यादींचा समावेश होता.[१४] या राजचिन्हांवर ''प्राहोमेशोम्या श्री. कर्तु:प्रारब्धात्'' असे संस्कृत भाषेतील वाक्य आहे. या वाक्याचा अर्थ असा की ''भगवान शंकरांनी पार्वतीला सांगितले की, हे देवी, प्रभुत्व आणि प्रारब्ध यांची जोड जमली की, मनुष्य वैभवशाली होतो. तसेच 'माणसुबियाच्या कार्यात त्वरेस मोल आहे.' मल्हारराव होळकरांचे ब्रीदवाक्य होते.[१५] या मानचिन्हामध्ये जमीन, जमिनीवर पिकांची समृद्धी, उजव्या बाजूला नंदी आणि तलवार तसेच डाव्या बाजूला घोडा आणि ध्वज अशी प्रतिके आहेत. तर वरील बाजूस छत्र आणि छत्राखाली सूर्य अशी प्रतिके आहेत. सुजलाम सुफलाम भूमी बनल्यानंतर प्रजेच्या आणि सर्वच सजीवांच्या मुलभूत गरजा तृप्त होतात.

### ४.१.३ दरबारी रितीरिवाज:

पेशव्यांच्या दरबारी रितीरिवाजाप्रमाणे होळकर राज्यातही सुख दु:खानुसार वस्त्रे दिली जात होती. आनंदाच्या बातमीच्या वेळी एकमेकांस शेला—पागोटे देऊन मानसन्मान केला जात होता. युद्ध प्रसंगी किंवा युद्धानंतर तहाचे वेळी पोषाखाचे देवाण—घेवाण होत असे. असे पोषाख एका गावातून दुसऱ्यागावी ही पाठविण्यात येत होते. मरणासंबधी दुखवट्याची माहिति देण्यासाठी वस्त्रे पाठविले जाई. ही दुखवट्याची वस्त्रे पेशवे हे राजमाचीकर किंवा बर्वे यांचे हाती रवाना केले जात होते. त्याचप्रमाणे इंग्रज वा इतर परदेशी लोक पेशव्यांच्या किंवा पेशव्यांच्या कोणत्याही सरदारांच्या दरबारी आले. तर त्यांना मराठ्यांच्या रितीरिवाजाप्रमाणे वागावे लागत असे. सरदार व राजे यांच्या भेटीच्या वेळी त्यांचा हस्तांदोलन करून एकमेकांस आलिंगन देऊन आपले किंवा विशेष स्नेहसंबंध दाखविले जात होते. पेशव्यांच्या आणि मराठेशाहीतील सर्व सरदारांना कातडी पादत्राणे काढून ठेऊन सारणीची पादत्राणे व रेश्मी पायमोजे घालावी लागत. मांडी घालून दरबारात बसावे लागत असे. दरबारातील एखाद्या महत्वाच्या सरदाराची वा अधिकाऱ्याच्या मृत्यूची बातमी कळताच सरकारी कामकाज बंद ठेवण्यात येत असे.

### ४.१.४ होळकर राज्याचा कोश:

होळकर राज्यामध्ये साधारणत: सव्वाशेच्या घरात परगणे होते. होळकर राज्यातील कोशाचे खाजगी व दौलत असे त्याचे दोन प्रकार पडत होते. म्हणजेच होळकरांच्या खजिन्याचे वा आर्थिक कारभाराचे दोन भाग होते. एक खासगी (सासू गौतमीबाईकडून चालत आलेला) व दुसरा सरकारी (दौलतीचा) खासगीचा सर्व अर्थव्यवहार त्या स्वत: पाहत असत. व दौलतीचा म्हणजेच राज्याचा अर्थव्यवहार हा पेशव्यानी नियुक्त केलेल्या तज्ज्ञ कारभाऱ्यांच्या सल्ल्याने केला जात होता. खासगी व सरकारी असा स्पष्ट भेद व त्याप्रमाणे खतावणीत हिशोब ठेवला जात होता. दौलतीचा (सरकारी) पैसा हा केवळ सरकारी कार्यासाठी व लष्कराच्या खर्चासाठी वापरला जात होता. म्हणजेच होळकरांच्या धार्मिक कार्यासाठी व वैयक्तिक खर्च करण्यासाठी एक पैसा कधीही वापरलेला नव्हता एवढा विवेकीपणा हा होळकर शासकांकडे होता.

#### ४.१.४.१ खाजगी जहागीर:

अठराव्या शतकातील राजकीय सत्ताधीशाची कारकीर्द म्हणजे अस्थिरता व अराजकता असलेली काळ होता. तरी पण पेशव्यांनी वा इतर सुभेदारानी प्रशासनाची घडी नीट बसवून राज्यकारभार केला. पेशव्यांच्या प्रशासन व्यवस्थेत थोडा फार बदल करुन सुभेदारांनी राज्यकारभार केला. होळकर राज्यात राज्यकारभार हा इतर सत्ताधीशापेक्षा निश्चित वेगळ्या स्वरुपाचा होता. त्याचे एकमेव कारण म्हणजे इतर राज्यांना होळकराप्रमाणे खाजगीचा अधिकार दिलेला नव्हता. मल्हारराव होळकरांनी स्वपराक्रमावर पेशवी बाजीरांवाची विशेष मर्जी संपादन केली. इ. स. १७३४ मध्ये पेशव्यांनी गौतमाबाई होळकर यांच्या नावे काही प्रदेश

वंशपरंपरागत खाजगी जहागिर म्हणून दिला होता.[१६] त्यामुळे होळकर राज्यात खाजगीचा राज्यकारभार व दौलतीचा राज्यकारभार असे दोन स्वतंत्ररित्या चालत होता. म्हणजेच पेशव्यांनी फक्त होळकरांना खाजगी जहागिरीची सनद देऊन काही प्रदेश कायमचे वंशपरंपरागत दिल्याने त्यास स्वतंत्र राज्याचा अधिकार मिळविला होता.

सुभेदार मल्हारराव होळकर यांना व त्यांच्या सोबत्याना पेशवे बाजीराव यांनी फौजेच्या खर्चासाठी सरंजाम म्हणून माळव्यातील काही महाल लावून दिले. धनगर प्रथेनुसार मल्हारराव गौतमीकडे उत्पन्नाचा चौथा हिस्सा नित्य नियमाने देत असत. तेंव्हा मल्हारावानी श्रीमान पेशव्यांस विनंती केली. त्यासंदर्भात चिमाजी अप्पानी शिफारस केलेली होती. तेंव्हा बाजीरावांनी मल्हाररावांची उत्तरेतील माळव्यातील मोहिमांतील शौर्य व कर्तृत्व पाहून खाजगी जहागीरी गौतमाबाईंच्या नावे बहाल केली. मराठ्यांच्या अख्या राज्यात फक्त मल्हारराव होळकर यांनाच खाजगी जहागीरी मिळालेली होती. याचे सर्व श्रेय मल्हाररावांची स्वामीनिष्ठा व कर्तृत्व यास जाते. त्याचे पत्र असे होते.

...तुमचे ताब्यांत खाजगी व दौलत असे दोन्ही पथक कायम करुन तुमचे कुटुंब सौभाग्यवती गौतमीबाईचे नावे इनाम देऊन सनद व कपडे पाठविले आहे. तरी खाजगीकडेस इनामी तालुके निरंतर चालविणे तपशील येणें प्रमाणे:

| | |
|---|---|
| २६३००० | प्रगणे महेश्वर, चोळी व प्रगणे इंदूर, प्रगणे हरसोला, प्रगणे सावेरपैकी बरलाई तालुका परगणे देपाळपूर पैकी तालुके हातोद परगणे महदपूर पैकी तालुके जगोठी व करंज माकडोन वगैरे... |
| ३६०१०—१०—० | दक्षिण प्रांती चांदवडपेकी गांवे व अबांडपैकी कोरेगांव वगैरे. |
| २९९०१०—१०—० | एकूण इनाम कुलबान कुलकानुगांवे दरोबस्त खासगीकडेस नेमून दिले आहे. तरी निरंतर उपभोग घेउन नवीन सनदेची अक्षेप न घेणे जाणिजे.[१७] |

२० जानेवारी १७३४ ला श्रीमंत पेशवे बाजीराव यांच्याकडून गौतमीबाईंना खाजगी जहागीरी मिळाली होती. त्या जहागिरीचे सुरूवातीस उत्पन्न २९९०१/—होते. ते वाढत जावून मल्हाररावांच्या निधनावेळी सोळा कोटी रूपये होते. या खाजगीचा कारभार स्वतंत्रपणे चालत असे. या खाजगीच्या उत्पन्नातूनच होळकर राज्याकर्त्या प्रथम स्त्रियांनी धर्मदाय कार्यासाठी व देवस्थानच्या खर्च्यासाठी करीत असत.

गौतमीबाईंच्या नंतर जो होळकरशाहीच्या गादीवर असेल त्याच्या प्रथम पत्नीकडे खासगीचा अधिकार पेशव्याकडून वंशपरंपरागत देण्यात आलेला होता. तरीही गौतमाबाईंच्या निधनानंतर खाजगीचा सर्व अधिकार हा अहिल्याबाईकडे होता. त्यानंतर सुभेदारांच्या निधनानंतर सुभेदारी ही मालेराव व तुकोजीरावांकडे जरी गेलेली असली तरीही खाजगीचा सर्व अधिकार हा अहिल्याबाईंकडेच त्यांच्या हयातीपर्यंत होता. त्याच्या पश्चात मात्र हा अधिकार हा

सुभेदारीची वा सरदारकीचे वस्त्रे ज्यांना मिळाली त्यांच्या पत्नीस मिळालेला होता. जहागिरीच्या कारभारात दुसऱ्या कोणासही ढवळाढवळ करण्याचा अधिकार नव्हता.

जेंव्हा जेव्हा मल्हारराव युद्ध मोहीमावर जात तेंव्हा तेंव्हा इंदौर राज्याचा सर्व कारभार गौतमीबाईच अतिशय चांगल्याप्रकारे सांभाळत असत. त्या राज्यव्यवस्था सांभाळण्यात अतिशय दक्ष होत्या. अहिल्याबाईना ही गौतमीबाईने आपल्या तालमीत तरबेज केले होते. त्याचप्रमाणे अहिल्याबाईला आदर्श प्रशासिका बनविण्यात गौतमीबाईचाच सिंहाचा वाटा होता. गौतमीबाईच्या निधनाने अहिल्याबाईच्या वरचे मायेचे छत्र गेल्याने त्या एकट्याच पडल्या. त्याचप्रमाणे सासूबाईच्या निधनानंतर अहिल्याबाईनी ही खाजगीचा कारभार सांभाळत असत. अहिल्याबाईनी जे जे निर्माण कार्य केले. त्याचा सर्व खर्च स्वत:च्या खाजगी उत्पन्नातूनच केला. राज्याच्या तिजोरीतून कधी एक नया पैशाचा खर्च केला नाही.

मल्हाररावांचे कारकिर्दीपासून अहिल्याबाईच्या सासूच्या नावे अर्थात गौतमाबाईच्या नावे खासगीची दिवाणगिरी चालू होती. हा मान गौतमाबाई निवर्तल्यानंतर अहिल्याबाईंना लगेच मिळाला. 'खासगीची गादी' म्हणजे 'अहिल्याबाईची गादी' म्हणून ओळखली जाते. अहिल्याबाईच्या कारकिर्दीत खासगीचे उत्पन्न दौलतीहून वेगळे असून त्यांना अहिल्याबाईची गादी म्हणण्याचा प्रघात पडलेला होता.[१८]

खासगीचे दिवाण फडणीस वगैरे दरखदार कामदार स्वतंत्र असून खासगीच्या उत्पन्नातूनच तेथील धर्मदाय व देवस्थानचा खर्च चालत असे. दौलतीतील हुकूमावर मंजुरीची खूण म्हणून श्रीमंत महाराज साहेबांचा श्री. शंकर (ऑर्डर) होते, त्याप्रमाणे अहिल्याबाईच्या कारकिर्दीपासून राज्य विलिन होईपर्यंत सौ. महाराणी साहेबांच्या खासगीतील हुकूमावर 'श्री शंकर' होत असे.[१९]

सुभेदार मालेरावच्या मृत्यूनंतर सरदारकीची वस्त्रे तुकोजीरावांना मिळाली; पण खासगीवर मालकी अहिल्याबाई यांचीच होती. महेश्वर ही जागा होळकरांचे कुटुंबांस इनाम म्हणून खासगीची जहागीर दिली गेली होती. त्यावर होळकरांचा पूर्ण अधिकार होता. शिवाय तुकोजीरावांना तशी ताकीद देऊन तुकोजी होळकर यांचे नाव सनद व कपडे पेशव्यानी पाठविलेले होते.

होळकर शासकांच्या स्त्रीयांना राज्यातील सरदार वा पागे हे सण व शुभ कार्यक्रमानिमीत्य आहेर म्हणून काही रक्कम चोळी साडीसाठी देत असत ते ही होळकर शासकाचे एक प्रकारचे उत्पन्न खाजगीत जमा होत असे.

| ४४३५—१४—० | **चोळी बाबद** | |
|---|---|---|
| ४२०—०—० | बारगळ | ४२००—८—० दर ८४ |
| ९३३—२—० | वाघमारे | ९३३४—११—६ दर १८६ |
| २९५—०—० | चौढीकर चिखली | २०१५—२—६ दर ४१ |
| १५५—०—० | रखामाई मत्कर | २०००—८—० दर ४० |
| ०—०—० | मातोश्री बाईसाहेब | ७८४९७—६—६ दर ४० |
| ०—०—० | मथुराबाई होळकर | ६५५१—१४—६ दर४० |
| ६५—०—० | चिमाजी बुळे | ६५०—०—० दर १३ |
| १७५—०—० | राधाबाई भागवत | १७४०—९—० दर १३ |
| ५२३—१२—० | मुक्ताबाई फणसे | १०२३६— दर १०४ |
| १९०—०—० | जिउबाई बाघ | १९०० दर ३८ |
| ७६५—०—० | हारकुबाई | ७६९९—२—० दर १५३ |
| ०—०—० | खासगीकडे | ७२७५—५ दर ९ |
| १५०—०—० | नानुबाई बुळे | १४९४ दर ३० |
| ३११—४—० | गेहनाबाई भांड | ३११८ दर ६२ |
| ५०—४—९ | सौभाग्यवती बाळाबाई | ५१०—२—६ दर १० |
| ..................<br>**४४३५—१४—०** | | २० |

होळकरांच्या दौलतीचा राज्यकारभार मल्हारराव होळकरांचे युद्ध मोहिमातील शौर्य व पेशव्यांप्रती निष्ठा पाहून स्वत: बाजीराव पेशव्यांनी इ.स. १७२७ पासून मल्हारराव होळकर यांना सरंजामी जहागीर देण्यास सुरुवात केली. त्यावेळी होळकरी लष्करी सेवेच्या मोबदल्यात मल्हाररावांना बराच मोठा भूप्रदेश पेशवे बाजीराव यांनी सरंजाम म्हणून दिला. जो की केवळ पेशव्यांच्या लष्करी हालचाली व सैन्य खर्चासाठी दिला जात होता. या युद्ध मोहिमावर मल्हारराव होळकर सतत धाडसीपणा व शौर्य गाजवित होते. तसेच ते एक कुशल प्रशासकही होते. हे रणभूमीवरुन अहिल्याबाईना व कारभाऱ्यांना वेळोवेळी पाठविलेल्या पत्रावरुन त्यांचे राज्यकारभाराविषयक ज्ञान व कुशल प्रशासकाचे गुण स्पष्टपणे दिसून येतात.

**४.१.४.१.१ खाजगी राज्यकारभार:**

होळकरांच्या खाजगीचा राज्यकारभार मल्हारराव होळकरांनी आपली पत्नी गौतमाबाईकडे सोपविलेला होता. ते आपल्या पत्नीस अतिशय सन्मानाची वागणूक देत असत. मल्हारराव होळकर त्याचाच एक भाग म्हणून ते ज्या ज्या वेळी युद्ध मोहिमावर जात त्यात मिळालेली लुट, खंडणी व उत्पन्न यांतील ठराविक हिस्सा आपल्या गौतमाबाईस देत असत. तेंव्हा मल्हारराव होळकरांनी पेशवे बाळाजी विश्वनाथ, बाजीराव थोरले, चिमाजीअप्पा सोबत

अनेक युद्ध मोहिमा काढून प्रचंड यश वा प्रदेश तसेच खंडणी मिळवून देण्यात सिंहाचा वाटा होता.

तेव्हा २० जानेवारी १७३४ ला बाजीरावाने मल्हारराव होळकरांच्या पत्नी गौतमाबाई त्यांच्या नावाने खाजगी जहागीरीची सनद दिली.[२१] बाजीराव पेशव्यांनी शिंदे, पवार, गायकवाड, दाभाडे, भोसले यांना खाजगी जहागीरी न देता केवळ मल्हारराव होळकराच्या घराण्यास दिली. ती सरकारी सरंजामी वा दौलती पासून खाजगीची दौलत ही पूर्णत: वेगळी व स्वतंत्र होती. त्यावर खुद्द होळकर घराण्यातील राज्यकर्ते वा सुभेदाराचाही त्यावर काहीही हक्क चालत नव्हता. तर केवळ होळकर घराण्यातील सुभेदार पदावर येणाऱ्याच्या पत्नीकडे वंशपरंपरागत पद्धतीने हक्क पुढे चालू ठेवण्यात आलेली होती. या खाजगी जहागीरीच्या उत्पन्नावर त्या स्त्रियांचाच पूर्ण अधिकार होता. त्यामुळे त्यातील उत्पन्नाचा व खर्चाचा अधिकार ही त्याच स्त्रीकडे होता. त्यामुळे या खाजगी जहागिरीच्या उत्पन्नाचा वा खर्चाचा हिशोब स्वतंत्र रित्या ठेवण्यात येऊ लागला. इ.स. १७३४ च्या सनदेत जरी दोन लाख त्र्यान्नव हजार रुपये उत्पन्नाची खाजगी जहागीरी असली तरी तिचा विस्तार होत जाऊन गौतमाबाईच्या हयातीत खाजगी विभागाचे उत्पन्न सात लक्ष रुपये मिळत होते.[२२] होळकर घराण्यातील खाजगी संपूर्ण स्वतंत्र व्यवस्था ही होळकर राज्याच्या विलीनिकरणापर्यंत चालू होती. याचा अर्थ असा की होळकरांची खाजगी जहागीर ही इ. स. १८१८ पर्यत अस्तित्वात होती.

**४.१.४.१.२ खाजगीची स्वतंत्र गादी व त्याचा प्रमुख**:

होळकर राज्यातील खाजगीची गादी स्वतंत्र असून त्या गादीवर होळकर कुटुंबातील प्रमुख सुभेदार असणाऱ्या प्रमुख स्त्रीस वा पत्नीस हक्क मिळत होता. त्याप्रमाणे मल्हारराव होळकरांच्या चारीही पत्नीपैकी पहिली पत्नी गौतमाबाई या प्रथम स्त्रिचा अधिकार म्हणून त्या गादीवर होता. अगदी त्याप्रमाणे पुढे गौतमाबाईच्या निधनानंतर खंडेरावांची पहिली पत्नी अहिल्याबाई यांच्याकडे खाजगीचा मालकी व राज्यकारभार आला. गौतमाबाईकडे खाजगीचा कारभार होता. तेंव्हा त्यांनी या उत्पन्नातून धार्मिक कार्ये केली. अहिल्याबाईकडे होळकरांच्या गादीवर अधिकार आल्यावर त्यांनी त्यांच्या खजिन्याचा वापर वा उपभोग स्वत: साठी नव्हे वा स्वत:च्या कुटूंबासही नव्हे तर सर्वसामान्य रयतेसाठी अनेक कार्ये हाती घेऊन त्यांच्या कल्याणात वाढ करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी संपूर्ण भारतभर अनेक ठिकाणी विहीरी, कालवे, अन्नछत्र, रस्ते व्यवस्था, मंदिरांची उभारणी, त्यांचा जीर्णोद्धार, अनेक नदी किनारी घाट, पाणपोईची व्यवस्था, सदावर्ते व छत्री बांधून त्यांनी जगासमोर एक आदर्श निर्माण करुन ठेवला.

होळकरांच्या .खाजगी जहागिरीचा कारभार हा स्वतंत्र चालत होता. त्या संबंधीचे शिक्के, मुद्रा व शील ही स्वतंत्र स्वरुपाची होती. म्हणून त्या 'श्रीमंत मातोश्री साहेब', 'महाराज मातोश्री साहेब', असा खाजगीच्या मालकीणीचा उल्लेख केलेला आढळतो.[२३]

अहिल्याबाई होळकर यांच्या पश्चात काही काळ रखमाबाई होळकर यांना खाजगीची सत्ता मिळाली. परंतु जास्त काळ त्यांना हे पद लाभले नाही. त्यानंतर खाजगीची उत्तम व्यवस्था राखण्याचे श्रेय केशरबाई ऊर्फ कृष्णाबाईस मिळाले.[२४] त्यानंतर यशवंतराव होळकरांची उप पत्नी तुळसाबाई हिलाही खाजगीचे अधिकार प्राप्त झाले होते. पण तिला आपल्या अधिकारांचा उपभोग करता आला की नाही? हे स्पष्ट होत नाही.[२५] म्हणजेच होळकर घराण्यातील खाजगीचा सर्वाधिकार हा सत्तेवर असलेल्या प्रथम स्त्रीस होता. ती स्त्री जीवंत असेपर्यंत ती त्या पदावर राहत असे. तसेच अहिल्याबाई व कृष्णाबाई यांनी खाजगीच्या अधिकार पदावर त्यांच्या पती निधनांनंतर त्या खाजगीचा कारभार पाहत होत्या. म्हणजे अहिल्याबाईनी मल्हारराव होळकर, मालेराव, तुकोजीराव या तिघांच्या राजकीय कारकिर्दीपर्यंत तर कृष्णाबाई इ.स. १८४९ पर्यंत हयात असल्याने संस्थानकाळात मल्हारराव दुसरे, मार्तण्डराव व हरिराव या तीन होळकर सत्ताधिशाच्या पत्नीना खाजगीचा अधिकार मिळाला नाही.[२७] पण त्यानंतर मात्र होळकर खाजगीच्या गादीसाठी होळकर घराण्यातील स्त्रियांमध्ये संघर्ष सुरु झाले.

**४.१.४.१.३ खाजगीचा दिवाण:**

पेशव्यांकडून होळकरांना मिळालेल्या दौलतीचा कारभार पाहण्यासाठी दिवाण म्हणून जशी नियुक्ती केली गेली होती. तसेच पेशव्यांकडून होळकरांना एकमेव खाजगीचा अधिकार मिळालेला होता. त्याचा कारभार पाहण्यासाठी सरकारी दौलती सारखे दिवाण पद निर्माण केलेले होते. त्या खाजगी दिवाण पदाची वस्त्रे होळकर शासकाकडून गोविंदपत गानु यांना देण्यात आलेली होती. यांनी खाजगीचा दिवाण म्हणून अनेक वर्ष इमान इतबारपणे काम पाहिले. म्हणून त्यांच्या निधनानंतर त्यांचा मुलगा गोपाळबाबा यास 'खाजगीचा दिवाण' म्हणून इ. स. १७९० मध्ये कारभार नियुक्त केलेले होते. गोविंदपंत गानूच्या घराण्यातच खाजगीचे दिवाणपद वंशपरंपरागत खूप काळ राहिल्याने या कुटूंबास 'खाजगीवाले' हे नाव रुढ झाले.[२७] होळकरांच्या खाजगी जहागिरीत अनेक परगणे व गावे होते. त्यांच्या उत्पन्नाचा व खर्चाचा हिशोब ठेवण्याचे काम या खाजगी जहागिरीच्या दिवाणाकडे होती. म्हणून होळकरांच्या खाजगीच्या दिवाणासही तेवढाचा मानसन्मान होता. गोविंदपतांच्या प्रामाणिकपणाची दखल अहिल्याबाईनी घेतलेली होती.[२८] सुरुवातीच्या काळात दिवाणाचे कार्य हे पेशव्याच्या फडणीसाप्रमाणे होते. पण होळकरशाहीत या पदास अधिकचे महत्व येऊन पुढे होळकराच्या वतीने खाजगीचा राज्यकारभार पाहण्यासाठी आणखीन एक दिवाण नेमण्यात येऊ लागला. त्यानुसार मल्हारराव होळकरांनी रामजी यादव पळशीकर यांची खाजगीचा दिवाण म्हणून नेमणूक केली. त्यास पेशव्यांनीही खाजगीचा दिवाण म्हणून संमती दिलेली होती. त्यानुसार हा खाजगीचा दिवाण हा होळकरांच्या प्रशासकीय यंत्रणेतील मुख्याधिकारी होता. त्यामुळे त्यासही सन्मानपूर्वक वस्त्रे, पालखी, हत्ती व नोकर चाकर हे होळकर सरकार मार्फत दिले जात असे.

होळकरांच्या खाजगीचा दिवाण मात्र इमान इतबारे दिवाणगिरी करीत असल्याने ते होळकर राज्यकर्त्यांचे ते नेहमी विश्वास पात्र राहिले. पळशीकर हे गौतमाबाई अहिल्याबाई तुकोजीराव, काशीराव यांच्या कारकीर्दीत रामराव आप्पाजी पळशीकर हे दिवाणगिरी चालवित होते. म्हणूनच अहिल्याबाई होळकर यांनी दरबाराच्या पत्रावर श्रीम्हाळसाकांत व शेवटी देवावे लिहिल्याचा पळशीकरांना अधिकार दिलेला होता. तसेच पळशीकरांना राज्याच्या उत्पन्नातून शेकडा दोन रुपये त्यांना देण्याची व्यवस्था केली होती.[२९]

**४.१.४.२ सरकारी जहागीर:**

मराठा राज्यात पेशव्याच्या वर्चस्वाखाली अनेक सरंजामी जहागिरदार होते. त्यांची त्या त्या प्रदेशातील त्यांच्या राजधानीत त्या सरंजामदाराची स्वतंत्र गादी असे. त्या गादीवर बसण्याचा अधिकार त्या घराण्यातील त्या प्रथम पुरुषास असे. पेशव्यांनी ज्या पद्धतीनुसार सरंजामी सरदारास सरंजामी पदाची वस्त्रे दिली जात होती. सरकारी जहागीरी अथवा दौलत म्हणजे सरकारी संपत्ती होय. सुभेदार मल्हारराव होळकर यांना चौऱ्याहत्तर लाख पन्नास हजार उत्पन्नाचा प्रदेश जहागीर म्हणून मिळालेला होता तो पुढे वाढत गेला. सरकारी खजिन्यातील पैसा हा फक्त सैन्याच्या खर्चासाठी व प्रजेच्या कामासाठी वा कल्याणासाठी खर्च करावा लागत असे या तत्वाचे किंवा नियमांचे अहिल्याबाई पूर्णपणे पालन करीत असत. सरकारी खजिन्यातील एका पैशाचा वापर न करता केवळ स्वत:ची खाजगी संपत्तीपणास लावून त्यांनी देशभरात विविध जनकल्याणाचे कामे हाती घेतली.

**४.१.४.२.१ सरकारी जहागिरीत वाढ:**

दौलतीचा दिवाण हा पेशव्यांच्या काळात सर्व सरदार वा सुभेदारांच्या दरबारात पेशव्यांच्या वतीने एक कारभारी नेमण्यात येऊ लागले. त्यानुसार होळकरांच्या दरबारात गंगाधर यशवंत चंद्रचुड नावाचा ब्राह्मण दिवाण म्हणून पेशव्यांनी नेमणूक केलेली होती. इ.स. १७३४ गंगाधर चंद्रचुड यांनी अंबाजीपंत पुरंदरे यास लिहिलेले पत्र त्यावरुन अंबाजी पंताच्या शिफारशीने चंद्रचुडास हे दिवाण पद मिळाले. असावे.[३०].

खानदेशातील उत्राण परगण्यातील मांडकी व नेवासे परगण्यातील दोन गावांची सरदेशमुखी व कित्येक ठिकाणचा मोकासा चंद्रचुडकडे असल्याचे दिसून येते.[३१] तसेच खाजगी दिवाण पळशीकरांनाही पारनेर मधील मांडवे व पळशी वगैरे गावे मिळालेली होती.[३२] मल्हारराव होळकरांनी या दोन दिवाणात दिवाणगिरीच्या कामकाजाची वाटणी करुन पंचावण्ण टक्के उत्पन्नाचा भाग चंद्रचुडकडे व पंचेचाळीस टक्के उत्पन्नाचा भाग यादवांकडे ठरवून दिलेला होता.[३३] म्हणजे पेशव्यांनी नियुक्त केलेल्या चंद्रचुडाला नायब दिवाण म्हणून कार्य करावे लागत असे. दौलतीच्या प्रदेशातून जमा होणाऱ्या महसूलातून ठराविक हिस्सा दिवाणला मिळत असे. याशिवाय शिबंदीच्या पगारातून एका रुपयामागे एक आणा याप्रमाणेही मिळत असे. तसेच हंगामाच्या दिवसात प्रत्येक गावातून दोन रुपये मिळण्याची व्यवस्था होती.[३४]

तसेच दौलतीच्या दिवाण यांना होळकर व पेशवे दरबारातून विविध ठिकाणचा जहागीरी, इनामे व हक्क मिळत होते. जसे की गंगाधार चंद्रचुड यांना पंच महाल देण्यात आला होता. तसेच पोतनिसीची आसामी व अंबाड परगण्याची फडणीशी दिली होती.[३५]

गंगोबा तात्या हे मुत्सद्दी असल्याने सतत चाळीस वर्ष मराठा व होळकर दरबारची कुशलतेने सोडवणूक करीत दिवाण पदी कार्य केले. पण मल्हारराव होळकरांच्या पश्चात होळकर जहागीरी आपल्या घशात घालण्यासाठी राघोबादादाशी हात मिळवणी करुन होळकरशाहीच्या मूळावर उठला. एवढे धाडस या दिवाणपदात होते. तत्कालीन अहिल्याबाईंनी मात्र हे आलेले संकंट अतिशय कुशलतेने व धाडसाने सामोरे जाऊन दोघांचा बंदोबस्त केला. त्यानंतर दिवाणपदी नारो गणेश यास नियुक्त केले. पण यांनी होळकरशाहीशी इमान इतबारे सेवा न करता स्वत:चे हित साधण्यावर भर दिल्याने मातोश्री अहिल्याबाई व तुकोजीराव यांच्या वैमनस्य निर्माण केले. नारोबा हा मोठा मसालेवाईक कुटील पुरुष होता. आपल्या मालकास हातातील खेळण करुन त्यास आपल्या बोटावर नाचविण्याची कला त्यास अप्रतिम साधली होती.[३६]

विठ्ठल महादेव किबे ऊर्फ तात्याजोग हे मल्हारराव दुसरे यांच्या कारकिर्दीत होळकरांचे दिवाण होते. त्याला जोग यांच्या चातुर्यानेच होळकर व इंग्रज यांच्यात चांगल्या वाटाघाटी घडवून आणून होळकरशाहीस चांगले दिवस आणून देण्यात यांचे फार मोठे योगदान आहे.

### ४.१.५ फडणविसांचे कायदे:

मातोश्री अहिल्याबाईने राजकीय दूरदृष्टी ठेवून आपल्या राज्यात व दरबारात अर्थिक सुधारणा घडवून आणण्यासाठी फडणीसांचे कायदे अमंलात आणून होळकर दप्तरात विशिष्ट चौकट निर्माण केलेली होती. त्यातील विविध कलमे पुढीलप्रमाणे आहेत.

१ पोते जामदारखान्यापैकी खर्चाच्या चिठया देण्याच्या फडणीसांनी दप्तरी ठेवून पोते व जामदारखान्यावर चिठ्ठी फडणिसांनी करावी. उचापतीच्या चिठया होतील त्याजवर तारीख फडणिसांनी घालावीं.

२ मुलकी महालांचा हिशोब रुजुवात पाहोन सनदी गैरसनदी निवडून कारभाऱ्यांनीं करावी. कमाविसदार यांस शिक्यानिशीं झडती करुन देणें. त्याजवर जमा व खर्च बाकी यांजवर एकूणात कारभारी यांनीं करावी. फडणिसांनी तारीख घालावी. मोर्तबसुद कारभारी यांनी करावें.

३ फौजेचा हिशोब करणें तो हजेरी बरहुकूम धनयाचे उरुबरु फडणिसांनी दप्तरीहून करून त्याजवर मखलासी कारभारी यांनी करावी. हजेरी फडणींस व सबनींस यांनी घेत जावी.

४ सिलेदार यांच्या खर्चाच्या व रोजमरे याच्या व किरकोळ यादी सबनिसांनी लिहाव्या त्याजवर आंख रुपयांचा घालणें. तो धन्याचे उरुबरु कारभारी यांनी घालावा आणि मखलासी करावी. धन्याची निशानी जाल्यावर फडणिसांनी पोत्यावर चिठ्ठी करावी.

५ महालपोते व जामदारखाना याची कीर्द एक दिवसाआड फडणिसांनी तयार करुन रुजवात करावी. जामदारखान्याची कीर्द फडणिसांचे कारकुनाने रुजवात करावी. बाकी कारखाने जिरायत—खाना, हत्तीखाना, उष्ट्रखाना वगैरेच्या हिशोब त्या कारखान्याचे कारकून आणतील ते फडनिसांनी तपासून कारभाऱ्यांसी दाखवून धन्याचे रुबरु फडशा करावा व त्यावर मखलासी कारभारी यांची व्हावी.

६ महालवार नेमणुकीच्या यादी ठरेल त्याप्रमाणें बेहडा फडणिसांनी लिहाव्या तारीख घालावी व मोर्तबसुद कारभारी यांनी करावी.

७ सनद किंवा चिठ्ठी देणें म्हणोन फडणिसांनी करुन दप्तरीहून सनद चिठया लिहाव्या.

८ समाईक, परमुलखी, जप्त्या व खंडण्या होतील त्याची याद व हिसाब सरकारचे मुतालकीचे फडणिसांकडे फडशे होतील त्याच्या नकला उभयतांकडील फडणिसांनी लिहून दयाव्या.

९ चिटणिसीपत्रे होतील त्यांत फडणिसीकडील असतील ती फडणिसांकडे बार व्हावीं. मसाला भरणें तो फडणिसांनी भरावा.

१० जामदारखान्याकडे कापड वगैरे खातें त्याची आंखपट्टी जमेची नफासुध्दा फडणीस पोतनीस यांनीं धरावी.

११ कीर्द फडणिसांनी पोते व जामदारखाना, रवासुदगी व दफा ते पत्रासुध्दा तयार करुन धन्यास दाखवावीं. धन्यानें ज्यास पहावयासी सांगितले त्यानें पहावीं कीर्दीवर धन्याची निशाणी व्हावी, अथवा धनी सांगेल त्यानें करावी.

१२ झडत्या फडणिसांनी तयार करवून धन्यास समजवाव्या. पागेकडील वगैरे कारखाने यांजकडील चदी व लागवड वगैरे यादी पागनिसांनी आणून त्याची चौकशी फडणिसांनी करुन कारभाऱ्यांस समजवाव्या व कारभाऱ्यानें धन्यास समजावून धन्याचें निशान व्हावें.

१३ शागीर्दपेशा देखील हशम कारकूनास मोघम रुपये दिल्हे असतील ते त्यांनी वाटावे रोजमरा हजेरी घेऊन वाटावे. पोतनिसांनी फडणिसांचे रुजवातीनें एकंदर हिशोब करुन मखलासी कारभाऱ्यानें करावी.

१४ सरंजामी याची चौकशी करणें पडेल तेव्हां फडणिसांनी कारभाऱ्यांसी समजावावी. सरंजामाचा खर्च दरसाल फडणिसांनी धन्यास समजावून करावा.[३७]

'फडणविसांचे कायदे' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या होळकर दप्तरातील नोंदी त्याची साक्ष देतात की, जमाखर्चाचा लेखाजोखा इतका अचूक व चोख होता. त्यामुळे होळकर राज्याची तिजोरी नेहमी भरलेली असे. त्याशिवाय होळकर नियुक्त केलेले होते हे गुमास्ते पद

राज्यात वा संस्थानात राहून खंडणी वसूल करण्याचे कार्य करीत असत. या कायद्याने होळकर राज्याची अर्थव्यवस्था मजबूत होण्यास मदत झाली. या कायद्याने कोणासही कोणत्याही प्रकराची अफरातफर करता येत नव्हती.

**४.१.६ होळकर राज्याचे प्रांत व परगणे:**

होळकर राज्याचा फार मोठा विभाग होता त्यास ‘सरकार’ म्हणटले जाई. या सरकारामध्ये ३० ते ४० जिल्हयांचा समावेश होत होता. याच सरकारास परगणा किंवा महाल असेही म्हणटले जात होते. या महालात ३०० खेड्यांचा समावेश होत होता. त्यात येणारे परगणे ही मोठया प्रामणत येत होते. होळकर राज्यात अनेक प्रांत होते. म्हणजेच होळकर राज्याची विभागणी ही अनेक प्रांतामध्ये केला जाई. या प्रांतालाच सरकार वा सुभा म्हणटले जाई.[३८] ते पुढीलप्रमाणे होते. माळवा, दक्षिण, स्वदेश, हिंदुस्थान, नेमाड, खानदेश, गंगथडी, हडोती, बुंदेलखंड, अंतरवेद, धुंधाड व जटवाडा असे होते.

तसेच होळकर राज्यात सव्वाशेच्या आसपास परगणे होते त्यात धुळे, खरगोण, शेगांव, झाबवे, झार्डा, इंदूर, बागदारा, बदडावद, बेटमे, बिजागड, ब्राह्मणगाव, कंजरडा, करही, करीहेडा, कायथे, कासेगाव, कोंच, कोंटे, कोठडे, कोरहाळे, कानसूळ, कसेरीया, कर्डे, कन्नोज, महत्पुर, महेश्वर, माचलपूर, मानपुरा, मल्हारगड, बिजागड, पिढावे, पिंपलोदा, थाळनेर, सिरोंज, दिंडोरी, किंदरा खुर्द, जिरापूर, निंबाहेडा, हसलपूर, भानपूर, पंचपहाड, पाटण, पाटोदे, राणीखेडा, रायपूर, रामपुराखुर्द, रामपूरा, रावेर, राजगड, संधारा, सुंदरशी, मुराबाद, सावेर, सोरू, सेनगीर, सुलतानपूर, सेंधवे, सेवगांव, उतरण, देपाळपूर देवळे, वाडीविजोता, वडेल, वेरूळ, वैजापूर, चंदणपूरी, चारूपिंपळी, चांदवड, चिखलदे, तराणे, जावरे, जैपूर, नंदवाई, नंदूरबार, नरवर मामोणी, नासिक, नारायणगड, नागलवाडी, नेमावर, अंबाड, आंबे, टोंक, आलमपूर, अडावद, अगबराबाद, गंगेरी पंचलाण, गांडापूर व गाळणा वगैरेचा समावेश होता.

छत्रपती शाहू महाराजांच्या नेतृत्वाखाली श्रीमंत पेशवे बाजीराव यांनी उत्तरेत आपल्या मराठा राज्याचा सरदार वा सुभेदारामार्फत फार मोठा विस्तार केलला होता. त्या जिंकलेल्या मोगलांच्या प्रदेशांची वाटणी पेशव्यांना आपल्या सुभेदारात वा जहागिरदारात व सरंजामदारात केल्याने मोगलांचे जिंकलेले परगणे त्या त्या सरदारांकडे कायमचे देऊन टाकलेले होते. त्यानुसार होळकर जहागीरीत वा राज्यात अनेक सुभ्यांचा समावेश होता. त्यामुळे होळकर राज्यांचे स्वतंत्र सुभे नसून अनेक सुभ्यातील सरकार, परगणे व गावे यांचा समावेश होता. तर छत्रपती शाहू व पेशवे बाजीराव यांच्या विस्तारवादी धोरणामुळे मराठा साम्राज्य सिमेत वाढ झाल्याने मराठा राज्यापासून ते क्षेत्र दूर होते म्हणून त्या सुभ्यांना सरसुभा म्हटले जाई. उदा. कोकण, खानदेश, माळवा, कर्नाटक, गुजरात व बुंदेलखंड इ.[३९] मराठा राज्याचे वा साम्राज्याचे विभाजन हे सरसुभा वा सुभा मध्ये केले जाई. सुभ्याचे विभाजन सरकारमध्ये केले जाई. सरकारचे परगण्यात किंवा महालात तर परगण्याची तर्फात विभागणी केलेली असे.[४०]

खानदेशात या सुभ्यात नंदूरबार, बालगण, बिजागड, हंडिया, अशीरगड, गाळणा या सहा सरकारचा वा जिल्हयांचा समावेश होता. शाहू दप्तरामध्ये खानदेश सुभ्यामधील सरकारची परगण्यांची माहिती मिळते, त्यात अशिरगड— चौतीस, बालगण— सव्वीस, नंदूरबार—चार, गाळणा—सात, बिज्जागड—तेहतीस आणि हंडीया—सोळा अशी एकूण एकशे वीस संख्या मिळते.[४१]

परगणे सुलतानपुरमध्ये दोनशे ऐंशी तर परगणे नंदूरबारमध्ये केवळ चौप्पन गावे होती. तर हंडिया सरकारमधील कालभिंत (मकडाई) परगण्यात सातशे, परगणे सावलीगडमध्ये सातशे, सजनी पिंपलोद परगण्यात तिनशे साठ, खांडवा परगण्यात तीनशे साठ, पुणासे परगण्यात ८४, आटोदे परगण्यात २४ तर पूरणी परगण्यात केवळ १२ गावे होती.

### ४.१.७ होळकर राज्याचे प्रशासकीय विभाग:

होळकर शासकांनी अंतर्गत शांततेसाठी व सूरक्षिततेसाठी सर्व प्रथम ठग व दरोडोखोरांचा कांयमचा बंदोबस्त करून त्यांचीही शक्ती राज्याच्या कार्यात यशस्वीपणे उपयोगात आणून राज्याची नीट घडी बसविली. होळकर राज्यामध्ये साधारणत: सव्वाशेच्या घरात परगणे होते. त्यानंतर त्यांनी आपल्या महसूल व्यवस्थेच्या सोयीस्करतेसाठी होळकर राज्याचे तीन विभाग पाडले.

| | |
|---|---|
| **४.१.७.१** | **उत्तर विभाग:** |
| | यात इन्दौर, तराना व राजपुतांच्या काही भागाचा समावेश होतो. हाच सर्वात मोठा विभाग होता. यातून मोठ्या प्रमाणात चौथाई वसूल होत होती. |
| **४.१.७.२** | **मध्य विभाग:** |
| | या विभागात महेश्वर व त्यांच्या जवळपासच्या भागाचा समावेश होता. |
| **४.१.७.३** | **दक्षिण विभाग:** |
| | या तिसऱ्या विभागात सातपुडा पर्वताच्या दक्षिण भागातील प्रदेशाचा समावेश होता.[४२] |

रयतेचे हित समोर ठेऊन तत्कालीन परिस्थितीचा विचार करून प्रशासकीय कार्ये केली जात होती. रयतेचे हित हाच होळकर शासकांचा प्रमुख हेतु होता.

### ४.१.८ होळकर राज्याचे कारभारी:

शिवाजी महाराजांनी अष्टप्रधान मंडळाच्या जोरावर हिंदवी स्वराज्याची स्थापना केली हे गमक होळकर शासकांनी ओळखूण आपलेही प्रधान मंडळ स्थापन केले. अहिल्याबाईच्या दरबारात गोविंद गानू हे होळकर संस्थानचा खाजगीचा कारभारी होते. विसाजी शामराज देशपांडे, नारो शंकर रांझोकर, शिवाजी गोपाल व भारमलदादा होळकर यासारखे मंत्री होते. यांच्या मदतीने अहिल्याबाईने राज्यकारभाराची घडी बसविण्याचा प्रयत्न केला.

होळकरांचे राज्य हे मोठ्या विस्तृत प्रदेशात पसरलेले होते. होळकराच्या दौलतीचा कारभाराचा हिशोब पाहण्यासाठी पुण्याच्या पेशव्याकडून होळकरांचा कारभारी म्हणून गंगाधर यशवंत चंद्रचुड याची नियुक्ती केलेली होती. गंगोबा तात्या चंद्रचुड, अन्याबा पळशीकर, छोटे मुंकुंदराव, रामजी यादव, गणेश विठ्ठल, पारशर दादाजी, अप्पाजी जगदेव, राजाराम रणछोड, रावजी महादेव, विसाजी शामराज, केसो भिकाजी, गोविंदपंत गानु, नारो गणेश रांझेकर व बाळाजीपंत दप्तरदार या सारख्या कारभाऱ्यांच्या मदतीने होळकर सत्ताधीशांनी आपले प्रशासन सूरळीत चालविले.[४३] पण काही कारभाऱ्यांनी जाणूण बुजुन त्रासही देण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांचे होळकर शासकांपुढे काहीही चालले नाही.

**४.१.९ होळकर राज्याच्या दरबाराचे कार्ये:**

होळकर घराण्यातील मल्हारराव, मालेराव, तुकोजीराव, काशीराव व यशवंतराव हे कर्तेपुरुष सतत युद्ध मोहिमावर जावे लागत होत. त्यामुळे त्यांना आपल्या राज्यापासून वा राजधानी पासून दूर रहावे लागत असे. त्यामुळे त्यांचा दैनंदिन राजदरबार ही ते ज्या ठिकाणी त्यांचा मुक्काम असेल. त्या ठिकाणी भरत असे. तेथून आपल्या दूर असलेल्या सरदारांना, अधिकाऱ्यांना, राज्यकारभाराविषयी सूचना व आदेश पाठविले जात असत. त्याप्रमाणेच अहिल्याबाईनांही राज्यांच्या जबाबदारीविषयी रसद पुरवठा विषयी, दारुगोळा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पाठविण्यासाठी सतत मल्हारराव होळकर व तुकोजीराव होळकर पत्र व्यवहार करुन महेश्वर दरबारची स्थिती जाणून घेत असत. त्यानुसार सासरे मल्हारराव होळकरांच्या सल्लानुसार महेश्वर दरबारचे दैनंदिन कामकाज चालत होते. होळकर शासक अहिल्याबाईची दिनचर्या ही अतिशय साधी व सभ्य स्वरूपाची होती. अहिल्याबाई ह्या सूर्योदयापूर्वी घटका अडीच घटका उठून स्नान करीत व नंतर पूजाअर्च्या करीत. या नंतर त्या नियमितकालपर्यंत पुराण श्रवणास बसत. नंतर दानें देवून त्या आपणासमक्ष ब्राह्मणांस भोजनें घालीत. हे होते आहे तोंच त्यांचे ताट वाढून येई. त्यांचे स्वत:चे भोजनास सारे शासभाज्यांचे पदार्थ असत. त्या आपलें भोजन आटपटयावर पुन:कांही वेळ परमेश्वर स्तवन करुन थोडा वेळ वामकुक्षी करीत. नंतर पोशाख करुन त्या सरकारी कामकाज करावयास दरबारात जात असत. जेंव्हा दरबारांत जात तेंव्हा बहुधा दोन प्रहर होत. तेथें सूर्यास्तापर्यंत कामकाज चाले. याउपर एक प्रहर पूजाअर्चा फराळ वगैरे कृत्यांत जाई मग रात्री सरकारी काम मध्यरात्रीपर्यंत चाले.[४४] मातोश्री अहिल्याबाईच्या दिनचर्यावरून होळकर शासक हे अतिशय साधी राहणी व उच्च विचारसरणी होती हे स्पष्ट होते.

अहिल्याबाई आपल्या दरबारातील शिवाजी गोपाळ, शरीफभाई, पिसाजी शामराज व कृष्णाजी तानदेव यांच्याशी राज्यकारभार करतांना सल्ला—मसलत करीत असत. अहिल्याबाईच्या किर्तीमुळे अनेक विद्‌वान, राजकारणी, मुत्सूद्दी राजेमहाराजे भेटीस येत. त्यात महादजी शिंदे अलिबहादूर, रणेखानभाई, हिंगणे व हरिपंत फडके भेटीस आलेले होते.

### ४.१.९.१ होळकरांच्या दरबारातील अधिकारी:

होळकरांच्या प्रशासनात अतिशय महत्वाचा गुण म्हणजे एकदा नियुक्त केलेला अधिकारी सहसा बदला जात नसते त्याने जर गैरवर्तन केले. तरच त्यास पदावरुन निलंबीत केले जाई. किंवा त्यास समज दिला जात असे, पण चांगले व्यवस्थित कार्य करण्याचा कमाविसदाराला प्रदीर्घ नोकरी करण्यांची संधी दिली जात होती. होळकर दरबारात अनेक कारकून मंडळी होती. राघो रावजी, शिवाजी गोपाळ, जयराम रावजी, अप्पाजी राजाराम, महिपत गिरमाजी, विनायक बाजीराव, व्यंकोजी लक्षुमण, व्यंकोजी मुकुंद, राघोराम, महादजी रूख्मानंद, नानाजी गंगाधर, गिरमाजी व्यंकटेश, नरहर पिलाजी सबनीस, गोविंद पुरूषोत्तम मुनसी, गोविंद कृष्ण, गोविंद जितेंद्र, काशी शिवाजी, खंडो यशवंत, रामाजी मोरेश्वर, अंताजी जगनाथ, त्रिंबक विनायक व हरिहर उद्धव पोतनीस यासारखे अनेक दरबारातील अधिकारी मंडळी होते.

### ४.१.९.१.१ होळकर राज्याचे सुभेदार:

होळकरांच्या राज्यात संपन्नता, सधनता, शांतता ही अतिशय चांगल्या प्रकारची होती. कारण त्यांच्या राज्यांची सप्तांगे ही स्वामी (राजा) मंत्री, प्रजा, सैन्य, कोश, कोटकिल्ला व सुहद्‌गण (आप्त इष्ट मित्र) ही राज्याची सात अंगे होत व ती एकमेकांस पोषक होत.[४५] याप्रमाणे होळकर शासकाचेही ही सप्तांगे प्रभावी होते. कामंदक यांनी सांगितल्यानुसार होळकर सुभेदारांनी राज्याची ही सप्तांगे स्विकारलेली होते. होळकर राज्याचे स्वामी मल्हारराव होळकर व अहिल्याबाई होळकर यांनी आपल्या राज्याचा राज्य कारभार करतांना या सात अंगाचा अतिशय चांगल्या प्रकारे योजनाबद्ध अंगीकार केलेला होता. यातील सर्वात महत्वाचा अंग म्हणजे होळकर राज्यातील राजा म्हणजे सुभेदार होय. होळकर सरदारांनी वा सुभेदारांनी नियुक्त केलेला अधिकारी वा मंत्री हा कायम स्वरूपी असल्याने त्याच्यावर प्रामाणिकपणे कार्य करण्याची जबाबदारी ही अनाहुतपणे येत होती. त्यातूनच त्यांच्या कार्याची एकनिष्ठता दिसून येते.

होळकरशाहीत सर्वोच्च पद होते ते म्हणजे ‘सुभेदार’ हे होय. मराठा राज्यांच्या प्रशासनासाठी सरसुभ्याची निर्मीती करुन मुलकी प्रशासन सोयीस्कर केले. या सरसुभ्यावरच्या अधिकाऱ्यास सरसुभेदार म्हणटले जाई. हा सरसुभेदार संपूर्ण सरसुभ्याचा मुख्याधिकारी होता. त्यांची नेमणूक ही पेशवे यांच्याकडून मानाची वस्त्रे व इतर सन्मानदर्शक साहित्य देऊन नेमणूक केली जात होती. प्रथमत: मल्हारराव होळकर यांची माळव्याच्या ‘सुभेदार’ पदी नियुक्ती केलेली होती. सुभ्यातील निरनिराळ्या प्रशासकीय विभागामध्ये व अधिकाऱ्यामध्ये सहकार्य निर्माण करणे, शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करणे, भ्रष्टाचाराला आळा घालणे, सुभ्याचा हिशोब सरकारला सादर करणे, रयतेचे कल्याण साधने, जास्तीत जास्त जमीन लागवडीखाली आणून सरकारचे उत्पन्न वाढविणे, सुभ्याचा आर्थिक व्यवहार व न्यायालयीन

कामकाज पाहणे, महसूल पाहणे, किल्यांच्या प्रशासनाशी संबंधीत असणाऱ्या सर्व अधिकाऱ्यावर देखरेख ठेवणे, रयतेच्या अडी–अडचणी सरकार दरबारी कळविणे, उठाव, अराजक यांचा बिमोड करणे. अशी अनेक कामे सरसुभेदाराला पार पाडावी लागत असत.[४६] म्हणजेच सरसुभेदाराचा हा सुभ्याच्या मुलकी, लष्करी न्यायालयीन प्रशासनाचा मुख्य अधिकरी होता. मराठा सुभेदाराच्या हाताखाली परगणे वा महालाच्या मामलतदार व कमाविसदार यांचीही नेमणूक सरकाराकडून केली जात होती. सुभेदारांनी आपल्या राज्यातील विविध अधिकारी वर्गावर देखरेख नियंत्रण व वर्चस्व ठेवण्याचे कार्य करुन सरकार आणि रयत यांच्यातील दुवा म्हणूनही कार्य करावे लागत होते.

सुभेदाराचे प्रशासनासाठी स्वतंत्र कार्यालय असे. या कर्यालयात त्याच्या मदतीला दिवान, फडणवीस, मुजुमदार, दप्तरदार व कारकून वगैरे लोक असत. सुभेदारला मिळणारे वेतन आणि सुविधा या पदास साजेशा होत्या असे म्हणता येईल. नारो कृष्णा या सरसुभेदाराला वार्षिक १०,००० रू. वेतन मिळत असल्याची माहिती मिळते. याशिवाय त्यास वेगवेगळे हक्क गावागावातून मिळते होते.[४७]

सरसुभेदाराला व्यापक अधिकार मिळालेले असले तरी, सरकारचे त्यावर कडक नियत्रंण असे सुरसुभेदाराला आपल्या कामात नेहमी दक्ष राहील याची सरकार काळजी घेत असे. सरसुभेदारीवर नेमणुक करताना संबधीत व्यक्तीशी त्याचे अधिकार, हक्क, जबाबदाऱ्या नमूद करून करारपत्र केले जात असे.[४८]

होळकर राज्यातील दरबारात महत्वाचा मंत्री हा दिवाण असे त्या दिवाणपदी पेशवे बाजीराव यांनी गंगाधर यशवंत चंद्रचुड यांनी नियुक्ती केलेली होती. त्यानंतर अहिल्याबाईंनी रामाजी यादव पळशीकर यांनी नियुक्ती केलेली होती. गंगाधर तात्या हे मुळातच लेखणी बहाद्दर व तलवार बहादूर अंगी असलेल्या गुणामुळे ते नेहमी मल्हारराव होळकर यांच्या समवेत युद्ध मोहिमेवर जाऊन बऱ्याच वेळा त्यांनी मल्हाररावांसोबत यशस्वीपणे कार्य केलेले आहे. पण हयाच दिवाणांनी अहिल्याबाईच्या काळात स्वार्थीपणा दाखवून होळकर राज्य हडप करण्याचा प्रयत्न केला होता.

होळकर शासक अहिल्याबाईंचे अष्टप्रधान मंडळ राज्याच्या कारभारासाठी नियुक्त केलेले होते. ते पुढीलप्रमाणे होते.

| | | |
|---|---|---|
| १ | तुकोजीराव होळकर | सुभेदार |
| २ | मुकुंदराव | दौलतीचे दिवाण |
| ३ | शरिफभाई | सेनानायक ते सेनापती |
| ४ | भारमल दादा | अंतर्गत सूरक्षा व्यवस्थेचे प्रमुख व सल्लागार |
| ५ | शिवाजी गोपाळ | आर्थिक व्यवहार प्रमुख |
| ६ | विसाजी शमराज | प्रमुख सल्लागार व पुणे पेशवे दरबाराची कामे |

| ७ | गोविंदराव भानू | खासगीकडील सर्वकामे |
|---|---|---|
| ८ | आबाजी रणसोड | जमीन महसूल विषयक कामे |
| ९ | कृष्णाजी मुराद | कारभारी [४९] |

अहिल्याबाईस कोणत्याही कारभाऱ्यानी राज्यकारभार करतांना म्हणावे तसे सहकार्य केलेले नाही. अहिल्याबाईच्या कारकीर्दीत मुकुंदराव, छोटे मुकुंदराव, गोविंदराव गाानू व बाळाजीपंत हे चार दिवाण होऊन गेले. मातोश्री अहिल्याबाई बदल सर जॉन माल्कम साहेबास अत्यंत आदर होता. त्यांना पुराण ऐकण्याची गोडी असल्यानें अंगी लौकरच बहुश्रुतपणा व चतुरता आली. चांगलया लिहिण्यातली वर्मे कळूं लागली. स्वत:ही मोठे मार्मिक व खोंचदार लिहीत असत. बाईची पारमार्थिक बाजू पाहिली असतां कात्यायनाचीं आठवण येते.

मराठ्यांच्या इतिहासात राज्यकारभार वा प्रशासकीय ब्राह्मण उपाध्याय यांना विविध पदावर नियुक्त केले जात असे. त्या प्रमाणेच होळकर राज्यातही अनेक ब्राह्मण प्रशासकीय कार्यात सहभागी करुन घेतलेले होते. विशेषत: अहिल्याबाईच्या कारकिर्दीमध्ये प्रशासकीय कार्यासह धार्मीक कार्य व इतर विविध कला गुण असलेले विद्‌वान यांना दरबारात व राज्यात मानाचे स्थान होते. याशिवाय त्यांना राज्याश्रय दिलेला होता. त्यांचा गुरु पुराणिक अंबादास हा होता. त्यास मातोश्रीनी गाव धर्मार्थ कार्याबदल लावून दिले होते. इज्जतअसार आनंदराव कृष्ण कमाविसदार परगणे शेवगां. आजतर्फ कप्तान हेनरी पाटंजर साहेब बहादूर कलेक्टर सुभे अमदानगर सलामआंर्की, अंबादास पुराणिक पुणतांबेकर यांस मौजे बालमटाकळी परगणेमजकूर हा गांव होळकर सरकारातून संसारबेगमीस धर्मार्थ दिला.[५०] तरी पण मातोश्री अहिल्याबाई राज्यकारभार करतांना सर्वाचे ऐकूण घेऊन त्या सारासार विचार करुन निर्णय घेत असत.

गंगोबा तात्याच्या कारस्थानामुळे त्यास पदमुक्त व्हावे लागले. त्याच्यानंतर दिवाणपदी नारो गणेश रांझोकर यांना नियुक्त केले. पुणें दरबारच्या संमतीनें नारो गणेश रांझेकर यांस दिवाणगिरीचा वस्त्रें मिळाली.[५१] हे तुकोजीराव होळकर यांच्या समवेत नेहमी युद्ध मोहिमावर जावे लागले. पण त्यांनी तुकोजीराव व मातोश्री अहिल्याबाई होळकर यांच्या दरबारात चांगले कार्य करण्या ऐवजी त्यांनी विघासक कार्य केल्याने त्यांचा शेवटी यापदावरून मुक्त व्हावे लागले.

विसाजी शामजी देशपांडे, नारो गणेश नंतर पेशव्यांनी त्यास होळकरांचे दिवाण म्हणून नियुक्त केले. तो केवळ नामधार दिवाण म्हणून राहिला. पण विसाजी देशपांडे यांस दिवाण पदाची कामे न मिळताही त्यांनी कार्ये केला. पेशव्यांचे वकिल लिहीतात १) राज्यसूत्रें चालविण्याचे खलबत करण्याकडे अहिल्याबाई, बिसाजी शामराज, मावशीबाई, आणि महादजी शिंदे, २) भोपाळवाले पठाण येथें आले ते अस्सल पहिले किल्लेदाराचे भाऊबंद आहेत. त्यांचे बोलणें की, तुम्ही सर्व प्रकारे आमचें साहिल्य करणें. बिसाजी शामराव व कृष्णाजी तानदेव आपले मुत्सद्दी बसवून दोन तीन दिवस ये गोष्टीचे खलबत केलें. ३) भोजनसमयीं (महादजींस

मेजवानी) राजश्री बिसाजी शामराज व नारो शिवदेव व बाईकडील मंडळी, असे जवळीच बसले होते. ४) वस्त्रें व जवाहिर (पेशव्यांचे लग्नास पाठवावयाचें) बाई व गोविंद रघुनाथ गानू उभयंता बसून काढली. तदोत्तर विसाजी शामराज यांस बोलावून दाखविले. ५) बक्षीगिरीबद्दल सालिना रुपये तीनशेंची नेमणूक ७) रावेर परगण्यातील मुजूमदारीची अर्धी नेमणूक. ७) नथ्थूराम आणि धुळा चौरी जिरापूर जिल्हयाचे यांस पत्र की मौजे बटवाडा परगणे जिरापूर येथील वसूल बिसाजी शामराज यांस देणे. ८) सनद जहागिर राजश्री आबाजी विष्णू कमाविसदार पगरणे सुलतानपूर यांस. स्नेहांकित तुकोजी होळकर दंडवत राजश्री बिसाजी शामराज यांनी रदारीत सेवा एकनिष्टपणे केली यास्तव यांचे चालविणें आवश्यक जाणोन तर्फ शहादे परगणे मजकूरपैकी गांव येणें प्रमाणे १. मौजे मादे, २. मौजे धुरखेड ३मौजे सोनवल ४. मौजे सिरुड ५. मौजे बेले ६. मौजे नांदेड एकूण सहा गांवे, तुम्हांकडून दूर करुन मशारनिल्हेकडे खेरीज हक्कदार व इनामदार व मोकासा व जकात उभामार्ग करुन बाकी अम्मल जहागिर व बाबती व सरदेशमुखी दरोबस्त कुलबाब कुलकानू साहित सालमजकूरपासोन जहागिर द्यावयाचे इरुन सनदा अलाहिदा देऊन हे पत्र तुम्हास सादर केलें असे. छ. ७ रबिलावल (ता. ६ एप्रिल १७७८) (९) कै. पंत मशारनिल्हे सरकारपदरचे. त्यांमागें त्यांचे मुलांबाळीचे चालविणे अगत्य जाणोन मौजे बटावद परगणे जिरापूर हा गांव बिसाजीचे पुत्र त्रिंबक विश्वनाथ यांजकडे करार करुन दिल्हा. त्रिंबक लहान, यांचे चालविणे अगत्य, हया अर्थाची सनद. १० (देवी अहिल्याबाईचे नाना फडणीस यांस पत्र) मौजे निंबसाखर व बरकुटे परगणे इंदापूर हे गांव सरकारांतून पूर्वीपासून विसाजी शामराजांकडे. आता ते शहाजाद्याकडे जाणार. कोणेविशीं उपसर्ग न लागे तें करावें. त्यांचे पुत्रावर लोभ करुन चालविणे आपलेकडे आहे.[५२] तेंव्हा या पत्रावरुन विसाजी देशपांडे यांनी होळकर दरबारात जे कार्य केले. त्यामुळे त्यांचा दरबारात मानसन्मान व दर्जा विशेष होता. त्यामुळेच अहिल्याबाईनी त्यांच्या एकनिष्ठपणे केलेल्या कार्यामुळे त्यांना जहागीरीची सनद दिलेली होती.

मल्हारराव होळकरांनी आपल्या दौलतीचा राज्यकारभार करण्यासाठी सोयीच्या दृष्टीने तीन विभाग करुन जी एक प्रशासकीय चौकट निर्माण केली. तिच प्रशासकीय व्यवस्था पुढे अहिल्याबाई होळकर यांनी चालू ठेवली होती. तसेच जेंव्हा तुकोजीराव होळकर उत्तरेत मोहीमावर जात. तेंव्हा ते उतर विभागाचे प्रशासन पाहत असत. तसेच माळव्यातील तीन महाल व नेमाड मधील एक महाल या चार महालाचीही ते व्यवस्था पाहत होते. त्याचेवळी मातोश्री अहिल्याबाई मध्य विभागाचे व दक्षिण विभागाचे प्रशासकीय यंत्रणा सांभाळत असत. त्या आपल्या खाजगी जहागीरीची व्यवस्था पहात होत्या. शिवाय त्या दौलतीचा राज्यकारभार पाहत होत्या.

### ४.१.९.१.२ दौलतीचा दिवाण:

होळकर दिवाणची नियुक्ती ही पुण्याच्या पेशव्याकडून केली जात होती. होळकर राज्याच्या 'दिवाण' या सर्वोच्च पदी गंगाधर चंद्रचूड, परशरपंत व नारो गणेश शौचे, रामजी यादव पळशीकर व रामराव नारायण यांनी काम केलेले आहे.[५३] अहिल्याबाईच्या काळात दिवाण या पदावर गंगाधर चंद्रचूड, पराशरपंत व नारो गणेश शौचे यांनी काम केलेले आहे. होळकर जहागिरीमधील दौलतीचे दिवाण हे सुभेदार सोबत नेहमी युद्ध मोहिमावर जात असत त्यावेळी त्यांच्या वतीने दिवाणगिरीचे कार्ये त्यांचे कुटुंबीय किंवा नायब दिवाण कार्ये पूर्ण करीत असत. होळकरांच्या राजदरबारात जी कार्ये पार पाडली जात ती सुव्यवस्थित असत. त्यांनी ते कार्य व्यवस्थितपणे पार पाडावीत यासाठी अहिल्याबाई होळकर यांनी इ.स. १७७९ मध्ये फडणीसांचे कायदे अंमलात आणले. त्यामुळे दरबाराचे कामकाज उत्तम प्रकारे चालण्यास मदत झाली. दरबार म्हणून ओळखल्या जाणाऱ्या एका खोलीत मातोश्री अहिल्याबाई या नेहमी पांढरी स्वच्छ घोंगडी घातलेली राजगादी होती. अहिल्याबाई या चादरीवर बसून स्वच्छ व चोख राज्यकारभार करीत असत. अहिल्याबाईचा राज्यकारभार व त्यांची शिस्त अतिशय चोख होते. म्हणून दरबारात एक चांगलाच आदरयुक्त दबाव व दरारा होता.

अहिल्याबाई होळकर यांच्या मृत्यूनंतर तुकोजीराव व त्यांचा मुलगा काशीराव हे पुण्यात पेशव्यांकडेच अधिक काळ राहिल्याने महेश्वर दरबारची उत्कृष्ठ कामकाज पद्धती व दरबारातील स्थैर्य संपुष्टात येऊन त्यानंतर यशवंतराव होळकर यांनी संपूर्ण हयात सततच्या युद्ध मोहिमावर घालविल्याने त्यांचा राज्यकारभार हा तेथूनच चालत होता. तर महेश्वर दरबारी भारमलदादा यांच्यामार्फत इतर कार्यालयीन कामकाज व रयतेच्या संदर्भात प्रशासकीय कामे पार पाडली जात होती. यशवंतरावाच्या मृत्यूनंतर म्हणजेच मराठा सत्तेच्या अस्तानंतर त्यांचा मुलगा मल्हारराव दुसरा यांनी महेश्वरहून आपली राजधानी इंदूर येथे इ.स. १८१८ ला स्थलांतरीत केली.[५४]

इंदूर संस्थानचा सर्व कागदपत्रे तात्या जोग ऊर्फ विठ्ठल महादेव किबे यांच्या नावाने निघत असत यांचे वकिल हरि सदाशिव जोग हे मातोश्री अहिल्याबाईच्या कारकीर्दीत मोठे पेढीवाले होते. यांना दोन मुले बाळाजी महादेव किबे व विठ्ठल महादेव किबे हे दोघेही बंधू महाराज यशवंतराव होळकर यांच्या सैन्यात आपल्या फौजेनिशी सेवेत दाखल झाले. हे दोघेही बंधू कारकूनी व कमाविस कामात तरबेज होते. यशवंतराव होळकरांच्या लष्करात तीन कंपु होते. फुलन साहेबांच्या नंतर तात्या जोग यांनी प्रमुख म्हणून काम केले. अनेक लढ्यात तात्या जोगनी पुढाकार घेऊन बाजी मारुन यश संपादन केले. त्यामुळे स्वत: यशवंतरावांनी तात्याचा पराक्रम पाहून शाब्बासकी दिलेली होती.

देशमुख यांच्या जोडीस मदतीसाठी लिहिता वाचत येणारा ब्राह्मण जातीचा दिवाण नियुक्त केलेला असे. परगण्याचा कारभार पाहण्याची प्रमुख जबाबदारी सोपविलेली असे.

दिवाण हा मामलतदार किंवा कमाविसदाराला दुय्यम अधिकारी होता. तरीही मामलेदारच्या पत्रव्यवहारावर दिवाणची सही लागत असे.[५५] यावरून असे लक्षात येते की, मामलतदार व कमाविसदार यांच्या कामाची माहिती ही दिवाणास व्हावी. जेणेकरून ते मामलतदार व कमाविसदार परगण्यात काय कार्य करीत आहेत. हे दिवाणमार्फत सरकारला समजावे, हा या मागचा उद्देश दिसून येतो. दरखदाराचे परगण्यातील प्रशासकीय व संरक्षण व्यवस्थेवर नियंत्रण ठेवत असे. दरखदारास मिळणारे वेतन हे दिवाणाच्या कार्यभारावर अवलंबून होते.

इ. स. १७६३ मध्ये आबाजी महादेव याची सुलतानपूर परगण्यात दिवाण म्हणून नियुक्ती झालेली होती. त्याच्या हातून दिवाणगिरीचे काम करून घ्यावे व त्यास ५०० रू वेतन द्यावे. अशी सुचना सुलतानपूरच्या कमाविसदारास मल्हारराव होळकरांनी केलेली होती.[५६]

पेशवेकालीन प्रांतिक प्रशासनात मामलेदार किंवा मामलतदार हा एक महत्वाचा अधिकारी असे. एलफिस्टन रिपोर्ट मध्ये 'मोठ्या विभागाच्या अधिकारी तो मामलेदार व छोट्या विभागाच्या अधिकारी तो कमाविसदार' अशी माहिती मिळते. ज्या परगण्यांतून अधिक महसूल गोळा होत असे. त्या परगण्यसाठी मामलेदार नेमण्याची पद्धत असावी असे वाटते. होळकरांच्या सुलतानपूर व नंदुरबार या परगण्यात मामलेदार असल्याच्या नोंदी मिळतात. त्याप्रमाणेच इतर परगण्यांतही मामलेदार असल्याची कागपत्रामधून माहिती मिळते. मामलेदाराच्या नेमणुकीचे अधिकार पेशव्याकडे असले तरी सरंजामदार देखील आपल्या प्रदेशात मामलेदार नियुक्त करू शकत असत.

खरगोणच्या मामलेदारच्या नेमणूकी संदर्भात उदभवलेले प्रकरण २३ जानेवारी १७८२ रोजी विठ्ठल शामराजने महेश्वरहून पुण्यास पाठविलेल्या पत्रात असा मजकुर आहे की, 'खरगोणची मामलत येथे बाईना कृष्णाजी तानदेव यांस दिली आहे. त्याजकडून रसद वगैरे वहीवाट चालत आहे. हे तेथेही ठाऊक असता. तेथे राजश्री तुकोजी होळकर यांनी कासी रंगनाथ यांस खरगोणची मामलत सांगितली येथे बाईनी कृणाजीपंतास दिली हे त्यांस विदित असता? मशारनिल्हेची रसद देऊन सनद घेतल्या.'[५७] याविषयीचा बराच मजकुर या पत्रात आहे. येथे या पुराव्याचे महत्व असे की, एकास अहिल्याबाईने व एकास तुकोजीने मामलत दिली, पण पेशव्याचा या नेमणुकीत प्रत्यक्ष कोणताच सहभाग नाही. अर्थात पेशवे नेमणुकीस नंतर मंजुरी देत असले तरी परंतु, मामलेदाराच्या नेमणुकीचे अधिकार सरंजामदासही होते हे स्पष्ट होते. काशीराव होळकर यांनी १९ जुलै १७९९ रोजी सुलतानपूर परगण्याच्या कानुनगो देसाईस लिहिलेल्या पत्रात दंग्यामुळे मामलत सोडून गेलेल्या भागवत यांच्या जागी नवीन मामलेदार पाठवित आहे असे कळविले आहे. अशा कित्येक पुरक सदर्भातून वरील निष्कर्षास आधार मिळतो.[५८]

मामलेदारचे पद हे तसे मोठे प्रतिष्ठेचे व मानसन्मानाचे मानले जात होते. मामलेदार आपल्या परगण्याचा प्रमुख जबाबदार अधिकारी होता. त्याच्याकडे आपल्या प्रदेशात शांतता व

सुव्यवस्था राखणे, जास्तीत जास्त जमिनीच्या लागवडीसाठी प्रयत्न करणे. आपल्या प्रदेशाचा महसूल गोळा करणे. इतर संरक्षण विषयक उपाययोजना करणे. अशी कार्य मामलेदाराला पार पाडावी लागत होती. होळकरांच्या मामलेदाराने कोणती कार्य करावीत याची अहिल्याबाईच्या काळातील ११ कलमांची एक यादी दिलेली आहे.

| | |
|---|---|
| १ | नेमणुकीबदल यादी महाल मजकूर. मामलेदार वेतन पालखी व शिबंदी नामजात ठाणेजात व भोजनखर्च तीस हजार कुलखर्च. |
| १ | सरकारचे जमीदार,फडणीस,दरखदार आहेत त्यांचे अभागाप्रमाणें काम घ्यावें |
| १ | सरकार मजकूरी भील, भूमिये, चोरचोरटे वगैरे बंदोबस्त उत्तम प्रकारें राखावा. |
| १ | परगणे मजकूरी रयत राजी राखून आबादी, लावणी उत्तम प्रकारें करावी. |
| १ | वर्षासनें, रोजीनदार, देवस्थानें सालाबादप्रमाणे चालविणें. |
| १ | जमीदारी वतनसंबंधी लावरिस व भूमीगतमाल येईल तो दाखल करावा. |
| १ | गोविंद शिवराम रुपये ३०० |
| १ | महालीं जास्त शिबंदी दरोबस्त ५०० पाचशें |
| १ | आफत फितूरी मुलूख सूट दरोबस्तेप्रमाणे दिली जाईल. |
| १ | हूड जहाल हिशेबाचे समयीं चौकशी करुन मुजरा दिले जाईल. |
| १ | मामलतीचा एकंदर आकडा. तो व्यक्तीवर व स्थानावर अवलंबून राहील.[५९] |

त्यावरून हे स्पष्ट होते की, मामलेदारानी आपल्या कामाच्या चाकोरीत राहून प्रशासनात सहाय्य करणे असे होते. मामलेदाराना त्यावेळी चांगलेच वेतन मिळत होते. याशिवाय सोबत इतरही सोयी मिळत होत्या.

१ दिनकर अनंत हा परगणे सुलतानपुरचा मामलेदार होता. त्याला इ.स. १७७०—७१ साली २००० रू. वार्षिक वेतन होते याशिवाय पालखी, मशालजी आणि अब्दागिरीसाठी १०६० रूपयाची तरतुद होती असे एकुण ३०६० रू. सदर वर्षी मामलेदारवर खर्च झाले होते.

२ मामलेदाराचे स्वतंत्र कार्यालय असे या कार्यालयात त्याच्या हाताखाली दिवाण, फडणीस, मुजूमदार, आणि कारकून काम करीत परगणे सुलतानपूरच्या मामलेंदार कार्यालयात इ. स. १७७१ मध्ये सात लोक असून त्याच्यांवर वेतनपोटी ३२५० रू खर्च दर्शविला आहे.[६०]

मामलेदारावर पेंशवे तसेच सरदार वा सरसुभेदार यांचे ही चांगले नियंत्रणं असे. त्यामुळे मामलेदार प्रमाणिकपणे काम करण्यासाठी मदत होत असे. कोणत्या मामलेदारांनी आपल्या कार्यात कसूर केल्याचे सिद्ध झाल्यास त्यास सेवेतून कमी करण्याची शिक्षा दिली जात असे. परंतु होळकर राज्यात एखाद्या मामलेदाराकडे जी मामलती दिलेली मामलती ही कायम ठेवण्यावर मोठा भर असे. पेशवे सवाई माधवराव महेश्वर दरबारात असणाऱ्या विठ्ठल शामराज याला लिहितात की, पहिले मामलेदार असतील किंवा नवे त्यानी (होळकरांनी) केले असतील त्याची घालमेल करू नये...[६१]

होळकर राज्यातही काही ठिकाणी मामलेदारच्या हाताखाली कमाविसदारही असत. खानदेशातील बोदवड हा परगणा विश्वावसराव रामंचद्र या मामलेदाराकडे होता. त्याचा हाताखाली काम करण्याऱ्यात कमाविसदारचा उल्लेख आहे.[६२] यावरून असे स्पष्ट होते की मामलेदार हा महसूल व्यवस्थेचा, न्याय व्यवस्थेचा व इतर प्रशासन व्यवस्थेच्या बाबतीत त्याच्या ताब्यातील किंवा प्रदेशात तो मुख्य अधिकारी होता.

#### ४.१.९.१.३ मामलेदार:

मामलेदारांची नेमणूक पेशव्यांकडून केली जात होती. मामलेदार हे होळकर राज्यात पेशव्याचे कारभारी म्हणून कार्य करीत होते. मामलेदाराचे प्रमुख काम म्हणजे परगण्यचे दिवाणी व फौजदारी चे सर्व अधिकार सांभाळणे हे होते. परगण्याचा महसूल वसूल करणे. प्रजेचे व शेती पिकांचे रक्षण करीत असत. महाल व कार्यातचा कारभार कमाविसदार हवालदार किंवा महालकरी काम पाहत होते.[६३]

होळकर संस्थानामधील शासक सतत युद्ध मोहिमावर जावे लागत असल्याने राज्याची मुलकी प्रशासन व्यवस्था खंबीरपणे सांभाळण्याचे काम त्या त्या शासकांच्या राणीस करावे लागे. सुभेदार मल्हारराव यांच्या कारकिर्दीमध्ये गौतमाबाई व त्यानंतर अहिल्याबाईनी मुलकी राज्यकारभार चांगल्याप्रकारे सांभाळत असत.

### ४.१.१० होळकरांचे शासकांचे परराष्ट्र धोरण:

होळकरांचे प्रतिनिधी म्हणून भारतातील अनेक राज्यकर्त्याच्या दरबारात आपले वकील ठेवलेले होते. त्याचप्रमाणे होळकरांच्या दरबारात इतर राज्यांचेही वकील होते. अहिल्याबाईनी परराज्य संबंध व्यवस्थीत राहवे यासाठी अयोध्या, उदयपूर, कोटा, ग्वाल्हेर, जयपूर, डूरंगपूर, दिल्ली, देवळे, प्रतापगड, नागपूर, पुणे, भोपाळ, लखनौ व हैद्रबाद अशा पंचेवीस संस्थानात आपले वकील नियुक्त केलेले होते. यावरून त्यांचे परराज्यासंबधीचे धोरण स्पष्ट होते. तसेच त्यासत्ताधीशांचे वकील ही होळकर राज्यात ठेवून त्यांच्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्यास महत्वपूर्ण मदत त्यांना झालेली होती. हेच त्यांच्या यशाचे मोठे गमक होते.मल्हारराव, मालेराव, अहिल्याबाई, तुकोजीराव व यशवंतराव यांच्या दरम्यानचा इ.स.१७१८ ते इ. स. १८१८ पर्यंतच एका शतकांचे परराष्ट्र धोरण हे यशस्वी व धडाडीचे मुलुखगिरी गाजविण्यात प्रामुख्याने गेले. त्यामुळे शेजारील व आसपासचे राजे महाराजे होळकर सत्ताधीशांचे पूर्णपणे अंकित बनलेले होते. ते होळकर सरकारला ठरलेली खंडणी नियमित देत होते.

#### ४.१.१०.१ परकीय राज्यात होळकरांचे वकील:

होळकर शासकांचे दुत शेजारील राज्याच्या दरबारी ठेवलेले होते. त्याच्याद्वारे आपल्या व त्यांच्या राज्यात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करणे सोयीचे व सरल होण्यास उपयुक्त ठरले. हे मध्ययुगील भारताच्या इतिहासात दुत पाठविणे हा होळकर शासकांच्या प्रशासन धोरणाचे खरे गमक होते. ते परराष्ट्रातील वकील पुढीलप्रमाणे आहेत.

| अ.क्र. | संस्थान | होळकराचे परराज्यातील वकील |
|---|---|---|
| १ | उदेपूर | राजश्री भगवंतराव जगताप |
| २ | जयपूर | रा. मार्तंडराव अप्पाजी |
| ३ | हैद्रबाद | रा. माधवराव लक्ष्मण |
| ४ | अयोध्या | राजश्री खंडो जगदेवराव |
| ५ | ग्वाल्हेर | राजश्री यमाजी मोरेश्वर |
| ६ | पुणे | राजश्री आप्पाजी जखदेव |
| ७ | नागपूर | राजश्री यंकोजी कश्ष्णराव |
| ८ | लखनौ | राजश्री मनोहर खंडेराव |
| ९ | भोपाळ | रा. जिवाजी गिरमाजी |
| १० | कोटा | राजश्री बापूजी आनंदराव |
| ११ | दिल्ली | राजश्री बहादूर सिंग |
| १२ | डोंगरपूर | राजश्री व्यंकोजी शिवाजी |
| १३ | देवळे, प्रतापगड | राजश्री विनायक सदाशिव.[६४] |

या राज्यात आपले वकील नियुक्त केलेले होते. यावरून त्यांचे आणि शेजारील राज्याचे संबंध मित्रत्वाचे होते हे स्पष्ट होते.

### ४.१.१०.२ इतर राज्याचे वकील होळकरशाहीत:

ज्याप्रमाणे होळकराचे वकील हे दुसऱ्याच्या राज्यात होते त्याप्रमाणे इतर ही राज्यांचे वकील होळकर दरबारात होते. होळकरांचे दरबारी इतर संस्थानिकांचे वकील होते त्याचा खुलासा:

| | | |
|---|---|---|
| १ | पुणे | श्री केसो भिकाजी दानार |
| २ | ग्वाल्हेर | श्री शिवाजी नारायण व भागवत आनंत |
| ३ | मारवाड | श्री जसकर्ण मेहता व श्री दत्तराम |
| ४ | भरतपूर | श्री भगवंत गोविंद |
| ५ | जयपूर | श्री सवाईराम व श्री शिवाजी |
| ६ | उदेपूर | श्री काशीनाथ पचोली |
| ७ | जोधपूर | श्री जगन्नाथ कृष्ण व कृष्णाजी जगन्नाथ |
| ८ | सातारा | श्री रामराव सदाशिव |
| ९ | वानवळे | श्री रावजी कचेश्वर व चिमणजी बाबूराव |
| १० | फार्शी व उर्दुनवीस | श्री गोविंद पुरषोत्तम मुनसी. |

### ४.१.११ होळकरांच्या सल्याने चालणारे संस्थानिक:

मातोश्री अहिल्याबाई यांच्या सल्याने चालणारे संस्थानिके पुढीलप्रमाणे होते.

| | |
|---|---|
| १ संस्थान बडवणी | १ संस्थान देवास |
| १ संस्थान झाबुवे | १ संस्थान सितामाहू.[६५] |

यावरून असे स्पष्ट होते की होळकर शासक हे नेहमी न्यायी भूमिकेतून राज्याकारभार करणारे शासक होते म्हणून इतर शेजारील संस्थानिक सुद्धा आपल्या राज्याचा कारभार हा होळकर शासकांच्या सल्याने करणे अधिक हितवाह समजून तशा प्रकारची अनुभूती घेवून राज्य करीत होते. हा होळकर राज्यकर्त्यासाठी निश्चितच भूषण होते.

**४.१.१२ टाकसाळ:**

होळकर राज्यास स्वत:ची टाकसाळ सुरू करण्याचा अधिकार पेशव्यांनी दिलेला होता त्याप्रमाणे सुभेदार मल्हारराव होळकर यांनी चांदवडच्या किल्ल्यात टाकसाळ सुरू केलेली होती. त्या टाकसाळीत चांदीचे नाणे पाडण्यात येत होती. तर अहिल्याबाई होळकर यांनी इन्दौर येथे टाकसाळ सुरू केलेली होती. शिवार्पण केलेल्या राज्याचे प्रतीक म्हणून होळकर राज्याच्या चांदीच्या नाण्यावर शिवलिंग बिल्व पत्रांनी कोरलेली मुद्रा सन १७६७ पासून महेश्वरास प्रारंभ केली. मल्हारनगर (इंदूर) येथील नाण्यावर सूर्य चिन्हाला आणखी अंकित केले होते.[६६]

होळकरांची स्वत:ची टाकसाळ होती. पण शेजारच्या अंमलशाही नाणे वापरत असल्यामुळे त्याच्या सोबत व्यापार करण्यास समस्या येत. ही समस्या होळकर शासक अहिल्याबाईने मोठ्या कुशलतेने सोडविल्या. अंमलशाही नाण्यापेक्षा आपल्या नाण्यांचे मूल्य बारा टक्क्याने वाढून आपल्या राज्यातील उद्योगधंद्यांना व व्यापाऱ्यांना दिलासा दिला.

कसबे महेश्वर येथील टाकसाळ व इंदूरचे टांकसाळेचा ऐवज रुपया चांगला पडतो. त्यांस सराफ, सावकार, वगैरे बटटा घेतात म्हणून विदित झालें... तरी तुम्ही येविसीं ताकीद करून सांगणे. इतकियावर कोण्हीही हल्ली शिकक्यावर बट्टा घेतल्यास त्याजपासोन गुन्हेगारी घेणें.मागती बोभाट आलिया उपयोगी पडणार नाही.[६७] या २६ ऑगस्ट १७७६ च्या पत्रावरून असे दिसून येते की, अहिल्याबाईकडे तक्रार आल्याने त्यांनी सक्त ताकीद करणारे पत्र इंदूर परगण्याचे कमाविसदार खंडो बाबुराव व सरकार बिजागडचे कमाविसदार त्रिंबक बाबुराव यांना अशी पत्रे पाठवून आदेश दिले. यातून त्यांचे रयतेबद्दलचे जागरूकता स्पष्ट होते.

**४.१.१३ शेतीसाठी सुधारणा:**

होळकर शासकाकडून नैसर्गिक आपत्तीच्यावेळी शेतकऱ्यांस शेतसारा वसूलीत सूट दिली जात होती. शेतकऱ्यांना मजुरांचा पगार व पुढील वर्षाचे बियाने यासाठी धान्य काढल्यावर राहिलेल्या धान्यातून निम्मा किंवा चौथा हिस्सा सरकारात कर रूपाने द्यावा लागे. याला बटाई महसूल म्हणत. 'शेती सुधारणेतच राज्याची सुधारणा असून, प्रजेच्या जगण्याचे

प्रश्न शेती उत्पन्नातूनच सुटत असतात. शेती व्यवसाय हा राजा आणि प्रजेचा आधारभूत पाया आहे.'[६८]

राज्यातील शेतकरी, कष्टकरी, सामान्य माणूस हा केंद्रबिंदू मानून त्यांनी आपले आर्थिक धोरण राबविले. भिल्ल, आदिवासी व भूमीहीन शेतमजुरांना माळरान, पडीक जमीन कसावयास देऊन रोजगार निर्मिती व अन्नधान्य उत्पादन वाढीस प्रेरणा दिली. सरकारने कसावयास दिलेल्या जमिनीत शेतकऱ्यांनी २० फळझाडे लावावीत. त्यातील ११ झाडे दौलतीची (सरकारची) व ९ झाडे शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढीसाठी उपयुक्त ठरली. तसेच जलसंवर्धनासाठी विहिरी व तलाव खोदले. नदी, तलावांना बंधारे घालून शेतीसाठी जलसिंचनाच्या सोई उपलब्ध करून दिल्या. माझ्या राज्यातील गरिबातल्या गरीब माणसाला सुख आणि स्थैर्य मिळाले पाहिजे. 'मातब्बर अधिकरी सैन्याच्या स्वयंपाकासाठी मोठ—मोठी झाडे तोडावयास सांगतात. यासाठी सक्त ताकीद आहे की, औषधी उपयुक्त व फडझाडे आदी वृक्षांना हात न लावावा. वृक्ष वर्षा—दोन वर्षात होत नाहीत. लेकरांसारखे बहुतकाळ जतन करावे लागतात. वृक्ष तोडणे म्हणजे प्रजापीडाच. म्हणून जीर्ण झाडच फक्त तोडावे.'[६९]

**४.१.१३.१ आदर्श कर रचना:**

मध्ययुगीन काळात मराठा राज्यात तत्कालीन महसूल पद्धतीनुसार काही गावे भाडेपट्टयाने ही दिली जात होती. त्या पद्धतीने होळकर राज्यास काहीच फायदा होत नसल्याचा कारणाने ही पद्धत अहिल्याबाईनी बंद केली. त्यासाठी गावातील त्यांच्या उत्पन्नाचा चौथा हिस्सा घेण्याची पद्धत सुरु केली. अहिल्याबाईंनी आदर्श कर रचनेचा अवलंब केला. मल्हारराव होळकर यांच्या काळातील कायद्यामधील जाच कमी करून कायद्यात आवश्यक ते फेरफार केले. कर पद्धतीत सुलभपणा आणला. कर ऐसा ठेवावा की जो प्रजेस सुखा—समाधानाने देता यावा. शेतकऱ्यांचे उत्पन्न अजमावून कर वसूली करण्यात येत असे. त्यासाठी होळकर शासक अहिल्याबाई आपल्या अधिकाऱ्याना म्हणत असत की, होळकर राज्य हे केवळ वसूलीसाठी आणि युध्दासाठी नसून समाज कल्याणसाठी असते. हे होळकर शाहीने दाखवून दिले.[७०]

होळकर राज्यात मोठ्या प्रमाणात भिल्ल गोंड रामोशी लोक मोठ्याप्रमाणत चोरी करून प्रवाशांना लूटत असत. प्रवासी कर आकारणीची एक अभिनव संकल्पना त्यांनी रुजविली. ज्यामध्ये प्रवासी सुरक्षिततेला प्राधान्य देण्यात आले होते. प्रवासी व यात्रेकरुंच्या रक्षणाची जबाबदारी भिल्ल व गोंड यांचेवर सोपविलेली होती. प्रवाशी संरक्षणाच्या बदल्यात प्रवासी कर देत असत. महसूलातून भिल्ल व गोंड यांना खंडणी दिली जात असे. या लोकांचा प्रवाशांना होणारा उपद्रव कमी करणे हा यामागचा हेतु होता. या प्रवाशावर बसविलेल्या करास 'भिलकवडी' असे म्हणत. या भिलकवडीच्या करातून भिल्लाची उपजिवीका होत असे.

जामघाट, त्या काळात या घाटातून प्रवास करायचा म्हणटलं की, लूटमार व्हायची, ती होऊ नये म्हणून प्रवाशांना सुरक्षित पोहचविण्यासाठी 'हात झुलाई' कर वसूल केला जात असे. गणपतराव यांच्याकडे या कराची रक्कम बरीच साठली. तेव्हा त्यांनी मातोश्रींना विचारलं, 'या कराचं काय करायचं?' तेव्हा त्यावर उपाय सुचवला तो असा की, जामघाटच्या मध्यभागी एक दरवाजा बांधण्यासाठी तो पैसा खर्च करण्याचा सल्ला दिलाला. होळकर शासक हे लोकांकडून कर रूपाने घेतलेला पैसा हा लोकांच्या हितासाठी खर्च झाला पाहिजे.[७०] तो राज्यकर्त्याने स्वत:साठी कधीच खर्चावयाचा नसतो. याविचाराचे होळकर शासक होते.

**४.१.११ कर पद्धतीत अचूक सुधारणा:**

आपल्या प्रजेला भरावा लागणारा कर सुखासमाधानाने भरता यावा अशी होती. शेतकऱ्यांच्या शेती उत्पन्नावर कर आधारीत होता. तसेच गावे भाडेपट्टीने देण्याची पद्धत बंद केली. महसूल वसूलीचे अधिकार पाटील पटवारी यांना दिले. जमीनदार व शेतकरी यांना त्यांच्या हक्काच्या जमिनी मिळवून दिल्या. महसूल पद्धतीत बदल केला. शेतीच्या विकासावर देशाचा विकास अवलंबून असल्याने शेती व्यापारावर विशेष भर दिला. व्यापाऱ्यांना प्रोत्साहन व मदत दिली. होळकर शासक अहिल्याबाईनी आपल्या राज्यात कर रचना सौम्य व समानतेच्या तत्वावर ठेवली होती.

**४.१.१४ राज्याच्या उत्पन्नाचे साधने:**

पेशव बाळाजी विश्वनाथ यांनी मोगल बादशहाकडून या दोन्ही सनदा प्राप्त करुन मोगलाच्या सहा सुभ्यातून म्हणजेच हैदराबाद, खानदेश, बेदर, वऱ्हाड, औरंगाबाद, विजापूर यातून चौथाई वसूल करण्याचा हक्क मराठ्यांना मिळविला होता.[७१] त्यानुसार सुभेदार मल्हारराव होळकरांनी पेशव्यास व स्वत:च्या राज्यास परमुलूखातून अमाप चौथाई व सरदेशमुखी तसेच विविध खंडणी व दंड वसूल केल्या जात होत्या, मराठ्यांनी गुजरात, माळवा व खानदेशात आपला राज्यकारभार सुरु केला. त्यातून मिळणारे उत्पन्न हे ठराविक हिस्यानुसार पेशवे व सरंजामदार यांच्यात वाटप केला जात होता.

होळकर राज्यास अनेक बाबीपासून सरकारी तिजोरीत उत्पन्न विविध मार्गाने जमा होत होते. त्यातील प्रमुख घटक हा जमीन महसूल हा होता. जेवढी जमीन शेत उत्पादनासाठी अधिक वापरली जाई. तेवढा अधिक महसूल शासनास जमा होत असे. होळकर राज्यातील महसूल वसूलीसाठी अनेक अधिकारी वर्ग कार्यरत होता. होळकर शासक आपल्या अधिकाऱ्यांमार्फत राज्यातील शेतकऱ्याना शेती लागवडीसाठी प्रेरणा व प्रोत्साहन देत असत. हा महसूल शेतकऱ्यास जाचक ठरले असा दर असू नये. यासाठी वेळोवेळी आपल्या अधिकाऱ्यास सूचना दिल्या जात होत्या. त्यामुळे शेतकऱ्यास झेपेल इतका माफक कर वसूल केला जात होता.

राज्याच्या उत्पन्नाचा दुसरा स्त्रोत हा सरदेशमुखी व चौथाई असे. होळकर राज्यातून उत्पन्नाच्या दहावा हिस्सा हा महसूल स्वरुपात वसूल केला जात होता. तर चौथाई ही परमुलाखातून उत्पन्नाच्या चौथा हिस्सा महसूल म्हणून वसूल केला जात होता.[७२]

होळकर शासक हे आपल्या राज्यातील रयतेकडून कमीत कमी दराने शेतसारा वसूल केला जात होता. सायर म्हणजे जी गावे किंवा जमीन इनाम म्हणून दिलेल्या भागात जो महसूल वसूल करणे होय. खंडणी म्हणजे युद्ध मोहिमेचा एकूण खर्च शत्रूकडून दंडासहीत वसूल केलेली रक्कम होय. विविध कर आयात–निर्यात केल्या जाणाऱ्या वस्तू व व्यापाऱ्याकडून वसूल केलेला करांचा समावेश होतो. तसेच जप्ती व दंड हे होळकर राज्याच्या उत्पन्नाचे साधने होती. होळकर शासकांचा राजकोश हा सालिना उत्पन्न पाऊनकोटी होते.[७३]

अहिल्याबाईनी तुकोजीरावांस १० जून १७७६ रोजी पत्र पाठवून कर्जपट्टी सरंजामे तुळसाजी वाघ व गोविंदरावजी बुळे व सुलतानजी लांभाते, व मानाजी लांभाते व ढमढेरे यांच्याकडून निर्गम येथें करून घेतला. बाकीचा ऐवज फणसे, वाघमारे, भागवत महाडिक राजोळे, खटके वगैरे यांजकडून येणे त्यांसी निकट करून ऐवज घेऊन इकडेस रवानगी करावी. ..[७४] यापत्रावरून असे स्पष्ट होते की, होळकर शासक हे राज्याच्या महसूल वसूली बाबत काटेकोरपणे तो वसूल केला जात होता. त्यामुळेच होळकर शासकांचा खजिन्याची तिजोरी नेहमी भरलेली होती.

**४.१.१४.१ होळकर राज्यात अनेक कर:**

होळकर राज्यात अनेक प्रकारचे कर वसूल केले जात होते त्यापैकी काही पेशव्यांचे तर काही होळकरांचे कर वसूल केले जात होते. त्यात जकात कर, अवकाराकारी कर, उद्योगधंद्यावरील कर, व्यवसाय कर, वनचराई, दहकंपट्टी अमराई, भिल्लपट्टी, आरबपट्टी व घासदाणा यासरख्या करांचा समावेश होत होता.

**४.१.१४.२ युद्ध खंडणी**

खंडणी पेशव्यासोबत सुभेदार वा सरंजामदार स्वत: अथवा पेशव्या सोबत पर राज्यात युद्ध मोहिमा काढून अनेक राजेमहाराजे त्यांच्याकडून युद्ध खंडणी वसूल केली जाई. त्या खंडणीतील ठराविक हिस्सेवारी ठरलेली असायची त्यानुसार आपापसात वाटणी केली जात होती. इ.स. १७६४ मध्ये भिमसिंहाला मल्हाररावांनी उदयपूरच्या गादीवर बसविले तेंव्हा २५,००००० रुपये मराठयांना देण्याचे भिमसिंहाने मान्य केले होते. त्यापैकी ५,००००० रुपये होळकर, ३,००००० रुपये शिंदे आणि १७,००००० रुपये पेशवे अशी वाटणी झाली होती.

दिल्लीच्या गादीवर शहाअलमाला पुन्हा बसविण्याच्या कामगिरीबदद्ल तुकोजी होळकर व इतर मराठा सरदारांना इ.स. १७७१ मध्ये २५,००००० रुपये मिळाले होते.[७५]

मोठ मोठया कामगिऱ्या पार पाडल्याबदद्ल किंवा महत्वपूर्ण कामाबदद्ल पेशवे सरकारही बक्षिसे देत असे. इ.स. १७५० मध्ये उमेदसिंगाकडून खंडणी वसुल केल्याबदद्ल

पेशव्यांनी होळकरांना १,५०,००० व शिंदयांस १,५०,००० असे ३,००००० रुपये बक्षिस म्हणून दिले होते.[८२]

बऱ्याच वेळा खंडणी देण्यास काही राजे रजवाड्याकडून विलंब होत असे. अशी थकीत खंडणी वसूलीसाठी मोहीम काढावी लागत असे तर काही राजे ठरलेली खंडणी चुकती करण्याऐवजी टाळाटाळ करुन देण्यास विलंब करीत असत. तर काही जण खंडणी देण्याऐवजी उलट बंडखोरी करुन लढाईच्या तयारीत असत. अशाना पुन्हा पराभूत करुन त्यांच्यावर जास्तीची खंडणी वसूल केली जात होती. जे राजे नियमित स्वरुपात खंडणी वेळोवेळी देत असत अशा राज्यांना टाकेदार म्हणटले जाई. होळकर राज्यात असे टाकेदार अनेक होते म्हणजेच मल्हारराव होळकर ते यशवंतराव होळकर पर्यंत नियमित स्वरुपात खंडणी देणारे अनेक राज्य होती.

**४.१.१४.३ टाकेवाले:**

इ.स. १८५३—५४ मध्ये टाकेवाले यांच्याकडून चालत आलेले महालवार व मौजेवार यादी पुढीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| १३५८—२—० | प्रगणे इंदूर हिंमतसिंग ठाकूर बढेकर यांजकडे... |
| १६६६—०—० | प्रगणे देपालपूर टाकेदाखललपूर मिलकी गावांबदल |
| ६७६६—०—० | प्रगणे रामपुरा |
| ६२९७—०—० | प्रगणे मनासा |
| ३७७—०—० | प्रगणे सावेर कानुगो यांजकडे |
| ३९०—०—० | प्रगणे चंदवासा पैकी मौजे कुरावण |
| ६०० —०—० | प्रगणे काठाफोड रावछतरसिंग यांजकडे |
| ९००—०—० | प्रगणे हासलपूर मिमानसिंग भूमिया |
| ८१०—०—० | सरकार बिजागड |
| ८५७५—०—० | प्रगणे गरोठ |
| ८५८२—०—० | परगणे संस्थान मानपुरा |
| २४८०—०—० | ता जाडी कंबार्डा व जामुण्या |
| ५२१६—०—० | प्रगणे नाराणगड विजेसिंग ठाकुराकडे |
| ६५८४—०—० | प्राो चंदवासाबइल ठराव |
| ३७२—०—० | प्राो सुनेल कोठडी |
| ५८०—०—० | प्राो चिखलदे. बरह्या ठराव |
| १२०९२—०—० | प्राो जिरापूर, माचलपुर |
| २५००—०—० | प्रगणे संधारा राजसिंग ठाकुर मौजे ढाबळा देह १ |
| १५८४७—०—० | प्रगणे थांदले, पेटलावद,व राजे गोपाळसिंग झाबवेकराकडून...[७६] |

यावरून हे स्पष्ट होते की, होळकर शासकांना या महालातून अथवा परगण्यातून नियमित स्वरूपात ठरलेला महसूल मिळत होता.

### ४.१.१४.४ युद्धातील लुट:

मराठे सरदार शत्रू पक्षात जाऊन मोठ्या प्रमाणात लूटमार करीत असत. त्यात शत्रूचा एखादा प्रदेश, किल्ला, गोटा, तळ, सैन्य, बाजारबुणगे व शहर इत्यादी लुटून त्यात सापडलेले सोने, भांडे, रोकड, घोडे, हत्ती, उंट, दागिने, शस्त्रास्त्रे बैल व इतर साहित्य इत्यादीचा समावेश होत होता. मराठा सरदार होळकर नेहमी युद्ध मोहिमावर आघाडीवर व सतत युद्धावर जात असल्याने त्यांच्या हाती मोठ्या प्रमाणात शत्रुची लूट सापडली जाई. तेंव्हा ती लुट लूटून घेतल्यावर त्यांचे ठरलेल्या वाटणीनुसार हिस्से पाडून ते शिंदे व पेशवे यास नियमित रवाना केले जात होती. भलेही शिंदे वा पेशवे मोहिमेत वा विजयात किंवा लूटीत सहभागी नसले तरी, त्यांना ती ठरलेल्या हिस्स्यानुसार पोच केली जाई.

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी दिल्लीचा बादशहाच्या सिंकदराबाद येथील छावणीवर रात्री पहाटेच्या वेळीच अचानक हल्ला केला. होळकर सैन्यातील पठाणानी बादशहाची बेगम मलकाजमानीस नग्न होईपर्यत तिला लूटत असतांना ती ‘मल्हार कहॉ है.’ अशी ती ओरड केली. तेंव्हा सुभेदारांनी लुटणाऱ्या पठाणास दूर करुन तिच्या अंगावर आपल्या कमरेचा शेला काढुन तिच्या अंगावर फेकला व तिची अब्रु वाचली. म्हणजेच या लूटीत सुभेदार स्त्रीयांच्या अब्रुना जपत. शत्रुची फक्त लुट लुटली जावी असा सक्त आदेश होता. या लुटीत त्यांना बादशहाच्या पाचशे तोफा, लाखोची रोकड, उंची वस्त्रे व सामान, जड जवाहिरे, रथ व तंबू इत्यादी हाती लागले.

त्याच प्रमाणे तुकोजीराव होळकर यांनीही मल्हाररावाच्या सोबत राहून अनेक स्वाऱ्या करीत लूट जमा करीत असत. त्यानंतर यशवंतराव होळकर यांनीही होळकर राज्यास शत्रूच्या लूटीपासून अमाप संपत्ती जमा करुन ती इंग्रजांना भारतातून हाकलून लावण्यासाठी तोफा व सैन्यावर मोठया प्रमाणावर खर्च केली. त्यांनी भारतभर लूटीचे सत्र चालू ठेवले. याची भिती इंग्रजासह दौलतराव शिंदे खुद्द पेशवे बाजीरावास ही वाटत होती

### ४.१.१४.५ नजराने वा भेटी:

अठाराव्या शतकात राजे महाराजे एखाद्या शुभ प्रसंगी वा भेटीगाठी दरम्यान ऐकमेकांना नजराने भेट म्हणून देत होते. त्या भेटीतून मिळलेले धन हे राज्याच्या उत्पन्नाचे साधन म्हणून उपयोगी पडत असे. तसेच उचित शौर्याबदल बक्षीस दिले जात होते. तर शुभ कार्यक्रमास मोठ्या प्रमाणात भेट वस्तू देण्याची प्रथा होती. होळकर शासकांना उतरेतील राजकरणात हस्तक्षेप करुन अनेकांना मदत व न्याय दिलेला होता. त्यासाठी अनेक वेळा नजराने वा भेटी मिळत होत्या.

दिल्ली बादशहाने सुभेदार मल्हाररावांच्या खंडेरावांस भेटी दरम्यान भेट देवून सन्मान केलेला होता. त्याचप्रमाणे यशवंतराव होळकर यांच्या मुलीच्या लग्नात अनेक राजेमहाराजांनी अनेक स्वरुपात भेट वस्तू देवून सन्मान केलेला होता. अशा प्रकारची होळकर शासकांना विविध प्रसंगावरुन वा शौयावरुन अनेकजण भेट अमुल्य वस्तु देवून सन्मान करीत असत. त्यामुळे होळकर शाहीचा खजिना सरकारी व खाजगी दोन्ही जहागीरीत वाढ होण्यास मदत होत होती.

राज्यातील अनेक व्यक्तीकडून ही वेगवेगळया माध्यमातून उत्पन्न जमा होत असे. न्यायालयातील वादी वा प्रतिवादी यांच्याकडून ठराविक प्रकरणातून उत्पन्न मिळत असे.

१४ मार्च १७६५ रोजी अहिल्याबाईंनी पत्र पाठवून त्रिंबकराव शिंदे चौढीकर यांसी तुह्मांकडून देखिले असेत रुपये १५२० पंधराशे वीस तरी सदर्हू पंधराशेवीस शेरीनजराणा सालमजकुर ऐवजी देऊन कबज घेणें जाणिजे किल्ले सेंघवे येथें कारखानियास खर्चास पूर्वी बेगमी केली होती त्याचा खर्च होऊन झाडा आला तो तुह्मांकडे पाठविला आहे.[७७]

तसेच एखाद्या सावकराचे कर्ज वसूल करून दिल्या बदल्यात ही त्यांच्याकडून चौथाई मिळवली जात होती. याशिवाय काही वतनदार सरदार वा सरंजामदार होळकर शासकाच्या विरूद्ध बंडखोरी करणाऱ्याची मालमत्ता जप्तीचे आदेश दिले जात होते.

एखाद्याच्या संपत्तीस वारस नसेल ती बेवारस पडून असेल ती ही संपत्ती जप्त केली जाते असे. त्यातून ही मोठ्या प्रमाणात राज्यास उत्पन्न मिळत असे. त्याचप्रमाणे खाजगी जहागिरीचे उत्पन्न हे सुरुवातीस इ.स. १७३४ वर्षी २९९०१० रु. होते. हे वाढत जावून मल्हारराव होळकर यांच्या मृत्यू समयी सोळा कोटी रुपयापर्यंत वाढत गेले.[७८]

त्याच प्रमाणे होळकर राज्यातील व इतर राज्यातील सरदार ही होळकर शासकांच्या महिलांस ओवाळणी, भेटी, नजराणे बक्षीस व साडीचोळी म्हणून होळकर महिलांना देत असत.

**४.१.१४.६ शेरी नजराणे:**

होळकर शासकास अनेकाकडून मोठ्या प्रमाणात शेरी नजराणे म्हणून २४१४५ ९—० प्रांत स्वदेश. ७८६६ ११—८ प्रांत नेमाड, ५७,२९७ प्रांत माळवा इत्यादी प्रांतातून उत्पन्न मिळत होते. त्यामुळेही त्यांच्या उत्पन्नात वाढ होत गेली हे पुढील यादीवरून दिसून येते.

| ८९३०९— ४—० शेरी नजराणा, | | | |
|---|---|---|---|
| २४१४५— ९—० प्रांत स्वदेश | | | |
| ७००० | प्रगणे अंबाड. | २३०० | प्रगणे शेगांव. |
| १५०० | तालुके देपूर. | ३०० | प्रगणे चांदवड. |
| ३०० | प्रगणे गाळणे | ४००० | प्रगणे सुलतानपूर |
| ४००० | प्रगणे नंदूरबार | ५०० | प्रगणे उत्राण |
| २४६—८—० | ता. वडेल. | १४९९— १—० | प्रगणे थाळनेर. |
| १००० | प्रगणे अडावद. | १००० | प्रगणे रावेर. |
| ५०० | प्रगणे कोरहाळे. | ० | लंग. |
| ७८६६—११—० प्रांत नेमाड. | | | |
| १०० | प्रगणे कानसूळ | ५०० | प्रगणे अंबा २०० व सेंधवे ३०० |
| ३०० | नागलवाडी | २०० | ब्राह्मणगांव. |
| ४००० | सरकार बिजागड | १००० | कोठडा नि. बुळे |
| १००० | प्रा॓ महेश्वर चोळी. | ५०० | बागदरा. |
| २६६—११—० | प्रा॓ करहाई | ० | लंग |
| ५७२२९ प्रांत माळवा. | | | |
| ६०० | प्रगणे इंदूर राहुगांव | ५४७ | प्रा॓ देपाळपुर. |
| ७५०० | ” रामपुरा | ३००० | ” पिढावा. |
| ४००० | ” मल्हारगड | ४५० | ” जार्डा कंजार्डा. |
| ३०० | ” नंदवाई | १००० | ” जावरे. |
| १५०० | ” झाबुवा. | १२०० | ” हसलपुर. |
| १२०० | ” कायथा | २१०० | ” महत्पुर |
| १२५० | ” पाठण नि. बुळे | १००० | ” जिरापुर |
| १००० | ” माचलपुर | १६०० | ” देवळे प्रतापगड |
| ४००० | ” सिरोंज. | ४००० | ” टोंक, रामपुर. |
| ५००० | ” कोंच | ५००० | ” संस्थान कोटा. |
| ८०० | ” संधारे | ६०० | ” रायपुर. |
| १००० | ” अंतूर | ४५० | ” बेटमें |
| २०० | ” सुंदरशी. | ५०० | ” पीपलोद |
| २००० | ” सेरीचा गल्ला, | ० | ” निंबाहेढा ऐंवजी मों पिंपळा. |
| ..........<br>८९३०९—४—० | | | |

होळकर शासकांना शेरी नजराना म्हणून तीन प्रांतातून एकूण २७३१६—११—० रूपयाचे उत्पन मिळत होते.[७९]

### ४.१.१४.७ शेरी नजरण्याऐवजी गावें:

शेरी नजराणे ऐवजी अनेक गावे सरंजामदारांना मिळालेली होती. त्यातील दक्षिण व हिंदूस्थान या दोन प्रांतातून होळकर शासकाना उत्पन्न मिळत होते. त्यामुळेही त्यांच्या उत्पन्नात वाढ होत गेली. हे खालील यादीवरून स्पष्ट होते.

**२७३१६—११—० शेरी नजरण्याऐवजी गावें** .

| | | | |
|---|---|---|---|
| ११६६—११—० | प्रांत दक्षिण, | परगणे थाळनेर जाभटे व उखळवाडी गावे | |
| २६१५०—०—०<br>....................<br>**२७३१६—११—०** | प्रांत हिंदुस्थान. | १३००० | प्रगणे देपाळपूर. |
| | | १५० | प्रगणे करहई |
| | | ११०० | प्रगणे तराणा |
| | | २००० | प्रगणे नेमावर |

होळकर शासकांना शेरी नजराने ऐवजी काही गावे दिलेली होती. त्यापासून एकूण २७३१६—११—० रूपयाचे उत्पन मिळत होते.[८०]

### ४.१.१४.८ चोळी ऐवजी फुटकळ गावे:

होळकर शासकाना चोळी ऐवजी फुटकळ गावे मिळालेली होती. त्यातील दक्षिण व माळवा या दोन प्रांतातून उत्पन्न मिळत होते. त्यामुळेही त्यांच्या उत्पन्नात वाढ होत गेली. हे खालील यादीवरून स्पष्ट होते.

**११३८०० चोळी ऐवजी फुटकळ गावे**

| **२६३०० प्रांत दक्षिण** | |
|---|---|
| ७७०० | प्रगणे चांदवडपैकी २१०० मौजे शिवडी, ५६०० मौजे नांदूर मध्यमेश्वर |
| ३०० | मौजे तलवड, |
| १०० | मौजे बोहली |
| ८०० | मौजे कुकरज प्राो नंदुरबार |
| २००० | मौजे बलद, |
| १३००० | प्राो वेरुळ |
| १५०० | कसबे थालनेर |
| **८७५०० प्रांत माळवा** | |

| | |
|---|---|
| १९००० | प्रांो इंदूर ४००० मौजे काकरया, ४००० खजराणा, ५००० तिल्लोर, २००० पिंपळदरा, २७०० कळमनेर, १००० चोरडया १०० अहिल्यापुरा २००, मौ. मालगंज. |
| १९००० | प्रांो देपाळपुर, ७०००, हतोद, १००० मौ बनेडया, २००० सगडोद, |
| १३५०० | प्रगणे सावेर, १००० पालाखेडी, १५०० दरजीकराडया, व ११००० बरलाइ ढकाच्या. |
| ७००० | तालुके केली बिजोता प्रो निंबाहेडा. |
| १००० | तालुके मोमानीं प्रांत नरवर. |
| १००० | प्रांो लहोरी (लाखेरी) |
| १५०० | ताो चोरुपिंपळी प्रांत जयपुर,गांवे तीन. |
| २००० | मौजे सेत, गांगरसोली, वृंदावन येथील अन्नछत्राकडे.[८१] |
| ........<br>८७५०० | |

होळकर शासकांना चोळी ऐवजी फुटकळ गावे दिलेली होती. त्यापासून एकूण ११३८०० रूपयाचे उत्पन मिळत होते. हे सर्व होळकर शासकाचे विविध उत्पन्नाचे साधने होती हेच स्पष्ट होते. त्याचप्रमाणे थाळनेरच्या कमाविसदारांची दिवाळी सणानिमीत्य ओवाळणी पाठविलेली होती. या उत्पन्नावर होळकर कुटूंबाचे व्यक्तिगत स्वरुपात होळकरांच्या खाजगी जहागिरामध्ये येत असल्याने होळकरांच्या खजिना नेहमी भरलेला राहण्यास मदत होत असे. तसेच प्रसंगानुसार कधी पेशव्यांस इतर सरदार वा जनता सुद्धा भरगोस मदतीच्या रुपाने दिली जात होती.

**४.१.१४.९ खाजगी जहागीर, पाटीलकी, देशमुखी व वतनेः**

होळकर घराण्यातील व्यक्तीस खाजगी जहागीर, पाटीलकी, देशमुखी, मंडलोई व राऊळकी अशा वतनाचे हक्क मिळालेले होते. यातील काही विशेष कामगिरी केल्याबाबत तर काही स्वत:हून खरेदी केलेल्या होत्या. याशिवाय होळकर घराण्याच्या बऱ्याच ठिकाणी बागा वा जमीनी होत्या. या सर्व वैयक्तिक संपत्तीतून मोठ्याप्रमाणात उत्पन्न मिळत होते. यादी दक्षिणप्रांत व खानदेशप्रांत येथील उत्पन्न पाटिलक्या, व देशमुख्या, व जाहगिरी, व राउळक्या वगैरे बाबी गुजारात शिवराम पाटील हुजूरवतन संबंधी तपशील.

| | |
|---|---|
| २७०० | श्रीपंढरपूरचे भाडयाबदल रु १२०० व जाहगिर गांवबदल रु.१५०० |
| २२०० | श्रीजेजुरी येथील श्रीखंडेरायाचें उत्पन्न. भाडयाबदल ५००, देवाचा बाग ६००,खंडेरायाची पूजा रु. ११०० एकूण २२०० |

| | |
|---|---|
| ४०० | पुणे येथील सरकारी बाग आहे त्याचे दरसाल, चारशे, पाचशेपर्यत. |

| | |
|---|---|
| २५० | पुणे येथील वाडयाचे भाडयाबदल. |
| १२५ | खडकीवर छावणी आहे ती जमीन आपली. |
| २०२५ | प्रगणे सुपे येथील गावडकीचे. |
| ६० | होळगुरुम बिघे ६० दरबिघा रु. १ प्रमाणे इनाम वतन. |
| ५०० | मौजे मारवाडी प्रगणे पालगांव पंढरीचे पलीकडे आहे तेथील पाटीलकी. |
| ६२५ | मौजे वाफगांव येथील गुजारात खंडपाटील, देशमुखी, पाटिलकी निम्मे. |
| १३१—८—० | मौज बिबवी येथील गुजरात सखाराम रामचंद्र पाटिलकी निम्मे. |
| २५० | मौजे डामोग्राम येथील इनाम. |
| ७५ | मौजे तलवड येथील पाटीलकी |
| १५ | मौज बाबूलगांव इनाम |
| २७ | मौज दिलखेड येथील पाटिलकी |
| ५० | मौज कादरी चंदनपूर येथील मोकदमी निमे विद्यमान रामदासभाई |
| ७५ | मौज प्रकाशे मोकासा. |
| ६२५ | मौजे अडगांव व वडझरे व पांडे देह ३ येथील दखलगिरी आपाजी त्रिंबक. |
| ६७५ | मौजे न्याहळोद येथील निम्मे पाटीलकी सखाराम गुमास्ता. |
| २६१ | मौजे कापडणे निमे पाटीलकी विद्यमान आनंदराव राजाराम कारकून. |
| २४०—२—० | मौजे मांडल परगणे डांगरी येथील पाटिलकी निम्मे गुजारत श्रीपतराव. |
| ३० | मौजे मुकटी येथील पाटिलकी. |
| ४० | मौजे वडजाई येथील हिशाबदल. |
| ७० | मौजे पिपरी इनामी वसूल. |
| १० | मौजे निखेड इनाम बिघे. |
| ४५० | मौजे थालनेर येथील निम्मे मोकदमी गुजारत कारले पाटिलकी. |
| १०—१०—० | मौजे कुरखेडी येथील इनाम. |
| १४५ | मौजे मेंढराचे खिल्लारची चुकोती. |
| १००० | मौजे करवंदवारी येथील रावलकी निम्मे उत्पन्नाबदल. |
| ६६—१०—६ | मौजे कोरेगांव येथील पाटीलकी गुजारत शामराव कारकून. |
| ८९८—१—० | मौजे मजकूर येथील पाटिलकी गुजारत माधवराव त्रिंबक कारकून निमे. |
| १४८—१४—० | मौजे लोणी एकजात श्रीगोंदे पाटिकली निमे गुजारत बापू साजवणे. |
| १४३—१४—० | मौजे कसवे आळे येथील पाटिलकीचा तिसरा हिस्सा विद्यमान भिकाजी जाधव. |
| ८०७—५—३ | मौजे कसवे मांडवगण येथील पाटिलकी, यादवराव यशवंत गुमास्ते कारकून. |
| २६१—१५—९ | मौजे कोरहाळे बमयवाड सुध्दां मोकदमी निमे गुजारत भवानी जयराम. |
| ४०७—६—० | मौजे अस्तगांव येथील पाटिलकी व देशमुखी व आवटकी दरोबस्त |

| | |
|---|---|
| ३१—१३—६ | रुई येथील मोकदमी चौथाई गुजारत खंडोजी जाधव. |
| ३९—८—० | मौजे निघोज येथील मोकदमी हिस्से तीन विद्यमान खंडवा जाधव. |
| १०६—२—६ | मौजे कलवेड येथील देशमुखी गुजारत कचले धोंडाजी देह तीन. निम्मे पाटिलकी. |
| ३०—०—० | मौजे दातली येथील देशमुखी. |
| ४३ —४—० | पारनेर परगणे अंबाड येथील पाटिलकी दरोबस्त गु. विठुजी. |
| २०००—०—० | कसवे माळणा येथील देशमुखी दरोबस्. |
| ७२५ —०—० | सरकार संगमनेर येथील ३६० गांवची गाउडकी सरकारची आहे. |
| २०००—०—० | कसवे वाफगांव वगैरे देह ९ येथील आकार. |
| ५०००—०—० | कसबे चांदवडप्रांतीचे नवगांव येथील जाहगिरी. दरगांवी इनाम चाहूर २ |
| ८०००—०—० | चांदवड येथील पाटिलकी बदल उत्पन्न. |
| २०००—०—० | मौजे चिंचुदी येथील पाटिलकी गुजारत हिराजी जगताप. |
| ४०००—०—० | नगरसूल येथील पाटिकक्या दरोबस्त, सखाराम पाटिल. |
| ३०००—०—० | मौजे पेठ येवले येथील पाटिलकी दरोबस्त निमेनाइक, निमेसरकार |
| १५०—०—० | कसबे जामगांव येथील पाटिलकींचे उत्पन्न.[८२] |

तसेच होळकरांच्या पिढीजात व्यवसाय हा मेंढपाळ असल्याने इ.स. १७४७ च्या पत्रात उल्लेख आहे. मौजे कोरेगाव तालुके पाबळ खासगत शेतापैकी उत्पन्न रू. २३५ दोनसे पस्तीस.[८३] तसेच मल्हारराव होळकर यांची इ.स. १७५१ चे पत्र खासा मल्हारबाबा यांची मेंढरें रिकामी रानीं चरणी करतील सुमारे दहा हजार १०,००० मौजे वडगांव कांदली प्रांत जुन्नर.[८४] म्हणजे होळकर घराण्याकडे मेंढरे होती. त्यापासून जे उत्पन्न मिळत होते. होळकरांची वैयक्तिक संपत्तीस हातभार लागत होता असे दिसून येते. होळकरांच्या घराण्यात खाजगी संपत्ती अमाप जमा झालेली होती.

त्या संपत्तीचा वापर होळकर घराण्यातील महिला अतिशय काटकसरीने वापर करीत असल्याने हरकुबाई होळकर यांनी मनिराम यास दहा लाखाचे कर्ज दिलेले होते. त्या कर्जाऊ रक्कमेच्या वसूलीचे प्रकरण बरेच दिवस चालले होते. यास सर्व बाबी असे स्पष्ट होते की होळकर घराण्यात त्याचे खाजगीच्या उत्पन्नाचे विविध स्त्रोत होते.

होळकरांची आर्थिक स्थिती ही अतिशय भक्कम स्वरुपाची होती. होळकर राज्याच्या उत्पन्नाचे विविध स्त्रोत असले तरी त्यापेक्षा अधिक पट्टीने होळकर शासक राज्यासाठी, सैन्यासाठी, किल्ल्यासाठी, मोहिमासाठी, शस्त्रास्त्रासाठी तोफखान्यासाठी रसद पूरवठयासाठी, व जनतेच्या कल्याणासाठी मोठ्या प्रमाणात खर्च करावा लागत होता. विशेष करुन होळकर घराण्याचा खर्च हा युद्ध मोहिमा संदर्भात व दानधर्माकरीता खर्च करावा लागत होता.

**४.१.१४.१० बागबगीच्या:**

होळकर शासकाच्या मोठयाप्रमाणात बागबगीच्या ही होत्या त्यापासून ही उत्पन्न मिळत होते. २९ जानेवारी १८३२ महाराज मल्हारराव होळकर, शहर इंदूर येथील सरकारी बागा सुमारी पंधरा १५ बदल याद.

| | |
|---|---|
| २ छत्रीबाग दोन. | १ रखमाबाई साहेबांचा बाग एक |
| २ बाळा साहेबांचे बाग दोन. | १ सरीफमाईचा बाग एक |
| १ हनुमंत बाग एक | १ कृष्णबाग एक |
| १ विनायक बाग एक | १ नजरबाग एक |
| १ गणेशबाग एक. | १ रामबाग एक.[८५] |
| १ गोपाळबाग | |

**४.१.१५ केंद्र सरकार व सरंजामदार यांच्यातील उत्पन्नाची वाटणीः**

थोरले बाजीराव पेशव्याच्या कारकिर्दीमध्ये उतर भारतात मिळलेल्या मोहिमेमधून सर्व उत्पन्नाची वा प्रदेशाची ही वाटणी करण्यात येत असे. केद्र सरकार व सरंजामदार यांच्यातील उत्पन्न वाटणीसाठी चौथाई, सरदेशमुखी हा प्रकार चालूच राहिला. एकुण उत्पन्नाच्या २५ टक्के राजबाबती, ६ टक्के सहोत्रा ३ टक्के नाडगौडा अशी ३४ टक्के रक्कम वजा जाता उर्वरित ६६ टक्के रक्कम मोकासा समजण्यात येत असे व त्यावर सरंजामदार सरदाराचा अधिकार असे.

तसेच पुढे अशा प्रकारे मिळालेल्या उत्पन्नाची वाटणी केली जात होती. श्रीमंत पेशवे बाजीराव माळवा प्रांताची, दरशेंकडा पंचेचाळीस श्रींमत पेशव्यास, बाकीचे साडेबावीस शिंदे, साडेबावीस होळकर व दहा पवार, याप्रमाणे वाटणी करून दिलेली होती. तसेच श्रीमंत पेशवे बाजीराव यांनी त्यानंतर ही २० जानेवारी १७३४ मध्ये माळवें प्रांताची वाटणी करून दिली. त्यानुसार होळकर २, शिंदे २, पवार १ असे पांच हिश्य्याने प्रगणे जिल्हे निहाय देण्यात आलेली होती.[८६]

समान वाटणी होत असे यात उत्पन्न व प्रदेश दोघांचाही समावेश होता. त्यानुसार मल्हारराव होळकरांना प्रतापगढ, झाबुबा डुगरवाड बॉसवाडा, निम्बाहेडा, गुगल, चावडा, कोटा, टौक, जयपूर, बुंदी, लाखेरी, रामपूरा, उदयपूर, रांची, आग्रा, मथुरा, भरतपूर, या सर्व भागातून वा प्रदेशातून चौथाई वसूल करण्याचा अधिकार मिळालेला होता. या प्रदेशावरील हा हक्क मल्हाररांवाना थोरले बाजीराव, नानासाहेब, थोरले माधवराव, नारायणराव व सवाई माधवरावांच्या काळापर्यंत पूर्णतः अबाधीत होता. मात्र नोव्हेंबर १७८९ मध्ये महादजी शिंदेने अहिल्याबाईच्या काळात होळकर संस्थानातील इलाखात ढवळा ढवळ करण्यास सुरुवात केली. घुसरखोरी करुन अनाधीकृतपणे चौथाई वसूल करू लागला. पूढे महादजी शिंदे पेशवे बाजीराव दुसरा यांचे ही आदेश धुडकावू लागले. म्हणजेच शिंदेनी पेशवे व होळकरांच्या आश्रयानेच मोठे होऊन त्यांनाच धक्का देवू पाहत होता.

**४.१.१६ जमीन महसूल व्यवस्थाः**

अठराव्या शतकापर्यत लोकांना स्थिर जीवन जगण्याची हमी नव्हती. कारण कोण केव्हा आक्रमण करेल हे सांगता येत नाही. अस्थिर अन्यायी अत्याचारी राजवटीला कंटाळून गेलेल्या लोकात अहिल्याबाईच्या कारभारात स्थिर जीवन मिळाले. उदासलेल्या मनात आशा निर्माण झाल्या. आपल्या जीवनात कोणाचा धोका होणार नसल्याची सामान्यास हमी दिली. व पडीक जमीनीत पीक घेण्यास लोकाना तयार केले. त्यासाठी त्यांना बी—बियाणे बैलजोड्या घेऊन देणे, त्यांना जगण्यासाठी त्याच बरोबर शेतकऱ्यांना घराच्या मागे गोठा आहे की नाही. त्यात दुभती जनावरे आहे की नाही. याबाबीकडे कटाक्षाने लक्ष दिले जात होते. लोकांच्या शेतात जास्त प्रमाणात पीकेल तरच लोक अधिक प्रमाणात कर भरतील. व त्या करावर नवीन उद्योग धंदे सूरू करता येईल व जास्तीत जास्त लोकांना त्यापासून काम मिळेल असे त्याचे मत होते. शेतकऱ्यांच्या जमीनीत जास्त उत्पन्न निघाले तरच तो शेतसारा भरेल. नाही तर तो कोठून भरेल? याची जाण होळकर शासक अहिल्याबाईंना होती म्हणूनच ज्या वर्षी दुष्काळ पडला किंवा नैसगिक आपत्ती कोसळली. त्या वर्षी शेतकऱ्यांना शेतसारा माफ करून उलट त्यांना लागणाऱ्या वस्तूचा पूरवठा सरकारकडून करण्यात येत असे. म्हणूनच तर अहिल्याबाईच्या राज्यामध्ये म्हणजे जनतेला प्रत्यक्ष अडीअडचणीस वेळेवर धावून जाणारे होते. त्यामुळे जनतेस होळकर शासकाबद्दल फार मोठा आदर व अभिमान होता.

मराठ्यांनी माळावा प्रांत जिंकला. त्या प्रांताचा विस्तार करण्याचे कार्य मल्हारराव होळकर यांनी सुरु केले. तेंव्हा माळव्याच्या शासन पद्धतीमध्ये थोडे फार बदल करुन पुणे येथील श्रीमंत पेशव्याची शासन पद्धती सुरु केली. त्यात मुस्लीम अंमलदाराऐवजी आपले हिंदु अंमलदार नियुक्त केले. व सोबतीस दिवाण, फडणीस, मुजुमदार, चिटणीस, शिवकेनवीस, पोतनवीस, दप्तरदार, मृत्सूद्दी व कारकून या प्रकारची त्या पदास नाव देऊन त्यांचे कार्य व जबाबदार निश्चित करुन दिलेली होती. शेवटच्या दर्जाची मुत्सुद्दी व कारकून ही पदे वगळता बाकीचे सर्व अधिकारी पदाची नियुक्ती स्वत: पेशवे सरकारकडून केली जात असत. माळावा प्रांतात सुरुवातीस पेशव्यांनी केलेल्या शासन पद्धतीनुसार माळव्याचे प्रशासन चालू झाले. हेच प्रशासन पुढे मल्हारराव होळकर यांनी माळवा प्रांताचे सुभेदार बनल्यानंतर चालू ठेवले. मल्हारराव होळकरानंतर अहिल्याबाई होळकर यांनी हिच शासन पद्धती चालू ठेवली. राजमाता अहिल्याबाईने या शासन पद्धतीत आणखीन काही सुधारणांची भर टाकली.

राज्याच्या उत्पन्नचा मुख्य स्त्रोत हा जमीन महसूल वसूली हा होता. म्हणून छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या हिंदवी स्वराज्यात सुनियोजीत जमीन महसूल व्यवस्थेचा अवलंब केला. 'पेशवाईत सरकारी वसूलाच्या पुष्कळ बाबी असल्या तरी त्या सर्वात जमीन ही बाब मुख्य होती.' होळकर शासकांनी मोगली प्रदेशात हस्तक्षेप करुन तेथे आपले राज्य निर्माण केले. त्या माळवा भागात मराठा व मोगल यांच्या महसूल पद्धतीचा अवलंब करुन महसूल

व्यवस्था निर्माण करुन त्याद्वारे महसूल वसूली केली जावू लागली. त्याप्रमाणेच पेशव्यांनीही अवलंब करुन जमीनाचा महसूल वसूल सुरू केला. पेशवा नानासाहेबांच्या कारकिर्दीत मराठा राज्याच्या महसूल व्यवस्थेची चांगली घडी बसविण्यात आली, पुढे नाना फडणीसांनी यामध्ये काही सुधारण केल्या.[८७]

### ४.१.१६.१ जमीनीचे वर्गीकरण:

मल्हारराव होळकर यांनी आपल्या राज्यातील जमीनीचे वर्गीकरण केले. ज्या प्रमाणे मराठा राज्यात पेशव्यांनी जमीनीचे वर्गीकरण केलेले होते त्याचप्रमाणे होळकरांच्या राज्यात ही जमीनीचे दोन गटात वर्गीकरण केलेले होते. लागवडी खाली असलेली जमीन किंवा शेतकऱ्यांकडे कसण्यासाठी दिलेली जमीन व राज्याच्या नियंत्रणाखालील असलेली जमीन पैकी शेतकऱ्यांकडे असलेल्या जमीनीचे पुन्हा दोन प्रकार पडतात. जिराईत जमीन जी जमीन पावसाच्या पाण्यावर अवलंबून असे तिला जिराईत म्हणत आणि ज्या जमिनीला पाट, नदी. तलाव, विहरी इत्यादी मार्गाने पाणीपुरवठा होत असे. तिला बागायत म्हणत.[८८] त्याचप्रमाणे जिराईत जमिनीचे सर्वत्र अव्वल (उत्तम), दुम (मध्यम), सीम (कनिष्ट किवां सामान्य) असे तीन प्रकार पाडले जात असत.[८९] बागाईत जमिनीचे पाटस्थळ व मोटस्थळ असे भेद केले जात पाटद्वारे पाणीपुरवठा होणारी जमीन म्हणजे पाटस्थळ आणि विहरीद्वारे पाणीपुरवठा होणारी जमनी मोटस्थळ समजली जाई. राज्याच्या नियंत्रणाखाली असणाऱ्या जमिनीचे अंबराई, बागा, कुरणे व जंगले, आणि शेरी जमीन असे चार प्रकार केले जात असत. खानदेशामध्ये अंबराई मोठ्याप्रमाणात होती. विविध परगण्यामधुन वेळोवेळी अंबराईकर गोळा करण्यात आल्याच्या नोंदी मिळतात.[९०] होळकराच्या प्रदेशाात आणि खानदेशाच्या इतर भागात ठिकठिकाणी सरकारच्या बागा होत्या.

मराठा व मोगल राज्यात ही माळव्याची जमीन इतर जमीनच्या तुलनेने उत्कृष्ठ होती. मराठा राज्याच्या समाप्तीनंतर ब्रिटीशांनी महाराष्ट्रात प्रदेशाची पाहणी करुन जमीनीचे पुढील प्रमाणे स्तर सांगितलेले आहेत. यावरुन होळकर राज्यातील जमीन ही सोळा आण्यापैकी दहा आणे म्हणजेच ६२.५० टक्के जमीन अव्वल दर्जाची होती.

### ४.१.१६.२ जमीन मोजण्याची पद्धत:

छत्रपती शिवाजी महाराजांनी मलिक अबंरची जमीन मोजण्याची पद्धती आपल्या पद्धतीने त्यात अवश्यक ते बदल करुन ती स्वराज्यात लागू केली. जमीन मोजण्यासाठी काठीचा उपयोग केला जात असे. ही काठी पाच हात व पाच मुठी लांबीची असे तीला शिवशाही काठी असे म्हणत.[९१] पेशवे व होळकरांच्या राज्यातही काठीचा वापर करुन जमीन मोजणी केली जाते असे. अशी जमीन मोजण्याची पद्धत असून देखील जमीन नेमक्या कोणत्या पद्धतीने मोजावी अशी अडचणी येत होत्या.

होळकर राज्यात या पद्धतीने जमीन मोजणी केली जात होती तरही प्रसंगानुरुप मोजली जमीन मोजणी पद्धतीचा वापर केला जाई. तसेच मराठा पेशवे राज्याप्रमाणे होळकर राज्यात परतण व ओत या कोष्टकाचा उपयोग केला जात होता. ४ बिघे =१ पतरण, २० पतरण ( ८० बीघे) = १ औत असे ते कोष्टक होते.[९२] चॅप्लीनने आपल्या रिपोर्ट मध्ये होळकरांच्या राज्यातील खानदेशमधील जमीन मोजण्याची पद्धत राज्यातील इतर पद्धतींपेक्षा अगदीच भिन्न आहे. आणि तशी पद्धत इतरत्र कोठेच आढळली नाही असे म्हटले आहे.

**४.१.१६.३ जमीन मोजणारे अधिकारी:**

होळकर राज्यातील जमीन मोजण्यासाठी स्वतंत्र अधिकारी होते. त्या सरकारी पथकामार्फत राज्यातील जमीन मोजणी केली जात होती. जमीन मोजणाऱ्या अधिकाऱ्यास 'अमीन' म्हणत असत. या अमीन मार्फत गरजेनुसार होळकर राज्यातील जमीन मोजण्यासाठी सरकारी पथक पाठविले जाई. त्याप्रमाणे या पथकाकडून जमीनीची पाहणी करुन तिचा महसूल ठरवून दिला जात असे. अमीन अधिकाऱ्यास सहाय्य करण्यासाठी लेखणीक म्हणून कारकून सोबत दिला जात होता. तर कारकूनच्या मदतीसाठी दोन सेवक व एक महार हे तिघे हाताखाली सेवेस दिले जात होते. अमीन आणि कारकुन सरकारकडून पाठविले जात असले तरी सेवक आणि महार हे शक्यतो त्या गावातूनच कमाविसदारमार्फत मदतीसाठी दिले जात होते.[९३]

**४.१.१६.४ महसूल वसूली पद्धती:**

माळवा प्रांतात मुस्लीम राजवटीत बटाई पद्धतीने जमीन महसूली धान्याच्या स्वरुपात केली जाते होती. त्यात मल्हारराव होळकरांनी या महसूल वसूली पद्धतीत बदल करुन जमीन महसूल वसूली ही धान्याच्या स्वरुपात न घेता रोख पैशाच्या स्वरुपात घेतली जावू लागली. सुरुवातीच्या काळात माळव्यात मराठ्यांनी बरीच जमीन सरकार मार्फतच लागवड केली जात असे. पण नंतर ही जमीन शेतकरी लोकांना, सरकारने अधिक मुदतीच्या कराराने दिल्या जावू लागल्याने त्या शेतकऱ्यांकडून सदरील जमीनीचा महसूल रोख स्वरुपात खजिन्यात जमा होवू लागला.

होळकर राज्याची आर्थिक तिजोरी ही अतिशय भक्कम स्वरूपाची होती. होळकर राज्यामध्ये बटाई, मोकासा, घुगरी, जब्ती, दान व कणवार या जमीन महसूल पद्धती होत्या. शेती महसूल वसूल करताना शेतकऱ्याना प्रत्यक्षात होणाऱ्या उत्पादनावर महसूल वसूली केली जाई. आपल्या राज्यांतर्गत येणारा महसूल हा रोख स्वरूपात प्रत्येक बिघ्याला सव्वा रूपया कर याप्रमाणे वसूल केला जाई. तर इतर संस्थानात हाच दर चार रूपये होता. यावरून होळकर शासकाचे धोरण हे 'सत्ता म्हणजे भोग नसून तो एक महान योगायोग आहे.' हे अहिल्याबाई जाणून होत्या.[९४]

**४.१.१६.५ महसूल वसूलीचे दर:**

होळकर शासक अहिल्याबाई होळकर यांनी जमीन महसूलाचे दर सर्व सामान्य रयतेस सहन होतील असे म्हणजेच सरासरी एकूण शेती उत्पादनावर आधारीत कमीत कमी ठेवले. यामुळे होळकर राज्यातील लोक व तेथील गावचे अमलदार जमीन महसूल वसूलीच्या दराबाबत अहिल्याबाईंच्या आदेशाचे पालन करीत असत. तसेच राजमाता अहिल्याबाईंची वागणूक ही अतिशय प्रेमळ व समजूतदार असल्याने जमीन महसूल वसूलीच्या बाबतीत कधीही थकीतपणा आढळून आलेला दिसून येत नाही. महसूल वसूलीमध्ये जे अडथळे निर्माण करीत होते. त्या रजपूत ठाकूर लोकांना विविध इतर सवलती देऊन त्यांच्यावर ही वचक ठेवला होता. शिवाय गोंड व भिल्ल या आदिवासी जमातीच्या प्रमुखांशी चांगले मैत्रीपूर्ण धोरण ठेवून त्यांनाही विशेष सवलती देऊन त्यांनाही अंकित ठेवले.

होळकर राज्यात व्यापार करणाऱ्यास संरक्षण व प्रोत्साहन दिल्याने व्यापारी लोक चांगलेच संतुष्ट झालेले होते. सर्वच स्तरात चांगलेच शांततेचे व समाधानाचे वातावरण निर्माण झाल्याने होळकर राज्यात भरभराटीचे दिवस आल्याने व अहिल्याबाई होळकर यांनी मनोमनी सर्व भारतभर रयतेचे हित लक्षात ठेऊन दूरदृष्टीकोन समोर ठेऊन अनेक ठिकाणी निर्माण कार्य केले. हे याचेच गमक आहे. अहिल्याबाई होळकर यांच्या मृत्यूनंतर मात्र होळकर राज्यात व भारतीय इतिहासात अशांतता पसरल्याने असे लोकोपयोगी निर्माण कार्य होवू शकले नाही. इ. स. १८१८ च्या दरम्यानच्या काळात होळकर राज्यात अतिशय धामधुम होती. ब्रिटीशांच्या वाढत्या प्रस्तामुळे मराठेशाही व ऐतदेशीय राज्य संपूष्टात येण्याच्या स्थितीत होते. तिच स्थिती इन्दौर संस्थानची सुभेदार श्रीमत दुसरे मल्हारराव होळकर यांची झाली. यांच्या तात्या जोग या दिवाणाने इंग्रजाशी मंदसौरचा करार केल्याने इन्दौर संस्थानला स्वत:च्या राज्याच्या प्रशासनाकडे लक्ष देण्यास उसंत मिळाली. दिवाणाने राजमाता अहिल्याबाई होळकर यांनी घालून दिलेल्या शासन व्यवस्थेच्या पद्धतीचे पूनरुज्जीवन केल्याने इन्दौर संस्थानच्या तिजोरीत जो खणखणाट झालेला होता, पण आता मात्र दिवाणच्या धोरणाने इन्दौर संस्थानच्या सरकारी तिजोरीत चांगलीच वाढ झाली.

### ४.१.१६.६ महसूल आकारणी पद्धती:

मराठा राज्यात जमीनीचा महसूल निश्चित करण्यासाठी प्रथम जमीनीची मोजणी करणे, लागवड क्षेत्रातील पिकांची स्थिती पाहणी करणे व त्यानुसार शेतसारा ठरवून तो आकारला जात असे. त्यापुढे मराठ्यांच्या वा होळकरांच्या जमीन महसूल व्यवस्थेत एकसुत्रता होती असे स्पष्ट दिसून येते. मराठा राज्यातील होळकरशाहीत जमीन महसूल वसूली ही लागवडी खालील क्षेत्र, त्या जमीनीचा पोत, जमीनीस होणारा पाणी पुरवठा व शेतात प्रत्यक्ष आलेले पीक याचा सारासार विचार करून शेतसारा ठरविला जाई. या मराठा महसूल निश्चितीच्या धोरणांचा स्विकार सर्व मराठा साम्राज्यातील सरंजामदारांनी व सुभेदारांनी केलेला होता. त्यानुसार होळकर राज्यातही चार प्रकारच्या महसूल आकारणीमध्ये तनखा आकारणी, कमाल

आकारणी, कुळवार आकारणी व मौजेवार आकरणीचा अवलंब केलेला होता. सारा आकारणीचे तनखा पद्धत खानदेशामध्ये मराठा पूर्वकाळापासून वापरात होती. ही पद्धती पुर्वी मलिकांबरने सुरु केली असे म्हटले जाते. जमीनीची अधिकाधिक लागवड होण्याच्या हेतूने तनखा पद्धत वापरली जात असे.[९५] पाटील शेख सुलतान यांनी आपल्या मौजे सातगाव परनणे पाचोरा येथे यापूर्वी तनखा पद्धतीने शेतसारा वसूल केला जात होता. पण पेशवे नानासाहेब अधिकाऱ्याने या पद्धतीने शेतसारा वसूल करण्याऐवजी दुसऱ्याच पद्धतीने शेतसारा वसूल केला जात होता. तेंव्हा पाटील, सुलतान, शेख यांनी विनंती केली की, आपण जर पूर्वीच्या तनखा पद्धतीनेच सारा आकारला तर लागवड चांगली होईल. त्याच्या विनंतीचा विचार करुन पेशव्यांनी मौजे सातगाव येथे पूर्वीचीच तनखा पद्धती सुरु ठेवली.[९६] त्याप्रमाणे पेशव्यांनी आदेश देऊन पुन्हा तनखा पद्धतीने शेतसारा वसूल करण्याचे कळविले. म्हणजेच शेतसारा वसूल करताना त्या शेतकऱ्यांच्या शेतीचा पोत पाहूनच शेत सारा निश्चित केला जात होता. सारा आकारणीच्या कमाल पद्धतीत जमीनीचा कस व तिची उत्पादनक्षमता याची पाहणी करुन सारा ठरविला जात असे. या कमाल शेतसारा आकारणी पद्धतीत मागील पाच वर्ष किंवा त्यापेक्षा अधिक वर्षाच्या त्या शेती उत्पादनाचा विचार करुन तो निश्चित केला जात होता. म्हणजेच प्रत्यक्ष शेती उत्पादन क्षमतेचा सारासार विचार करून, शेतसारा ठरविल्याने दोघांनाही तो किफायतशीर असल्याने महसूल वसूली ही मोठया प्रमाणत वसूल होण्यास मदत होत होती.

होळकर राज्यात मौजेवर पद्धतीमध्ये संपूर्ण गावचा शेतसारा एकत्र ठरवून तो गावच्या पाटलाकडून जमा केला जात होता. त्यात त्या पाटलांनी त्या गावातील प्रत्येक शेतकऱ्याकडून किती प्रमाणात शेतसारा वसूल करावा हे ठरवून दिले जात होते. त्यानुसार सर्व गावाचा वसूल झालेला शेतसारा तो पाटील सरकारच्या कमाविसदाराकडे जमा करीत असे.

कुळवार पद्धतीमध्ये संबंधीत जमीन कसणाऱ्या कुळाकडून लागवडी केलेल्या जमीनीवर शेतसारा आकारला जात असे. याही पद्धतीमध्ये शेतीची उतपादन क्षमता विचार केला जात होता. महसूल वसूलीच्या पद्धती मराठा राज्यात पेशव्यांच्या काळात जमीन महसूल वसूल करण्याचा अनेक पद्धती होत्या. रयतेकडून रोख पद्धतीने (नख्त) धान्याच्या स्वरुपात जो महसूल केला जाई त्यास 'गला पद्धत' म्हटले जाई. महसूल वसूल करणारे अधिकारी मामलेदार, कमाविसदार तसेच कमाविसी पद्धत, मक्ता पद्धत व इतर दुसऱ्याही पद्धतीचा अवलंब करुन शेतसारा वसूल केला जात होता. इतर सहाय्यक अधिकारी नियुक्त करुन महसूल वसूली केली जात होती. इनाम व वतनाने दिलेली जमीन सोडून बाकीची राज्यातील सर्व जमीनीवर सरकारचे नियंत्रण असे. त्या जमीनी कसण्यासाठी उपरी कुळाकडून खंडाने लावून त्या कसल्या जात होत्या. त्यांचा वसूल करण्याचे काम सरकारी आधिकाऱ्यामार्फत होत असे. त्या पद्धतीला कमाविसी पद्धत म्हटले जाई.[९७]

होळकरांच्या राज्यात मोठ्या प्रमाणात मक्ता पद्धतीचा अवलंब करुन महसूल वसूल केला जात असे त्यानुसार एका गावाचा किंवा काही गावाचा मिळून तसेच संपूर्ण परगण्याचा देखील ठरवून मक्ता दिला जात असे. या पद्धतीमुळे होळकर राज्यास निश्चित केलेला मक्ता ठरवून दिलेल्या दराप्रमाणे तो अधिकारी महसूल वसूल केला जाई. त्यामुळे वसूल होणारा महसूल याबाबत निश्चितता असल्याने होळकर राज्याची तिजोरी नेहमी भरलेली असे. असे एका गावाचा दोन किंवा त्यापेक्षा अधिक गावांचा एकत्र मक्ता होण्यासाठी अनेक प्रतिष्ठित मंडळी, वतनदार कमाविसदार, मामलेदार व अन्य दर्जाचे अधिकारी नेहमी तयार असत असे दिसून येते. इ.स. १७७० च्या परगणे सुलतानापूरच्या झडती जमाखर्चात 'साल मजकुर जमा जागीर, मोकास, सरदेशमूखी बाबतीत वगैरे कुलबाग सुद्धा रुपये सुद्धा एकंदर मक्ता रुपये २०००००० पैकी वजा रयत निसबत सुद्धा मक्ता करुन दिला.[९८] त्याप्रमाणे इ.स. १७७१ मध्ये याच परगण्याचा मक्ता २,३५,००० रु दिलेला दिसतो. नंदूबार परगण्याचा मक्ता वामनजी हरी यास पाच वर्षासाठी लावून दिलेला होता.

तसेच होळकरांच्या राज्यात बटई पद्धत व लिलावाची पद्धत ही अस्तित्वात होती. महसूलातील अन्य बाबी ही मोठ्या प्रमाणात समाविष्ठ होते. त्यात जकात, वेगवेगळ्या पट्या, संकीर्ण कर यातूनही सरकारला वेगळा महसूल मिळत होता. होळकर राज्यात महसूल निश्चित करण्यासाठी व तो वसूल करण्यासाठी मुलकी व्यवस्थेत सरकारचे विविध अधिकारी व वतनदार अधिकारी कार्य करीत होते. मुलकी प्रशासन हे व्यवस्थीत व सुरळीत पार पाडण्यासाठी सरसुभेदारापासून ते गावच्या पाटील, कुलकर्णी पर्यंत संपूर्ण राज्याचा महसूल वसूल करण्याची जबाबदार त्यांच्यावर होती.

सरसुभेदार हा प्रांताचा महसूल वसूल करणारा प्रमुख अधिकारी होता त्याच्या अखत्यारीत संपूर्ण प्रातांची महसूल व्यवस्था येत असे. सरदेशमुखी म्हणजे कोठे शेकडा १० रुपये व कोठे १२ रूपये अशी राज्याची वतन बाकी राहिलेले बेरजेपैकी चौथाई बाबतती राजाचा हक्क बाकी तीन हिस्से राहिले त्यांस मोकासा असे म्हणतात. दक्षिणेतील सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी संपादिली. स्नेहभाव जोडला व स्वराज्याचा पाया मजबूत करुन साम्राज्याच्या उभारणीची तैयारी करुन दिली.[९९]

सुप्रसिद्ध इतिहासकार डॉ. सेन यांनी मराठयांच्या महसूल व्यवस्थेची स्तुती केली आहे. मराठी राज्यकर्ते हे रयतेकडून जो कर वसूल केला जाई. त्यावेळी प्रजेचे कल्याण एवढाच होता. म्हणजे रयतेच्या शेती उत्पादनावर कर अवलंबून होता. शिवाय शेती उत्पादन वाढीस उत्तेजन दिले जात होते.[१००]

चौथाई, सरदेशमुखी व महसूल उत्पन्नाशिवाय अनेक प्रकारचे कर वसूल केले जात होते. पेशव्यांच्या उत्पन्नाच्या अनेक साधनापैकी चौथाई व सरदेशमुखी यापासून मिळणारे उत्पन्न हे उत्पनाचे प्रमुख साधन होते. परराज्यात मिळणारी चौथाईची वाटणी केली जाई.

त्यातील २५ टक्के राज्याकरिता ६६ टक्के मराठा सरदाराकरिता ६ टक्के पंत सचिवाकरिता व ३ टक्के राजा म्हणेल त्या व्यक्तीकरीता केली जाई.

**४.१.१७ टाक्याचा ऐवज:**

यादी होळकर सरकारांत महतपूरचे लढाई पूर्वी संस्थनिक लोकांकडून टाक्याचा ऐवज येत होता त्याजबददल, व हल्ली येतो त्याज बा इसवी सन १८१८ सालची यादी

| **१८१६२४८** | महतपूरचे लढाई पूर्वी टाक्याचा ऐवज येत होता. तो |
|---|---|
| ३५०००० | महतपूरचे जयपूर सन १२२७ सालीं इंग्रेज सरकारांत टाका लावून दिल्हा |
| ८३३३३३ | संस्थानन उदेपूर सन ११७५ स. १७६५ इ. जे यादी अन्वेयें |
| ३५०००० | संस्थान कोटे संवत १८१८ चे यादीकोन |
| १०५००० | संस्थान कोटे संबत १८१८ चे यादीबरोन |
| १०५००० | संस्थान बुंदी सन १२२७ साली इंग्रेज सरकारकडे टाका लावून दिला |
| २०७०० | संस्थान सोपन सन १२२८ फसलीचे यादीवरुन |
| २६७१५ | संस्थान इंद्रगड सं. १८०५ चे यादीवरुन |
| २०००० | संस्थान डोंगरपूर सन १२२७ फसली इंग्रेज सरकारकडे लावून दिला |
| ७५००० | संस्थान झाबबे यादीवरुन |
| १४००० | संस्थान खातोली प्रांतहडोती संमत १८७५ चे यादीवरुन |
| १२००० | संस्थान करोली येथील ठरावाचा दाखला... सन ११८३ चे सालीं वसूलीं |
| २००० | संस्थान पिपले करवड सन ११८३ चे तालेबंदावरुन |
| ७५०० | संस्थान बांसवाडा संमत १८२४ चे यादीवरुन ३००० पेकी |
| ............ **१८१६२४८** | |
| १५८५१४—३—० | हल्ली सरकारांत टाके येतात ते हल्ली सिक्का |
| ३०००० | सां पाटण केशवरायजीचे |
| ६९६२७ ३ | संस्थान नरिसिंगगड |
| ० | संस्थान देवळे प्रतापगड [१०१] |
| ५८८८७ | |
| **१५८५१४ ३ ०** | |

यावरून स्पष्ट होते की, होळकर शासकाना अनेक संस्थानिक वा वतनदार व सरंजामदार यांच्याकडून १८१६२४८ इतके उत्पन्न मिळत होते. त्यास चालू द्या होळकरांची टाकी असे म्हणटले जात होते.

**४.१.१८ हवाला व वराती:**

अठराव्या शतकातील होळकर शासक आपल्या व्यवहारात मोठ्या प्रमाणात ठराविक रक्कमेचा हवाला व वराती देवून असे अनेक आर्थिक व्यवहार पूर्ण करीत होते. त्याबाबतीत होळकर शासक हे तेवढी पत बाळगून होते. अशा प्रकारचे हवाला देणाऱ्या पत्रावरून स्पष्ट होते. परगणे बरडावदा येथील कर्जपटीचे ऐवजाचा ठराव होउन आम्हांस साहकारी हवाला दिल्हा, तरी तुम्हीं पत्र पावल्या दिवसा पावेतों आपलेकडे वासलात जाहली असेत ते जमीदारांचे दस्तकानिसी करुन घेऊन तुह्मी उठोन येणें.[१०२]

इ.स. १७७२ मध्ये तुकोजीराव होळकर यांनी इंदूर परगण्याचे कमाविसदार विसाजी रंगनाथ यांच्या नावे शिंदेना सैन्याच्या खर्चासाठी रोख रक्कमेऐवजी सरळ त्या रक्कमेच्या वराता दिलेल्या होत्या. लष्करातून चिरंजीव राजश्री तुकबानी चौंडीकर सिंदे यांसी नालबंदी ऐवजी वराता दिल्या आहेत बी तपशील.

| | | | |
|---|---|---|---|
| ३७८० | राणोजी शिंदे | ८९० | आप्पाजी शिंदे |
| १६४० | विठोजी शिंदे | ८९० | गोविंदराव शिंदे |

एकूण ७२०० सातहजार दोनशेच्या म्हणोन [१०३] या पत्रावरून असे स्पष्ट होते की, त्या त्या रक्कमेचा सरळ भरणा करण्या अथवा देण्याऐवजी त्या रक्कमेच्या वराता दिल्या जात होत्या. याव्यवहारात प्रामाणिकपणा हा महत्वाचा होता. तो पूर्णपणे यशस्वी होत होता. अशा स्वरूपाच्या वराता या सर्रासपणे राज्यकर्ते व मोठे व्यापारी व्यवहारात वापरत असत.

१४ फेब्रुवारी १७७० च्या पत्राने मातोश्री अहिल्याबाई होळकर यांनी श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचा ऐवज देणे होते. त्यासाठी सदरील साठ हजार रूपये देण्याविषयीचे चांदवड परगण्याचे कमाविसदार राजश्री दिनकर अनंत यांस वराता करून कळविले होते. ते असे ...

| | | | |
|---|---|---|---|
| १०००० | सिदो तुकदेव प्रगणे मांडवगण.. | ५००० | सिंद्धेश्वर विष्णु तालुके कोरहाळे |
| ५००० | गोविंद कृष्ण प्रगणे सुलतानपूर | ५००० | त्रिंबक नारायण कमाविसदार ता. देवपूर |
| १०००० | धोंडो बल्हाळ प्रगणे सुलतानपूर | ५००० | तुझी प्रगणेमजकुर ऐवजी |
| १०००० | व्यंकटराव काशी प्रगणे आंबाड | १०००० | महादाजी हरी प्रगणे सेवगांव [१०४] |
| **६००००** | | | |

## ४.१.१९ होळकर राज्यातील खर्च:

होळकर शासकाना आपल्या राज्यातील विविध बाबीवर मोठया प्रमाणत लष्करी मोहिमासाठी व रयतेच्या हिताचे कल्याण साधण्यासाठी खर्च करावा लागत होता. होळकर शासकाना मिळालेल्या खाजगीच्या उत्पन्नातून ही अनेक कामे हाती घेवून संपूर्ण भारतभर अनेक ठिकाणी निर्माण कार्य केले. होळकर शासकाना सतत युद्ध मोहीमा काढाव्या लागत होत्या त्यासाठी अनेक स्तरावर खर्च करावा लागत होता. होळकर राज्यातील नोकरांना नियमित स्वरूपात वेतन दिले जात होते. तसेच होळकर शासकांनी इंदौर, महेश्वर व चांदवड

आदी शहरांचा विकास करून त्यांची भरभराट घडवून आणली. सेंधव्यासारखा भक्कम किल्ला बांधला, अनेक लहान मोठी बांधकामे केली. अतिथी सत्कार, प्रजेला दान दक्षिणा देणे, गोरगरीबांना गरजूंना मोठयाप्रमाणत सुखसुविधा पुरविणे, यात्रेकरूसाठी निवास व्यवस्था, अन्नछत्र व पाणपोयांची निर्मीती केली. तसेच संकटसमयी शेतकऱ्यांना आर्थिक सवलत आणि मदत देणे, शेतीसाठी पाणी पुरवठयाच्या सोईसाठी कालवे व तलावांची निर्मीती केली. वर्षासने, राजेमहाराजे यांना आर्थिक मदत देणे, एखाद्या बिकट प्रसंगी कुमक पाठविली जात होती.

### ४.१.१९.१ सरंजामी सरदारावर होणारा खर्च:

तसेच होळकर शासकाच्या अंतर्गत सरंजामी सरदाराची नियुक्ती केलेली होती. त्यांना होळकर राज्यातील प्रदेशाची त्यांच्या सैन्याच्या खर्चासाठी काही प्रदेशाची सरंजामी सरदाराना देण्यात आलेला होता.

| अ.क्र | सरंजामदारांची नावे | सरंजामी प्रांताची नावे | अजमासें उत्पन्न | स्वार |
|---|---|---|---|---|
| १ | **राजश्री गोविंदराव बुळे** | ३पाटण, झाबुबा व चिखलदे, तीन परगणे. | **१,९५,०००** | ७०० |
| २ | **राजश्री वाघ** | ३ महत्पूर, बेटमे, व उत्राण | **३,००,०००** | १०० ० |
| ३ | **राजश्री नारायण बारगळ** | ४ बुढे, नारायणगड, करही, रायपूर | **९६०००** | ७४० |
| ४ | **राजश्री लाभांते** | २ जिरापूर, माचलपूर | **६००००** | **२०५** |
| ५ | **रा. फणसे यशवंतराव** | १ तराणा परगणा | **१,१५,०००** | **२८०** |
| ६ | **राजश्री बाबूराव वाघमारे** | १ सावेर परगणा | **१,०४,०००** | **२२५** |
| ७ | **रा.अप्पाजीराम पळसीकर** | १ परगणे बरडाबर | **३००००** | **१०** |
| ८ | **राजश्री नारोगणेश** | १ परगणे पंचपहाड | **५००००** | ० |
| ९ | **रा. भागवत व खटके** | १ पगरणे जावरा | **६००००** | **१२०** |
| १० | **रा. गोविंदराव महाडिक** | प. पिंपलोदा | **४०००** | ० |
| ११ | **राजश्री खंडूजी नलगे, निसबत ढमढरे** | ४अडावद आहूर, रापूर व दहीवद | **६००००** | **२२५** |
| १२ | **राजश्री भागवत** | १ परगणे बागदरा | **१५०००** | **२५** |
| १३ | **रा. माधवराव राजगोळे** | ३ हसलपूर, हरसोले, जांब | **३३०००** | **१००** |

| १४ | **राजश्री पिसे** | १ वडगांव परगणा | **५०००** | **१५** |
|---|---|---|---|---|
| | | **एकून** | **१५९६०००** | |

१०५

यावरुन असे दिसून येते की, होळकर राजांनी आपल्या अंतर्गत सरंजामदारांना पंधरा लाख शहान्नव हजार रूपयाचा प्रदेश त्यांच्या सैन्याच्या खर्चासाठी व इतर खर्चासाठी लावून दिलेला होता.

**४.१.१९.२ सरंजामी मंडळ:**

होळकर राज्यातंर्गत सरंजाम सरदार होते. त्यांच्या सरंजामीचे इ.स. १७९७—१८०० दरम्यान उत्पन्न पुढीलप्रमाणे होते. त्यामुळेच होळकर शासकाची ताकत व शौर्य हे उत्तर भारतात अटकेपर्यंत दाखवून दिले.

| **९९६३७—१३—०** | **सरंजाम मंडळ** | **उत्पन्न एकूण रूपये** |
|---|---|---|
| २६६८६ १४ ० | तुलसाजी वाघ | २६६८६७— ०— ० |
| २९६१ ९ ० | माधवराव वाघ | २९६१६— १— ९ |
| ९८५० ० ० | आवचीतराव वाघमारे | ९८४९८— ५— ९ |
| १०१६—१४—० | रा. झसके | १०१६७— ०— ० |
| ६०००—०—० | आनंदराव खटके | ६००००— ०— ० |
| ३०००—०—० | भागवत | ३००००— ०— ० |
| ६२३७—८—० | ढमेढरे | ६२३७८— ०— ० |
| ८००—०—० | बागदरेकर भागवत | ८०००— ०— ० |
| १०००—०—० | व्यंकटराव नलगे | १००००— ०— ० |
| ९४५३—१२—० | नारायणराव बारगळ | ९४५४०— १०— ० |
| ५००—०—० | फकीरजी सितोळे | ५०००— ०— ० |
| १५०—०—० | मानाजी उदाजी लांबहाते | १५००— ०— ० |
| ९८१०—०—० | चोंडीकर शिंदे | ९७९०४— ०— ० |
| ९९९०—०—० | यशवंतराव फणस | ९९९००— ०— ० |
| ७२५—०—० | आडगांवकर पिंगळे | ७२४४— १२— ० |
| ५३७—८—० | पाराशर दादाजी | ५३७४— ३— ३ |
| ३७—८—० | सेटीबा गाविंदराव खेमनोर | ३७५— ०— ० |
| ६०—०—० | पिराजी हयाळोजी पिंगळे | ६००— ०— ० |
| ८६—४—० | रांजणगांवकर बोराडे | ८६३— ०— ० |
| २००—०—० | खंडोजी पिसे | २००००— ०— ० |
| १०४३२—८—० | लांभाते. खंडुजी भीवाजी | ०— ०— ० |

| ...................... ९९६३७—१३—० | मळोजी व मकाजी | १०६ |
|---|---|---|

यावरून हे स्पष्ट होते की, होळकर राज्याचे उत्पन्नात त्यांच्या अंतर्गत असलेल्या सरंजामीच्या ९९६३७—१३—० उत्पन्नाचाही समावेश होता. म्हणजेच होळकर राज्यातील सरंजामी मंडळाना हा प्रदेश सरंजाम म्हणून देण्यात आलेला होता.

**४.१.१९.३ सरंजामी पागेवर होणारा खर्च:**

तसेच होळकर राज्यातील सैन्यात अनेक निसबत पागे सरंजामी सरदारही होते. त्यांचे ही उत्पन्न हे २४६४३—१२—० एवढे होते. म्हणजेच ते होळकर शासकाना पागेवरही मोठा खर्च करावा लागत होता.

| **२४६४३—१२—०** | **निसबत पागे सरंजामी** | **येकुण उत्पन्न** |
|---|---|---|
| १५९४३—१२— ० | चिमाजी बुळे | १५९४३९—३—६ |
| ३०००—०— ० | गोविंदराव महाडिक | ३००००—०—० |
| २५००—०— ० | माधवराव राजोळे | २५०००—०—० |
| ३१००—०— ० | आंबोजी इंगळे | ३११—०—० |
| १००—०— ० | सैयद महमद | १०००—०—० |
| .................. **२४६४३—१२— ०** | | १०७ |

**४.१.१९.४ प्रशासनावरील खर्च:**

होळकर संस्थानाच्या शासकांचे धोरण हे 'जगा आणि जगु द्या' या तत्वावर आधारीत होते. पुणे सरकार हे सर्वांचेच आहे. इतर सत्ताधीशासारखे पेशवे पद हे बळकावण्याचा विचार होळकर शासकांत कधीही आलेला नव्हता. या प्रशासन होळकर घराण्याच्या शासनकर्त्यांनी कधीही पेशवे व नानाच्या अंतर्गत वादात किंवा नाते संबंधात कधीही ढवळढवळ केली नाही. स्वत: एवढाच अधिकार व हक्क सर्वांचाच असतो हे भान होळकर शासकांना होते. यावरुन होळकर शासक हे लोकशाहीचे उदगाते व संरक्षण करणारे होते. हे यावरून स्पष्ट होते. पुण्याचे पेशवे पद हे नागपूरचे भोसले व इतर अनेकांना हवे होते. त्याबदल जराशीही लालसा होळकर शासकांना कधीही वाटलेली नव्हती. महादजी शिंदेनी स्वहित समोर ठेवून पुण्याच्या पेशव्यांना व होळकर राज्यावर डोळा ठेवून पेशव्यांच्या व होळकर शासकांच्या उपकराची जाणीव थोडही ठेवलेली नव्हती. म्हणजेच शिंदेनी संधी साधू धोरणाचा स्विकार केलेला होता. तसा होळकर शासकांनी कधीही केलेला नव्हता. आपल्या शेजारी असलेल्या शिंदे, भोसले,

पवार, गायकवाड, व उत्तरेतील काही राज्याचे शासक तसेच पुण्याचे पेशवे यांच्या बिकट प्रसंगी होळकर शासक मदतीस धावून गेलेले होते. तसे शिंदेनी कधीही न करता उलट त्यांच्या बिकट प्रसंगाचा स्वहितासाठी फायदा घेण्याचा सपाटा सुरु केलेला होता.

होळकर राज्याच्या दौलतीवरील विविध प्रशासकीय काम कामकाजासाठी व अधिकाऱ्याच्या वेतनासाठी मोठ्या प्रमाणात खर्च येत होता. राज्याच्या दौलतीचा दिवाण, कमाविसदार, मुजमदार, यासारख्या होळकर राज्यातील प्रशासनासाठी दरबारातील मंडळी व अनेक प्रकारचे कर्मचारी कार्यरत होते. त्यात दिवाण यांच्यापासून ते कारकून यांच्या पर्यतच्या नोकराचां समावेश होता.

| ००० कारकून मंडळी | | |
|---|---|---|
| ० | नारो गणेश | ५४११८—९—० |
| | सदाशिव मोरेश्वर गोळे | ६३५२—०—० |
| | रामाराव अप्पाजी | २६५४३—९—० |
| | महिपत लक्ष्मण | ५७०५—८— ० |
| | यशवंतराव गंगाधर | २१४७०—०—० |
| | | ………………… |
| | | **१२८९१७—७—०** [१०८] |

**सूलतानपूर परगण्याचा खर्च होळकर शासकास पुढीलप्रमाणे येत होता.**

**४६१० ठाणे जात**

**३६२० ठाणे भुलाणे मा बाबुराव गोविंद**

३०० मारनिल्हे वेतन

३३०० प्यादे आा ७५ दरमहा रु ४ प्रोा येक महा ३०० एकुण आकारमाही

२० तेल वगैरे ३६२०

**९९० ठाणे खेडले मल्हार विठठल गणेश**

२०० वेतन माार निल्हे

७७० प्यादे आा २० दर सरासरी ३ ।। प्रो येकमहा ७० एकुण आकारमाही

२० तेल रोशनाई वगैरे.

……

**९९०**

……….

४६१०

तसेच सूलतापूर महालातील काही प्रशासकीय खर्च केला जात होता तो पुढीलप्रमाणे आहे.

| ३४२५० | | महाल मल्हारनिशे |
|---|---|---|
| ३०६० | | मामलेदार माार |
| | २००० | जातीस वेतन |
| | १००० | पालखी बाा |
| | ६० | मशालची आबदागीरी |
| | .......<br>३०६० | |
| ३२५० | | कारकुन आा ७ |
| | १००० | चिंतामण हरी |
| | ५०० | दिवाण |
| | ३०० | भास्कर बल्लाळ फडणीस |
| | ३०० | विनायक वेंकाजी मुजुमदार |
| | ४०० | बाबुराव सदाशिव |
| | ५०० | महादजी अनंत |
| | २५० | मोरो सामराज दप्तरदार |
| | ३२५० | |
| २५४४० | | शिबंदी स्वार प्यादे |
| १००० | | कारकुन तरफदार |
| १५०० | | खेरीज मुशाहिरा धर्मदाय भोजन खर्च[१०९] |

होळकर राज्यातील सूलतानपूर परगण्याचा हा खर्च होता. तो नियमित पूर्ण करावा लागत होता असे अनेक परगण्याचे वा महालासाठी होळकर शासकाकडून खर्च करावा लागत होता हे स्पष्ट होते.

**४.१.१९.५ सरदारांना फुटकर गावे:**

होळकर राज्यातील काही सरदारांना फुटकर गावे सरंजामास लावून दिलेली सरंजामदार ही कार्यरत होते. त्यात राजश्री शिंदे चौंडीकर यास— १ परगणे निंबहेडा निम्मे महाल, राजश्री काशराव—१ परगणे कायथा, यशवंतराव गंगाधर—१ मौजे केसोद प्रात मेवाड, शितोळे—१ करही प्रदेश लावून दिलेले होते.[११०] म्हणजेच होळकर राज्यात काही सरंजामी सरदाराना त्यांच्या खर्च्यासाठी काही फुटकर गावे सरंजाम म्हणून दिले जात होते. हा होळकर शासकाना खर्च करावा लागत होता यावरून हे स्पष्ट होते.

गायकवाड यासारखे अनेक सरंजामी सरदार व जहागिरदारास छत्तीस परगणे व इतर किरकोळ गावे मिळून अंदाजे बत्तीस लाख सत्तावन हजार रुपये उत्पन्नाचा प्रदेश सरंजाम म्हणून देण्यात आला होता. होळकरशाहीतील फुटकर गावे सरंजामदारास लावून दिलेली होती. पण त्यांच्या गावांचा उल्लेख नाही. त्यातील सरंजामदार बांडे, कोकरे, कारले, थोरात, पिंगळे,

पुरंदरे, दाभाडे, इंगळे, जगताप, जाधव, चिखले, म्हसके, बघड, गुंजाळ, गावडे, होंगाड, बोराडे, डोयफोडे, गायकवाड, धायगंडु, गीते, बाळ गावडे यांचा समावेश होता.[१११]

होळकर राज्यातील सरंजामी जहागीरदार व सरदारांस छत्तीस महालाचे उत्पन्न अजमासें बत्तीस लक्ष सत्तावन हजाराचे दिलेले होते. होळकर राज्यातील इतर सर्व सरंजामदार होळकर सत्ताधीशांना लष्करी मोहिमामध्ये सहभागी होऊन विजय मिळवून देण्यात ते अग्रेसर असत.

### ४.१.१९.६ हिस्याच्या वाटपावर होणार खर्च:

सुभेदार मल्हाराव होळकर यांना श्रीमंत बाजीराव यांच्याकडून सरंजामी जहागिरी मिळाली. त्यामुळे मराठा सरदारांनी आपल्या सरंजामी जहागिरीत जमा होणाऱ्या महसूल व इतर उत्पन्नापैकी ठराविक हिस्सा केंद्र सरकारला म्हणजे पेशव्यांना द्यावे लागत होते. तसेच पर राज्यात वा शत्रूच्या प्रदेशातून मिळालेली खंडणी व लूट यांचा देखील ठरावीक हिस्सा पेशव्यांना द्यावा लागत होता. शिवाय तो इतर सोबत असलेल्या सरदारास ही वाटून घ्यावा लागत होता. म्हणजेच केंद्र सरकारचा उत्पन्नात हिस्सा ठरलेला होता. तो नियमित व अचूक पोच होळकर शासकाकडून पाठविलेला जात होता. तसेच होळकर राज्यात होळकर शासकांनी वा पेशव्यांनी वतनदार, सरंजामदार, हक्कदार नियुक्त केलेले होते. त्यांच्याकडून ही पेशव्यांस ठराविक हिस्सा रवाना केला जात होता. ज्याप्रमाणे सरंजामी प्रदेशाच्या उत्पन्नातून पेशव्यांचा हिस्सा बाजूस काढून तो पाठविला जात होता. त्याचप्रमाणे तो सरंजाममध्येही काही वतनदार, अधिकारी, पाटील, देशमुख, कानुनगो, देशपांडे यांच्या हिस्स्याची रक्कम बाजूला काढून ठेवली जात होती. म्हणजेच सरंजामाच्या उत्पन्नातून पेशवे, वतनदार व इतरांचे हिस्से काढून त्यांना ते नियमित दिले जात होते. त्यामुळे सरंजामी सरदारांना त्याचा स्वत: हिस्सा अतिशय थोडा शिल्लक राहत होता.

इ.स. १७६९ मध्ये माधवराव बल्लाळ प्रधान यांनी मातोश्री अहिल्याबाईंस खालील पत्र पाठवून तुमच्याकडील सरंजाम जमा केलेला नाही. तो त्वरीत जमा करावा असे स्पष्ट केले तो मजकूर असा होता...

<table>
<tr><td>३७५९०३—१२—०</td><td colspan="2">नेहमी परसाली प्रांत माळवा येथील बाबती सरदेशमुखीचा मक्ता...</td></tr>
<tr><td>१५५००—०—०</td><td colspan="2">मोकासबाब सरकार बिजागड सालमजकुर सनसर्वनचा मक्ता</td></tr>
<tr><td>७२२७०२—२—०</td><td colspan="2">बा गंगाधर यशवंत</td></tr>
<tr><td>४२५००—०—०</td><td colspan="2" rowspan="2">चिंतो विठठल, चिंतो अनंत व आबाजी महादेव मिळोन ऐवज येणे रु. ५०००० पैकी वसूल रु ७५०० बाकी</td></tr>
<tr><td>११५६६०५-१४-०</td></tr>
<tr><td colspan="3">पैकी वसूल भरणा झाला व निशा जाहली रू.</td></tr>
<tr><td>२५००००</td><td colspan="2">गंगाधर यशवंत याजबदल ऐवज येणें त्याजपैकी यादवराव रघेनाथ भागवत...</td></tr>
<tr><td>३०००००</td><td colspan="2">निशाकरुन घेतली आहे व हुंडी.</td></tr>
<tr><td></td><td>हवाला १०००००</td><td>यादवराव रघुराथ भागवत फाल्गुन अखेरचे मुदती.</td></tr>
</table>

|  | हवाला १२५००० | व्यंकटराव कासी अंबाउचे ऐवजी दिनकर बाबुराव खरे... |
|---|---|---|
|  | ७५००० | खेतसी करमसी इंदूरकर याचे दुकानी हुंडी |
| **५५००००** | **३०००००** |  |

बाकी रुपये ६०६६०५—१४—० सहालक्ष सहाहजार सहाशे पांच चौदा आणे येणे त्यासऐवज मुदतीप्रमाणे न आल्यास स्वदेशी तुमचे सरंजामाचे महाल आहेत त्यांची जप्तीकरुन वसूल सरकारांत घ्यावा.[११२] यावरून असे स्पष्ट होते की, मराठा राज्यातील सर्व सरंजामदारांकडील सरंजामी विहीत मुदतीत सरकारात जमा केली नाही तर, दिलेले सरंजामी महाल जप्त करण्याचा अधिकार पेशव्याना होता. त्यानुसार होळकर शासकांनाही तसा सरंजाम जमा करावे लागत होते.तो वेळोवेळी पूर्ण केला जात होता. प्रसंगी आर्थिक मदत केली जात होती.

### ४.१.१९.७ लष्कारी मोहीमेसाठी कर्जः

होळकर शासक नेहमी अनेक युद्ध मोहिमेवर जाताना प्रचंड सैन्यासह जात असत. त्यासाठी लागणारी रसद व इतर खजिना यांची प्रचंड गरज लागत होती. त्यासाठी मोहिमेत शत्रू राजाचा पराभव करून त्याच्यावर युद्ध खंडणी वसूल केली जात होती. तरी पण वाढत्या लष्करी खर्चासाठी त्यांना वेळोवेळी सावकाराकडून कर्ज ही त्यांना घ्यावे लागत होते. त्यामुळे होळकर शासक मल्हारराव होळकर यांनी आपल्या मोहिमासाठी वाढता खर्च पाहून कर्ज घेतलेले होते. हे या पत्रावरून लक्षात येते. धनको नाम राजश्री बाबूराव मल्हार यांस निणको नाम मल्हारजी होळकर कर्ज रोखा लिहून दिला ऐसाजे तुमचे देणें बी तपशील रुपये.

| २००० | रुपये सालमजकूरी द्यावें. नेमणूक प्रगणे महतूर पैकी. |
|---|---|
| १६५० | रुपये साल ऐंदे मध्ये द्यावे. |
| ३६५० | एकूण तीनहजार सहाशे पन्नास रुपये बिनब्याजी लिहिले प्रमाणें पावते करुं.[११३] |

म्हणजेच होळकर राज्यकर्त्यांना प्रसंगी सावकाराकडून कर्ज घेवून आपल्या फौजेचा खर्च भागवावा लागत होता. विविध युद्ध मोहिमासाठी मोठी फौज ठेवावी लागत होती हे यावरून स्पष्ट होते..

### ४.१.१९.८ होळकर राज्यातील इतर सुधारणाः

होळकर प्रशासकांनी आपल्या राज्यात अनेक प्रकारच्या इतर सुधारणा केलेल्या होत्या. शिक्षण मंडळाची स्थापना, सायर खात्याची पुनर्घटना, नवीन टाकसाळी, टपालसेवा, जमीन मोजणी व प्रतवारी, दवाखाने, पाटबंधारे, तलाव, विहिरी, इन्दौर शहरात म्युनिसिपालिटीची स्थापना, रस्ते व लोहमार्ग काढून दळणवळणच्या साधनात वाढ मोठ्याप्रमाणत करून जन कल्याण साधण्याचा प्रयत्न केला. राज्यात अनेक सामाजिक सुधारणा घडवून आणल्या होत्या. तसेच राज्यात नर्मदा, चंबल, क्षिप्रा, गंभीर, खान, छोटी काली सिंध व मोठी काली सिंध या नद्यांच्या पाण्याचा जलसिंचनासाठी वापर केला.

छ. शिवारांयाच्या राज्यात कोणत्याही धर्माची, जातीची, वंशाची, पथांची, कोणाचीही स्त्री असो तिला मान सन्मान दर्जा देवून तिचा सन्मान करत तिला सुखरुप परत पाठविले जाई. तसेच होळकर शासकांच्या राज्यात ही पर स्त्रियांना सन्मान पूर्वक वागणूक दिली जात होती. पण शिंदे राज्यातील शासकांनी तर निच पातळी गाठलेली होती. महादजी शिंदेनी दत्तक घेतलेल्या दौलतरावांनी आपल्या मातेसमान असलेल्या महादजी शिंदेच्या पश्चात नऊ पैकी तीन लक्ष्मीबाई यमूनाबाई व भागीरथाबाई जिवंत होत्या. बाकीच्या अगोदरच निधन पावलेल्या होत्या दौलतरावंनी तिसरा विवाह सर्जेराव घाडगेच्या बायजाबाईशी केल्याने सर्जेरवाचे आपल्या मुलीच्या घरी येजा सुरु राहिले. तेंव्हा त्यांची भागीरथीबाई या विधवेवर वाईट नजर देवून तिच्यावर अत्याच्यार करी दौलतरावांच्या सासऱ्यांची वाईट कृतीस कोणीही अटकाव करु शकले नाहीत. म्हणजेच शिंदे कुटूंबातील राजपत्नींचा असा अवमान कोणत्याच शासकांनी केलेला नव्हता. दौलतराव व सर्जेरावास स्वराज्य म्हणजे स्वैराचार असे वाटत होते.

## ४.२ परगणा प्रशासनः

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या कारकिर्दी मध्ये वतनदारी पद्धतच बंद करून त्याच्यावर चांगला अंकुश ठेवला होता. पण नंतरच्या काळात छत्रपती हे पेशव्यांच्या सल्यानेच राज्यकारभार करीत असल्याने बाळाजी विश्वनाथ व बाजीराव या पेशव्यांच्या काळात पुन्हा वतनदारांना पुर्वी सारखे पण शूरवीर अशा बहाद्दरांनाच महत्व प्राप्त झाले. सुभ्यापासून ते गाव स्तरापर्यंत अनेक वतनदार नियुक्त केलेले होते. यावरून होळकर राज्यांच्या कागदपत्रामध्ये प्रांतिक मुलकी प्रशासनात वतनदार मंडळीना महत्वाचे स्थान होते असे दिसून येंते. होळकराच्या प्रांतिक किंवा परगण्याच्या प्रशासनाचा प्रमुख कमाविसदार तसेच इतर अनेक तील वतनदार असलेले अधिकारी हे देशमुख व देशपांडे याचा समावेश होत होता.

### ४.२.१ कमाविसदारः

एका राज्याची वा प्रातांचे अनेक परगण्यात विभागणी करण्यात आलेले होते. त्यावरील प्रमुख कमाविसदार असे म्हणटले जात होते. या कमाविसदारावर देखरेख ठेवण्याचे काम पेशव्याचे कारभारी करीत होते. प्रत्येक परगणाचा कारभार मामलेदार व कमाविसदारकडे होता. त्याचे प्रमुख कार्य म्हणजे परगण्यात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करणे हे होते. दिवाणी व फौजदारी गुन्हयाचे न्यायदानाचे कार्य ही त्यांना पार पाडावे लागत होते. हा परगण्याचा मुख्य अधिकारी म्हणून संपूर्ण परगण्याचा जमाखर्च त्यांचे अंदाजपत्रक वार्षिक खर्च उरलेल्या पैशाची व्यवस्था पहाणे. तसेच परगण्याचा महसूल जमा करण्याच्या कार्यात मामलतदारास सहाय्य करावे लागत होते

तुकोजीराव होळकरांचे सल्लागार दिवाण नारो गणेश आणि वकिल पाराशरदादाजी हे मुख्य होते.[११४] नारो गणेश हा चंद्रचुडच्या हाताखाली कारकून होता. कारभारी चंद्रचुडच्या मृत्यूनंतर मातोश्री अहिल्याबाईने नारो गणेशची शिफारस केल्याने त्यास कारभारी बनविण्यात

आलेले होते. याच कारभाऱ्याने तुकोजीरावास नाना फडणीसांच्या विरुद्ध बंधू मोरोबादादाकडे वळविले. मोरोबादादा बरोबर नारो गणेशची कैदेत रवानगी केलेली होती. नंतर महादजी शिंदेनी सुटका केल्यावर महादजी शिंदे व तुकोजीराव होळकर यांनी समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करीत होता. नारो गणेश हा होळकरांचा सेवक असूनही तो महादजी शिंदेचा मुखत्यार असे वागत होता. जयपूर प्रकरणात स्वतःचे हात ओले केल्याची कुणकुण नाना फडणीसांपर्यंत पोहचल्याने आदेशावरुन नारो गणेशांवर चौकी बसली. त्यावेळी नारो गणेशने तीस लाख रुपये भरले. तरीही सुभेदार तुकोजीराव एक कोटीवर आडून बसल्याने शेवटी नारोनी आत्महत्या केली. परगण्याचा मुख्य अधिकारी कमाविसदार हा होता. हे शासन व्यवस्थेमध्ये रयतेकडून कर वसूली करतांना शांतता व संयम ठेवला पाहिजे असे त्यांना राज्यकारभाराचे धडे देण्यात आले. या कर वसूलीसाठी पत्र व्यवहार स्वतः मल्हारराव जातीने लक्ष घालून करीत होते. तसेच परप्रांतात राजस्वाचे प्रमुख अधिकारी म्हणून कमाविसदार ओळखले जात. त्यांचे वेतन हे राजस्वाच्या चार टक्के एवढे होते.

पेशवेकालीन मुलकी प्रशासन व्यवस्थेतील अधिकाऱ्यात कमाविसदाराची भरती मोठ्या प्रमाणात केली जात होती. कमाविसदाराला एका गाव, अनेक गावे, किंवा संपूर्ण परगणाही कमाविसदाराकडे दिला जात असे. कमाविसदाराची सनद देताना त्याच्या अधिकारातील प्रदेशाचे अजमावस पत्रक त्यास देण्यात येई. त्यामध्ये गांवाचा परगण्याचा एकूण सारा, वसूली, पगार व भत्ते तसेच त्या ठिकाणाची वर्षासने, इमाने इत्यांदींची माहिती देण्यात येत असे. या पत्रकाच्या आधारे कमाविसदार आपल्या अंमलाखालील विभागाचा महसूल जमा करीत असे व प्रशासन व्यवस्था चालवित असे. कमाविसदाराना कमाविस देताना सदरील व्यक्तिकडून रसद म्हणजे अगावु रक्कम घेण्याची प्रथा मराठा सम्राज्यात सर्वत्र होती. अर्थात ही रक्कम सरकारकडे जमा होत नसून ती ठेव स्वरूपात सरकारकडे ठेवलेली असे. रसदेच्या रक्कमेवर सरकार प्रचलीत दराने व्याज देत असे. सुलतानपूर परगण्याच्या कमाविसदारास इ.स. १७८२—८३ या वर्षी रसदेवरील व्याजपोटी ३९७२ रू दिले होते.[११५] अशी अनेक उदाहरणे ऐतिहासीक कागदपत्रामध्ये पहावयाव मिळतात.

कमाविसदार हा त्याच्या विभागातील प्रमुख जबाबदार अधिकारी होता. आापल्या अधिकार क्षेंत्रातील जमीन महसूल गोळा करणे. त्याचा भरणा सरकारात करणे, शेती व्यवसायास प्रोत्साहन देवून अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणणे, येणाऱ्या जाणाऱ्या मालावर जकात बसविणे, जमाबंदीनुसार वसूलीची व्यवस्था करणे, परगण्याच्या शिंबदीची व्यवस्था राखणे, दुष्काळ व इतर आपत्तीच्या काळात महसूलात सुट देणे, टाकसाळीवर नियंत्रण ठेवणे, लोकांच्या जीवीताचे व मालमत्तेचे संरक्षण करणे, गोधंळ थांबविणे, दंगे, गडबड, बंडाळी, परगण्यातील रहदारीची व्यवस्था पहाणे अशी अनेक कामे कमाविसदाराकडे होती. तसेच कमाविसदारांना काही न्यायविषयक अधिकारही देण्यात आलेले होते. फौजदारी

गुन्ह्याच्या बाबतीत मात्र फक्त गुन्ह्याची चौकशी करून सरकारला अहवाल देण्याचे काम त्यास करावे लागत असे.[११६]

होळकराच्या राज्याच्या अधिपत्याखालील प्रदेशातील भागात नेहमीच भिल्लांचा उपद्रव होत असल्याने खानदेशातील कमाविसदारांना भिल्लाचा बंदोबस्त करणे हे नेहमीचेच कार्य बनून बसले होते.[११७] लंष्करी हालचाली करणे. युद्ध करणे, माहिमा काढणे वा सोबत जाणे तसेच इतर वेळीही सरकारच्या लष्कराला आपल्या प्रदेशात सुविधा पुरविणे. त्यावर देखरेख ठेवणे ही कामेही कमाविसदाराला करावे लागत असे. सुलतानपुरच्या कमाविसदारस ४ ऑगस्ट १७६३ रोजी अहिल्याबाई होळकर यांनी असे पाठविलेल्या पत्रात असे म्हणटले आहे की, खेमाजी सुर्वे व येसु सुर्वे यांच्या पागा सुलतानपुर परगण्यात पाठविल्या आहेत. त्याच्यांकडे रतीबास तुप व कणीक एक खंडी सतरा मण सव्वादोर शेर रोज देण्याची व्यवस्था करणे. घोड्यांची हजेरी पाहून कार्यवाही करावी.[११८]

मराठा राज्यातील महत्वाच्या व्यक्ती आपल्या विभागातून वा प्रदेशातून मार्गक्रमण करीत असताना त्यांच्या आर्थिक गरजा भागविणे. त्यांना सुविधा पुरविणे. त्यांच्या संरक्षणाची काळजी घेणे. ही कामही कमाविसराकडे असत. याशिवाय पेंशवे, सरंजामी सरदार किंवा त्यांचा कुटुंबीय नातेवाईक, त्यांच्या सुचनांप्रमाणे आपल्या प्रदेशात मिळण्याऱ्या काही वस्तू करून पाठवाव्या लागत. पण हे त्या व्यक्तींचे खाजगी काम असे. त्याच्या या कामाचा खर्च संबंधीत व्यक्तीकडून दिला जात असे. उदा. सरकार हांडियाच्या कमाविसदाराकडून १५ खंडी तुप पेशव्यांनी मागविले होते.[११९]

तसेच मल्हारराव होळकर यांची कन्या उदाबाई वाघमारे यांनी चांदवडच्या कमाविसदार राजश्री दिनकर अनंत यांनाा पत्राद्वारे कळविले की, ...घोड्याकरीता घास पाच हजार व रथाची चाके नवी करावया करिता सुतार कारागीर असामी चार येणे प्रमाणे पाठवून देणे. असे कळविले आहे. तर अहिल्याबाईची कन्या मुक्ताबाई फणसे यांनी चांदवडच्या कमाविसदारकडून हात्तीनीच्या बेडीसाठी पंचवीस शेर लोखंड मागविल्याची नोंद मिळते.[१२०]

प्रत्येक कमाविसदाराच्या अमंलाखालील प्रदेशातून किती महसूल जमा होतो. यावर त्याचा पगार अवलबून होता. म्हणजेच या पगारात सारखेपणा नसून तो मोठ्या विभागाच्या कमाविसदारांना चांगला मोठा पगार आणि अन्य सुंविधा मिळत असत. इ.स. १६६७ मध्ये नारो बल्लाळ हा रावेर परगण्याचा कमाविसदार होता. त्याला वार्षिक १५०० रू वेतन, पालखीसाठी ९०० रू दिवटया अब्दागिरीसाठी १०० रू असे एकुण २५०० रू मिळत होते. मौजे कुर्जी परगणे कुभांरी यागावचा कमाविसदार इ.स. १७७८ मध्ये फक्त ७५ रू वार्षिक वेतनावर काम करीत होता.[१२१]

यावरून असे स्पष्ट होते की प्रत्येक परगण्याच्या कमाविसदाराचे स्वतंत्र कार्यालय असे त्यात मुजुमदार, फडणीस, चिटणीस व कारकून असे अधिकारी वर्ग सहाय्यासाठी कार्यरत

असत. एक व एकापेक्षा अधिक परगण्याची कमविस असणाऱ्या कमाविसदारांच्या कार्यालयात ही सहाय्यक अधिकाऱ्यांची संख्या अधिक तर तर्फ वा खेड्यांचा कार्यालयात सहाय्यक अधिकाऱ्यांची संख्या त्यामानाने कमी प्रमाणात असे.

इ.स. १७८० मध्ये होळकराच्या प्रदेशातील देपाळपूर व देवळे या ठिकाणाच्या कमाविसदारास पेशव्यांनी विनाकारण आदलाबदल केली. तेव्हा मातोश्री अहिल्याबाई कमाविसदारच्या बाजूने ठामपणे उभ्या राहिल्या. हे ११ जानेवारी १७८१ रोजीच्या बातमीपत्रातून अहिल्याबाईची या बद्दलची भुमिका स्पष्ट केली होती. त्यावेळी त्या पेशव्यांना कळवितात की, श्रीमंताची आज्ञा आम्हास लक्षोलक्षवेळी शिरसावंद्य आहे. एक देपाळपूर व देवळे या दोन्ही महांलाचे कमाविसदार तीस चाळीस वर्षाचा तो दूर करावयास काही कारण नव्हते.[१२२]

### ४.२.२ तरफदार:

परगण्याचे विभाजन तरफ किंवा महालांमध्ये केले जात होते. तर्फच्या कामकाजासाठी तरफदार हा मुख्य अधिकारी नियुक्त केलेला असे. त्यास तरफदार असेही म्हणटले जाई. तर महालाचा प्रमुख म्हणून हवालदार हा कार्य करीत असे. म्हणजेच परगण्याच्या उपविभगास महाल किंवा तर्फ असे म्हणत. या तरफचा मुख्य कारभारी हवालदार असे.[१२३] यांच्या मदतीस मुजूमदार व फडणीस हा दोन सरकारी अधिकारी होते. याशिवाय हशमनविस, आशम फडणीस, आशम दप्तरदार व हजरनविस हे चार लष्करी अधिकारी मदतीस होते. एक लाख रुपयांपेक्षा कमी उत्पन्न असणाऱ्या तर्फ विभागावर कमाविसदाराची नेमणूक केली जात असे.
परगण्याच्या उपविभागाना तर्फ म्हणून प्रत्येक तर्फ मध्ये मोठी गावे म्हणजे मौजे किंवा देह आणि मौजा भोवती असणाऱ्या लहान गावांना व वस्त्यांना वाडड्या, पाडया व मजरे म्हणून संबोधले जाई. सुलतानपूर परगण्यातील आठ तर्फ होत्या. त्या प्रत्येक तर्फ मध्ये जी मौजे होती ती अशी तर्फ तर्फ सुलतानापूर –२९, प्रकाशे –१३, अंबाड – १६, तळोदे – ४, शहादे – २४, सारंगखेडे –११, बोरद – ५, वऱ्हाड – ११, अशी तर्फतील मौजांची संख्या होती हे दिसून येते. तसेच तर्फच्या अखत्यारीत पाच ते वीस पर्यत गावांचा समावेश असे. तर सुलतानपूर परगण्यात इ.स. १७८२–८३ मध्ये आठ तरफातील तरफदार यांचे वेतन ६रू ते १०० रूपयापर्यंत होते. यावरून असे स्पष्ट होते की प्रत्येक तरफदारांचा वेतन हे त्यांच्या अखत्यारीतील महसूलावरून वेगवेगळा देण्यात येत होता. तरफदाराला त्याच्या तरफावर अधिकार व कर्तव्य ही कमाविसदारा प्रमाणेच होते. आपल्या तर्फा पुरते त्याचे कार्य मर्यादित होते. तरफदारांच्या वरचा अधिकारी हा परगण्याचा कमाविसदार हा असल्याने त्यास कमाविसदारांच्या नियत्रंणखाली काम करावे लागत होते.

### ४.२.३ प्रांतिक प्रशासनातील दरखदार वर्ग:

प्रांतिक प्रशासनातील मुलकी अधिकाऱ्यांचा आणखी एक वर्ग होता तो म्हणजे दरखदार वर्ग होय. मामलतदार. व कमाविसदार या दर्जाच्या अधिकाऱ्याच्या कामावर अप्रत्यक्ष

दरकदार हा देखरेख व नियंत्रण ठेवत असे. दरकदार या अधिकाऱ्यांच्या नेमणूका या सरकारकडुन केली जात होत्या. दरखदार हा अधिकारी वर्गातील दुय्यम दर्जाचे अधिकारी असले तरी तो सरळ सरकारला जबाबदार असे त्यामुळे दरखदारावरील जे वरिष्ठ अधिकारी असत ते त्यांच्यावर कोणतेही दडपण आणु शकत नव्हते. किंवा त्यांना काढून टाकण्याचा अधिकारही त्यानां नव्हता. दरखदार या गटात येणारे अधिकारी दिवाण, मुजूमदार, फडणीस, दप्तरदार, पोतनीस, पोतदार, जमेनीस, अमीन, इत्यादीचा समावेश होत होता.[१२४]

**४.२.४ कानुनगोः**

परगण्यातील जमीन मोजणे महसून गोळा करण्याचे कामे करावे लागत असे. मराठा सरदार होळकरांचा अधिपत्याखालील बहुतांशी भाग उत्तर भारत, माळवा व खानदेशमध्ये असल्याने कानुनगो हा वतनी अधिकारी होळकरांच्या मुलकी प्रशासनात महत्वाचा घटक होता. होळकरांच्या राज्यात देशमुख व देशपांडे याप्रमाणेच कानुनगो नावाचा एक महत्वपूर्ण वतनी अधिकारी होता. मराठाकालीन खानदेशाच्या मुलकी प्रशासनात कानुनगो हे वतनीपद होळकरांच्या काही भागात होते. मोगल प्रशासनाचा वारस कानुनगो हा खानदेशला मिळालेला वतनी अधिकारी होता. तसेच मराठा सत्तेच्या काळातही कानुनगो हे पद होते. परगण्याच्या ठिकाणी कानुनगो असे

अनेक कानुनगोंच्या वरती संपूर्ण सरकार किंवा सुभ्यातील मोठ्या भागासाठी सरकानुनगोची नेमणूक केलेली होती. कानुनगो वतन दोन प्रकारचे होते. काही कानुनगो फक्त सायरसाठी (जकात) नेमलेले कानुनगो हा जमीनी संबधीचा कागदपत्रे सांभाळणारा अधिकारी होता. आपल्या प्रदेशातील जनतेच्या अडीअडचणी समजुन घेणे व ती सरकार दरबारी मांडणे, जास्तीत जासत जमीन लागवडीखाली आणण्याचा प्रयत्न करून शेती उत्पादन वाढविणे, जमीनसंबधीची एकत्र माहिती गोळा करून सरकारला गरज असेल त्यावेळी ती पुंरवण्याची मुख्य जबाबदारी कानुनगोवर होती. हक्कदाराच्या हक्कांचे रक्षण करणे, रयतेतील विविध प्रकारचे निर्माण झालेले तंटे वा बखेडे सोडविणे, प्रदेशाचे हिशोब सादर करणे यासारखी कामे कानुनगोला पार पाडावी लागत होती. कानुनगो आपल्या प्रदेशात घडणाऱ्या घटनांची माहिती सरकारकडे पाठविण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी होती. त्यानंतर सरकारकडून संबधित मुलकी अधिकाऱ्याला आज्ञा दिल्या जात असत. सरकारच्या आदेशांची अमंलबजावणी झाली की नाही यावर लक्ष देण्यासाठी कानुनगोला पत्राद्वारे कळविले जाई. यावरून असे दिसून येते की, कानुनगोचे कार्य व कामकाज हे महत्वपूर्ण होते. हे नंदुरबार दप्तरातील कागपत्राच्या आधारे पहावयास मिळते.[११२५]

कानुनगो वतनाची विक्री देखील करता येत होती. कानुनगोस विविध प्रकारचे हक्क मिळत. जमाबंदीवर ठराविक टक्के रक्कम, गावभेटीबद्दल काही रक्कम, व्यापाराच्या

बसविलेल्या जकातीतून काही हिस्सा आणि इतर मानपान त्यास मिळत.[१२६] भुटकुटे यांना दिलेल्या कानुनगो वतनाच्या सनदेतून कानुनगोचे हक्क अधिकार चांगल्या प्रकारे स्पष्ट होतात.

**४.२.५ मुजुमदारः**

परगण्याचे हिशोब तपासण्याची प्रमुख जबाबदारी मुजुमदाराची असे. मुजुमदारामार्फत जमीन महसूलीसंबंधीचे आदेश गावोगावी जात असत. महालाची जमाबंदी मुजुमदारच्या सल्याने केली जात होती. फडणीसाने तयार केलेली रोजच्या कामाची दैनदिनी व दफतरदाराने तयार केलेली खतावणी मुजुमदाराकडून तपासून घ्यावे लागत असे. तसेच वार्षीक हिशोब तपासणे, दिलेली कर्जे त्याची परतफेड किती झाली ते तपासणे, कोणाकडे थकबाकी किती ते तपासणे या सर्व बाबीची नोंद त्यास ठेवावी लागत असे. प्रत्येक महालनिहाय यांची नियुक्ती राज्याकडून केली जात असे. या अधिकाऱ्याचे कार्य राज्य कराचे ताळेबंद व त्याची छाननी करणे हे होते.

**४.२.६ दप्तरदारः**

होळकराच्या प्रशासन व्यवस्थेचा दप्तरादार हा महत्वाचा अधिकारी असे. यांची कामे ही फडणीसाने लिहिलेली जमाखर्चाची खतावणी तपासून त्याचा हिशोब ठेवणे. म्हणजेच जाबजवाब लिहिण्याचे कार्य करणे. जमाखर्चाची खतावणी सांभाळून ठेवणे व ती पाहिजे तेव्हा पहावयास उपलब्ध करून देणे. तसेच आपल्या विभागाचे सर्व दप्तर सांभाळण्याचे मुख्य काम दप्तराकडे असे. वसूली संबंधीचे दप्तर आणि रोकड आपल्या विभागाचे दप्तर सांभाळण्याचे मुख्य काम दप्तराकडेंच होते.[१२७]

**४.२.७ फडणीसः**

सरकारी कागदपत्र, महसूली कागदपत्र, ताळेबंद इ. महत्वाचे हिशोबी कागदपत्र जेथे जमा होत त्याला फड ऑफिस म्हणत. त्याच्या प्रमुखास फडणवीस असे म्हणत.[१२८] कमाविसदाराच्या मदतीसाठी त्याच्या कार्यालयात फडणीस हा अधिकारी नेमला जाई. हे कोषाध्यक्ष म्हणून राज्याचे सर्व कर एकत्र करून त्याचा ताळेबंद ठेवत असत. त्यास दस्तऐवजांची नोंद ठेवण्याची प्रमुख जबाबदारी असे महसूलाचा हिशोब ठेवणे, किल्यावरील वस्तु व साहित्यावर नियंत्रण ठेवणे, तसेच इतर साहित्याची नोंद ठेवण्याची जबाबदारीही फडणीसाचीच होती. त्याचप्रमाणे शिंबंदीच्या खर्चाचा हिशोब ठेवणे. सरकारच्या व वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आदेशान्वये पत्रे लिहिणे, परगण्याची रोजकीर्द ठेवणे यासारखी अनेक कामे फडणीसाकडे सोपविलेली होती.[१२९]

**४.२.८ पोतदारः**

परगण्याच्या स्तरावर असलेल्या पोतदाराने सर्व महसूल वसूलीचा व दैनंदिन वसूल केलेला पैश्याचा नीट पारखून तपासून तो पोतनिसाकडे पाठविण्याची जबाबदारी होती.

### ४.२.९ पोतनिसः

होळकराच्या प्रशासन व्यवस्थेचा पोतनिस हा ही महत्वाचा अधिकारी होता. परगण्यातील वसूल केलेला महसूलाचा पैसा व दैनंदिन प्राप्त होणारी रोकड सांभाळणे तसेच त्या वसूलीसंबधीचे दप्तर सांभाळणे हे प्रमुख जबाबदारी असे. सरकारी खजिन्यावर जातीने देखरेख ठेवणे. तसेच फडणीस व मुजुमदार यांना खतावणी लिहिण्यास मदत करणे यासारखी अनेक काम पोतनिसाकडे सोपविलेली होती. याशिवाय ही रोजच्या चलनातील नाण्याची पारख करण्याची जबाबदारी कामही पोतदाराकडेच होते. नाण्याची शुद्धता, वजन, धातु, मिश्रण, याबद्दलचे सर्वोत्तम ज्ञान असणाऱ्या व्यक्तिची पोतदार म्हणून नेमणुक केली जात असे. पेशवे काळात पोतदाराचे कार्य प्रामुख्याने सावकार करताना मंडळी करताना दिसते.[१३०]

### ४.२.१० जमेनिसः

होळकराच्या प्रशासन व्यवस्थेत जमेनिस हा एक दरखदार दर्जाचा महत्वाचा अधिकारी होता. त्याच्याकडे मुलकी प्रशासनात मुख्य जबाबदारी म्हणजे परगण्यातील जिराईत, बागाईत जमिनीचा अहवाल संबंधीत अधिकाऱ्याकडुन प्राप्त झाल्यानंतर सारा निश्चित कराण्याचे होते. तसेच होळकरांच्या दरबारात अमीन, शेखदार, चिटणीस या दरखदार दर्जाच्या अधिकाऱ्यांचा समावेश होता.

### ४.२.११ देशमुखः

सुभ्याचे जे उपविभाग प्रांत किंवा परागणे असत त्यांना देश म्हणण्याचा प्रघात प्राचीन काळापासून होता. त्यावरील वतनदार अधिकारी देशमुख म्हणून ओळखला जात असे. देशमुखीचे वतन कायमस्वरूपी व वंशपरंपरागत होते. गावात ज्याप्रमाणे पाटील त्याप्रमाणे देशावर देशमुख हा वतनी अधिकारी नियुक्त केलेला असे. देशमुख हा बहुदा मराठा जातीचा असे. यांच्या जोडीस लिहिता वाचत येणारा ब्राह्मण जातीचा दिवाण दिलेला असे. मातोश्री अहिल्याबाईंच्या काळात जमिनीची महसूल वसूली देशमुख—देशपांडे यांच्यामार्फत केली जात होती. आपल्या अखत्यारीतील उजाड गावाचे पुनवर्सन करणे, गावाच्या संरक्षणची काळजी घेणे. गोतसभेच्या मदतीने गावात न्यायनिवाडा करणे, गावातील जास्तीत जास्त जमीन लागवडीखाली आणणे. संकट समयी शेतकऱ्यांना शेतसाऱ्यात सवलत किंवा सुट देणे, आपल्या प्रदेशातील वसूल कमाविसदारामार्फत सरकारकडे जमा करणे तसचे वसूलीच्या प्रशासकीय व संरक्षणाच्या कामासाठी सरकारकडून पाठविण्यात आलेल्या लोकांना सहकार्य करणे. अशी अनेक प्रकारची कामे देशमुखाला करावी लागत होती. देशमुखाचे स्थान हे परगण्यात येणाऱ्या सर्व पाटलाचा तो नायक असे. पाटील कुलकर्ण्यांनी जमा केलेला महसूल आपल्याकडे जमा करून घेणे हे महत्वाचे कार्य करावे लागत होते. म्हणजेच तो आपल्या वतनी प्रदेशातील सर्व पाटलांवर देशमुख या नात्याने देखरेख ठेवण्याचे महत्वपूर्ण कार्य करावे लागत होते.

देशमुखाला काही जमीन इनाम व महसूल वसूलीच्या प्रमाणात ठराविक हिस्सा तसेच समाजातील मानपानाचे इतर हक्क दिलेले असते.[१३१] यावरून असे स्पष्ट होते की, होळकर शासकांनी व पेशव्यांनी माळवा व खानदेशामधील परगण्यातील देशमुख, देशपांडे यांच्याशी केलेल्या अनेक पत्रावरून विविध परगण्यातील देशमुखांच्या कार्याची व अधिकाराची माहिती मिळते. देशमुखाच्या या वरिष्ठ कचेरीतील कामाची व्यवस्था पाहणारे इतर अधिकारी हे दिवाण, मुजूमदार, फडणीस, दप्तरदार, पोतनिस व पोतदार असे होते.

**४.२.१२ देशपांडे:**

प्रत्येक परगण्यातील देशमुखाच्या मदतीला देशपांडे हा दुय्यम वतनदार अधिकारी नियुक्त केलेला होता. गावात ज्याप्रमाणे पाटील यांच्या मदतीस कुलकर्णी असे त्याप्रमाणे देशमुखाच्या मदतीस देशपांडे हा वतनी अधिकारी देशावर नियुक्त केलेला असे. देशपांडे यांस आपल्या अखत्यारीतील जमीन महसूलाचा हिशोब ठेऊन प्रत्येक गावा—गावातील कुलकर्ण्याच्या कामकाजावर देखरेख ठेवण्याची प्रमुख जबाबदारी असे. या कामाबद्दल त्यास सरकारकडून काही जमीन इनाम मिळत होती. तसेच इतर वेगवेगळे हक्क व महसूल वसूलाच्या काही टक्के रक्कम मिळत असे. म्हणजेच देशमुख व देशपांडे हे परगण्यातील उच्च दर्जाचे वतनी अधिकारी होते. गावात पाटील कुलकर्णी यांना सहाय्य करण्याकरिता गावात जसे वतनदार नोकर असत तसे देशाच्या मुख्य गावी देशमुख व देशपांडे यांच्या मदतीकरिता वरिष्ठ प्रतीचे वतनदार नोकर असत. देशमुख व देशपांडे यांच्या मदतीसाठी दिवाण, फडणीस, पोतनीस इत्यादी नोकर मुळचे हाताखालील होते.[१३२]

**४.२.१३ मंडलोई:**

होळकर राज्याच्या बहुतांश प्रदेशात मंडलोई हा वतनदार अधिकारी होता. मंडलोई हा वतन अधिकारी हे देखील कानुनगो प्रमाणेच मोगलांच्या प्रशासन व्यवस्थेचा वारस म्हणता येईल. माळव्यात मराठ्यांचा सत्ताविस्तार होण्यात इंदौरच्या नंदलाल मंडलोईने सुभेदारास सुरूवातीच्या काळात माळव्यात व उत्तर भारतात चांगलेच सहाय्य लाभलेले होते. म्हणून नंदलाल मंडलोई आणि मल्हारराव होळकरांचे चांगले संबध पुढील वाटचालीसाठी उपयुक्त ठरले. मंडलोई हा वतनदार सर्वसाधारपणे देशमुख, कानुनगो याच्या प्रमाणेच हा ही होता. मंडलोई आणि कानुनगो ही दोन्ही वतने कधी कधी एकाच व्यक्तीकडे दिली जात असत. होळकर राज्यातील खानदेशमधीले इडिया व बिज्जागडचे सरमंडलोई आणि सरकानुनगो वतन भुसकुटे घराण्याकडे प्रदिर्घकाळ चालत होती. असल्याचे दिसते, मंडलाईपणाचे हक्क, अधिकार आणि कार्य याबद्दल सविस्तर माहिती भुसकुटे यांच्याकडील कागदपत्रावरून मिळते.

**४.३ ग्राम प्रशासन:**

खेडे, कसबा, मौजेचे प्रशासन सारखेच होते. पाटील यास कुलकुर्णी व बलुतेदार यांच्या मार्फत खेडयाचा कारभार चालू होता. खेडयाचे गावाचे प्रशासन हे पाटलाकडे होते.

कसब्यापेक्षा लहान गावा मौजे म्हणत गावाच्या प्रमुखास पटेल किंवा पाटील म्हणत असत. या पाटील पदाची खरेदी विक्री केली जाई. गावातील तंटे मिटविणे जमिनीचा सारा वसूल करणे.

**मजर :** लहान खेडयास मजरे म्हणत असत.

**४.३.१ पाटील:**

होळकराच्या माळवा आणि उत्तरेकडील प्रदेशात चौधरी या नावानेही पाटील ओळखला जात असे. मौजा किंवा खेडगाव हा सुभ्यातील सर्वात शेवटचा आणि महत्वाचा घटक होता. देशक राजाने ज्या लोकांना त्यांची कामे पार पाडण्यासाठी उत्पन्नचा स्त्रोत म्हणून जमीन दिली अशा लोकांना देशक म्हणत असत. यात गटात प्रामुख्याने देशमुख किंवा दिसाई, देशपांडे किंवा देशकुलकर्णी, पाटील, कुलकर्णी, चौगुला, शेटे, महाजन व महार यांचा समावेश होता. स्थानिक प्रशासनातील अत्यंत महत्वाचा घटक पाटील होता. पाटील हा गावतील वतनदार अधिकारी गावचा प्रमुख असे. होळकर राज्यात पाटील यास सरपंच, पटेल किंवा गावचा मुखिया, पाटील, गावपाटील, ग्रामगोपाळ मोकादम, चौधरी ही एकाच अधिकार पदासाठी स्थलपरत्वे वापरलेली नावे आहेत. गावाची सर्वस्वी जबाबदारी पाटलावरच होती. तो पाटील हा गावचा राजाच होता. पाटील हा गावातील प्रजा व राजा यांना जोडणारा दुवा होता. पाटलास गावापूरते मुलकी, दिवाणी व फौजदारी अधिकार असायचे.[१३३] बहूतेक सर्व पाटील घरदांज व काही सरदार होते. त्यामुळे त्यांना गावात मानाचे स्थान होते. त्यानुसार ते गावात वावरत असत. मराठेशाहीतील भोसले, दाभाडे, होळकर, पवार, शिंदे, गायकवाड हे सुरुवातीस पाटील किंवा सरदार होते. यातूनच त्यांनी स्वपराक्रमावार स्वत:ची राज्ये उभी केली. महादजी शिंदेना पाटील म्हणून घेण्यात भूषण वाटत होते. काळ्या जमीनीवर जेंव्हा पांढर रचली गेली, तेंव्हा पासून पाटील की सुरु आहे. गावाचा हा प्रमुख असल्याने त्यांस गावचे मुलकी व फौजदारी प्रशासन प्रमुख म्हणून कामे करीत असे.

पाटील, पटवारी व जमीनदार यांच्या पिळवणूकीपासून रयतेच्या हक्कांचे रक्षण करणे हे होळकर शासक अहिल्याबाई आपल्या धार्मिक कर्तव्यापैंकी एक त्या मानत असत. हे सारे मल्हारी मार्तण्डाचे काम आहे अशी त्यांची श्रद्धा होती. पाटील हा गावाचा राजाच होता. त्याच्याकडे गावाचे सर्व अधिकार होते. जमीन महसूल ते न्यायदान पर्यंतचे सर्व कामे गावपातळीवर पाटीलच करीत असत. गावचे हक्क, गावचे संरक्षण व सरकारी वसूलीचे कार्य पाटील यांनाच करावी लागत होती.

हे गावाचे कायमचे अधिकारी म्हणून गावकीची विविध प्रकारचे कामे करीत. शांतता व सुव्यवस्था राखणे, मामलतगार कमाविसदार, तरफदार यांना सारा निश्चितीसाठी आणि वसूलसाठी मदत करणे, गावात घडणाऱ्या गुन्ह्यांचा तपास करणे, गुन्हेगारांना शिक्षा करणे, तंटे—बखेडे सोडविणे, प्रसंगी गोतसभेच्या मदतीने न्यायदान करणे, लावणी, संचनी, उगवणी

करणे. गावातील पडीत जमीन लागवडीखाली आणणे, लागवडीखाली जमीनीची योग्य काळजी घेऊन शेतीचे उत्पादन वाढविणे हे पाटील यांची कामे होती.[१३४]

अशा प्रकारची अनेक महत्वपूर्ण कार्य पाटलाला पार पाडावी लागत असत. पाटील याच्यापासून मुलकी प्रशासनाची सरसुभेदारापर्यंत पाटलास त्याच्या कामाचा मोबदल्यात इमानी जमीन. अनेक प्रकारचे हक्क लाजीमे व मानपान मिळत होते. गावच्या महसूल वसूलपैकी काही हिस्साही त्यास मिळे. गावातील कारगीर, सेवकवर्गाकडून मोफत सेवा व वस्तु त्यास मिळत होत्या. तसेच त्यांच्या सोबत एक राबता महार सदैव तैनातीस असे. .

पाटील यांना या कामाच्या बदल्यात त्यांना कुलकर्णी प्रमाणेच जमीन इमान आणि वेगवेगळे हक्क, प्राप्त मानपान मिळत होते. या अधिकाऱ्याचे अधिकार हे वंशपरंपरागत असल्याने ते आपल्या शासकांशी प्रामाणिकपणे व प्रभावीपणे गावाची सेवा करीत असत. या अधिकाऱ्यांस त्यांच्या राजाकडून जी जमीन दिली जाई. त्यास सारा माफ केलेला असे. यातील अधिकाऱ्यास वतनदार असे म्हणत.[१३५]

सर्व सरकारी अधिकारी आणि वतनी अधिकाराच्या माध्यमातून सुभ्यापासून ग्रामपातळी पर्यत मुलकी प्रशासन व्यवस्था होळकर राज्यात चालवली जाई.

### ४.३.२ कुलकर्णीः

गावपातळीवर कुलकर्णी हा पाटलाच्या मदतीला असणारा वतनदार अधिकारी होता. कुलकर्णी वतनालाही पाटीलकी प्रमाणेच वंशपरापरागत समजले जाई. गावातील सर्व प्रकारच्या जमीनींची नोद ठेवणे, प्रत्येक व्यक्तींच्या नावावर असणाऱ्या जमीनीचा व महसूलाचा जमाखर्च ठेवणे हे सर्व त्याचे मुख्य काम होते. गावच्या लावणी संचणीकडे लक्ष देणे, महसूल वसूल आणि पाटलाच्या सर्व कामात मदत करणे. अशी कित्येक कामे कुलकर्णी सांभाळत असे. थोडक्यात आजच्या काळातील तलाठी व ग्रामसेवक या दोघांचेही कार्य एकट्या कुलकर्णीकडे होते. पाटलाप्रमाणेच त्यासही इमान जमीन, हक्क लाजिमे आणि मानपान मिळत असत. पेठेच्या आणि कसब्याच्या ठिकाणी शेटे व महाजन हे वतनी अधिकारी स्थानिक प्रशासन व्यवस्था सांभाळत असत. हा गावाच्या लोकांच्या जमिनीचे हिशोब ठेवण्याचे कार्य करण्याचा अधिकार होता.

गावाचा कारभार पाटील यांच्या मार्फत चालत होता. पण कुलकुर्णीच्या मदतीने हे कार्य चालत होते. कुलकर्णी हा गावचा प्रधान होता. गावातील जमीनीचा, महसूलीचा व इतर बाबीचा हिशोब ठेवणे, गावाचे दप्तर सांभाळणे, जमीनीचे क्षेत्र, आकार, वर्णन जमाखर्च, सरकारला द्यावयाचा महसूल, माणसाची जनावरांची गणती, पंचायतीचा न्यायनिवाडा, पावत्या, फौजदारी कामाचे हिशोब इ. कामे कुलकर्णीच सांभाळत असत.

कुलकर्णी हा खास करुन ब्राह्मण जातीचाच नेमला जाई. हे पद पाटील इतकेच गावात महत्वाचे होते. कुलकुर्णी व पाटील यांच्या सरकारी कामात मदत करण्यासाठी महार, रामोशी

व तराळ हे हाताखाली काम करीत होते. गावाच्या गरजा भागविण्यासाठी बारा जणांचे एकमंडळ होते त्यास बारा बलुतेदार म्हणत त्यात सुतार, लोहार चांभार, महार, कुंभार न्हावी, परीट, मांग, भट, गुरव व मुलाणी होते.

**४.३.३ शेटे महाजन:**

शिवकाळ व पेशवेकाळात सपूर्ण मराठा राज्यात शेटे महाजन ही वंशपरंपरागत वतनदार पदे दिसून येतात. बाजार पेठेची भरभराट करणे कसब्याचे संरक्षण करणे, शांतता व सुव्यवस्था राखणे, जकात गोळा करणे तसेच सरकारी करांची वसूली करणे, लोकाच्या अडीअडचणी सरकारपर्यंत पोहचविणे इत्यादी महत्वाची कामे त्यांच्याकडे होती.[१३६]

**४.३.४ चौकीदार:**

गावातील जनतेस सूचना व मार्गदर्शक तसेच गावाच्या सिमेवर कोणी आक्रमण केल्यास त्याचा साक्षीदार म्हणून चौकीदारास कार्य करावे लागत असे.

होळकर घराण्याच्या मुलकी प्रशासन व्यवस्थेतील महसूल प्रणाली ही परिस्थितीजन्य होती. मुलकी प्रशासन हा प्रशासनाचा अविभाज्य घटक अभ्यासताना सुभा हा महत्वाचा घटक निदर्शनास आला. होळकर शासकानी पेशवे कालीन मुलकी प्रशासनाचा अंगीकर केलेला होता. एकूणच पेशवेकालीन मुलकी प्रशासन व्यवस्था ही होळकरांच्या मुलकी प्रशासनाचे प्रेरणास्थान होते.

मराठी सत्तेचा विस्तार, विकास व वैभव निर्माण करण्यासाठी होळकर शासकांनी प्रशासनातील मुलकी व्यवस्था मजबूत बनविली. राज्याचा कारभार सूव्यवस्थित चालण्यासाठी चौदा कलमी फडणीसांचे कायदे तयार करण्यात आले. या कायद्यान्वये महसूल वसूली केली जात असे. कठोर कायद्यान्वये भष्टाचारास आळा बसविला व राज्याच्या तिजोरीचा आर्थिक व्यवहार हा चोख ठेवण्यात आला कर रचना ही सौम्य व समानतेच्या तत्वावर आधारित होती. प्रजेच्या हितावह शेती धंद्यावर सुधारणा घडवून आणल्या. कर रूपाने जमा केलेल्या पैसा हा फक्त रयतेच्या हितासाठीच वापरला जात असे. होळकर घराण्याने शासन व्यवस्थेत घडी बसवित असताना नेहमीच रयतेच्या हिताला प्राधान्य दिले. अशा वैशिष्टये पूर्ण मुलकी प्रशासनामुळे होळकर शासकांनी जनतेच्या मनात आधिराज्य गाजविले.

## संदर्भ सूची


१ लुनिया बी.एन., मराठा प्रभुत्व, भाग—३ लक्ष्मीनारायण अग्रवाल प्रकाशक, आग्रा प्रथमवृती, १९८५ पृ.५४२.५४३

२ दीक्षित म.श्री., प्रतापी बाजीराव, गजानन क्षीरसागर प्रकाशक, पुणे, १९९९,पृ.२१

३ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.१७७

४ प्रा. जोशी सु. ह., डॉ. कुलकर्णी म. रा., डॉ. शेळके रघुनाथ, कुलकर्णी शिल्पा, दांडेकर सुनिता, डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड पब्लिकेशन, पुणे, प्रथम आवृत्ती, २००९, पृ.३२७

५ लुनिया बी.एन., मराठा प्रभुत्व, भाग—३ लक्ष्मीनारायण अग्रवाल प्रकाशक, आग्रा प्रथमवृती, १९८५ पृ.३५४—३५५

६ सोनवणी संजय, धनगरांचा गौरवशाली इतिहास, पुष्प प्रकाशन, पुणे, द्वितीय आवृत्ती, २०१५, पृ.१०३

७ कोळेकर हरीभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१३, पृ.१

८ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठ्याचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२६०

९ कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास, खंड–३, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, १९८६, पृ.२४०—२४३.

१० पारसनीस दत्तात्रय बळवंत, (संपा.), होळकर दरबारांतील हिंगण्यांची वकिली, निर्णयसागर प्रकाशन, मुंबई, १९११, पृ.११५

११ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३९८

१२ पारसनीस दत्तात्रय बळवंत, (संपा.), होळकर दरबारांतील हिंगण्यांची वकिली, निर्णयसागर प्रकाशन, मुंबई, १९११, पृ.१६२—१६४

१३ प्रा. बेडदे धनंजय प्रभाकर, परिवर्तनाची गौरवगाथा: लोकमाता अहिल्याबाई होळकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती, १९९६, पृ.४९

१४ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास: डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४,पृ.२४१

१५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.४३६

१६ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, पत्र व्यवहार, खंड—१२, इतिहास लेखक व संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२५,पृ.४—५

१७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९.२०

१८ लंभाते—अवचरे रूपाली, (संपा.), लोकमाता अहिल्यादेवी विशेषांक, यशोदीप पब्लिकेशन्स, पुणे, पृ.५

१९ कित्ता, पृ.५

२० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१६०.

२१ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, पत्र व्यवहार, खंड—१२, इतिहास लेखक व संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२५,पृ.४—५

२२ पाटील सु. आ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, अहिल्यादेवी प्रगती मंडळ प्रकाशक, जळगांव, २०००, पृ.६१

२३ Barve M. W., Life of Devi Ahilyabai Holkar, 1922, p170-171

२४ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, पत्र व्यवहार, खंड—१२, संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२५, पृ.१३२

२५ अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट, अहिल्या स्मरिका, अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट इंदौर, व्दारा प्रकाशित, वर्ष १९७४, पृ.५३

२६ किता, पृ.५४

२७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१८५

२८ अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट, अहिल्या स्मारिका, अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट इंदौर व्दारा प्रकाशित, वर्ष १९७०, पृ.११

२९ निसळ स. शि., (संपा.), दिवाण पळशीकर दप्तर, भाग—१, अहमदनगर जिल्हा वस्तु संग्रहालय, अहमदनगर, १९७२, पृ.३४

३० सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तरातून निवडलेले कागदपत्रे, खंड—१७, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, १९३२, क्र ४३, पृ.३५

३१ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत इतिहास संशोधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२०, पृ.५

३२ निसळ स. शि., (संपा.), दिवाण पळशीकर दप्तर, भाग—१, अहमदनगर जिल्हा वस्तु संग्रहालय, अहमदनगर, १९७२, पृ.५—७

३३ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत

इतिहास संशेधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२०, पृ.११३—११४

३४ निसळ स. शि., (संपा.), दिवाण पळशीकर दप्तर, भाग—१, अहमदनगर जिल्हा वस्तु संग्रहालय, अहमदनगर, १९७२, पृ.३४

३५ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०,पृ.२६३—२६४

३६ पुरुषोत्तम दास, देवी श्री अहिल्याबाई यांचे सचित्र चरित्र, अनंत आत्माराम मोरमकर, १९१३, पृ. १६२

३७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२०१—२०३

३८ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठ्याचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२६०

३९ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२,पृ.५६—५७

४० भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३६

४१ महाजन टी.टी., खानदेशाचा राजकीय व सांस्कृतिक इतिहास, १३८२—१८१८, कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर पुणे, १९९८,पृ.२७०

४२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१३३

४३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९२

४४ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४,पृ.२४२

४५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१३५

४६ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२,पृ.५७—५८

४७ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक १९८७, वर्ष—२४वे, पुस्तक९५, पृ.४४—४५

४८ किता, पृ.३९

४९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४,पृ.२३४

५० ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९३

५१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९६

५२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९६—१९७

५३ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक१९८७, वर्ष २४वे पुस्तक, पृ. ३९

५४ मालव साहित्य, इंदूर विशेषांक, महाराष्ट्र साहित्य सभा, त्रैमासिक वर्ष .५ अंक.१ भाद्रपद शके १८५५, पृ.१८३

५५ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३६४

५६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.११३

५७ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०,पृ.१५२

५८ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.२७

५९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१९८

६० इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.६०—६७

६१ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ. १७७—१७८

६२ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३६७

६३ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२५९—२६३

६४ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२४५—२४६

६५ किता, पृ.२४६

६६ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहास: डॉ. गणेश मतकर,

अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४,पृ.७३

६७ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनु.८५, पृ.२०७

६८ शूरनर गोविंदराव, लोकमाता राजमाता महाराणी अहिल्याबाई होळकर, प्रबोधन प्रकाशन, नांदेड, तृतीयावृत्ती, २०१५, पृ.३५

६९ प्रा गावडे के. आर., राष्ट्रमाता अहिल्याबाई होळकर (जीवन व कार्य), पंचकुला प्रकाशन, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, २०१४, पृ.९०

७० शेळके नीलेश केदारी, होळकरांची थैली, अक्षरवेध प्रकाशन, गडहिंग्लज, पहिली आवृत्ती, २०१५.पृ.८

७१ केळकर नरसिंह चिंतामणी, मराठे व इंग्रज संबंध, मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे, पहिली आवृती, १९१६. पृ.१११

७२ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.६८

७३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२१२

७४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२०१

७५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.९०—९१

७६ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.२६३—२६९

७७ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१३७

७८ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, भाग—१, दांडेकर ब्रदर्स इंदूर, १९२४.पृ.२६३

७९ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.५६

८० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.११—१३

८१ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१२—१३

८२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर

गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.३५८

८३ किता, पृ.१५३

८४ किता, पृ.पृ.१५४

८५ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१६६

८६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१७२

८७ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३४९

८८ कित्ता, पृ.३४९—३५०

८९ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०,पृ.१६७

९० इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२३, आर्यभूषण छापखाना, पुणे, १९३९, पृ.१०६

९१ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१९३

९२ महाजन टी.टी., खानदेशाचा राजकीय व सांस्कृतिक इतिहास, १३८२—१८१८, कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर पुणे, १९९८, पृ.३१९

९३ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, खंड—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, पुणे. पृ.२०५

९४ नजन ओमप्रकाश वसंत, अहिल्याबाई होळकर, साकेत प्रकाशनः पुणे, पाचवी आवृत्ती, २०१६.पृ.६७

९५ महाजन टी. टी., खानदेशाचा राजकीय व सांस्कृतिक इतिहास, १३८२—१८१८, कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर पुणे, १९९८, पृ.३१८

९६ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, खंड—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, पुणे. पृ.२०६

९७ सावंत बी. एस., जाधव व्ही. के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२,पृ.२०२

९८ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.६२

९९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.२२

१०० सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२,पृ.६५

१०१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१७७

१०२ कित्ता, पृ.१९२

१०३ कित्ता, पृ.१९०

१०४ कित्ता, पृ.१७३

१०५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१७६—१७७

१०६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.५५—५६

१०७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.५६

१०८ कित्ता, पृ.५७

१०९ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.५९

११० ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१३

१११ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१७७

११२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१७१—१७२

११३ कित्ता, पृ.२०२

११४ कित्ता, पृ.३३१

११५ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक.१९८७, वर्ष २४वे पुस्तक, पृ. २६

११६ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.६०

११७ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, खंड—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, पुणे. पृ.३०२—३०४

११८ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनु.१८२

११९ सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तरातून निवडलेले कागदपत्रे, खंड—३९, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३२, क्र.४३, पृ.२४

१२० भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, पत्र व्यवहार, खंड—१२, इतिहास लेखक व संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२५, पृ.२९

१२१ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक १९९२, वर्ष २४वे , वर्ष—२८वे, पुस्तक—११२ पृ.३३

१२२ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०, पृ.२२२

१२३ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२६०

१२४ सावंत बी. एस., जाधव व्ही. के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.५५

१२५ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.३१

१२६ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, खंड—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, पुणे, पृ.१४६—१४७

१२७ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.६१

१२८ प्रा. जोशी सु. ह., डॉ. कुलकर्णी म. रा., डॉ. शेळके रघुनाथ, कुलकर्णी शिल्पा, दांडेकर सुनिता, डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड पब्लिकेशन, पुणे, प्रथम आवृत्ती, २००९, पृ.२८८

१२९ महाजन टी.टी., खानदेशाचा राजकीय व सांस्कृतिक इतिहास, १३८२—१८१८, कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर पुणे, १९९८,पृ.३३१

१३० सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.६१

१३१ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०, पृ.३६२—३६३

१३२ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.३६३

१३३ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.२९०—२९१

१३४ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती, २०१६, पृ.४६

१३५ कित्ता, पृ.४६

१३६ कित्ता, पृ.४७

**प्रस्तावना:**

छत्रपती शिवाजी महाराज यांनी मोगली साम्राज्यास आव्हान देवून हिंदवी स्वराज्याची स्थापना करून गनिमी काव्याच्या तंत्राने त्यावर यशस्वी मात केली. पुढे मराठा सेनानीने गनिमी काव्याचा मोठ्या प्रमाणात उपयोग करून अदिलशाही व मोगल शत्रूवर मात करण्यास यश मिळवले. हे फक्त लष्करी धोरणाचे द्योतक होते. अठराव्या शतकातील स्थिती ही भिन्न स्वरुपाची होती. यावेळी मराठा राज्याच्या सिमा कर्नाटकापासून ते थेट अटकेपर्यंतच्या प्रदेशात पोहचविण्याचे धाडस लष्करी प्रशासनाने शक्य करून दाखविलेले होते. छत्रपती शाहू महाराज व त्यानंतरच्या छत्रपतींनी रणमैदान शौर्यापासून दूर झाल्याने यापुढे पेशव्यांनाच या लष्करी धोरणाचे नियमन करावे लागले. ऐवढ्या अवाढव्य प्रदेशावर नियंत्रण मिळविण्यासाठी तेवढ्याच सरदारांची व सैन्याची गरज पूर्ण करण्यासाठी पेशव्यांनी स्वत:च्या हातात मराठा राज्याची सुत्रे हाती घेऊन आपल्या सरंजामी सरदारामार्फत राज्य कारभार सुरु केला. पेशव्यांनी मोगल बादशहाकडून सनदाची प्राप्ती केल्याने व गुजरातमधून दाभाडेचा पराभव केल्याने विस्तृत लष्कराची गरज भासत होती. त्यासही पेशव्यांनी सेनापती ऐवजी सरंजामदारशाहीस प्रोत्साहन दिल्यावर या पार्श्वभूमीवर मल्हारराव होळकरांचा सरंजामी सरदार म्हणून उदय झाला. त्यांनी सुद्धा छत्रपती शिवाजी महाराज व बाजीराव पेशव्याप्रमाणे गनिमी काव्याच्या तंत्राचा अवलंब करुन सैन्याच्या बळावर मोगल प्रदेशात व उत्तरेस आपले वर्चस्व निर्माण केले. त्यामुळेच अठराव्या शतकात मल्हारराव होळकर हे उत्तरेचे उत्तम जाणकार व शौर्यवान सुभेदार म्हणून नावारुपास आले. ऐवढच काय मराठा साम्राज्याचे प्रमुख आधार स्तंभ होळकर व शिंदे घराणे होते.

प्रस्तुत प्रकाराणामध्ये होळकर शासकाच्या लष्करी प्रशासनाचा सविस्तर अभ्यास करण्यात आलेला आहे. होळकर राज्यातील शासकांनी आपल्या सैन्याच्या बळावर आपल्या राज्याच्या सिमेत सातत्याने वाढ केलेली होती. संपूर्ण होळकर राज्यातील कायदा व सुव्यवस्था आपल्या अधिकार क्षेत्रातील सैनिकांच्या सहाय्याने ते पाहत असत. माळव्यात यापूर्वी मोगल साम्राजाचे प्रशासन होते. त्यात थोडासा बदल करून होळकर राज्याचे लष्करी प्रशासन पेशव्याची लष्करी प्रशासन राबिवले. त्यानुसार होळकर शासकानी आपल्या लष्कराची पुनर्रचना सुसूत्रता निर्माण केलेली होती. पेशवाईत होळकराचे लष्कर म्हणजे बलाढ्य लष्कर होते. होळकर शासकांचा पेशवाईत एक प्रमुख सरदार म्हणून चांगलाच दबदबा होता. सुभेदार मल्हारराव होळकर यांनी इंदौर राज्याची स्थापना केली. श्रीमंत पेशवे यांच्या प्रमुख सरदारांपैकी एक पराक्रमी सरदार मल्हारराव होळकर होते. होळकरशाहीचा पाया मल्हाररावांनी घातला. यांच्या मर्जीशिवाय पेशव्यांचे पानही हलू नये, इतका दबदबा त्यांनी स्वकर्तृत्वाने निर्माण केला होता. पेशव्यांनी इ. स. १७६१च्या पानिपतचा कलंक पुसून काढण्यासाठी उत्तर मोहीम हाती घेतली. तेव्हा मल्हररावांनाही आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी ते या मोहिमेत आघाडीवर

असताना वाटेतच त्यांची प्रकृती बिघडल्याने अचानक कर्तबगार सासऱ्याचा मृत्यू झाला. पण सुभेदार मल्हाररावांच्या अचानक जाण्याने होळकरांच्या दौलतीचे रक्षण करण्याची जबाबदारी वैराग्य धारण करणाऱ्या अहिल्याबाईला उचलावी लागली. पती, सासरे यांच्या निधनाने अहिल्याबाईच्या आयुष्यातील दु:खाची मालिका पुढेही चालूच राहिली. तेव्हा त्यांनी २१ वर्षाच्या मालेरावास गादीवर बसवून राज्यकारभार सुरू केला. पण तो अल्पजीवी ठरला.

मल्हारराव होळकरांच्या कुशल आणि ममत्वपूर्ण मार्गदर्शनाखाली युद्ध, नेतृत्व, प्रशासन, न्यायनीती या अंगानी परिपूर्ण झालेल्या अहिल्याबाईंनी १७६७ ते १७९५ पर्यंत अठ्ठावीस वर्ष राज्य सांभाळले. तत्पुर्वीच सासरे सुभेदार मल्हारराव होळकर व सासू गौतमाबाईनी यांनी सून अहिल्याबाईचे गुण ओळखूण आपल्या मार्गदर्शनाखाली कुशल राजनितीचे, युद्धाचे डावपेच, राज्यकारभार चालविण्याचे, शेजारील राज्याबद्दलच्या धोरणाविषयीचे, युद्ध निती व लष्करी प्रशासनातील महत्वपूर्ण बाबी, युद्धातील अनेक पेचप्रसंग, युद्ध क्षेत्रावर करावयाची कामगिरी, खाजगी व दौलतीच्या कामकाजाची जबाबदारी सांभाळणे, दारूगोळा व युद्ध सामुग्री गोळा करणे, ती सूरक्षित स्थळी हलविणे व त्याविषयीची माहिती अतिशय गुप्त ठेवणे, सल्ला मसलतीचे कार्य करणे, यशस्वीपणे फौजेच्या हालचाली करणे, रसद पुरवठा करणे, त्यांच्यातील हिकमती व डावपेचाने आपल्या बाजूने परिस्थिती निर्माण करून अर्धे युद्ध लढाई होण्याअगोदरच जिंकणे, शत्रूचे मानसिक परिवर्तन करून त्याचे मानसिक खच्चीकरण करणे, शत्रूशी करावयाचे तह व करार,राजनितीचे व्यावहारीक शिक्षण अशा अनेक इत्यंभूत बाबींचे शिक्षण व प्रशिक्षण काळजीपूर्वक वेळोवेळी देत असल्यामुळे अहिल्याबाईने ते आत्मसात करून अतिशय कुशलपणे त्यांनी नंतर राज्यकारभार केला. तसेच या सर्व बाबीचे प्रशिक्षण त्यांना सहजपणे सासऱ्याकडून मिळाले. त्यामुळे होळकर शासक सुभेदारांची कर्तबगार सून अहिल्याबाई होळकर यांनी आपल्या बौद्धीकतेच्या जोरावर अनेक मातबर सरदारावर मात केली.

सुभेदार मल्हारराव होळकर यांच्यासोबत खंडेराव सुद्धा नेहमी युद्ध मोहीमावर जात असत. त्यावेळी गौतमाबाई होळकर अहिल्याबाईच्या मदतीने खाजगीचा व सरकारी दौलतीचा राज्यकारभार स्वतंत्रपणे सांभाळत असत. सासूबाईच्या निधनानंतर अहिल्याबाईच सर्व काही कारभार पाहत होत्या. स्वत: घोड्यावर बसून आपल्या राज्याचा फेरफटका मारत व सर्व परिस्थितीचा अतिशय डोळसपणे प्रत्येक घटकांची पाहणी करीत असत. तसेच सासरे सुभेदार मल्हारराव होळकर व पती खंडेराव युद्ध मोहिमावर गेल्यावर अहिल्याबाई आपल्या राज्याचा स्वत: जातीने लक्ष घालून आपल्या राज्याचे शासन व प्रशासन, सैन्यांची हालचाल, गोळा, बारूद, तोफा, धन, रसद पुरवठा व राज्याचा महसूल जमा करणे अशी अनेक कामे आपल्या मंत्र्याकडून करून घेत असत. अहिल्याबाईच्या दक्ष कारभारामुळे सर्वावर आपोआप एक प्रकारचा वचक निर्माण झाला. सुभेदार मल्हारराव होळकर यांनी आपल्या सूनेला व मुलाला

राज्यकारभाराचे योग्य धडे दिल्याने हळुहळु राज्याची थोडी थोडी जबाबदारी देवून त्यांना आपल्या कार्यात चांगलेच सहभागी करून घेतले. त्यामुळे सुभेदार मल्हारराव होळकर यांना राज्य विस्तार करण्यास व मराठा राज्य उत्तर भारतात पसरविण्यास पूर्ण वाव व सहकार्य मिळाले. म्हणूनच मराठ्यांना या अशा पराक्रमी सरदारमुळेच दिल्लीवर आपला वचक व विजय संपादित करता आला.

त्यामुळे होळकर राज्याचे फार मोठे नुकसान झाले. पण यापुर्वीच सुभेदार मल्हरराव होळकर यांनी तुकोजीरावांकडे सेनापतीचे कार्य सोपविलेली होती. त्यामुळे ते अहिल्याबाईंच्या पश्चात ते होळकर गादीवर आले. पण त्यांचा अल्पावधितच वृध्दपकाळाने मृत्यू झाल्याने त्यांच्या वारसा प्रश्नामुळे होळकर शाहीत वाद झाल्याने काही काळ लष्करी प्रशासन खंबीरपणे राबविता आले नाही. त्यांच्या नंतर आलेले काशीराव यांचा काळ हा अस्थिरतेचा काळ होता. त्यामुळे त्याना लष्करी प्रशासन खंबीरपणे राबविता आले नाही. पण पुढे यशवंतराव यांनी मात्र अनेक संकटाना सामना देत पुढे अनेक मातबर सरदार व अफाट सैन्य जमवून त्यांनी आपला दबदबा निर्माण केला. यशवंतराव होळकर यांना लष्कराच्या बळावर आपल्या व बाहेरच्या शत्रूवर मात करण्यातच संपूर्ण हयात गेली. त्याच लष्कराच्या बळावर इंग्रजाना सुध्दा मागे घेण्यास भाग पाडून त्यांच्याशी राजघाटचा तह करून पुन्हा नव्या दमाने इंग्रजाशी दोन हात करण्यासाठी संपूर्ण भारतातील राजे महाराजेंना एकसंघ लढा पुकारण्याचे आव्हान केले पण त्यांना त्यात यश आले नसले तरी त्यांनी स्वत: लढा दिला. पण यशवंतरावांच्या पश्चात होळकर शासकाना इतर सत्ताधीशाप्रमाणे इंग्रजांशी तह करून छोटया संस्थानचे राजे बनून केवळ अंतर्गत लष्करी प्रशासन सांभाळावे लागले. मल्हरराव दुसरे, मार्तण्डराव व खंडेराव यांच्या कारकीर्द या अल्प ठरलेल्या होत्याच. शिवाय मंदसौरच्या तहाने होळकर राज्याचे छोट्याशा संस्थानात रूपांतर झाल्याने त्यांना लष्करी मोहिमा काढण्याची गरजच नव्हती. केवळ अंतर्गत व्यवस्था पाहण्याचे काम राहिलेले होते. तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, तुकोजीराव तिसरे, यशवंतराव दुसरे होळकर यांनी संस्थानात नागरी सुविधा रयतेस उपलब्ध करून दिल्या.

**५.१ केंद्रीय लष्करी प्रशासन:**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून लष्करी मोहिमामध्ये योग्य प्रशासन राबविल्यामुळेच शत्रूंना धुळ चारण्यात यश मिळाले. त्याच प्रमाणे लष्करी मोहिमातील होळकर संस्थानच्या शासकांनी युद्ध निती, शस्त्रास्त्रे, तोफखाना, गनिमी काव्याचा यशस्वी वापर, कवायती फौजेचे संचलन, जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावणे, लष्करातील शिस्त व जलद हालचाली याबाबतीतील अचूक प्रशासन हेच होळकरांच्या लष्करी मोहिमांचे गमक होते. इंग्रजांनी वसई घेतल्यावर आपले राज्य कसे सूरक्षित असू शकते असे त्यांना वाटत होते. असे होळकर शासक अहिल्याबाईंना वाटत होते. तर यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांचा वाढता धोका वेळीच ओळखूण संपूर्ण भारतातील राजे महाराजे यांना एकजुटीने लढा देण्याची योजना

आखलेली होती. पण त्यांचे दुर्दैव की त्यांच्या धोरणास ना मराठा सरदारांनी वा शासकांनी ना इतर शासकांना काळाची पावले ओळखता आली नाहीत. त्यामुळे त्यापैकी कोणीही वेळेवर एकत्र आले नाहीत. त्यामुळेच इंग्रजाचे फावले. म्हणजेच होळकर शासकाना पुढील संभाव्य धोक्याची जाण झालेली होती हे स्पष्ट होते.

**५.१.१ सुभ्याची संरक्षण व्यवस्था:**

होळकरशाहीची सरंक्षण व्यवस्था मध्ययुगीन काळात कोणत्याही राजास राज्य स्थापन करणे किंवा विस्तार केल्यावर त्यांचे खंबीरपणे संरक्षण करुन कायम टिकविणे बाह्य आक्रमणापासून या अंतर्गत बंडाळ्यापासून वाचविणे यासाठी राज्यात लष्करी तयारी जय्यत ठेऊन त्याचा वेळीच बंदोबस्त करणे महत्वाचे असते. अगदी त्याप्रमाणे मराठा सरदार मल्हारराव होळकर व इतरांनी मुगल साम्राज्यातील बराच मोठा भाग जिंकून त्यावर नियंत्रण ठेवले. त्यासाठी अंतर्गत शांतात व सुव्यवस्थेसाठी पोलीस खात्याची निर्मीती होळकर राज्यात केलेली होती. त्या त्या प्रदेशावरील प्रमुखाकडे म्हणजेच सुभेदार, सरंजामदार, कमाविसदार, मामलेदार व सर्व वतनदार यांची जबाबदारी सोपविलेली होती. यांच्या नियंत्रणाखाली पोलीस दल ठेवलेले होते. त्या त्या पातळीवरील अधिकाऱ्याने पोलीसाच्या मदतीने राज्यातील वा नगरातील रयतेच्या जीवीताची व मालमत्तेचे संरक्षण करुन विकासात हातभार लावणे ही प्रमुख जबाबदारी होती.

नरहर बल्लाळ यास तीनशे स्वार देऊन खानदेशावर नागपूरच्या भोसल्यांनी इ.स. १७६८—६९ मध्ये पाठवून दिले. त्यावेळी खानदेशाचे सुभेदार चिंतामण हरी यांनी सैन्याची जमवा जमव करुन नरहर बल्लाळचा पूरता बंदोबस्त करण्यासाठी स्वत: निघाला. पेशवे काळात सर्व सुभ्यावरील सुभेदारांना आपल्या अंतर्गत सुभ्यावरील संरक्षणाची जबाबदारी सोपविलेली होती. या सुभेदारांना होळकर शासकाकडून सूचना वा आदेश दिले जात होते. त्यानुसार त्यांना कार्य करावे लागत होते. सरसुभेदाराच्या या कामगिरीबद्दल पेशवे पहिले माधवराव यांनी पत्र पाठवून त्याची स्तुती केली होती. आणि संरक्षणाचे असेच कार्य करा म्हणून प्रोत्साहन दिले होते.[१]

खानदेशामध्ये सदाशिवभाऊचा तोतया आल्याने त्यांनी मोठा उपद्रव सुरु केला. तेंव्हा सुलतानपूरच्या कमाविसदारानी पेशव्यांस या तोतयाचा बंदोबस्त करण्याची विनंती केलेली होती. तेंव्हा नारो कृष्ण या सुभेदारास याची गंभीर दखल घ्यावी असा आदेश दिलेला होता. तेंव्हा या सुभेदारानी जी उपाय योजना केली. ती पेशव्यास २५ नोव्हेंबर १७६४ ला पत्राने कळविले होते.खानदेशातील जगजीवन पवार यांनी मोठा उपद्रव सुरु केलेला होता. तेंव्हा सुभेदार नारा कृष्ण यांनी नसरतपूर व चाळीसगाव या ठाण्याचा कडक बंदोबस्त करण्यासाठी खास पथक व अंबादास बल्लाळ यांना पत्र लिहून कळविले होते. पेशव्यांनी या प्रकरणात लक्ष घालून सुलतानपूरच्या कमाविसदार नारो कृष्ण यांना आदेश दिला की, ‘मौजे जेतनगर

येथून ज्या तोतयाच्या बातम्या आल्या होत्या बंदोबस्तासाठी मानाजी निकम याला पाठविले आहे. तसेच त्यांच्याबरोबर २०० राऊत पाठविले आहेत. आपण लिहिल्या पत्राप्रमाणे मी बंदोबस्त करीत आहे.'[२] या सर्व घटनावरुन असे दिसून येते की, पेशवे हे आपल्या सरदारांना वेळोवेळी सरंक्षणाकरीता सुभाचे अधिकारी नेहमी दक्ष राहत होते.

तसेच इ. स. १७६४—६५ मध्ये जगजीवनराव पवार यांनी बंडखोरी करून होळकराच्या खानदेशातील नसरतपूर व चाळीसगाव या ठाण्याच्या प्रदेशात धुमाकूळ घातल्याने त्याच्या बंदोबस्तासाठी खासा पथक व तापकिर सारखी वेळेवर मदत व्हावी. यासाठी नारो कृष्ण यांनी अंबादास बल्लाळ यास पत्राद्वारे निरोप पाठविला तो असा— रा. बाबाजी अनंत व आबाजी रणसोड यांस संताजी होळकरांकडून पत्र ता. १४—११—९८ राजश्री यशवंतराव होळकर यांनी पवारास शामील होऊन देपाळपुरास उपद्रव घेऊन ठाणें घेतलें याकरितां कांही सरंजाम सिद्ध करुन आळयाचा माणूस पाठवून बंदोबस्त करावा.[३]

### ५.१.२ शहरांची संरक्षण व्यवस्थाः

शहराच्या संरक्षणासाठी विशेष दक्षता घेतलेली होती. त्यासाठी विशेष शिंबदी ठेवण्यात येत होती. यासाठी कोतवाल पदाची निर्मीती करून त्यांच्याकडे खास अधिकार देण्यात आले. त्यांच्या नियंत्रणाखाली हे संरक्षणाचे कार्य अव्यहातपणे चालत होते. अठराव्या शतकात गावाच्या वा शहराचा सुरक्षिततेसाठी विशेष फौजदार वा कोतवाल नियुक्त केला जात होता. या अधिकाऱ्याकडे पोलीस दल तैनात केलेले होते. मोगल साम्राज्यात जी व्यवस्था होती त्याचप्रमाणे पेशवे काळात विशेषत: पेशवे पहिले माधवराव यांच्या कारकिर्दीत इ.स. १७६४ मध्ये पुणे शहरासाठी स्वतंत्र पोलीस खाते निर्माण करुन त्यावर कोतवाल या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली.[४] म्हणजे पेशव्यांनी शहराच्या सुरक्षिततेसाठी कोतवाल पदाची निर्मीती करुन पुणे शहराची सरंक्षण करण्याची व्यवस्था निर्माण केलेली होती. त्याचप्रमाणे होळकरांच्या प्रदेशातही त्याच धर्तीवर अहिल्याबाईंच्या कारकिर्दीत इंदौर शहरासाठी कोतवाल पद निर्माण करण्यात आले होते. या सरंक्षणासाठी कोतवाल यांच्या मदतीस शिलेदार व हाशम शिपाई नियुक्त केलेले होते.[५]

प्रत्येक चौकीवर गरजेनुसार शिपाई ठेवले जात होते. या हाताखालच्या प्रत्येक अधिकाऱ्यावर कोतवालाचे नियंत्रण असे. त्यासाठी कोतवालाचे स्वतंत्र कार्यालय होत. त्या कार्यालयात फडणवीस, दस्तदरदार, अमीन, विद्वान व कारकून कार्यरत होते. शहराच्या संरक्षणाबरोबर कोतवालास इतर ही कामे करावी लागत होती. बाजारपेठावर नियंत्रण ठेवणे, समाजातील गुन्हे नियंत्रित करणे, लहान खटल्याचा न्याय निवाडा करणे, प्रदेशातील रस्त्यांची दुरुस्ती करणे अशी अनेक कामे कोतवालास करणे अवश्यक होते.

गावाच्या पातळीवर गावाचे संरक्षण करण्याची जबाबदारी ही गावातील नागरीकांवरच सोपविलेली होती. गावाचापाटील हा गावाच्या संरक्षण जबाबदारी सोपविलेली होती. पाटील

यांच्या मदतीस गावात कुलकर्णी, चौगुले हे सहाय्यक अधिकारी ही होते. तसेच गावात रात्रीच्या वेळी गस्त घालण्याचे काम करुन गावाचे संरक्षण करीत असे. खानदेशमध्ये अशा कामावरील महाराला जागला म्हटले जाई.

याशिवाय गावाच्या संरक्षणासाठी गावातील रामोशी, मांग, भिल्ल व कोळी या जातीच्या लोकांचा ही सहभाग महत्वपूर्ण होता. पेशवे काळात दख्खनमध्ये ग्रामसंरक्षणाची व्यवस्था सर्वत्र साधारणपणे सारख्याच स्वरुपाची होती गरजेनुसार परगण्याच्या कमाविसदाराकडून वेळप्रसंगानुसार सैन्याची कुमक बोलावली जात होती. तेव्हा शिबंदीच्या चौक्या निर्माण करून गावात शांतता व सूरक्षितता निर्माण केली जात होती.

नगरांची किंवा शहरांची मुख्य अधिकारी म्हणून कोतवाल कार्य करीत होता. यांचे कार्य ही वस्तूंचे भाव ठरविणे वाद मिटविणे, कर वसूल करणे, शहरातील कायदा व सुव्यवस्था पहाणे, गुन्हेगारांचा शोध घेणे. असे होते.

**५.१.३ किल्ले प्रशासन:**

प्राचीन काळापासून किल्ल्यांना राज्याच्या प्रशासनाच्या दृष्टीने विशेष महत्व होते. त्याचप्रमाणे अठराव्या शतकामध्ये मध्ययुगीन भारताच्या इतिहासात किल्ल्याचे महत्व व किल्ले प्रशासन हे अनन्य साधारण महत्वाचे होते. प्राचीन राजनितीज्ञ शुक्राचार्य यांनी किल्याचे महत्व सांगातना म्हणटले आहे की, किल्यांच्या आश्रयाने एक सशस्त्र माणूस शंभर योद्धाशी लढू शकतो. १०० योध्दे १०००० सैन्याशी लढू शकतता यास्तव राजाने किल्ल्याचा आश्रय करावा.[६] त्यामुळे किल्ल्यास मध्ययुगीन काळात अनन्यसाधारण महत्व होते. तर रामचंद्र पंत अमात्य यांनी आपल्या आज्ञापत्रात, 'संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग' असे महात्म्य सांगितलेले आहे.[७] म्हणूनच छत्रपती शिवाजी महाराज यांनी डोंगरी अभेदय किल्ल्यांचा आश्रय घेवूनच बलाढ्य मोगल साम्राज्याशी लढा देवून हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. तसेच त्यांनी किल्ल्याचे महत्व ओळखूण शत्रू मोगलाचे अनेक किल्ले जिंकून घेतले. याशिवाय त्यांनी स्वत:च्या कारकिर्दीत अनेक किल्ले बांधले. व काही दुरुस्त केले. या किल्यांचे प्रशासन चोख पद्धतीने राबविले जात होते. पुढे पेशव्यांच्या काळात सरंजामशाहीचा, वतनदारीचा व जहागिरीचा उदय झाला. त्यामुळे अनेक सरदार सरंजामदार बनले. त्यात मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, उदाजी पवार, त्र्यंबकराव दाभाडे व विंचुरकर यांचा समावेश होता. यांच्यावर पेशव्यांचे नियंत्रण असले. तरी ते त्या त्या प्रदेशाचे मालक बनल्याने त्यांच्या हद्दीतील येणारे किल्लेही त्यांच्या मालकीचे व नियंत्रणाखाली होते. त्यानुसार त्यांनी आपापल्या पद्धतीने त्यांची प्रशासन व्यवस्था राबविली. त्याचप्रमाणे होळकर राज्यातही सर्व किल्ल्याना विशेष महत्व होते. होळकर शासकांनी आपल्या शासन कारकिर्दीत सैन्याचे नीट संचलन करता यावे. यासाठी राज्याचे संरक्षण, किल्याचे संरक्षण, स्वत:चे संरक्षण व अंतर्गत संरक्षण करण्यासाठी लष्करी धोरण खंबीरपणे राबविले. म्हणूनच इंग्रजाना ते काही काळ तरी भारी पडले. व त्याच्यापुढे

ब्रिटिश गव्हर्नर जनरलादेखील काही काळासासाठी होळकर शासकाशी शांततेचा तह करणे भाग पडले. याचे सर्व श्रेय होळकर शासकाच्या लष्करी प्रशासनास जाते.

मल्हारराव होळकरांनी मोंगलाईतील किल्ले सर केले. किल्ले मार्कड, किल्ले इंद्राई, किल्ले चांदवड, किल्ले केनेरा, किल्ले राजोद, किल्ले धोडप वगैरे किल्ले... हे किल्ले हस्तगत करण्यास खर्च रूपये ९२२३४... व त्यांचे बंदोबस्तासाठी खर्च रूपये ९१३०७ एकूण आकार एकलक्ष त्र्याऐंशीं हजार पाचशें एकेचाळीस रूपये पुणे दरबाराने खर्च अंगिकारिला.[८] म्हणजेच होळकर शासकानी युद्ध मोहिमाद्वारे केलेला खर्च हा पेशवे ग्राहय धरीत असत.

**५.१.३.१ होळकर राज्यातील किल्ल्यांची संख्या:**

होळकर राज्यात एकूण सहा किल्ले होते. .त्यात होळकर राज्यात महेश्वर, चांदवड, सेंधवा, अशीरगड, गाळणा, कुशलगड व हिंगलाजगड या सात किल्ल्यांच्या समावेश होता.[९] तसेच इतरत्र ठिकाणच्या संरजामी प्रदेशातील मंडलेश्वर, कजलिगड इंद्राई, थाळनेर व बिज्जागड हे महत्वाचे किल्ले कायमस्वरुपी होळकरांच्या ताब्यात होते. म्हणजेच मध्ययुगात किल्ल्याना महत्व होते हे होळकर शासक जाणून होते. या किल्ल्यांच्या अधारे शत्रूना सहज मात करता येत असे. तसेच प्रशासन लष्करी प्रशासन करण्यासाठी सोयीचे होते.

**५.१.३.२ किल्ल्यावरील अधिकारी:**

होळकर राज्यातील किल्ल्यावर अनेक प्रकारचे अधिकारी तैनात केलेले असत. प्रत्येकाची जबाबदारी ही निश्चित केलेली होती. त्यात पुढील अधिकाऱ्यांचा समावेश होता.

**५.१.३.२.१ किल्लेदार:**

होळकर राज्यातील किल्ले प्रशासनासाठी किल्ल्यावर अनेक प्रकारचे अधिकारी कार्यरत होते. यात किल्ल्यावरील अनेक अधिकाऱ्यापैकी किल्ल्याचा जो प्रमुख अधिकारी असे त्यास किल्लेदार म्हणटले जाई. यास हावलदार असेही म्हणटले जात होते. यांच्या कडे किल्ल्याच्या दरवाजे व कोठयांच्या किल्ल्या हवालदाराजवळ असत. किल्लेदारास किल्ल्यावरील सर्व घटकावर नियंत्रण ठेवावे लागत असे. किल्ल्यातील इतर अधिकाऱ्यावर नियंत्रण ठेवणे, त्यांच्याकडून प्रशासकीय कामे करुन घेणे, वरीष्टांच्या आदेशानुसार कार्य करणे व किल्ल्यातील सैन्यावर देखरेख ठेवणेअसे सर्वप्रकारचे कार्य त्याना पार पाडावे लागत होते. तसेच सरकार व मुलकी अधिकाऱ्यांना योग्य ती माहिती देणे, त्यांच्या सूचना व आदेशांचे पालन करणे वगैरे कार्य त्याच्याकडे होती. किल्ल्याचे दरवाजे, कोठ्या उघडणे, बंद करणे, किल्ल्यात येणाऱ्या जाणाऱ्यांना परवानगी देणे अथवा नाकारणे या सर्व बाबींवर किल्लेदाराचा अंतिम अधिकार चालत असे.[१०]

किल्लेदारास त्याप्रदेशात मोठे अधिकार असल्याने त्यांचा त्यात्या प्रदेशात मोठा दबदबा व प्रतिष्ठा होती. तसेच सरकारकडूनही किल्लेदारास पालखी, अफदागिरी, दिवटे इ. विशेष सुविधा देऊन त्यांचा मानमरातब राखला जात असे.[११]

**५.१.३.२.२ सबनिसः**

किल्लेदार यांच्या मदतीसाठी दुसरा दुय्यम दर्जाचा अधिकारी हा सबनिस हा होता. सबनिस अधिकाऱ्यास किल्लेदाराच्या नियंत्रणात कार्य करावे लागत असे. त्याप्रमाणे किल्ल्यावरील धान्याचा साठा व शस्त्रांचा साठ्याचे जतन करण्याचे कार्य करावे त्यास करावे लागत असे. म्हणजेच किल्ल्यावरील शस्त्र साहित्य, दारुगोळा व धान्य यांची गरजेनुसार चोख व्यवस्था ठेवावी लागत असे. तसेच किल्ल्यातील सर्व प्रकारचे नोकर हजेरी दररोज घेणे, दैनंदिन जमाखर्च तपासणे, दैनंदिन पत्रव्यवहार करणे यासारखी कामे सबनिसास करावी लागत होती. किल्ल्यातील सर्व व्यवहाराच्या लिखापढीची कामे सबनिसाकडे असत. याशिवाय इतर अधिकारी व कारकूनही किल्यावर असत.[१२] म्हणून किल्ल्यावरील या अधिकाऱ्यास होळकर राज्याच्या लष्करी प्रशासनात महत्व होते.

चांदवड किल्ल्याची सबनिसी इ.स. १७५३ मध्ये विनायक बाजीराव यांचेकडे देण्यात आलेली होती. त्यास वार्षीक ७०० रुपये वेतन मंजूर करण्यात आल्याबद्दल मल्हारराव होळकर यांनी चांदवड किल्यावरील पिराजी ढमढेरे यास १७ एप्रिल १७५३ रोजीच्या पत्रान्वये कळविले होते.[१३] कारखानिस, सबनिस व किल्लेदार यांचे वेतन त्यांच्या कामाच्या स्वरुपावरुन व दर्जावरुन दिले जात असे.

**५.१.३.२.३ कारखनिसः**

होळकर राज्यातील किल्ल्यावर किल्लेदार यांच्या मदतीसाठी तिसरा दुय्यम दर्जाचा अधिकारी हा कारखानिस हा होता. कारखानिस या ही अधिकाऱ्यास किल्लेदाराच्या नियंत्रणात कार्य करावे लागत असे. सुभेदार मल्हाराव होळकर यांनी आपल्या येथील किल्ल्याचे किल्लेदार धोडप व चांदवडच्या कारखानिस यांना २८ मार्च १७५३ रोजी वेगवेगळी पत्रे पाठवलेली होती. विश्वासराव लक्ष्मण हवाला मुतालिक किल्ले घोडप कारखाननिशी राजश्री अप्पाजीराम यांस करार करुन सांगितले आहे. तरी किल्ले मजकूरचे कारखाननिशीचे कामकाज यांचे हातें घेत जाणें यांसी वेतन रुपये ९०० नऊशे देविलें असे.[१४]

होळकराच्या दौलतीच`दिवाण चंद्रचुड व खाजगीचे दिवाण पळशीकर यांच्या मदतीस अनेक सबनिस व कारखानिस सेवेत कार्यरत होते. एकाच व्यक्तीकडे अनेक किल्ल्यांवरील सबनीसी, कारखनिशीची पदे एकाचवेळी देण्यात येत होते. तसेच पिराजी ढमेंढरे हवाला किल्ले मुतालकी चांदवड राजश्री आप्पाजीराम इतबारी जाणून किल्ले मजकूरचे कारखानीहीचें काम करार करुन सांगितले असे तरी किल्ले मजकूरचें कारखानीशीचें कामकाज लिहिण्याचें प्रयोजन मशारनिल्हेच्या हातीं घेऊन वेतन रुपये ६०० सहाशें नेमणूक ऐवजी पावणें.[१५]

**५.१.३.२.४ सरनोबत:**

होळकर राज्यातील किल्ल्यावर किल्लेदार यांच्या मदतीसाठी चौथा अधिकारी हा सरनोबत होता. सरनोबत या ही अधिकाऱ्यास किल्लेदाराच्या लष्करी कार्यात सहाय्य करावे लागत असे. किल्ल्यावरील सर्व लष्कारी हालचालीचा प्रमुख म्हणून जबाबदारी पार पाडावी लागत होती. सरनोबत यांना सैन्याचे नेतृत्व वा सैन्याचे संचलन करण्याचे कार्य करावे लागत होते. किल्ल्याच्या संरक्षण व्यवस्थेवर सरनोबतांची संख्या अवलंबून असे मोठ्या किल्ल्यावर पाच ते सात सरनोबत तैनात केलेले असत. तर एका सरनौबतच्या कार्यात सहाय्य करण्यासाठी सैन्यात आढाव, बरकंदाज, तिरंदाज, गोलंदाज असे शस्त्र भेदावरुन प्रकार केले जात असत.[१६] किल्ल्यातील सैन्याकडे आपला किल्ला व सभोवतालच्या प्रदेशाचे संरक्षण करण्याची जबाबदारी होती. शेजारी कुठे सैन्याची गरज भासल्यास कुमक पाठविणे, किल्यातील कैदी सांभाळणे.ही कार्ये सरनौबतास पार पाडावी लागत होती.

**५.१.३.३ किल्ल्यातील लष्कर:**

होळकर राज्यात किल्ल्याच्या प्रशासनासाठी अवश्यक तेवढे लष्कर तैनात करण्यात येत होते. किल्ल्यावरील सैन्य संख्या ही त्या किल्ल्यांच्या परिसरात येणारा प्रदेश, व शेजारी शत्रूची संख्या व त्या प्रदेशाचे महत्व लक्षात घेवून सैन्य संख्या निश्चित करुन तेवढी शिबंदी ठेवली जात होती. किल्ल्यावरील संभाव्य परिस्थिती पाहून जादा कुमक मागिवली जात होती. होळकर राज्यातील किल्ल्यावरील सैन्यात तीन प्रकारचे सैन्य तैनात केलेले असत. काही कायमस्वरुपी तर काही सैन्य महिण्यासाठी सेवेत ठेवले जाई तर काही सैन्य केवळ एखाद्या मोहिमेसाठी ही सेवेत भरती केले जात होते. अशा प्रकारच्या सैनिकास गरजेनुसार पगार दिला जात असे. तरी पण पेशवा नानासाहेबांच्या कारकिर्दीच्या महिना पाच रुपये, पहिल्या माधवरावांच्या कारकिर्दीत सात रुपये तर नंतरच्या काळात अकरा रुपयांपर्यत पगार मिळत होता.[१७] यावरुन असे स्पष्ट होते की, अरब सैन्यास दहा रुपये दर महा वेतन दिले जात होते.

कुकुरमुंडे किल्ल्यावर १७६३—६४ मध्ये चारशेपेक्षा अधिक सैन्य नव्हते. या किल्ल्याच्या प्रदेशातून सरंजाम म्हणून जमा झालेले ३३३४५.६।।। महसूलीपैकी २५३८९।।.।। एवढा खर्च सैन्यावर झाला होता. गाळणा किल्ल्याचा किल्लेदार यांच्यावर सौ. रखमाबाई होळकर यांनी नाराजी व्यक्त करीत असल्याचे पत्र लिहिले. इ. स. १७६३—६४ साली पेशव्यांच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली असलेल्या कुकरमुंडे या खानदेशमधील किल्ल्यावर किती प्रकारचे सैनिक होते. आणि त्यांना किती वेतन देण्यात आले होते. यासंदर्भातील माहिती त्यात्या वर्षीच्या जमाखर्चातून मिळते. तो होणारा खर्च पुढीलप्रमाणे आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| **शिलेदार स्वार** | | **रुपये** | |
| **५७९८—।।⊢।।।** | | **नेहमी नेमणूक बारमाही** | **रुपये** |
| | २१९३—।।⊢।।। | भोपतराव कठोरे स्वार आसामी | १२ |
| | १९२५ | राणा अजेबसिंग स्वार आसामी | १२ |
| | १६८० | शंकराजी खंडेराव स्वार | १० |
| | .......... **५७९८—।।⊢।।।** | आसामी | |
| **२३१८—।।⊢** | १८०० | **आसामी स्वार... दंग्यामुळे** | **रुपये** |
| | १२५ | रामसिंग करोल स्वार | १० |
| | ३५ | भवानी खंडेकर | १ |
| | १२८ | बहिर्जी इंगळे | १ |
| | १२३—।।। | आनंदराव कदम | १ |
| | ५४—। | साधुखान नांदुरकर | ५ |
| | ५२—। | लक्ष्मण कांचन | ५ |
| | ............ | भवानी कदम | २ |
| | **२३१८—।⊢।।।** | **असामी स्वार** | .......... **२६** |
| **पावलोक प्यादे हशमी लोक (तैनाती लोक)** | | | **रुपये** |
| **७७८ ।।।** | | **दिडमाही सिरस्त्याचे लोक** | |
| | २०५—।।। | नारोजी परकरे आसामी | ७ |
| | १६७ | मानाजी चव्हाण आसामी | ५ |
| | ५२ | सेख घासी आसामी | १ |
| | ३५४ | रघुरानाथसिंग परदेसी आसामी | २० |
| | ................ **७७८—।।।** | **आसामी** | ..... **३३** |
| **बारमाहीकरी (बारमाही काम करणारे)** | | | |
| **रुपये** | | **आसामीचे नावे** | **आसामी** |
| १०८५—।।। | | रुमाजी नाईक आसामी | ३ |
| १५६ | | गुणाजी नाईक आसामी | ९ |

| | | |
|---|---|---|
| २२२—।। | परदेसी आसामी | ३ |
| ७२ | बालोजी नाईक जाधव | २९ |
| ४७४—। | आसामी | १ |
| २० | आलीखान आसामी | १ |
| १५ | रसुलखान आसामी | १ |
| १५ | शेख बाबुजी आसामी | १ |
| १५ | बादुर सिंग आसामी | १ |
| १५ | देवजी भोईर आसामी | १ |
| १७—।। | जीवजी बलाले आसामी | १ |
| २२—।। | मानेरखान आसामी | १ |
| १५ | धाडेजी बेलवणकर | १ |
| ६ | मालीकजी आसामी | १ |
| ......... **१०८५—।।।** | मालनाईक पटवारी आसामी | ...... **५३** |
| | **एकूण आसामी** | |

| **अरब लोक** | **रुपये** | |
|---|---|---|
| १०४८ | माहे जिल्हेज आसामी... | ९२ |
| २७०९ | माहे मोहरम तगायत माहे... | ३ |
| ७६८ | आसमी दर महा रुपये ९०३ | ७८ |
| ६१८ | माहे रबिलाखर आसामी | ६५ |
| ५७८ | माहे जमादिलावल आसामी | ५० |
| ७३४ | माहे जमादिलाखर असामी | ४६ |
| ४६ | ...माहे रमजान दरमहा ५७८ | **४६** |
| ५८७ | माहे शवाल आसामी | ४७ |
| ५८८ | माहे जिलक्झिंद आसामी | ४७ |
| .......... **८६२९** | **एकूण आसामी** | ........ **४७४** |

**खानदेशी लोक जकाती**

| | | | |
|---|---|---|---|
| **२७८१।।—** | यात आसामीचा तपशील | एकूण आसामी | **८६** |
| **१६५७** | यात आसामीचा तपशील | एकूण आसामी | **५५** |
| **८३४** | यात आसामीचा तपशील | एकूण आसामी | **१६** |

| तरीज पावलोक | रुपये |
|---|---|
| १८६४—।। | हशम लोक |
| ८६२९ | अरब लोक |
| २७८१—।। | प्यादे जकादीबाबत |
| १६५७ ८— | फुटलोक |
| ८१४—।। | बाजे लोक |
| ………… | |
| **१५७४६—।।।—** | |

यावरून असे दिसून येते की, शिलेदार, हशमी, बारमाही, अरब, प्यादे, पावलोक यासारख्या सैन्यास दिले जाणारे वेतन हे स्पष्ट होते.

होळकर शासकाकडून नारो लक्ष्मण यास चंद्रराव पवार यांच्या बंदोबस्तासाठी किल्ले कुकरमुंडे येथील शिबंदी पाठवून देण्यासंदर्भात आदेश आला. तेंव्हा येथील अधिकाऱ्याने रखमाबाईस पत्र पाठवून कळविले की, मुळातच किल्ल्यात शिबंदी कमी आहे. त्यात दुसरीकडे काही सैन्य पाठविण्यास सांगितले. सरकारच्या आदेशानुसार आम्ही काम करतच आहोत. मी स्वत: कुकरमुडे किल्ल्यावर एक दोन दिवसात प्रत्यक्ष जाऊन किल्ल्यासाठी आवश्यक लोक ठेवून शक्य तेवढे बाकीचे लोक पवाराच्या बंदोबस्तासाठी पाठविण्याची व्यवस्था करतो.[१९]

यापत्रावरून असे स्पष्ट होते की, एखाद्या ठिकाणी पहिलेच किल्ल्यावर शिबंदी कमी असतांना सुद्धा दुसरीकडे काही सैन्याची गरज भासल्यास तशा प्रकारचा आदेश आला. तर तो निमुटपणे पाळुन आपल्याही किल्ल्यांची सुरक्षितता कायम ठेवत इतरांनाही कुमक पाठवून द्यावी लागत होती.

होळकर राज्यात किल्ल्याच्या संरक्षणासाठी नेहमी सर्तकता बाळगलेली असायची यासाठी लागणारे सैन्य व शस्त्रसाठा तसेच अन्नसाठा एखादे वर्षभर पूरेल एवढे साठवणूक करुन ठेवलेले असे. श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनी चांदवडच्या किल्लेदार संताजी मोहिते यास पत्र पाठवून हळद, तंबाखू, मिरची, तेल, तूप व भांग यासारख्या गरजेच्या वस्तू या वस्तूची मागणी केलेली होती. तेंव्हा चांदरवडच्या किल्लेदारांनी स्वत:चा कारकून शिवराम नारायण यांच्या मार्फत उंटावर लादून पाठवून दिलेल्या होत्या. यावरुन हे स्पष्ट होते की, एखाद्या किल्लेदारास आपल्यास अखत्यारीतील गरजेपेक्षा अधिक खाद्य वस्तूचा साठा करुन ठेवावा लागत होता. तसेच ज्या वस्तू उपलब्ध नसतील त्या वस्तूही खरेदी करुन साठवून ठेवावे लागत होते.

गाळणा किल्ल्यांची किल्लेदार होळकर सरकारकडे गवताची मागणी केलेली होती त्यावेळी तुकोजराव होळकर यांच्या काळात गाळण्याचा किल्लेदार खंडोजी लाड हे होते. त्या

सरकारातून ३५००० गवताची तरतूद करुन दिलेली होती.[२०] यावरुन असे दिसून येते की, किल्ल्यासाठी वर्षभराची सोय व्यवस्थित व्हावी. या उद्देशाने कमतरता भासत असलेल्या घटकाची मागणी केली जात होती. यांनी सरदारासिंग यांच्याकडून पावसाळा जवळ येत असल्यामुळे छप्परबंदीसाठी गवत पाठवून देण्यासाठी पत्र पाठविले होते. शत्रुच्या हल्यापासून किल्ल्याचे पूर्णपणे संरक्षण करता यावे. यासाठी किल्ल्यावर पूरेसे युद्ध विषयक साहित्य व सैन्य आहे का? याची खातरजमा केली जाई. त्यात बंदूका, तलवारी, तीर कामठे यासारख्या साहित्याचा समावेश होत होता. तसेच लहान मोठ्यातोफा ही ठेवल्या जात होत्या. होळकर राज्यातील किल्ल्यांच्या सरंक्षणासाठी व त्यावरील युद्धविषयक अवश्यक साहित्याची विशेष काळजी घेतली जात होती. यशवंतराव होळकर यांच्या राजवटीत महेश्वर किल्ल्यावरील तोफांची उपलब्धता व गिणती करुन त्याची यादी बनविलेली होती. ता. २ माहे मार्च सन १८०३यादी मोजदाद तोफखाना तटवंदी वगैरे किल्ले महेश्वर विद्यमान राजरी बाळाजी भास्कर दिमत राजरी अंबाजी इंगळे...छ ७ माहे जिल्काद शके १७२४

| **१० तोफा सुमारी** | |
|---|---|
| १ दक्षिणेस श्रीगणपतीचे जवळ लोखंडी | १ ईशान्य कोनाचे बुरजाबव, |
| १ उत्तरेकडे तटबंदी बुरजावर लोखंडी | १ दिल्ली दरवाज्याबाहेर. धातूची |
| **४ दिल्ली दरवाज्यापुढे** | १ दिल्ली दरवाज्याचे उजव्या बुरजावर लोखंडी |
| १ पंचरसी मोठी तोफ | १ उत्तरेकडील बुरजावर पीराजवळ. |
| १ शेरवचनावाची पंचरसी. | १ कमानी दरवाज्याचे उजवेबाजूस पंचधातूची |
| १ लहान लोखडीं. | १ उत्तरेकडील कमानी दरवाज्याचे पंचधातू |
| १ पंच धातूची लहान | १ दक्षिणेकडे बागली बुरजावर लोखंडी |
| .....<br>४ | .....<br>७ |
| २ आग्नीकोण बुरजावर तटबंदीस लोखंडी लहान,व मध्यम. ८येकूण १५ पंधरा.[२१] | |

पैकीवजा साहेब फिरंगी याजकडे कंपूंत आल्या सुमारी ५ पांच दिली दरवाज्या पुढींल चार ४ व दिल्ली दरवाजया बाहेर लंब छड १ येकूण पांचः बाकी किल्लेमजकुरीं बुरजावर वगैरे १० दहाः—

| ३० मालेकरी दरवाज्यावर | १ जंबुरेची गोळी<br>२१ जजाली सुमारी<br>१ गोळया सुमारी | १ सिंगाडा<br>६ जंबुरे लहान |
|---|---|---|
| **४०० कचेरींत.** | | |

| ३० येणें प्रमाणे कचेरीत | १ नगारियाची जोडी लोखंडी<br>५ जंबुरे सुमारी<br>५ बागली बुरजावर | ५ गंजीफा गाडया दिल्ली दरवाज्यापुढें<br>३ व मंडळ खोर दरवाजा<br>२ येकूण ५ |
|---|---|---|

|  | २ नेऋत्य कोनीं बुरजावर<br>२ जेजाली सुमारी दो |  |
|---|---|---|

येकूण श्रेपन दागिने आहेत. सिवाय जंबुरे १०६ पैकी सरकारांत पाठविलें २५बाकी आहेत. व गोळे वगैरेची मोजदाद करुन दिल्ही नाहीं तीकरुन लिहून घेणें.[२१] या पत्रावरुन होळकर राज्यकर्ते शत्रूचा अचूक बंदोबस्त करणसाठी किल्ल्यावरील तोफा विषयी व युद्ध साहित्याविषयी किती जागरुक होते हे स्पष्ट होते. यशवंतराव होळकर यांनी याच तोफाच्या बळावर स्वदेशी व इंग्रजासारख्या परदेशी सत्तेशी सतत सामना करुन त्याना भारतातून हाकलून देण्यासठी जय्यत तयारी करीत होते. त्यासाठी त्यांनी तोफा गाळण्याचा कारखाना सुरु केलेला होता.

होळकर राज्यामध्ये किल्ल्याला विशेष महत्व होते. ते महत्व लक्षात घेऊन सुभेदार मल्हारराव होळकर यांनी दक्षिण व उत्तर भारत यांना जोडणारा मार्ग हा सैधंवाच्या प्रदेशातून जात होता. अशा मोक्याच्या ठिकाणी सैधवा येथे मल्हारराव होळकर यांनी स्व खर्चातून किल्ला बांधला. त्यामळे होळकर राज्यास यापासून वेळोवेळी संरक्षण होण्यास मदत झालेले होती. या सैधंव्याच्या किल्ल्याचा किल्लेदार हा तुकोजीरावांचा बंधू संताजी होळकर व त्यांच्या मदतीस भारमलदादा होळकर व भिकाजी होळकर ही बरेच दिवस तैनात होते. हा किल्ला होळकर राज्याच्या मध्यभागी व जलद हालचाली करण्याच्या दृष्टीने सोईचा होता. म्हणून याच किल्ल्यावर मोठ्याप्रमाणात युद्धा विषयक साहित्य ठेवले जात होते. या सैधंव्याच्या भागात भिल्ल, रामोशी व जंगली लोक मोठ्याप्रमाणात राहत असल्याकारणाने लुटारुपासून संरक्षण करता यावे. यासाठी या किल्ल्याचे योगदान मोठ्याप्रमाणात होते.

त्याचप्रमाणे चांदवडचा किल्लाही पुणे, नाशिक, मुंबई व विदर्भास जोडणारा असल्यामुळे पुणे ही किल्ला महत्वाचा मानला जात होता. या किल्ल्यावरुन सभोवतालच्या प्रदेशावर नियंत्रण ठेवता येत होते. म्हणून इंग्रजांशी होळकरांचा मंदसौरचा तह चालू असतांना हा किल्ला आपल्याकडेच राहावा यासाठी मोठा आग्रह धरण्यात आलेला होता. ६ जानेवारी १८१८ ला मंदसौचा तह झाला. त्यावेळी माल्कमने जॉन अडमला पत्राद्वारे कळविले होते की, होळकरांनी किल्ल्याची मागणी केली होती त्या विषयी सांगितले की, खानदेश भागाची शांतता राखणे चांदवडचा किल्ला ताब्यात असण्यावरच अवलंबून असल्यामुळे तो किल्ला तुमच्याकडे राहील अशी आशा धरु नका.[२२] यावरुन चांदवडच्या किल्ल्याचे महत्व होळकर संस्थानाला किती होते हे स्पष्ट होते.

**५.१.३.४ किल्ल्यावरील अधिकाऱ्यास मिळणारे वेतन:**

माळवा, गुजरात, राजपुताना, बुंदेलखंड, काठेवाड, दोआब, ओरिसा, आग्रा इत्यादी प्रदेशात चौथाई व सरदेशमुखी गोळा करण्याची सुरुवात बाजीरावांच्या काळातच सुरूवात

झालेली होती. एकट्या माळव्यातून मराठ्यांना पंन्नास लाख रुपये चौथाई मिळत होती. पेशवाईच्या प्रारंभी चौथाई, सरदेशमुखी हे मराठा राज्याच्या उत्पन्नाचे प्रमुख साधन होते.[२३]

सुलतानपूर परगण्यातून इ. स. १८०९ ते १८१७ या कालखंडात अशा करांमधून प्रतिवर्षी किती रक्कम जमा झाली याचा सविस्तर तपशील सुलतानपूर परगण्यासंबंधीच्या कागदपत्रांतून मिळतो.[२४]

इ.स. १८१८ मध्ये बनविलेली एक यादी उपलब्ध असून टाकेदारांमध्ये जयपूर, उदयपूर, कोटे, सोपार, बुंदी, इंद्रगड, डोंगरपूर, झाबळे खातोली, बांसवाडा, पाटण, नरसिंगगड, प्रतापगड या संस्थानांचा उल्लेख आहे. सर्वांचे मिळून १९७४७६२ रूपये होळकरांना नियमित मिळत असल्याचे नमूद आहे.[२५]

**५.१.४ सरंजामदारव सैन्यास बक्षीसः**

दिल्लीच्या गादीवर शहाअलमाला पुन्हा बसविण्याच्या कामगिरीबद्दल तुकोजी होळकर व इतर मराठा सरदारांना इ.स. १७७१ मध्ये २५,००००० रुपये मिळाले होते. मोठ मोठ्या कामगिऱ्या पार पाडल्याबद्दल किंवा महत्वपूर्ण कामाबद्दल पेशवे सरकारही बक्षिसे देत असे. इ. स. १७७२ मध्ये तुकोजी होळकर व विसाजीकृष्ण यांनी दिल्लीवर आक्रमण केले. तेंव्हा बादशहाने या बिकट प्रसंगातून मार्ग काढण्यासाठी तुकोजीचा दिल्लीत विशेष सन्मान करुन काही भूप्रदेश आणि रोख ९,००००० रुपये बक्षिस दिले होते.[३०]

वेतन, मानमरातब, सोयीसुविधा हा सर्व खर्च होळकरांच्या तिजोरीतून होत होता. होळकर दरबारात असणारे सबनिस, पोतनिस, फडणीस, मुनशी त्यांच्या मदतीला असणारे कारकुन यांच्या वेतनावर बराच खर्च होत असे. इ.स. १७७५ साली महेश्वर येथे असणाऱ्या कारकुन मंडळीवर झालेला खर्च आणि त्यांचे प्रत्येकाचे वेतन निश्चित केलेले होते.[२७]

दौलतराव शिंदे यांच्या दरबारात असणारा रावजी गोंविंद हा होळकरांचा वकिल महिना ४५० रुपये वेतनावर ठेवलेला होता. याच्याकडे इ.स. १७९३ मध्ये तीन वर्षासाठी मक्त्याने देण्यात आली होती. या परगण्याचे तीन वर्षाचे एकूण उत्पन्न १५,८७,००३ रुपये एवढे अपेक्षित होते. या उत्पन्नातून स्थानिक प्रशासनावर म्हणजेच, मामलेदार ४००० रु. फडणीस ६०० रु. मुजुमदार ४०० रु. कारकून ५००० रु. आणि शिबंदीस्वार व इतर खर्च मिळून प्रतिवर्षी ७०,००० रुपये खर्च करण्यास होळकर सरकारने संम्मती दिली होती.[२८]

यशवंतरावाने मोठ्या फौजेनिशी दक्षिणेत येऊन दौलतराव शिंद्याची दादागिरी संपुष्टात आनावी म्हणून अमृतरावाने होळकरास एक कोटी रुपये देण्याचे कबुल केले होते. आपले काम पार पाडल्यानंतर तो अमृतरावांकडे पैशाची मागणी करतो. यशवंतराव आपली भुमिका स्पष्ट करताना असे सांगतो की, पुर्वी करारात ठरल्याप्रमाणे मी माझे काम बजावले आहे. आता तुम्ही मला एक कोट रुपये दयावेत. नवी फौज ठेवण्यासाठी मला कोटयावधी रुपयाचे

कर्ज काढावे लागले आहे आणि माझ्या फौजेचा नुसता नित्यखर्चच दरमहा दहा लक्ष रुपये आहे.[२९]

सैन्याचा थकीत पगार देण्यासाठी होळकरांनी कोंच परगण्याच्या तारणावर सहा लक्ष रुपये इंग्रजाकडून घेतले होते.[३०]

पेशव्यांकडून सरंजामी जहागीरीस व वतनास मान्यता मिळविण्यासाठी काही रक्कम नजर म्हणून पेशव्यांना दयावी लागत असे. नेमाड प्रांताची देशमुखी व कानुनगोपणाचे वतन होळकर– शिंदे यांनी मिळवीले. तेंव्हा त्याबद्दल नजर म्हणून १०,००० रुपये पेशव्यांना दिल्याची[३१]

मालेराव होळकरांच्या मृत्यूनंतर तुकोजीस होळकरांची सरदारी मिळाली त्यावेळी नजरेबाबत ऐवज १५,३०,००० नजरे बाबद १५,००००० ऐन, ३०,००० परगणे गाळण्याबदद्ल १,३२,००० कित्ता ऐवज खजगीकडे भरणा करुन दयावा. १०००० किल्ल्याबददल आनंदवल्लीचे इमारतीस एक लक्ष. ३२००० खरगोणचे मोकाशाबदद्ल तीसाला पैकी करार १६,६२,००० एकुण सोळा लक्ष बासस्ट हजार रुपये करार केले. म्हणजेच तुकोजीने पेशव्यांना १५,००००० रुपये निव्वळ नजरे बाबत दयायचे असून उर्वरीत १,६२,००० रुपये इतर गोष्टींसाठी दिले आहेत.[३२]

**५.१.५ पेशव्यांच्या आर्थिक मदत:**

मराठा सरंजामीसरदारानी पेशव्यांना आर्थिक मदत करावी लागत असे. मल्हारराव होळकरांनी पेशव्यांना कर्जातून बाहेर काढण्यासाठी अनेकदा मोठा आर्थिक भार उचललेला दिसून येतो. पेशव्यांच्या ७५,००००० रुपये कर्जाची हकीकत होळकरांच्या कैफियतीत दिलेली आहे. पाऊण कोटीच्या कर्जफेडीसाठी होळकर ३०,००००० रुपये, शिंदे ३०,००००० रुपये आणि इतर किरकोळ सरदार १५,००००० रुपये अशी स्वत: मल्हाररावांनी तोड काढली होती. ३३

कर्जपटीचे खुळ माजले त्यामुळे मल्हाररावांचा पारा विशेषच वाढला. कर्ज निवारणार्थ कोट्यावधी द्रव्यप्राप्ती करुन दिली असता असले चाळे होळकरास खपावयाचे कसे.[३४]

पेशव्यांकडून आपल्या वाटणीचाच हिस्सा अगावू मागण्यात आला होता. पण होळकर– शिंद्यांशिवाय एवढ्या मोठ मोठ्यारक्कमा अन्य कुणी सरदार पेशव्यांस ऐनवेळी देणे शक्य नव्हते. पेशव्यांची कर्जे ही होळकरांच्या तिजोरीवर अचानक अतिरिक्त ताण निर्माण करीत असत. आणि पेशव्यांप्रमाणेच त्यांनाही कर्जबाजारी करुन ठेवीत. पेशव्याकडून वेगवेगळया नैमित्तीक पट्ट्या सरदारांवर बसविल्या जात असत त्यात दहकपट्टी, लग्नपट्टी वगैरे असत. एवढेच नव्हे तर रघुनाथराव दादाला वाटखर्चासाठी म्हणून काही रक्कम देण्याचे ठरले. तेंव्हा दादाखर्चपट्टी देखील सरदारांवर लादली होती.[३५] म्हणजेच होळकरांच्या हिस्याला २५,००० रुपये आले होते.

### ५.१.६ सैन्य व्यवस्था:

मराठा सरदार होळकरांच्या राज्यात ज्याप्रमाणे मुलकी व लष्करी प्रशासनास महत्व होते त्यातील लष्करी यंत्रणेत सैन्याचे प्रमुख अधिकारी सेनापती व सरदार वा सरंजामदारांना होते. पेशव्याकडे जी फौज होती त्याचे दोन प्रकार पडत होते. हुजुरात म्हणजे पेशव्याची फौज. पेशव्यांच्या मध्यवर्ती सत्तेकरीता फौजेत दहाहजारापर्यंत घोडेस्वार असत. त्याची पथके ५२ असून त्या प्रत्येक पथकावर वेगवेगळे सरदार असत. या फौजेस पथक म्हणतात.छत्रपती राजाराम यांच्या नंतर मराठा फौजेचे दोन प्रकार पडत होते. सरंजामी फौज व इतलाखी किंवा नगदी फौज मराठी लष्करात शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, पटवर्धन यांना फौजा उभारण्यास सरंजाम व जहागिरी लावून दिलेल्या होत्या. यांच्याकडे सरंजामी फौज बाळगली जायची.[३६] सुभेदार मल्हारराव होळकर ते यशवंतराव होळकर यांच्याकडे स्वत:चे फार मोठे सैन्य बळ होते. या होळकरांचे सरदार मल्हारराव, तुकोजीराव व यशवंतराव यासारखे लढवय्ये नेहमी रणांगणांवर परमुलूखांत मोहिमात सतत गुंतलेले असत त्यावेळी होळकरांच्या राज्यात व राजधानीत सुद्धाकाही फौज सरंक्षणासाठी ठेवली जात असे.

होळकर राज्यात सरंजामी सरदारांचे सैन्य हे मोठ्या प्रमाणात होते. ज्यावेळी होळकरशाही अस्तिवात आली. त्याच वेळेपासून मल्हारराव होळकरांनी आपल्या अंतर्गत बऱ्याच सरदारांना सरंजामी दिलेली होती. मल्हारराव होळकर यांनी आपल्या सोबत अनेक मराठी सरदरांना माळव्यात व उत्तरेत घेवून गेलेले होते. तिथे गेल्यावर त्यांचे कर्तव्य पाहून त्यांना होळकर राज्यांतर्गत सरंजामी देऊन त्यांना उत्तरेत स्थिर केले. यामुळे अनेक छोटे मोठे सरदार चांगलेच नावारूपास आले. त्यात त्यांच्या सैन्यांचा खर्च भाग विण्यासाठी त्यांना सरंजामी देऊन त्यांना मराठा राज्य वा होळकरांचे राज्य विस्तारासाठी त्यांचे योगदान महत्वाचे ठरले. या सर्व सरंजामदाराचें सैन्य मिळून होळकरांचे सैन्य म्हणून ओळखले जात होते. त्याप्रमाणे सर्व मराठा सरदार होळकर शिंदे, पवार, गायकवाड, पेशवे यांचे सैन्य मिळून मराठा सैन्य म्हणून ओळखले जात होते. तरी मराठा सरदारांच्या अंतर्गत असलेले सरंजामदारांच्या सैन्याचे स्वतंत्र अस्तित्व होते. सरदारांच्या सैन्यात स्वतंत्र गोट असून त्या गोटात सरदारांचे सैनिक, त्यावरचे पागे, पथके, हिशोब ठेवणारे व इतर कामे पाहणारे कारकुन, चांभार, धोबी, तंबू ठोकणारे तसेच शास्त्री ,पंडीत, पुराणीक, वैद्य व ज्योतिषी या सर्वाचा भरणा असे.[३७]

होळकरांच्या सरजामी सरदारांनी त्यांना दिलेल्या सरंजामांच्या बदलत्या किती सैन्य बाळगावे याचा स्पष्ट उल्लेख सरंजामाच्या करारातच केला जाई. सरंजामी सरदारांना दिलेला प्रदेश, त्याचे उत्पन्न व सैन्य संख्या याबद्दलची सविस्तर माहिती अनेक साधनातून मिळते.[३८]

शत्रूवर मात करण्यासाठी युद्धाविषयीची सर्व व्यवस्था पाहिली जाते. त्यात युद्ध साहित्य तयार करणे, युद्ध साहित्यांची साठवणूक करणे, युद्ध विषयक साहित्यांची खरेदी करणे, जलद व नियमित रसद पुरवठा करणे याविषयीची यंत्रणा सैन्याची भरती सैन्यातील

विविध स्तरावरील अधिकाऱ्यांची नेमणूक करणे यासारख्या बाबींची जय्यत तयारी केली जात होती. तोफखान्यात तोफदाज, दैगदाज, गोलदाज, बांधणी साखे, व इतर सैनिक असत,

**५.१.६.१ पेंढारी:**

मराठा सत्तेतील पेशवाईच्या शेवटच्या काळात पेंढारी या लढावू जमातीचा उपयोग अनेक मराठा सरदार सैन्यात सहभागी करुन घेत होते. त्याप्रमाणेच होळकर व सरदारांनीही आपल्या सैन्यात पेंढारी जमातीचे सैन्य बाळगलेले होते. मल्हारराव होळकरांनी पेंढारी सैन्याचा वापर करुन घेतला. पेंढारी जमात ही लुटमार करुन पोट भरणारी; पण त्यांना सैन्यात सहभागी करुन शत्रूची लुट करण्यात सहभागी करुन घेतले जाई. दौलतराव शिंदे यांचा जीवाजी यशंवत नावाचा सरदार बावनपागे या उपनावाने प्रसिद्ध होता. त्याच्याकडे बावनपागा होत्या. तो इ.स. १८०२ मध्ये यंशवतराव होळकराच्या सैन्यात आला होता. अशा पेंढाऱ्यांकडून युद्ध मोहिमात व लढाईत जी लूट सापडली त्यापैकी ठराविक हिस्सा सरकारात जमा करुन बाकीची लुट त्यांनाच ठेवून घेण्याची परवानगी होती. त्यामुळे पेंढारी हे विनावेतन युद्ध मोहिमात हिरीरीने पुढाकार घेत. लष्करात पेंढाऱ्यांचा भरणा केल्यामुळे मराठा फौजेत बेशिस्त निर्माण तर झाली. त्याचबरोबरच मराठे हे केवळ लुटारू आहेत. असा सर्व हिदुस्थानभर दुलौकिक झाला.[३९]

कुंभेरीच्या युद्धास जाटास सहाय्य करण्यासाठी येणाऱ्या पातशहाचे प्रचंड सैन्य दक्षिणेकडे निघाले. तेंव्हा मल्हारराव होळकर हे मथूरेकडे खंडेरांवाच्या उत्तर कार्यासाठी निघाले होते. तेंव्हा पातशहाच्या फौजेवर रात्रीच्या वेळी हल्ला चढविला. तेंव्हा पेंढाऱ्या सैन्यानी पातशहाची पत्नी मलकाजमानीस लुटण्यास सुरुवात केली. तेंव्हा ती म्हणाली ‘मल्हार कहा है?’[४०] म्हणजेच पेंढारी ही लुटीत कोणास ही सोडत नसत. अहिल्याबाईने तुकोजीराव होळकरास लिहिलेल्या पत्रात होळकर सैन्याबरोबरचे मोठ्या संख्येने पेंढारी होते. त्यामुळे महादजी शिंदे यांनी इ.स. १७८७ मध्ये अहिल्याबाईकडे लष्करी सहाय्याची मागणी केली होती. त्यात १००० स्वार आणि १०,००० पेंढारी पाठवून दयावेत असे कळविले होते. पण अहिल्याबाईने पेंढयाऱ्या ऐवजी सैन्य पाठविण्याची तयारी दर्शविलेली होती.[४१]

तुकोजीराव होळकर यांनी टिपू सुलतान विरूद्ध जी मोहीम उघाडली होती. त्यावेळी त्यांनी उत्तरेतून पेंढारी सैन्य बोलावून घेतलेले होते. त्यानंतर यशवंतराव होळकर यांनीही आपल्या सैन्यात अनेक पेंढारी सरदार वा सैन्यास सेवेत दाखल करुन घेतले होते. त्यात मीरखान, अमीरखान व गफारखान यासारख्या सरदारांचा समावेश होता. हे होळकरांचे सरदार युद्ध मोहिमात आघाडीवर पाठविले जात होते. भरतपुरच्या वेढ्याप्रसंगी एकट्या मिरखानाजवळ २५,००० पेंढारी असल्याचा उल्लेख मिळतो.[४२] पुढे यशवंतरावांच्या निधनानंतर हेच पेंढारी होळकरांच्या मुळावर उठवून फितूरी वा दगाबाजी करण्यात सुरुवात केली.

५.१.६.२ **बाजारबुणगे:**

छत्रपती शिवाजी महाराज आपल्या लष्करी मोहिमेमध्ये कधीही सडी फौज घेऊन गनिमी काव्याने अत्यंत जलदगतीने हालचाली करुन शत्रूस नमोहरण करीत. पण पेशवे काळात लष्करी मोहिमामध्ये युद्धात बिनलढाऊ पण, सैन्याच्या इतर गरजा भागविणारे किंवा सैन्यास उपयोगी पडणारे लोकांस बुणगे म्हणटले जाते. ते सोबत जाऊ लागले त्यात कारगीर, नोकर—चाकर, सोबत असत. शिवाय खिजमतगार, परीट, शिंपी, न्हावी, पखाली, दिवटे, भोई, चोपदार, चांभार,ढोर अफदागिरी तसेच विविध वस्तूंची विक्री करणारे दुकानदार असत. सरदार, दरखदार यांच्या खाजगी सेवेसाठी असणारे नोकर, कुणबीणी, आचारी यांचीही बुणग्यांमध्ये गणना केली जात असे. बुणग्यांमधील बहुतांशी मंडळी आपला व्यवसाय करुन पोट भरण्यासाठी सैन्यासोबत येत होती.[४३] पेशवे काळातील अनेक सरदारांच्या फौजेसोबत बाजार बुणग्यांची संख्या फार मोठी असल्यानेच पानिपत सारख्या युद्धात मराठ्यांना हार खावी लागली होती.

५.१.६.३ **सैन्य भरती:**

मराठा सरदार होळकरांच्या राज्यात दोन प्रकारचे सैन्य होते. त्यात कायम स्वरुपी सैन्य व हंगामी स्वरुपाचे सैन्य असे होते. अशी सैन्य भरती करतांना त्यांची शुरता व लायकी तपासली जायची शिवाय तो महाराष्ट्राच्या कोणत्या भागातील आहे हे ही विचारात घेतले जायचे. महाराष्ट्रातील फलटण, पुणे, सोलापूर, कृष्णाकाठ भागातील लोकांची सैन्यात भरती करण्याकडे मराठा सरदारांचा अधिक कल होता.[४४]

म्हणजे त्या सैन्यास भरती होतांना जामीन द्यावी लागत होता. होळकरांचे दिवाण गंगोबा तात्या चंद्रचुड व आनंदराव यांच्याकडे शेट्याजी थोरात आपल्या सर्व लवाजमानिशी होळकर सैन्यात सामिल होण्यासाठी आला. त्यावेळेस दिवाणानी त्याना जामीन मागितली. तेव्हा तो सरळ मल्हारराव होळकरांकडे येऊन भेट घेतली; पण त्यावेळी युद्ध मोहिमेची धामधुम असल्याने मल्हाररावांनी दिवाण गंगोबा तात्यास शेट्याजीची जामीन घेण्यास सवलत देण्याविषयी पत्र पाठविले. 'राजश्री गंगाधरपंत व आनंदराव गोसावी यांसी अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य मल्हारजी होळकर दंडवत विनंती उपरी शेटयाजी थोरात येथे आले जमीन मागतात म्हणून सांगितले त्यांस लष्करात अलियावर जमीन.दयावा ऐसा करार झाला. तरी त्याची बोली करुन नेमलियाप्रमाणे दिढाशा रावताची नालबंदी पंधरा हजार रूपये देणे. याजला तयार होउन आले पाहिजे तर लिहल्याप्रमाणे आटोपून येत ते करणे.'[४५]

म्हणजेच सैन्य भरती व त्यांचा जामीन यात अवश्यकतेनुसार थोडीफार सवलत दिली जात होती. पण त्यांची गुप्तपणे माहिती घेण्यासाठी चौकशी करुन खात्री केली जात होती. अहिल्याबाई होळकर यांच्या बाळाजीपंत नावाच्या व्यक्ती सोबत बडोद्याहून तीनशे अरब, गारदी व रजपूत नोकरीच्या निमित्याने महेश्वर येथे आलेले होते. तेव्हा मातोश्रीने माहिती

गुप्तहेरा मार्फत काढली असता, त्यांना कळाले की, हे राघोबादादाचे माणसे असून त्यांना होळकर राज्यात वा लष्करात गोंधळ घालण्यासाठी आल्याचे कळाले होते. त्यावेळी अहिल्याबाईनी त्यास असे बजावले 'आम्ही कोणास चाकरीस ठेवत नाही. आम्हास माणसे ठेवण्याची प्रस्तुत दरकार नाही. तुम्ही येथून निघून जाणे.'[४६] असे त्यांना स्पष्ट सांगितले होते.

म्हणजेच अहिल्याबाई होळकर या राजधानीत सैन्य बाळगून असत. कारण होळकरांची मुख्य फौज तुकोजीरावासोबत होती. मातोश्री अहिल्याबाई वेळप्रसंगी तुकोजीरावास व महादजी शिंदे यास लष्करी कुमक पाठवित असत. होळकरशाहीत सैन्य भरती करताना बऱ्याच गोष्टीची खातरजमा करुनच भरती केली जाई. पण वेळ प्रसंगी कोणतेही निकष न पाळता सुद्धा नोकर भरती केली जाई. असे यशवंतराव होळकर यांच्या प्राथमिक अवस्थेत भिल्ल, पेंढारी लोकांचा शूरवीर व धाडसी पण पाहून त्यांना लष्कारात घेतले गेले होते. यावरुन असे होते की, होळकरांच्या सैन्याच्या भरती प्रक्रियेत कठोर व कडक नियमांची पूर्तता करुन सैन्यात सामील केले जात होते. भरती प्रक्रियेत गुप्त हेरामार्फत त्यांचा भरती होण्यामागचा उद्‌देश व हेतू लक्षात घेऊन भरती केली जात होती.

होळकर राज्यात सैन्य संख्या नेमकी किती होती हे स्पष्ट पणे सांगता येत नाही. कारण सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या काळात यांच्या सैन्याची संख्या व अंतर्गत सरंजामदाराची सैन्य संख्या, मिळून ती गणली जायची म्हणून निश्चित मोहिमांचा प्रसंगावधान करुन घेऊन सैन्य संख्येत भरती करुन वाढ केली जात असे. शांततेचा काळ असेल तर त्या सैन्यात कपात केली जात होती. म्हणजेच होळकर राज्यात कधी पन्नास हजार तर कधी वीस हजार तर कधी दहा पेक्षा कमीही सैन्य संख्या होती. तरी पण मल्हारराव होळकरांची सैन्य संख्या अफाट होती. म्हणूनच मोगल, निजाम रजपूत व पठाण राजे वचकून राहत होते.

तुकोजीराव होळकर यांचीही लष्करी ताकत महादजी शिंदे एवढीच होती याशिवाय स्वत: अहिल्याबाईचे राजधानी महेश्वर येथेही पुरेशे सैन्य बळ होते. शिवाय त्या पेशव्यासाठी सैन्य बाळगण्याविषयी कळवितात की, 'श्रीमंत फौजेची उपेक्षा करतात. परंतु गोष्ट कार्याची नाही. फौज चांगली पंचवीस, तीस हजार जवळ असावी... आपण आपले फौजनिशी बळकट असावे.'[४७] म्हणजेच मातोश्री अहिल्याबाई होळकर यांना भविष्यातील इंग्रजांची संकटाची जाणीव झालेल्या त्या एकमेव राज्यकर्त्या होत्या.

टिपू सुलतान विरूद्धच्या मोहिमेत सुभेदार तुकोजीरावांकडे अठरा हजार सैन्य संख्या होती. तर लाखेरीच्या युद्धावेळी डयुडरनेककडे वीस हजारची फौज होती. म्हणजेच होळकरांची सर्व सरंजामदाराच्या संख्यासह पन्नास हजारांच्या आसपास सैन्यसंख्या होती. पण तुकोजीराव होळकरांच्या निधनानंतर त्यांत बरीच घट होऊन सैन्य शक्ती पूर्णत: मोडकळीस आलेली होती. पण ज्यावेळी यशवंतराव होळकरांनी सैन्याची जमवाजमव करुन होळकरांच्या सैन्यात पुन्हा प्रचंड वाढ केली. उज्जैनच्या लढाईत यशवंतरावांकडे प्लेमेटच्या हाताखाली १४ पलटाणी,

५००० रोहिले, १२,००० मराठे, १५,००० पठाण आणि ३०० तोफा होत्या. हडपसरच्या लढाईप्रसंगी हार्डीगच्या हाताखाली ४००० लोकांच्या ४ पलटणी, देशी अंमलदारांच्या हाताखाली ३ पलटणी, याशिवाय रोहिले व इतर सर्व मिळून १,४४,००० सैन्य यशवंतराव होळकरांकडे होते.[४८]

इ.स. १८०३ च्या सुमारास होळकरांकडे २०,००० घोडदळ, ८,००० पायदळ व १०७ तोफा होत्या अशी माहिती मिळते.[४९]

म्हणजेच यशवंतरावांनी दौलतराव शिंदे यांना शह देण्यासाठी आपल्या सैन्यत सुरुवातीस थोडी वाढ केली. पण इंग्रजांचा वाढता धोका लक्षात घेवून इ.स. १८०४ ला आपल्या सैन्य संख्येत प्रचंड मोठी वाढ घडवून आणली. इ.स. १८०४ मध्ये त्याच्याजवळ १,००००० पायदळ, २५,००० घोडदळ होते अशी नोंद मिळते.[५०]

पण यशवंतराव होळकर यांच्या मृत्यूनंतर दुसऱ्या मल्हारराव होळकरांच्या कारकिर्दीत इंग्रज—होळकर यांच्यात इ.स. १८१७ मध्ये झालेल्या महिदपूरच्या लढाईप्रसंगी होळकरांचे सैन्य मराठे व पेंढारी मिळून ८०,००० होते.[५१]

म्हणजेच होळकरशाहीतील मल्हारराव होळकर यांच्या पासून ते दुसरे मल्हारराव होळकर यांच्या कारकिर्दीपर्यंत सैन्याची संख्या इतरांच्या मानाने मोठी व श्रेष्ठ होती हे निर्विवाद सिद्ध होते. हे अनेक लढायावरुन मराठा साम्राज्याच्या अधिपत्याखाली विशेषत: होळकरांच्या ताब्यात बराच मोठा मुलुख अधिपत्याखाली होता.

**५.१.६.४ सैन्यातील शिस्त:**

छ. शिवाजी महाराज यांच्या सैन्यात कमालीची शिस्त होती. ती पुढे घटली पण तीच शिस्त बाजीराव पेशवे व त्यांचे सरदार शिंदे होळकर यांच्या सैन्यातही आढळून आली. खुद मल्हारराव होळकर आपल्या सैन्यात विशिष्ट प्रकारची शिस्त लावलेली होती. म्हणून त्यांना प्रचंड यश रणमैदानावर मिळत गेले. तेंव्हा त्या यशाचे कौतुक करतांना आपल्या सैनिकाने उत्कृष्ट कामगिरी बजावल्यावर मल्हारराव होळकर खुष होऊन, भरा याची ढाल रुपयांनी भरा असे म्हणत असत.[५२] तसेच ते आपल्या सैन्याचा पगार, भत्ता व सुविधा वेळोवेळी पुर्ण करण्यावर त्यांचा कला होता. त्यामूळे ते आपल्या सैन्यात कठोर व कमालीची शिस्त पाळत होते हे हडपसरच्या युद्ध ानंतर विजयी फौज पुणे लुटणार नाही. ना ही तिकडे कोणताही पेंढारी जाणार नाहीत अशी तंबी दिलेली असतांना त्यांचे अचूक व काटेकोर पालन झालेले होते.

तसेच सैन्याने वा सरदाराने नियमाचे उल्लंघन केले तर त्यास सेवेतून मुक्त केले जात होते. एखादी मोहीम हाती घेतल्यावर ठरलेल्या वेळी ठरलेल्या ठिकाणी पूर्ण तयारीनिशी आपले लष्कर सज्ज असावे लागते. हा मल्हाराव होळकररांचा कठारे दंडक होता. म्हणून त्यांनी लांब पल्याच्या मोहिमा जलद हालचाली करुन शत्रूस कळण्याअगोदरच विजय

मिळविला जायचा, हे त्यांच्या शिस्तीचे मोठे गमक होते. तसेच आपल्या सैनिकांची व इतर युद्ध सामुग्रीचे (घोडे, उंट, बैल) नियमित हिशोब व हजेरी घेतली जात होती. अहिल्याबाईंनी अमेरिकन कर्नल बॉईडशी केलेल्या करारात दर पोर्णिमेस सैन्याची हजेरी घेतली जावी असा दंडक होता. खराब झालेले पोशाख, हत्यारे यांची पाहणी करुन व ते जमा करुनच त्याजागी नवे दिले जातील.[५३] यावरुन असे स्पष्ट होते की, होळकर घराण्यातील राज्यकर्ते हे लष्करातील कडक शिस्तीचे होते. म्हणूनच त्यांना आपले राज्य स्थापन करता आले. होळकरांच्या लष्करातील शिस्तीत बेशिस्त निर्माण झाली ती तुकोजीराव व त्यांच्या नंतरच्या आलेल्या सरदार कारकिर्दीमध्ये होय. तुकोजीरावांना आपल्या फौजेने मोठ्याप्रमाणात गारदी, भिल्ल, पेंढारी व पठाण यांची नियुक्ती केली. पण नंतर त्यावर नियंत्रण सैल झाल्याने त्यावर नियंत्रण ठेवणे कठीण झालेले होते. पण अहिल्याबाईंना पेंढाऱ्यावर विश्वास नव्हता. त्या तुकोजीरावास पेंढारी लोकास आपल्या सैन्यास ठेवू नये. कारण त्यामुळे आपला दुर्लौकिक होऊन पत नाहीशी होईल अशी सुचना त्यांनी तुकोजीस अनेकदा केली होती.[५४]

तरीही पुढील पढत्या काळात यशवंतरावांनी आपल्या सैन्यात पेंढारी व भिल्ल लोकांचीच मोठ्याप्रमाणात भरती केल्याने आपले अस्तित्व व होळकर गादी सिद्ध करण्यात साहय केले होते. हे यावरुन स्पष्ट होते. म्हणजेच होळकर राज्यातील सरदार जोपर्यंत मातब्बर होते तेंव्हा पेंढारी, भिल्ली व पठाण सैन्यांनी मोठा पराक्रम व विश्वास दाखविला होता हे मल्हारराव होळकर व यशवंतराव होळकर यांच्या कारकिर्दीवरून स्पष्ट होते.

म्हणजेच होळकारांच्या राज्यात सैन्यात कमालीची शिस्त होती. होळकर राजाचा आदेश हा शिरसावंत मानून तो निमूटपणे पाळला जात होता. हे होळकरांच्या प्रशासनाचे खास वैशिष्टे होते. शस्त्रास्त्रे व हत्यारे प्राचीन काळापासून आधुनिक काळापर्यंत राज्याच्या सरंक्षणासाठी युद्ध विषयक सामुग्री अवश्यक असते. त्याप्रमाणे अठराव्या शतकातील मराठा राज्यकर्त्याकिडे आपल्या सैन्यास युद्धविषयक उपयुक्त साधन सामुग्रीची उपलब्धता करुन जंबिया, सुतरनाला, खांडा, कडाबीन, खंजीर, पट्टा, रेहकला, निणचा, जमदाडा, कटयार व गुरगुज तसेच काठ्या, दगड व गोफणी यासारख्या युद्ध विषय शस्त्राची मुबलकतेविषयी जेवढी भक्कमता व विविधता अधिक असेल, तेवढे राज्य भक्कम समजले जात होते. पण अठराव्या शतकात या शस्त्राशिवाय आधुनिक युद्ध उपयोगी साहित्य व शस्त्राच्या जोरावरच युद्ध जिंकण्यासाठी उपयोगी पडत होते. यासाठी युद्ध साहित्यांच्या निर्मीतीवर फार मोठा खर्च करावा लागतो. यासाठी होळकर राज्यात रामपुरा भागात शस्त्रास्त्र निर्मितीचे कारखाने होते.

**५.१.६.५ रसद पुरवठा :**

मराठा सरदार मल्हाराव होळकर यांना नेहमी वेगवेगळया युद्ध मोहिमावर जावे लागत असे त्यावेळी रणभूमीवरुन मल्हारराव आपल्या अहिल्याबाई सुनेस व वेळ प्रसंगानुसार अनेकांना पत्र पाठवून सुचना वा आदेश देत असत. त्यात रणनिती कोणती व कशी असावी.

युद्ध साहित्य सुरक्षितरित्या हलविणे, राज्याचा व्यवहार सांभाळणे, नि:पक्ष न्यायदान करणे, इ. अनेक बाबीविषयी अहिल्याबाईंना पत्र व्यवहार करुन करावयाची कार्ये व सुचना देत असत. त्याप्रकारचे नंदलाल मंडलोईस पाठविलेले पत्र असे होते. राजश्री नंदलाल मंडलोई परगणे इंदूर गोसावी यांसी, अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहकिंत मल्हारराव होळकर दंडवत... आम्ही घांट चढोंन देपाळपुरावर आलों. ये प्रांतीचा बंदोबस्त करावा लागतो. याजकरितां येणं कित्येक वर्तमान मशारनिल्हे मुखवाचे सांगतील ते मनांत आणून निस्संदेह भेटीस लवकर येणें व जजाला ८० ऐंशी, दारुखंडी सव्वा व सिंसे मण अर्धा पाठविणे. व उंटें पन्नास ऐशी तयारी करुन पाठविणें.[५५]

**५.१.६.६ ताकीद :**

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी अहिल्याबाईंना ता.३१ जानेवारी सन १७६५ रोजी पत्र पाठवून मथुरेत चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर मथुरेसी अगर आगऱ्यासी काही मुक्काम न करिता भारीभरी मजली करुन ग्वाल्हेरपर्यत झाडून जोणें. मथुरेसी मुक्काम केले हे उत्तम नसे. आम्ही सांगितले तें न करावें आणि आपल्याच चित्तास येईल तसें करणें इतकियावरी पाणी पिण्यासी देखील मथुरेस न राहता थोर थोर मजला करुन चमल उतरुन ग्वालेरीस जाणें तेथें बनेल तर पांच चार मुक्काम करावे. त्यास्थळी थोर तोफखाना ठेवून त्याचे गोळे व जंबुरियाचे गोळयाचे तजवीज होईल तितके करावें. परंतु ग्वाल्हेरी अलीकडे एक मुक्काम न करणें.[५६]

इ.स. १७६५ ला शूजाउद्यौलास इंग्रजा विरोधात मोहिमेवर गेले असता अहिल्याबाईस दारुगोळा मथुरेत मुक्काम न करण्याविषयी ताकीद दिलेली होती.पुरविण्याच्या संदर्भात केलेली सुचना राज्यातील करवसूली करणे, मल्हाररावांना रणभूमीवर सर्व प्रकारची रसद पुरवठा करणे (पैसा, अन्नधान्य, घोडे, सैन्य, तोफा इत्यादी) दारुगोळा पुरविणे, सैन्याची कुमक पाठविणे, इत्यादी खर्च अहिल्याबाईने अत्यंत चोकपणे सांभळले होते.

**५.१.६.७ पराक्रमी सैन्याचा गौरव:**

होळकर राज्यात आपल्या अंतर्गत असलेल्या सरदारांचा वा सैन्याचा मानसन्मान राखला जात होता. याशिवाय त्यांनी गाजविलेल्या शौर्याबद्दल होळकर सरकार वा पेशवे सरकारकडूनही उचित सन्मान करुन त्यांचा गौरव केला जात असे. होळकरांच्या राज्यात अनेक वंश परंपरागत सरदार वा संरजामदार सरदार सैन्य दलात सेवेत कार्यरत होते. त्यात बारगळ, वाघ, बुळे, फणसे, लांभाते, नलगे, मतकर, खटके, भागवत, काळेगावंडे, ढमढेरे असे अनेक घराणे नावारुपात आलेले होते. त्यानंतर यशवंतराव होळकर यांच्या कारकिर्दीमध्ये नव्या सरदाराचा उदय होऊन त्यात पठाण व पेढारी होते. अशा अनेक सरदाराच्या उदयाने व सेवेत असल्याने होळकरांची सैन्य शक्ती अफाट होती. त्यामुळे उत्तर भारतातील इतर सत्ताधीश व खुद्द इंग्रजही स्वत:हून बचावाची भूमिका बजावत असत. त्यामुळेच त्यांना यशवंतरावाचा

शेवटपर्यंत पराभव करता आला नाही. ना ही इतर भारतातील मराठा सत्ताधीशाप्रमाणे त्यांना होळकरावर मांडलिकत्वाचा तह करता आला नाही. पण नंतर होळकर राज्याचे वारसदारांनी हार पत्कारीत इंग्रजांचे मांडलिकत्व स्विकारले. तरीही होळकर संस्थानास अंतर्गत स्वातंत्र पूर्णपणे कायम राखलेले होते.

हजेरी पगारवाटप वगैरे कामे दिवाण, मुजुमदार, गोलदाज बांधणी, साखे व इतर सैनिक असत, हजेरी पगार वाटप वगैरे कामे दिवाण मुजुमदार फडणीस सबनिस याच्याकडे होती.

**५.१.७ होळकरांच्या लष्काराचे विभाग:**

होळकर राज्यातीललष्करात मोठ्या प्रमाणात पायदळ, घोडदळ, तोफाखाना व कवायती असे भाग होते.

**५.१.७.१ पायदळ:**

होळकर राज्यात पायदळास घोडदळाच्या तुलनेने कमी महत्व दिलेले होते. होळकरांच्या लष्करात जरी घोडदळास अत्यंत महत्व आले असले, तरी देखील पायदळाची संख्याही मोठी होती. मल्हारराव होळकरांच्या काळात ती संख्या कमी होती; पण नंतर वाढत गेली. शेवटी यशवंतराव होळकरांच्या कारकिर्दीमध्ये ही संख्या एका लाखाच्या जवळपास होती.

**५.१.७.२ घोडदळ:**

होळकर राज्यात घोडदळास अतिशय महत्वाचे स्थान दिलेले होते. तत्कालीन परिस्थितीमध्ये घोडदळास अत्यंत महत्व होते. मराठ्यांच्या खालून घोडा ज्या दिवशी निघून गेला त्या दिवशीच त्यांचे राज्य गेले. म्हणजेच मराठा लष्करात घोडदळास महत्व होते. अशा मराठा राज्याचा विस्तार व संरक्षण करण्यासाठी होळकर घराण्याचे फार मोठे योगदान आहे. होळकर घराण्याकडे अठराव्या शतकात फार मोठे सैन्य कायमस्वरुपी तर काही तात्पुरते स्वरूपाचेही होते. मराठा साम्राज्य विस्तारात घोडदळास अत्यंत महत्वपूर्ण स्थान होते. त्याप्रमाणे होळकरांच्या लष्करात घोडदळ हे सुरूवातीपासून उत्कृष्ठ होते. घोडदळात बारगीरव शिलेदार असे दोन प्रभावी मुख्य भेद असत, आणि दोन्हीमध्येही, करोल,भालेकरी व आडहत्यारी असे शस्त्रे वापरण्यावरून पुन्हा पोटभेद केले जात होते.

**५.१.७.२.१ बारगीर:**

बारगीर म्हणजे सरकारी घोडा व युद्ध साहित्य असलेला नोकरदार होय. होळकरांच्या लष्करात असे अनेक बारगीर एकत्र करुन त्यांचा गट बनविला जाई त्या गटास 'पागा' म्हटले जात होते. या पागेच्या मुख्य अधिकाऱ्यास पाग्या म्हणटले जात होते. एका पागेत साधारणत: दहा बारगीरपासून पाचशे ते सातशे बारगीरांचा समावेश होत होता. पागाच्या दर्जा त्याच्या हाताखालील घोडयाच्या संख्येप्रमाणे चढता असे. घोडदळातील २० ते २५ च्या बारगीर शिलेदार यांच्या गटावरील प्रमुखास नाईक, त्यावर हावलदार व त्यावरील अधिकाऱ्यास 'जमादार' असे म्हणटले जात होते.[५७]

**५.१.७.२.२ शिलेदार:**

शिलेदार म्हणजे स्वत:च्या खाजगी मालकीचा असलेला घोडा व युद्ध साहित्य असणारे सैन्य होय. होळकरांच्या लष्करात शिलेदारांची संख्या बरीच मोठी होती. शिलेदाराच्या गटास 'पथक' म्हणटले जाई. तर या पथकांच्या प्रमुखांना 'पथके' म्हणत असत. या पथकाचे दोन उपप्रकार पडतात. इतलाखी पथक म्हणजे ज्या पथकाच्या खर्चासाठी रोख रक्कम दिली जाई त्यास इतलाखी पथक म्हणटले जाई. सरंजामी पथक म्हणजे ज्या पथकाच्या खर्चासाठी ठराविक प्रदेश वाटून दिला जाई त्यास सरंजामी पथक असे म्हणटले जाई. शिलेदारात एकांडे शिलेदार हाही एक वर्ग होता. हे एकांडे शिलेदार कायमस्वरूपी सेवेत न राहता कुणाच्याही पथकात प्रसंगानुसार चाकरीस राहत. घोडदळात बारगीर शिलेदार यांच्या २०—२५ च्या गटावर नाईक त्यावर हावलदार, जमादार अशी रचना केलेली होती पथक्यात वरिष्ठ शिंदे—होळकर व राजपथक्यात वरिष्ठ पेशवे, भोसले व गायकवाड यांचा समावेश होते होता.[५८]

**५.१.८ होळकरांना मिळालेली सरंजामी:**

होळकर राज्यकर्त्यांना पेशव्याकडून सैन्य खर्च्यासाठी काही प्रदेश सरंजाम म्हणून वाटून दिलेला होता. त्याचे पत्र असे— ता. ६ ऑगस्ट १७२७ रोजी मल्हारजी होळकरास सरंजाम खर्चास देणे तपशील :—

| | | | |
|---|---|---|---|
| ४ प्रांत गुजराथेत महाल चार | ४ गुजराथ:— | १ मौजे मोघे,<br>१ परगणे बलवद. | १ परगणे खंबाइत.<br>१ परगणे सबलके. |
| ६ प्रांत माळव्यांत महाल सहा. | ६ माळवा:— | १ आरणिया.<br>१ परगणे रुणीझा.<br>१ परगणे पिंपलोद. | १ परगणे देवळे.<br>१ परगणे खाचरोद.<br>१ परगणे जावरा. |
| १ प्रांत खानदेश एक. | खानदेशपैकी एक महाल.[५९] | | |
| **११ एकूण अकरा** | | | |

मल्हारराव होळकर यांना श्रीमंत बाजीराव पेशवे यांनी सुरूवातीस अकरा प्रांत सरंजाम म्हणून दिले. या सरंजामीमध्ये निरंतर वाढ होत गेली.हे होळकर शासकांच्या शौर्याचे पहिले प्रतिक होते.

श्रीमंत बाजीराव पेशवे यांनीमल्हारराव होळकरांसपुन्हा दुसऱ्यांदा साडे अठ्ठावीस वाढीव सरंजामी महाल बहाल केले. ते असे—२२ माहे जून १७३२ रोजी बाजीराव पेशवे यांनी मल्हारराव होळकर यांना खास पत्र पाठवून विशेष—प्रांत मालवा येथील वाटणीचे महाल वाटणी पांच ५ पैकी दोन दक्षिण तुम्हांकडे त्यांजबद्दल महाल ची तपशील.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | परगणे इंदूर | १ | परगणे जावरा | १ | परगणे खैराबा |
| १ | परगणे गांगुरानी | १ | परगणे डोंगरपुर पैकी | १ | छत्रपती |

| १ | परगणे जिरापुर | १ | चौथ | १ | परगणे रामपूर. |
|---|---|---|---|---|---|
| १ | परगणे करहई | १ | परगणे तराणे. | १ | परगणे कायथे. |
| १ | परगणे जेपालपुर (देपालपूर) | १ | परगणे बेटमे | १ | परगणे महेश्वर. |
| १ | परगणे महत्पूर देखील | १ | परगणे आवेर. | १ | परगणे |
| १ | लालगड. | १ | परगणे भिलवडी. | १ | बाकाणीनिमें. |
| १ | परगणे पिंपळोदे | १ | परगणे पिंपलोद तलाठी | १ | परगणे काटकुट. |
| १ | परगणे बरडावद | १ | परगणे कोठडे | १ | परगणे देवळे. |
| १ | परगणे हासलपुर | १ | परगणे झाबवा | १ | परगणे पाटण |
| १ | परगणे लवाणी. | १ | परगणें पिढावा | | |
| | परगणे बुढा | **ऐकूण २८।। साडे अठ्ठावीस** | | | |

येणें प्रामणें लावून दिले असत तर सदरहू महालांचा ऐवज फौजेचे सरंजामीस घेत जाणें.[६०] यावरून असे स्पष्ट होते की, मल्हारराव होळकर यांना आपल्या सैन्याच्या खर्चासाठी सरंजाम म्हणून २२ जून १७३२ वंशपरंपरागत दिले. त्यामुळे या साडे अट्ठावीस महाल वा परगण्यातून चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा पेशव्याकडून मिळाल्या होत्या. या प्रांताचा मोकासा वसूलीचा अर्धा हिस्सा सरकारला द्यावचा होता. तर राहिलेल्या अर्ध्या मोकासा स्वत:कडे फौजेच्या खर्चासाठी घ्यावयाचा होता.

श्रीमंत बाजीराव पेशवे यांनी मल्हारराव होळकरांसपुन्हा तिसऱ्यांदा वाढीव सरंजामी महाल बहाल केले. ते असे—इ. स. १७५१—५२ मध्ये संरजाम देशीहून फौजेसह हिंदुस्थान मुलूख सरकरुन घेण्यास व स्वारीबरोबर खर्चास महाल सन ११६१ फसली सालांत श्रीमंत पेशवेसरकारनें दिले. हया यादीपैकी फक्त होळकरांचे सरंजामाचा खुलासा घेतला असून शिंद्याचे सरंजामाचा घेतला नाही.

| २००००० | परगणे आंबाड | १००००० | परगणे चांदवड. | ४०००० | परगणे देपुर. |
|---|---|---|---|---|---|
| ३०००० | ” गाळणा. | ४०००० | पैठणनिमे. | २०००० | कोरहाळे. |
| ४५००० | ” उन्नण. | ५०००० | अडावद. | ६०००० | थाळनेर. |
| १२५००० | ” सुलतानपुर. | १००००० | नंदुरबार | ७००० | आंबे. |
| १५००० | ” बिजागड. | .......... | | ......... | |
| १००००० | ” बारखेडी, वाफगांव आलें. | **२९००००** | | **१२७०००** | |
| .......... **६५००००** | लोणी, बिबी, लाखनगांव, मणचर, काठापूर, वगैरे. | | | | |
| **७५०००** | वेरुळ व रावेर निम्मे मिळून. | | | | |

येकूण एकंदर होळकरांचे हिश्शाची बेरीज रु. ११४१००० अकरा लक्ष एकेचाळीस हजार. सदरहु सरंजाम देशीहून आणले याचे खर्चास. एकूण देशचे महाल फौजेचे खर्चास रु १६६१००० सोळा लक्ष एकसष्ट हजार रुपये दोन्ही सरदारांस खर्चास दिल्हे.[६१]

इ. स. १७५८ मध्ये पुण्याच्या पेशव्यानी सुभेदार मल्हारराव होळकर यांना आणखीन चौथ्यांदा सरंजाम बहाल करण्यात आला. पुणे दरबारांत होळकर व शिंदे यांची सरंजाम निवाडयाची यादी तयार झाली त्यात होळकर चोऱ्याहत्तर लक्ष ७४००००००, व शिंदे साडेसहासष्ट लक्ष ६६५०००० होळकर यांचे सरंजामाचा तपशिल खालील प्रमाणे –

| | |
|---|---|
| २५०००००० | नवा, जुना बुळे, बारगळ, वाघसुद्धा |
| १५०००००० | नवा सरंजाम, अंतर्वेद मोहिमेबद्दल, |
| ४०००००० | थाळनेर, अडावद, सेवगांव वगैरे किरकोळ सुद्धा |
| ७५०००० | शहापूरा वगैरे राणा जैनगर व बुंदीवाल्याचे परगणे घेतले त्याजबद्दल |
| २२५०००० | आकार. श्रीमंताकडून स्वारीसंबंधात हिस्सा वाटणीचे. |

पंचविस लक्ष पंधरा लक्ष चार लक्ष सात लक्ष पन्नास हजार बावीस लक्ष पन्नास हजार [६२]

सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या निधनानंतर पेशव्यानी त्यांच्या छत्रीसाठी पुढील गावे इनामासाठी २ जून १७६६ रोजी पुढील पत्र दिले. मालजी होळकर यांजकडे छत्रीचे खर्चाकरितां इनाम गांव दिल्याबददल सनद बार आहे. छत्री मौजे मल्हारनगर उर्फ अलंमपूर परगणे बेरछा येथे आहे तेथें सदावर्ताचे वगैरे खर्चाबदल इनाम गांव.

| | |
|---|---|
| १७५०१ परगणे बेरछा पैकी गांवे ११ | ७,००० परगणे दतियापैकी गांव ३ |
| ३,००० परगणे भांडरपैकी एक गांव १<br>.........<br>२७५०१ | नूतन इनाम दरोबस्त कुलबाब कुलकानू म्हणोन सनद.[६३] |

हिंदुस्थान मुलूख सर करण्यास्तव बरोबरीचे सरदारांस खर्चाकरिता दोन्ही सरदारांस सोळा लक्ष येकसष्टहजार रुपयाचे मुलूख खर्चास दिले. पुढील पेशव्यानी ११,४१,००० श्रीमंतांनी होळकर सरकारांस अकरालक्ष ऐकेचाळीसहजार रुपयाचे तेरा महाल लावून दिले. ते तपशीलवार येणेप्रमाणे.

| १३ महाल | | १००००० खेडी: १३ वा महालमधील खेडी | | | |
|---|---|---|---|---|---|
| २००००० | आंबाड १ | २५०० | वाफगांव | ७००० | मांडवण. |
| ४०००० | देपूर २ | ४००० | मांडल | ३००० | मुंगठी. |
| २०००० | कोरहाळे ३ | ६००० | आळें. | ५००० | जांबगांव |
| ४५००० | उत्राण ४ | २००० | लोणी. | ५००० | कापडणं |
| ६०००० | थालनेर ५ | २२०० | बीवी | ४५०० | वडजाई. |
| २५००० | वेरुळ ६ | ५०० | पाडे. | ६००० | न्याहळोद. |
| १००००० | चांदवड ७ | २००० | मनचर. | ८४०० | नावलागणे |
| ३०००० | गाळणी ८ | १००० | काटापूर | ८००० | धोघलगांव |
| ४०००० | सेंवगांव ९ | २५००० | सिउर | १५०० | लाखणगांव |
| ५०००० | आडावद १० | १५०० | बडझिरे | १००० | निंब, बारगळांचे. |
| १२५००० | सुलतानपूर ११ | २५०० | कोरेगांव | ५००० | आडगांव |
| ५०००० | रावेरनिम्मे १२ | १५०० | निंबगांव. | ७०० | बुळे घाटगांव. |
| १००००० | खेडी: १३ वा महाल | १००००० एकूण | | | |
| आकार रु ११४१००० | | | | | |

१५९६००० महालनिहाय फुटगांव व सरंजामी श्री. तुकोजीराव होळकर हे मोठे सुभेदार मल्हारजी होळकरांबरोबर प्रथम स्वारीचे लढाईत होते ते पंधरा सरदार लोकांचे फौजेचे खर्चास माळवे प्रांतांतील दिल्ले महाल १५ पंधरा, ३२५७०००येणेप्रमाण.[६४] यावरून हे स्पष्ट होते की,इ.स. १७७० मध्ये होळकर शासकास ११४१००० रुपयाचे सरंजाम तेरा महाल व शिंदे शासकास ५२०००० रूपयाचे आठ महाल श्रीमंत बाजीराव पेशवे व रघुनाथरावांनी या दोघांस हिंदूस्थान मुलुख सर केल्यामुळे सैन्याच्या खर्चासाठी दोन्ही सरदारांस एकूण सोळालक्ष येकसष्ट हजारांचे एकेवीस महाल फौजेचें सरंजामाच्या खर्चासाठी दिले.

श्रीमंत पेशवे यांनी सन १७७७ मध्ये होळकर व शिंदे यांनी जहागीर महाल, मुलुख सर करुन आले त्यावेळेस त्यांचा पराक्रम पाहून अनुक्रमे ३१ व २८ महाल सरंजामासाठी दिले. त्या दिले. त्याचा होळकरांकडे आकार रु वीस लक्ष, व शिंदे यांच्याकडे आकार रु. अठ्ठावीस लक्ष एकूण दोन्ही सरदारांस जहागीर अठ्ठेचाळीस लक्ष दिले ते असे.

| होळकर | | शिंदे | |
|---|---|---|---|
| २००००० | परगणे इंदूर १ | ३००००० | उज्जेन महाल १ |
| १००००० | ”तराणे २ | ३००००० | खाचरोद महाल २ |
| १२५००० | ” देपालपूर ३ | ३००००० | नबलाइ महाल ३ |
| ७५००० | ” पिढावाकोठडी ४ | १००००० | रतलाम ४ |
| ३००००० | ” रामपुरा ५ | ३४०००० | आंमझरें ५ |
| ७०००० | ” देवळे महालसुद्धा ६ | ३००००० | मंदसोर ६ |
| ४०००० | ” महेश्वर ७ | १००००० | कयामपूर उज्जैन जवळ ७ |
| ६०००० | ” गांगरुणी ८ | ५०००० | उन्हेल ८ |
| २५००० | ” कायथे ९ | ५४००० | पान विहार ९ |
| १००००० | ” मल्हारगड १० | ३६०००० | बडोदा वगैरे महाल १० |
| २००००० | ” महत्पूर ११ | १५४००० | शहाजपूर ११ |
| ७५००० | ” जावरा १२ | ८००००० | राजगड खिलचीपूर १२ |
| ३०००० | ” पिंपळोदे १३ | ५४००० | नेवरी भवरासा १३ |
| ३०००० | ” बेटमें १४ | ३७००० | झालोर बडोदे १४ |
| २००० | ” काटकुट १५ | ६४००० | सोनकच १५ |
| १०००० | ” नेमावर १६ | ४०००० | ठोके १६ |
| ७००० | ” हासलपूर १७ | ३४००० | घरगांव १७ |
| २००० | ” आंबे १८ | ८००० | वाघबारे १८ |
| ५००० | ” सुंदरसी १९ | १२००० | नेमावर १९ |
| ३०००० | ” आबेर २० | २२००० | निमेमोराहसोद २० |
| १५००० | ” संधारा २१ | ६०००० | पाटणकेशवराय २१ |
| १०००० | ” रायपुर २२ | १५००० | गांगली २२ |
| ५००० | ” करहाई २३ | ४२००० | दाउद २३ |
| ६५००० | ” पाटण २४ | ४०००० | सागोरदिगठाण २४ |
| ३००० | ” पाटणकेशवराय २५ | १५००० | पुणासे सिकरी २५ |
| १५०००० | ” सिरोंज २६ | १००००० | पावागड २६ |
| ७५००० | ” सावेर २७ | ४०००० | बडवाय २७ |
| ६०००० | ” झाबवे महालसुद्धा २८ | १००००० | आजमेर २८ |
| ३५००० | ” कोठडा २९ | ............ | ६५ |
| ५००० | ” लवाणी ३० | **२८०००००** | |
| १०००० | ” टोकरामपुरा ३१ | | |

| .............. २०,००००० | | | |
|---|---|---|---|

### ५.१.८.१ होळकर राज्यातील सरंजामी सरदार

माळव्यात स्थिरस्थावर झाल्यानंतर आपल्याबरोबर आणलेल्या शूर व स्वामीनिष्ठ लोकांना मल्हारराव होळकरांनी सरंजाम दिला होता. तर अहिल्याबाईंनी त्यांना प्रतिष्ठा मिळवून दिली. त्यापैकी कित्येकांनी मुद्रा सुरु केल्या. कित्येकांनी आपल्या अधिकारात जहागिऱ्या दिल्या. होळकर राज्यात सैन्य व्यवस्था व योजना हीसरंजामी सरदारांमार्फत होत होती. इ.स. १७८३—८४ चा तपशील व महालनिहाय सरंजामी सरदारांच्या खर्चाची यादी व त्यासाठी फूटगांव सरंजामी महाल खर्चासाठी लावून दिलेले होते. त्यात प्रामुख्याने गोविंदराव बुळे, वाघ, माधवराव बारगळ, लांभाते, फणसे, बाबूराव वाघमारे, आप्पाजी राम पळशीकर, नारो गणेश, भगवंतराव खटके, गोविंद महाडिक, खंडूजी नलगे, भागवत, माधवराव राजोळे व पिसे इत्यादी सरदार होते. सरंजामांतून होते. सरंजामदार व सरदारांना बत्तीस लक्ष सत्तावन हजाराची जहागीर दिल्याने त्यांच्या ताब्यात पेशव्याकडून मिळालेल्या जहागिरीचा निम्मा हिस्साच राहिला होता.[७९]

| अ. क्र. | | सरंजामी सरदारांची नांव | प्रांतांची नांवे व उत्पन्न | स्वार |
|---|---|---|---|---|
| १ | १,९५,००० | निस्बत राजश्री गोविंदराव बुळे यांजकडे तीन महाल | परगणे.पाटण—७५०००, परगणे.झाबुबा—८५००० परगणे. चिखलदे—३५०००, | ७०० |
| २ | ३,००,००० | राजश्री वाघ | परगणे.महत्पूर, परगणे.बेटमे व परगणे.उत्राण | १००० |
| ३ | ९६००० | राजश्री नारायण बारगळ | परगणे.बुढे—७५०००, परगणे.नारायणगड—, परगणे.करही—६०००, परगणे.रायपूर—१५००० | ७४० |
| ४ | ६०००० | राजश्री लाभांते | परगणे जिरापूर—३००००, परगणे माचलपूर—३०००० | २०५ |

| ५ | १,१५,००० | राजश्री फणसे यशवंतराव | परगणे तराणा | २८० |
|---|---|---|---|---|
| ६ | १,०४,००० | राजश्री बाबूराव वाघमारे | १ सावेर परगणा | २२५ |
| ७ | ३०००० | श्रा.अप्पाजीराम पळसीकर | १ पगरएणे बरडावडा | १० |
| ८ | ५०००० | राजश्री नारोगणेश | परगणे पंचपहाड | |
| ९ | ६०००० | राजश्री भागवत व खटके | पगरणे जावरा | १२० |
| १० | ४००० | राजश्री गोविंदराव महाडिक | परगणे पिंपलोदा | |
| ११ | ६०००० | राजश्री खंडूजी नलगे,<br>निसबत ढमेढरे | आबेर—४००००<br>अडावद—६००००<br>दहीवद—६००० | २२५ |
| १२ | १५००० | राजश्री भागवत | परगणे बागदरा | २५ |
| १३ | ३३००० | राजश्री माधवराव राजगोळे | परगणे<br>हसलपूर—१२०००,<br>हरसोले—७५०,<br>जांब—३५००<br>बुढे पैकी—१००० | १०० |
| १४ | ५००० | राजश्री पिसे | परगणे वडगांव | १५ [६६] |

यावरून होळकर शासकांची सैन्य बल व त्यांच्या खर्चासाठी दिलेला सरंजामी प्रदेश व त्यांचे सरदार याची माहिती मिळते.होळकर राज्यात सरंजामी सरदार ही मोठ्याप्रमाणात होते. त्यात राजश्री गोंविंदराव बुळे, वाघ, नारायण बारगळ, यशवंत फणसे बाबुराव वाघमारे, गोविदराव महाडिक व भागवत खटके यासारखे होते.होळकरशाहीतील अंतर्गत सरंजामशाही मल्हारराव होळकरांनी माळव्याची जहागीरी पेशव्याकडून मिळताच राज्याच्या प्रशासनासाठी पेशव्याप्रमाणेच राज्यांतर्गत सरंजामदारी पद्धतीचा अवलंब केला. त्या पद्धतीने होळकर राजानी आपल्या अंतर्गत सरदारांना व अधिकाऱ्यांनाही पेशव्यांप्रमाणे सरंजामदारी तर होळकरांनी उपसरंजामदारी निर्माण केली. होळकरांच्या या अंतर्गत सरंजामदारीस पेशव्यांकडूनही मान्यता मिळालेली होती. होळकरांच्या राज्यात अनेक संरजामी सरदार त्यांचे शौर्य पाहून दिले होते. त्यात इ.स. १७३७ मध्ये होळकर राज्यात पंधरा सरंजामी सरदार होते. त्यांना चोवीस परगण्यांचा प्रदेश सरंजाम म्हणून दिलेला होता. होळकरांचे प्रतिनिधी या नात्याने त्यांना त्या सरंजामी प्रदेशाची व्यवस्था पहावी लागत असे.[६७] होळकर राज्यातील सरंजामदारांची संख्या वाढत गेल्याने या होळकरांच्या प्रदेशात वा उत्पन्नातही वाढ होत गेली. ती अहिल्याबाई होळकर यांच्या काळात सरंजामदारांची व त्यांच्या ताब्यातील प्रदेश वा उत्पन्नाच्या वाढीची माहिती मिळते.

**५.१.८.२ सरदारांना फुटकर गावे सरंजामासः**

होळकर राज्यातील काही सरदारांना फुटकर गावे सरंजामास लावून दिलेली सरंजामदार ही कार्यरत होते. त्यांची यादी

| अ. क्र | सरंजामदार मंडळी | लावून दिलेला सरंजाम | स्वार |
|---|---|---|---|
| १ | राजश्री शिंदे चौंडीकर | १ परगणे निंबहेडा निम्मे महाल | ६५ |
| २ | राजश्री काशराव | १ परगणे कायथा | ० |
| ३ | यशवंतराव गंगाधर | १ मौजे केसोद प्रात मेवाड | ० |
| ४ | शितोळे | १ करही पैकी | ५ |

गायकवाड यासारखे अनेक सरंजामी सरदार व जहागीरीदारास छत्तीस परगणे व इतर किरकोळ गावे मिळून अंदाजे बत्तीस लाख सत्तावन हजार रुपये उत्पन्नाचा प्रदेश सरंजाम म्हणून देण्यात आला होता. होळकरशाहीतील फुटकर गावे सरंजामदारास लावून दिलेली होती. पण त्यांच्या गावांचा उल्लेख नाही. अशा सरंजामदारांची यादी—

| राजश्री बांडे | राजश्री पिंगळे | राजश्री जगताप | राजश्री बघड | राजश्री बोराडे | राजश्री |
|---|---|---|---|---|---|
| राजश्री कोकरे | राजश्री पुरंदरे | राजश्री जाधव | राजश्री गुंजाळ | राजश्री डोयफोडे | गीते |
| राजश्री कारले | राजश्री दाभाडे | राजश्री चिखले | राजश्री गावडे | राजश्री गायकवाड | बाळगाव |
| राजश्रीाोरात | राजश्रीइंगळे | राजश्री म्हसके | राजश्री होंगाडे | राजश्री धायगंडे | डे ६८ |

होळकर राज्यातील सरंजामी जहागीरदार व सरदारांस छत्तीस महालाचे उत्पन्न अजमासें बत्तीस लक्ष सत्तावन हजाराचे दिलेले होते. होळकर राज्यातील इतर सर्व सरंजामदार होळकर सत्ताधीशांना लष्करी मोहिमामध्ये सहभागी होऊन विजय मिळवून देण्यात ते अग्रेसर असत.

**५.१.९ कवायती सैन्यः**

होळकर शासकांनीही पाश्चिमात्यांच्या कवायती फौजेचा स्विकार करून डयुडेन्स यास कवायती फौजेचा अधिकारी म्हणून नेमले. महादजी शिंदे, पेशवे, व यशवंतराव होळकर यांच्या सैन्यात कवायती सैन्य होते. त्यात पठाण, रोहिले, शिख, गारदी व पेंढारी जमातीचा भरणा मोठ्याप्रमाणात होता. हे पायदळ किल्ला सर करणे, किल्ल्यास वेढा देणे. यासाठी उपयोगी पडत होते. म्हणून यशवंतरावांनी आपल्या पायदळातील सैन्यात वाढ केलेली होती.

आपल्या सैन्याच्या आधुनिकीकरणासाठी व प्रशिक्षणासाठी त्या अत्यंत जागरूक असत. १७९३ मध्ये अमेरिकन अधिकारी जी.पी.बॉयड यांची सैन्याच्या प्रशिक्षाणासाठी प्रशिक्षक म्हणून नियुक्ती केलेली होती. कावायती सैन्यात मोठ्याप्रमाणात पायदळांचा समावेश असे. त्यामुळे या पायदळाची संख्या वाढत गेली. शिंदे, होळकर व इतरांनी अशी कवायती फौज आपल्या पदरी ठेवलेली होती. मराठा राज्यात घोडदळ व पायदळास महत्व होते. त्यावेळीच त्यांना

गनिमी काव्याच्या तंत्राने अनेक विजय सहज हस्तगत करता आले. पण पेशवाईकाळात याबरोबर कवायती फौज मराठा सरदार आपल्या पदरी बाळगू लागले. मराठा सैन्यात कवायती पाश्चात्य पद्धतीच्या लष्करी फलटणीचा स्विकार इ.स. १७७७ पासून झाला. तत्कालीन मराठा दरबारातील नाना फडणीसाकडे फ्रेंच वकील सेंटल्युबीन यांनी येवून आपण फ्रेंच सरकारशी मैत्री करावी असा प्रस्ताव मांडलेला होता.

**५.१.१० लष्कराचे वेतन:**

होळकरांच्या सैन्य काळात सैन्याची संख्या ही फार मोठी होती. त्यांना शक्यतो दर महा स्वरुपात त्यास पगार दिली जात असे. स्वारास ४५० रू., करोल बंदुकधारी ३२५ रू तर भालेकरी २२५ रू. असे वार्षिक वेतन दिलेले दिसते.[६९] पुढे काळानुरुप सैन्याच्या वेतनात बदल झालेले होते. 'पेशवेकाळात बारगीरांना चार—पाच रुपयापासून आठ—दहा रुपयापर्यंत मासिक वेतन दिले जात असे.[७०]

नालबंदी म्हणजे स्वारीस निघण्याअगोदर तयारीसाठी शिलेदारांना वार्षिक वेतनाची एक चतुर्थांश किंवा तिजाई रक्कम दिली जाई. त्यास नालबंदी म्हणत. बाकीचे वेतन सैन्यात उपस्थित झाल्यावर प्रत्येक आठवड्यास ठराविक हप्त्याने देण्यात येत असे त्यास रोजमुरे म्हणत.[७१]

होळकरांनी बॉईडशी केलेल्या करारावरुन एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे युरोपीयन पद्धतीच्या पलटणीमध्ये हिंदी लोकांपेक्षा परकीय लोकांना अधिक वेतन दिले जात होते.[७२]

होळकरांच्या सरंजामी सरदारांना लष्करी खर्चासाठी मुलुख तोडून दिलेला असल्याने सरदारांच्या सैन्याचे वेतन सरदारांनांच भागवावे लागत असे.[७३]

पगाराव्यतिरिक्त घोड्यांच्या चाऱ्याची आणि सैनिकांच्या भोजनाची, इतर सुविधांची काळजी सरकारकडून घेतली जात होती. तसेच युद्ध मोहिमात विशेष शौर्य वा मुसांडी मारुन यश मिळवणाऱ्यांचा मोठा मानसन्मान व योग्यते बक्षिसही दिले जात होते. पण पेशवे काळात सैन्यास नियमित वेतन मिळणे कठीण झालेले होते. तत्कालीन मराठा साम्राज्यात अस्थैर्य व मातबर सरदार यांच्यात बेभनावामुळे मराठ्यांची तिजोरी रिकामीच झाल्याने पेशव्यांनी आपल्या धरसोड वृत्तीमुळे व नेभळट व स्वार्थी संधीसाधुवृत्तीने सैन्याच्या वेतनाकडे दुर्लक्ष केलेले होते. तर इतर मराठा सरदार शिंदे व होळकर यांच्यातील वाढता संघर्ष यामुळे सैन्याची परवड झाली. हालापेष्टा होऊन दुफळी माजली. पुढे यशवंतराव होळकरांनी आपले आसन स्थिर झाल्यावर सैन्यास नियमित व रोख स्वरुपात पगार दिला होता. म्हणजेच मल्हारराव होळकर, अहिल्याबाई होळकर व यशवंतराव होळकर यांच्या कारकिर्दीमध्ये आपल्या सैन्यास नियमित व रोख स्वरुपात पगार दिला जात होता हे त्यांच्या भक्कम भरलेल्या तिजोरीचे उत्तम उदाहरण होते. मातोश्री अहिल्याबाईनी चांदवड परगण्याचे कमाविसदार दिनकर अनंत यांस पुढील प्रकारचे पत्र पाठवून वेतन देण्याविषयी कळविले होते.ते असे चिरंजीव राजश्री यशवंतराव

फणसे हयांस देशी रवाना केली आहेत. त्यांजबरोबर मेवाती व खानदेशी लोक दिले आहे. त्यांस रोजमुरा दीडमहा सदुष्ट रूपये एकंदर इसम चौदाबद्दल देविले असे तरी सदर्हु रुपये ज्याचे त्यास घेऊन पावल्याचे कबज घेणे.[७४]

खऱ्या अर्थाने पाश्चात्य पद्धतीचे सैन्य भारतात सर्व प्रथम म्हैसूरच्या हैदर अलीने तयार केले पूढे त्यांच्या मुलाने म्हणजे टिपू सुलतान यांनीही कवायती सैन्य आपल्या पदरी ठेवलेले होते. निजाम, उत्तरेतील गोहादच्या राणाने पाश्चात्य पलटणी उभारल्या होत्या.[७५] त्यानंतर तर मराठा सरदार महादजी शिंदे यांनी मराठेशाहीत इ.स. १७८४ ला युरोपियन पद्धतीची पलटन उभारली. त्यानंतर तुकोजीराव होळकर यांनी इ.स. १७९१ मध्ये डयूडरनेक यांस नोकरीवर ठेवून दरमहा तीन हजार रूपये वेतन दिले जाऊ लागले. याच डयूडरनेकने होळकरशाहीत चार बटालियन उभाररुन इ.स. १७९२ च्या लाखेरी लढाईत डयुडरनेकच्या पलटणीने चांगला पराक्रम गाजविल्याने त्यास आणखी पलटणी उभारण्यास सांगण्यात आले होते.[७६] तसेच तुकोजीराव होळकर यांनी अमेरीकन अधिकारी जी.पी. बॉइड या कर्नलच्या नियंत्रणाखाली इ.स. १७९३ आणखीन एक पलटन उभारण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार त्यांच्याशी जो करार केला तो लुनिया बी. एन. यांनी आपल्या लेखात सैन्य व त्यांचे विविध स्तरावरचे अधिकारी यांचे वेतन सविस्तर दिलेले आहे.

**सैनिक साम्रगी की अन्य आवश्यकताएँ**

| **सामग्री** | | **दर रू.मे.** | **आकार रू. और आनों मे.** |
|---|---|---|---|
| ९४१ | बंदुके मय संगीतो के | १२.०.० | ११,२९२,.०.० |
| ९४१ | कुरतिया | ४.०.० | ३,७६४.०.० |
| ९४१ | पगडिया | १.४.० | १,१७६.४.० |
| ९४१ | कमरबंद | ०.८.० | ४८०.८.० |
| ९४१ | कंधे के उपर की पट्टीया | १.०.० | ९४१.०.० |
| ९४१ | पजामे | ०.८.० | ४७०.८.० |
| | | **कुल योग रूपये** | **१८,११४.४.०** |

| इंग्रज अधिकारी | व्यक्ति | वेतन | कुल |
|---|---|---|---|
| मुख्य अधिकारी (बाईट) | १ | २००० | २००० |
| खासा सरदार (केप्टीन) | १ | ३०० | ३०० |
| लेफिटिनन्ट | ५ | १५० | ७५० |
| सार्जन्ट मेजर | १ | ६५ | ६५ |
| सार्जन्टस् | १ | ६५ | ५८५ |
| भारतीय अधिकारी तथा बिला सनदी कमान्डर | १ | ६० | ६० |
| सुबेदार | १० | ४० | ४०० |
| जमादार | १० | २० | २०० |
| हवालदार | ४० | १२ | ४८० |
| नाईक | ४० | ८ | ३२० |
| ड्रमर (तम्बरची ) | १० | ८ | ८० |
| पापडर (बांसुदी व मशक) | १० | ८ | ८० |
| सिपाही | ८४१ | ६ | ५०४६ |
| क्लार्क्स (कारकुन) | २ | ३० | ६० |
| हरकारा | ५ | ५ | २५ |
| भिस्ती | १० | ४ | ४० |
| मशालची | ५ | ५ | २५ |
| | १,००१ | | १०,५१६ |

यासाठी लागणारा खर्च हा अठरा हजार एकशे चौदा चार पैसे असा होता. त्यापैकी अकरा हजार चारशे एकोणनव्वद रुपये पुणे मुक्कामीच बॉईड यांना दिलेले होते. तर बाकीचे सहा हजार सहाशे पंचेवीस रुपये महेश्वर येथे चुकते केले. त्यासाठी लागणारा तोफखाना व इतर सामुग्री उपलब्ध करुन दिली.

| **सामग्री** | **संख्या** |
|---|---|
| तोंपे | ०१० |
| बैल | १५६ |
| प्रति तोप ६ बैल हिसाब से १० तोपो के लिये प्रति लट्ट गाडी के लिए ६ बैल के हिसाबसे | ०६० |
| १० गाडीयों के लिए बैल | ०६० |
| एक छकडे के लिए १२ बैल के हिसाबले ३ छकडे | ०३६ |

उपरोक्त तोपखाने के लिऐ निचे लिखी विगत के अनुसार व्यक्ती (इसम) और सामग्री साथ रहेगी.

| ६० | तोफची, प्रत्येक रू. ८ के हिसाब से | रू.४८० |
|---|---|---|
| २० | युरोपीयन तोपची प्रत्येक ४ के हिसाब से | रू.८०० |
| १२० | सारथी तथा गोला बारूद देनेवाले (आयद खलासी)प्रत्येक रू. ६ के हिसाब से | रू.७२० |
| १ | जमादार रू. १२ के हिसाब से | रू.१२ |
| २० | युरोपीयन तोपची प्रत्येक ४० के हिसाब से | रू.८०० |
| २० | लद्दु गाडीया चलानेवाले गाडीवान प्रत्येक रूपये ४ के हिसाब से | रू.८० |
| १ | डिंटल (पार्क सार्जंट) रू ८ के हिसाब से | रू.८ |
| **२२२** | **कुल योग** | **रू.२,१००** |

[७७]

तसेच दोनशे बावीस सैन्याच्या भरती केल्यानंतर त्यांना पगार दिली जाईल. तसेच या सैन्यांनी किमान एक वर्षभर तरी सेवेत असणे अवश्यक आहे. तसेच या सर्व सैन्याची हजेरी व मोजणी दर पोर्णिमेस घेण्यात येईल. जर कोणी यावेळी गैरहजर असेल तर त्याचे वेतन दर महातून कपात केले जाई.हा आदेश मानून त्यानुसारच सैन्याने आपले कार्य करावे लागेल. यावरून असे स्पष्ट होते की, या कराराचे पालन तंतोतंत करण्यावर भर देवून तो सक्तीचा करण्यात आलेला होता.

त्यासाठी लागणाऱ्या सैन्यांची भरती व त्यांचा पगार दर पोर्णिमेस हजेरी घेऊन केला जाईल. अशी अट घातलेली होती. यासाठी अप्पाजी चिमनाजी या कारकूनची होळकर सरकारकडून नियुक्ती केलेली होती. याकार्यासंबंधीचे शिक्के, सही व आदेश महेश्वरला गेल्यावर अहिल्याबाई यांच्याकडून दिली गेली होती. सदरील करारानुसार कवायती फौजेची सुरूवात राज्यात अतिशय चांगल्या प्रकारे झाली. या शिवाय होळकरांकडे हा डयुडरनेक हा तुकोजीराव होळकर ते यशवंतराव होळकर यांच्या कारकिर्दीमध्ये होळकर सैन्यात पाश्चात्य पद्धतीच्या पलटणीचे नेतृत्व केले. याशिवाय प्लेमेट, गार्डनर, रॅयन, ईव्हॅन, आदी पाश्चात्य अंमलदार होळकराच्या सैन्यात काम करीत असल्याची माहिती मिळते.[७८]

### ५.१.११ तोफखाना:

छत्रपती शिवाजी महाराज यांच्या काळात तोफखाना व त्या तोफाचा वापर होत होता. त्यापेक्षा पेशवाईच्या काळात या तोफखान्यास महत्व येऊन मोठ्याप्रमाणात पेशव्यांचे सरदार तोफखाना आपल्या पदरी बाळगत असत. पण गनिमी काव्याचा वापर करते वेळी अवजड तोफखाना वापरणे फारच कठीण होत होते. छत्रपती शिवाजी महाराज, संताजी घोरपडे,

बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, मल्हारराव होळकर इत्यादींनी जलद हालचाली करण्यासाठी फक्त गनिमी काव्याचाच वापर करण्यावर भर दिलेला होता. हेच त्यांच्या यशाचे मोठे गमक होते. म्हणून शत्रूच्या अतिशय मोठ्यालष्करावर मात करून आपले राज्य व वर्चस्व निर्माण करण्यात पुढाकार होता. तरी पण युद्ध मोहिमात अवजड तोफखान्यास महत्व होते. त्यामुळे प्रत्येक सरदार व राजे महाराजे तोफखाना अधिकात—अधिक ठेवण्याचा प्रयत्न करीत होते. विशेषत: होळकर शासकांनी तोफखाना विभागावर व निर्मीती करण्यावर मोठा भर दिलेला होता.

२१ ऑक्टोबर. १७६४ ला इंग्रजाविरुद्ध दिल्लीचा बादशहा, शहाशूजा व मीर कासीम यांनी संयुक्त आघाडी उभारुन लढाई केली. पण त्यात त्यांचा पराभव झाल्याने इंग्रजांची सरशी झाल्याचे पाहून मल्हारराव होळकरांनी अहिल्याबाई होळकरांस आदेश दिला की, ग्वाल्हेर जवळ दारु गोळयांचा कारखाना लावून तोफखाना सिद्ध ठेवावा... तसेच १० फेब्रुवारी १७६५ गोविंद शामराव यांनी लिहून पाठविलें की, किल्ल्यावर तोफा उतरावण्याकरिता लिहून पाठविले आहे. त्याप्रमाणे तोफांचा सरंजाम नाही. किल्यावरील तोफा न उतरणें आह्मी येथून तोफा थेर चार पाठविल्या आहेत. त्या शहरांत ठेवणें आणि तोफा तुह्मी ग्वालेरीस पाठवाल त्यासमयी बैलांस चाराचंदी व गाडी रोजमुरियाची वगैरे नेमणूक देणें ४००० थोरले तोफांचे गोळे, १०००० जंबुरियाचे गोळे व १५०० आणीदार गोळया.[७९]

२३ फेब्रुवारी १७६५ रोजी मल्हारराव होळकर यांनी अहिल्याबाईस पत्र पाठवून आहिल्याबाई यासी प्रती मल्हारजी होळकर ग्वालेरीस तोफखाना ठेवावयाची सोय नव्हती. त्याजकरितां शिंरोजेस घेऊन जातों. तेथे तोफखाना ठेवूं ह्मागून लिहिलें ऐसियास तोफखाना शिरांजी ठेवून तेथें बैलास चारादाण्याची सोय उत्तम प्रकारे करुन घेऊन ताजूस तोफासुध्दा ठेवणें आणि तुह्मी इंदुरी जाणें. तेथें गोलियावर सुलतानपूर, सेंधव्याचा बंदोबस्त जरुर करणें.[८०]

२३ फेब्रुवारी १७६५ रोजी मल्हारराव होळकर यांनी अहिल्याबाईस पत्र पाठवून ताजू तोफखाना घेऊन आला आहे. त्यास तोफखाना झाडून सिरोंजेसी येऊन तेथें बैलासी चारा पोटभर व चंदीची बेगमी करुन घेऊन मग तुह्मी पुढें जाणें राजश्री चिमणाजी गोविंद मामलेदार यांस बैलांच्या चाऱ्याविषयी व दागडुजी तोफखान्याचे करिता ताकीद करुन तोफांची झाडून तयारी करुन ठेवणें.[८१]

४ मार्च १७६५ रोजी मल्हारराव होळकर यांनी आपल्या सून आहिल्याबाई बाईस पत्र पाठवून गोहदकराकडील एक गढी तुह्मी तोफा लावून खाली केली, म्हणून काशीदाने सांगितले पोक्त करवणें. ऐंदा तोफेचे गोळे व जंबुरियाचे गोळे याचा कारखाना लावून सरंजाम पोक करवणें. ऐंदा आझाद गोहदकराचें पारपत्य जरुर कर्तव्य आहे.[८२]

गोहदकरांकडील गढीचा जमाव अटोकाट पुर्ता मनास आणोन मग तोफखाना पाठवीत जाणें. शहास सर्वथा गुंतत न जोणें दबाबानें जितकें काम होईल तेथवर करीत जाणें.

तोफखाना आपल्यापासून कोणाच्या भरवंशावर सर्वथा लांब पाठवावयाची तजवीनज न करीत जाणें. तोफखान्याची आब राहून आपला नक्ष साधे तो अर्थ करीत जाणें.[८८]

२१ मार्च १७६६ चिरंजीव अहिल्याबाईस पत्र की, गोहदकरांकडील एक दोन गढ्या मातबर घ्यावयाच्या होत्या. तेथे तोफा लावून ठाणें खाली करुन घेऊन राजश्री सामराज यांचा अमंल पेशजी प्रमाणे चालते आला. सांप्रत मोहीम जाटाची आहे. लोकांस खावयास द्यावे लागते. याजकरितां खेतसी करमसी याजपासोन लष्करांत रुपये २,००,००० दोनलक्ष घेऊन हे पत्र तुह्मांस हुंडीदाखल लिहिलें असे तरी पत्र पावतांच सदर्हु दोनलक्ष रुपये सावकार मजकुर याजला देऊन पावती घेणें चिठी जे समयी पावाल तेचक्षणी ऐवजाची भरती करुन देणें. येविषयी हयगय न करणें [८४]

१० सप्टेंबर १७९७ रामराव अप्पाजींस पत्रः— तुकोजीराव यांजकडून तोफखान्याकडील शेखजी करीमन तोफा ओतावयाकरितां पाठविला आहे त्याजला सरंजामाचा मेळ नन्हेखांकडील इंदूरी तोफ आहे. ती महेश्वरी आणून तिजला फोडून तिची धातू, व महेश्वर पैकी दससलाम तोफ आहे ती फोडून दोन्ही तोफांची धातू कारगिराकडे घेऊन कोंळसें वगैरे जिन्नस याचा मेळ लावून देणें आणि तोफा चांगल्या सुरेख जलदी ओतविणें म्हणोंन.[८५]

यशवंतराव होळकरांनी इ.स. १८०२ मध्येझालेल्या दौलतराव शिंदे व बाजीराव दुसरा यांच्या संयुक्त फौजेचा हडपसर येथे तोफाच्या जोरावर शिंदे पेशव्यांच्या फौजेचा धुव्वा उडविला. दोन्ही पक्षाच्या तोफखान्याचीच झाली होती व त्यात होळकराचा तोफखाना सरस ठरला होता. यशवंतराव होळकरांनी तोफा तयार करण्याचा भानपूरा येथे कारखाना सुरु केलेला होता. मराठा सत्तेच्या शेवटी तोफखान्याचे महत्व यशवंतराव होळकरांनी ओळखूण इंग्रजांशी सशक्त लढा देण्यासाठी पुन्हा नव्या दमाने प्रत्युत्तर देण्यासाठी स्वतः यशवंतराव होळकरांनी इंग्रजाशी झुंज चालु असतना अत्यंत जलद हालचाली करतानाही यशंवतरावांबरोबर १९२ तोफा होत्या अशी माहिती मिळते.[८६] त्यानंतर भानपुरा येथे तोफांचा कारखाना सुरू केला होता. आणि तोफा निर्मीतीच्या कामावर ते जातीने देखरेख करीत होते. म्हणजेच मराठी सत्तेत मोठ्याप्रमाणात तोफांचा वापर केला जात होता. त्यात सर्वात जास्त तोफखान्याचा वापर व त्याचे महत्व यशवंतराव होळकरांनी जाणलेले होते. होळकरांच्या सैन्यात घोडदळ, पायदळ व कवायती फौजे शिवाय ही उंटदळ, हत्तीचेदळ ही होते. त्याचा वापर युद्ध प्रसंगानुरुप केला जात होता. मोठ्यातोफा व छोट्या तोफा हत्तीवरच्या तोफा व उंटावरच्यामोठ्यामाध्यम लहान, अशा विविध आकराच्या व एक धातु किंवा मिश्रधातुच्या तोफा असत. तोफाचे प्रकार पडत होते. तोफखान्यात तोफदाज, दैगदाज, गोलंदाज, बांधणी साखे, व इतर सैनिक असत,[८७]

ता. २ माहे मार्च सन १८०३यादी मोजदाद तोफखाना तटवंदी वगैरे किल्ले महेश्वर विद्यमान राजरी बाळाजी भास्कर दिमत राजरी अंबाजी इंगळे... छ ७ माहे जिल्काद शके १७२४

| १० तोफा सुमारी | |
|---|---|
| १ दक्षिणेस श्रीगणपतीचे जवळ लोखंडी<br>१ उत्तरेकडे तटबंदी बुरजावर लोखंडी<br>**४ दिल्ली दरवाज्यापुढे**<br>१ पंचरसी मोठी तोफ<br>१ शेरवचनावाची पंचरसी.<br>१ लहान लोखडीं.<br>१ पंच धातूची लहान<br>.....<br>४ | १ ईशान्य कोनाचे बुरजाबव,<br>१ दिल्ली दरवाज्याबाहेर. धातूची<br>१ दिल्ली दरवाज्याचे उजव्या बुरजावर लोखंडी<br>१ उत्तरेकडील बुरजावर पीराजवळ.<br>१ कमानी दरवाज्याचे उजवे बाजूस पंचधातूची<br>१ उत्तरेकडील कमानी दरवाज्याचे पंचधातू<br>१ दक्षिणेकडे बागली बुरजावर लोखंडी<br>.....<br>७ |
| २ आग्नीकोण बुरजावर तटबंदीस लोखंडी लहान,व मध्यम. [८८]<br>....<br>८ **येकूण १५ पंधरा.** | |

पैकीवजा साहेब फिरंगी याजकडे कंपूत आल्या सुमारी ५ पांच दिली दरवाज्या पुढींल चार ४ व दिल्ली दरवाज्याबाहेर लांब छड १ येकूण पांच बाकी किल्लेमजकुरीं बुरजावर वगैरे १० दहा:—

| ३० मालेकरी दरवाज्यावर | १ जंबुरेची गोळी<br>२१ जजाली सुमारी<br>१ गोळया सुमारी | १ सिंगाडा<br>६ जंबुरे लहान |
|---|---|---|
| ४०० कचेरींत. | | |
| ३० येणें प्रमाणेकचेरीत | १ नगारियाची जोडी लोखंडी<br>५ जंबुरे सुमारी<br>५ बागली बुरजावर<br>२ नेऋत्य कोनीं बुरजावर<br>२ जेजाली सुमारी दो | ५ गंजीफा गाडया दिल्ली दरवाज्यापुढें<br>३ व मंडळ खोर दरवाजा<br>२ येकूण ५ |

येकुण त्रेपन्न दागिने आहेत. सिवाय जंबुरे १०६ पैकी सरकारांत पाठविले २५ पंचवीस. बाकी आहेत. व गोळे वगैरेची मोजदाद करुन दिल्हीच नाहीं.[८९]

### ५.१.१२ लष्करातील जनावरास चाऱ्याची सोय:

होळकर शासकाच्या लष्करातील बैल घोडे व हत्तीच्या चाऱ्याची वेळीच सोय केली जात होती. हे अहिल्याबाईंनी चितो नारायण कमाविसदार चांदवड यांना २९ नोव्हेंबर १७७४ रोजी पाठविलेल्या पत्रावरून दिसून येते. ते असे देशी चंदी वगैरे गल्ला लागेल याजकरिता तूर्त देशी गल्ला सवंग आहे. तरी सरकार निरख चौकशी करुन हंगामशिर घेणें. हरभरे रु.

२००० व बाजरी ३००० व गहू १००० ऐकूण ६००० तुम्हांकडून देखिले असें. सदर्हू रुपये प्रगणेमजकुरचे हिशेबी मुजरा दिले जातील.[९०]

मातोश्री अहिल्याबाई होळकर यांनी सरकार बिजागड येथील त्रिंबक बाबुराव कमाविसदारयांस १० मार्च १७७५ रोजी पत्र पाठवून वैरणीची व्यवस्था करण्यासाठी कळविलेले होते. ते असे सरकारात गवत आणायकरिता गाडे आणविले होते. त्यासी श्रीमंतांची स्वारी महेश्वर अकबरपूर येथील मार्गे गेली. त्यासमयी घमघुमीमुळें किरसानापासून दो गाडियाचे बैल सर ८ नेले ते बैल सरकारांतून किरसानास द्यावेसे झाले. त्यावरुन बैल सर ८ दर ८ प्रमाणे एकूण रुपये ६४ चौसष्ट तुम्हांकडून दखिले असे.[९१] या दोन्ही पत्रावरून असे स्पष्ट होते की, होळकरशासक हे आपल्या लष्करातील सैन्यासोबत विविध प्रकारच्या जनावरांच्या वैरणीचीही तेवढीच काळजी घेतली जात होती. त्यामुळेच होळकरांना लष्करी मोहिमा फत्ते करण्यात फार मोठे यश मिळत होते.

**५.१.१३ पागा किंवा पथके:**

होळकर कुटूंबातील नातेवाईक भारमलदादा, संताजी होळकर, महादजी शिंदे, हरकुबाई व रखमाबाई फणसे यांच्याकडे स्वत:च्या स्वतंत्र पागा पथके होती. त्याचा उपयोग होळकरांच्या विविध युद्ध मोहिमात उपयोगी पडत होता. व ते पथके युद्ध मोहिमात आघाडीवर असत. तर कधी एखादी बाजू सावरण्यात ते यशस्वीही होत असत. १ फेब्रुवारी १७७५ रोजी कमाविसदार निंबाहेडा यांस अहिल्याबाईकडून पत्र तुह्मी आपल्याकडील जमियत व गिते मशारनिल्हे व सरकारांतील पागा पाठविल्या आहेत. त्या एकत्र करुन रांगडयांचे पारपत्य उत्तम प्रकारे करुन सिंगेश्वर गढी वगैरे गढ्या घ्यावयाच्या त्या घेऊन बंदोबस्त यथास्थित करणे.[९२] यापत्रावरून पागे ही होळकर शासकांच्या लष्करी मोहिमेस मोठा हातभार लावून विजय मिळवून देत असत

मराठा सैन्यात काही मंडळी स्वत:ची स्वतंत्र पागा किंवा पथके तयार करुन त्यास लागणारे शस्त्रे वा घोडे यांचा ताफा तयार करुन काही ठराविक काळासाठी वा युद्ध मोहिमासाठी पाठविण्याचा ठराविक मोबदला घेऊन व्यवसाय करीत होते. एखादया सधन व्यक्तीने पदारचा पैसा खर्च करून घोडे खरेदी करावेत व बारगीर नोकरीस ठेवावे. दर वर्षाला लढाया मुलुखगिऱ्या असतच. सरकारकडून पागेच मालकाला मोहिमेत सहभागी होण्यासाठी बोलावले जाई. तेव्हा हे मालक कुणीतरी नातेवाईकाला किंवा विश्वासू व्यक्तीला पागा देऊन पाठवित व सरकारकडून स्वारांच्या संख्येप्रमाणे पैसे घेत. स्वारांवर थोडा खर्च करून बाकी खिशात टाकत असत.[९३]

होळकरांच्या राज्यात अशा स्वतंत्र पागा मुलूखगिरी गाजविण्यासाठी त्यांच्या मालकांशी ठराव वा करार करुन त्यांना युद्ध मोहिमात सहभागी करुन घेतले जात होते. त्यांची संख्या इ.स. १७७६ मध्ये पुढीलप्रमाणे होती.

| पागे | लोकावळी |
|---|---|
| १ राघो रणछोड | १ रणछोड होळकर |
| २ तान्हाजी दिघे | २ भारमल होळकर |
| ३ तुलाजी शिंदे | ३ नवलाजी होळकर |
| ४ रामसिंग | ४ सटवाजी होळकर |
| ५ सजनाजी भगोरे | ५ येसूजी होळकर |
| ६ नथोजी कारले | ६ भवानी होळकर |
| ७ अंबोजी रायेले | ७ निंबाजी होळकर |
| ८ कालू सराफ | ८ तुकोजी होळकर |
| ९ रामाजी अघाडे | ९ खुशाल होळकर |
| १० रोडाजी होळकर | १० भिकाजी होळकर |
| | ११ धनसिंग होळकर |
| | १२ दुधबक्ष होळकर.[९४] |

**५.१.१४ सेनापतीचे कार्य:**

होळकर राज्यातील सेनापतीस सैन्याविषयाची सर्व व्यवस्था पाहण्याचे कामे करावी लागत होती. अंतर्गत शांतता प्रस्थापित करणे व अंतर्गत विरोधी शक्तीना पायबंद घालण्यासाठी ठिकठिकाणी छावण्या उभारणे, दारूगोळा काढण्याचे व शस्त्र तयार करण्याचे तसेच त्याची कारखाने काढण्यास प्रोत्साहन देणे, सैन्यास आळशी बनू न देणे अशी अनेक कामे सेनाप्रमुख म्हणून पार पाडावी लागत होती.

**५.१.१५ पोलीस प्रशासन:**

होळकर राज्यात सुभेदार होळकरांनी जी पोलीस यंत्रणा मराठ्यांच्या पद्धतीसारखीच होती. पोलीस हे इन्दौर व इतर शहरात कायदा व सुव्यवस्थेचे काम पाहत असत. नगर पोलीस व देहाती पोलीस असे पोलीस यंत्रणेचे भाग पडत होते. शिवाय परगण्यामध्ये कमावसदार हा कायदा व सुव्यवस्थेचे काम पाहत असे. तर गावात चौकीदार हा पोलीस व्यवस्थेचा प्रमुख म्हणून कार्य करीत होता.

**५.१.१६ डाक व्यवस्था:**

अहिल्याबाईच्या अगोदर पासूनच टपाल व्यवस्था कार्यरत होती. पण पत्रे खलीते हारविणे, त्याची पळवा पळवी होणे, दिरंगाई होणे. गुप्त बातम्या उघडकीस येणे इत्यादी प्रकार घडत असे. या कामात इंग्रजासारखे लोक फार हुशार होते. यामुळे राज्यकारभाराचे व लोकांचे फार नुकसान व्हायचे. महाराणी याची दखल घेऊन महेश्वरी ते पुणे टपाल आखणी करून त्यातला विसकळीतपणा काढून टाकला. वीस टप्याची फैरी ४—५ दिवसात पूर्ण होई. इतर ही व्यवस्था योग्या असल्यामूळे देशभरातून अहिल्याबाईना संदेश मिळत असत. त्यामुळे

अहिल्याबाईची संदेश वहन व्यवस्था इतरापेक्षा सरस होती.पुणे महेश्वर ही टपाल व्यवस्था सुरु केली. त्यासाठी पदमसी नेनसी यांच्यामार्फत वीस मुक्कामांची ही डाक चालु ठेवण्यासाठी त्यांनी एकूण वीस कासीद जोड्यानेमल्या होत्या.

टपालाची वाहतुक करणाऱ्या मंडळींसाठी ऐतिहासीक कागदपत्रांमध्ये जासुद, कासिद, हरकरा, राउत, सांडणीस्वार, महालदार, खासबरदार, ढालाईत, नाईक, फडनाईक, वार्ताहर, खिजमतगार, दूत, मुजरद, बारीदार अशा अनेक नावांनी त्यांची ओळख होती. त्यांचे प्रमुख काम टपाल पोहचविणे हे होते. टपाल पोहचविण्याचे काम करणाऱ्यांचे जथ्थे म्हणजेच गट असत. अशा जथ्थांच्या प्रमुखांना जथ्थेदार म्हटले जाई. विशिष्ट ठिकाणी विशिष्ट मोबदल्यावर पत्रे पोहच करण्याचा करार करणाऱ्यांस अजुरदार म्हणत.[९५]

जथ्थेदार किंवा अजुरदारांशी करार करुन त्यांना टपाल वाहतुकीचे काम सोपविले जात होते. खाजगी लोक, सावकार, सरकार यांची टपाल वाहतुकीची कामे नैमित्तीक, हंगामी किंवा नियमित स्वरुपात असे जथ्थेदार, अजुरदार जासुद, कासिद यांचा स्वतंत्ररीत्याही टपाल वाहतुकीचा व्यवसाय करीत होते.

करारी किंवा वायदेवाले, इनामी असे त्यांचे प्रकार सैन्यामध्ये जासुद, कासिद, हरकारे वगैरेचे खास नेमणूक केली जात होती. पत्र व्यवहार थैलीतून केला जाई. त्यास लखोटा म्हणण्याचा प्रघात मराठा राज्यात होता. कासिद पायी मार्गक्रमण करीत असत. लांब पल्ल्याचे टपाल पोहचविण्याठी घोडे, उंट यांचा वापर केला जाई. होळकरांनी सुरु केलेली महेश्वर ते पुणे ही नियमित डाक सेवा खानदेशच्या दृष्टीने महत्वाची होती. तसेच उत्तर भारतातील बातम्या आणि पत्रव्यवहार पुण्यापर्यत चालु राहण्यात होळकरांच्या डाक व्यवस्थेचा खूपच मोठा वाटा होता. उत्तरेकडे मोहिमांवर असणाऱ्या सरदारांचे पत्रव्यवहार लष्करातून महेश्वर पर्यत पोहचते केले जात असत. आणि तेथून पुणे दरबारात किंवा इतरत्र ही पत्रे व माहिती पाठविली जाई. होळकर, शिंदे, पवार, राजपूत राजे, उत्तरेतील अन्य महत्वाच्या व्यक्ती यांच्याकडील बातम्या,पत्र व्यवहार आणि महत्वपूर्ण घडामोडींचे आशय महेश्वर दरबारातील बातमीदारांनी पेशव्यांना वेळोवेळी कळविले जाई. उत्तरेमध्ये रवाना करायची पत्रे महराष्ट्रातून महेश्वरपर्यत पोहचती केली जात व तेथून संबंधीताकडे पाठविण्यात येत असत.

मल्हारराव व तुकोजी हे सातत्याने युद्ध मोहिमांवर दूरवरच्या प्रदेशात फिरत असल्याने होळकरांच्या लष्करापासून ते महेश्वरपर्यत डाक बसविली जाई. होळकरांचे वकील विविध ठिकाणच्या राज्यकर्त्याच्या दरबारात होते. तसेच इतरांचेही वकिल होळकर दरबारात होते. त्यामुळे नागपूर, हैद्राबाद, जयपूर, उदपूर, आयोध्या, ग्वाल्हेर, लखनौ, कोटा, प्रतापगड अशा महत्वाच्या ठिकाणांपासून महेश्वर पर्यत पत्रव्यवहाराची सातत्याने आदान प्रदान चालू असे.

महेश्वर ते पुणे या नियमित डाक व्यवस्थेमध्ये प्रारंभी पाच कोसाच्या अंतरावर एक कासिद जोडी ठेवलेली होती. इ.स.१७९२ मध्ये या मार्गावरील डाकेची माहिती खालील प्रमाणे मिळते.

| | |
|---|---|
| ४० महेश्वर पासून थाळनेरी पर्यंत कोस<br>४० थाळनेरहून चांदवड पर्यंत कोस | ३० चांदवडहून संगमनेरपर्यंत कोस<br>४२ संगमनेरहून पुण्यापर्यंत कोस |
| १५२ यांसी कासिद जोड्या पांच कोसांवर जोडी १ प्रमाणे जोड्या ३४ यांस दरमहा रुपये<br>२४० डाक चौकीच्या जोड्या ३० असाम्या ६० दर ४ प्रमाणे रुपये.<br>४८ सरबराईच्या जोड्या ४ असाम्या ८ दर ६ प्रमाणे [९६]<br>———<br>२८८ | |

पुणे ते महेश्वर दरम्यानचे अंतर थाळनेर—चांदवड—संगमनेर मार्गे १५२ कोसांचे होते. डाक पोहचविण्यासाठी या मार्गावर ३४ कासिद जोड्या म्हणजेच ६८ माणसे कार्यरत होती. या व्यवस्थेवर होळकरांचा दरमहा २८८ रुपये खर्च होत होता. 'यादी डाकेच्या चौक्या महेश्वरपासून पुण्यापर्यत दहा कोसांचे टप्प्याने मार्फत पद्मसी राजसी सावकार गुजारत भगवान कासिद नथे मानधाता मिरधा सन १२०२ शके १७१५ कासिद जोड्या सुमारी २० दरमहा मक्ता यणे प्रमाणे.

| | |
|---|---|
| १ नावडा तावडीस जोडी १ | १ बलकवाडा जोडी १ |
| १ नागलवाडी जोडी १ | १ थोवरगड जोडी १ |
| १ सांगवीस जोडी १ | १ थाळनेरास जोडी १ |
| १ कापडणे जोडी १ | १ ललींग जोडी १ |
| १ टोकेस जोडी १ | १ मालेगाव जोडी १ |
| १ दहिगाव जोडी १ | १ पाटोदे जोडी १ |
| १ शेरास जोडी १ | १ संगमनेरास जोडी १ |
| १ आंबे धारगांव जोडी १ | १ आळे जोडी १ |
| १ लोणी जोडी १ | १ भीमचे काठी जोडी १ |
| १ पुणे जोडी १ | १ सरबरा जोडी १ |
| .......<br>**१०** | .......<br>**१०** |

या वीस जोड्यादरमहा रोजमुरा भत्ता रूपये दोनशें चार दरमहाचे दरमहा दिला जात असे. तसेच पुणे महेश्वर हे अंतर साडे पाच दिवसात पूर्ण करून डाक पोच केला जात होता. [९७]

होळकरांप्रमाणेच पुण्याचे पेशवे व अन्य मराठा सरदारांनेही डाक व्यवस्था सुरू केलेली होती. तसेच ठिकठिकाणी त्यांच्या कासिद जोड्या ठेवलेल्या असत. महेश्वर ते पुणे ही होळकरांची नियमित डाक सेवा असली तरी पेशव्यांच्या मार्फत स्वतंत्र कासिद जोड्या ठेवून

पत्रव्यवहार सतत होत राहील याची दक्षता घेतली जात होती. महेश्वर दरबारात पेशव्यांच्या वतीने असणाऱ्या विठठल शामराज आणि केसो भिकाजी दातार यांच्या दिमतीला अशा काशिद जोड्यापेशव्यांनी ठेवल्या होत्या.

इ.स. १७५३—५४ मध्ये दिल्ली येथील बापूजी महादेवकडे पेशव्यांनी पत्रे घेऊन पाठविलेल्या कासिदास तो सोळाव्या दिवशी दिल्लीस पोहचल्यास ५० रुपये, सतराव्या दिवशी पोहचल्यास ४० रुपये अठराव्या दिवशी ३० रुपये आणि त्यानंतर पोहचल्यास काहीही देऊ नये असा स्पष्ट उल्लेख केला होता.[९८]

दिल्लीपर्यतचे अंतर पूर्ण करण्यास १६ ते १७ दिवसाचा कालावधी अजुरदारांना दिला. महेश्वर ते दिल्ली हे आंतर कासिदांनी १३ दिवसात पार करुन दिल्लीस पोहचावे अशी साधारण अपेक्षा असे. प्रती दिवसासाठी ३ रुपये हा जासुदांचा उच्च मोबदला होता. महेश्वर ते पुणे या दरम्यान पत्रे सहा दिवसाच्या आंत पोच केले जाई. म्हणजेच पत्र वाहतुक शक्य तेवढया जलद गतीने होईल. याची काळजी पुण्याहून पेशवे सरकारची पत्रे कुकरमुंडे येथील कमाविसदार नारो हरी याच्यापर्यंत पाठविलेली होती. त्याने ती पुढे तुकोजी होळकर यांच्या लष्करात डाकेबरोबररवाना केली. रखमाबाई होळकर यांच्याकडून पाठविलेली होती. पत्रे घेऊनतेथील जासुद लष्कराकडे रवाना झाले होते आणि काही दिवसांपुर्वीच डाकही उठली होती. त्यामुळे नारो हरीची मोठी पंचाईत झाली होती.

पुण्याहून लखोटे आले ते जलद गेले पाहिजे. येथे तो एकही जासुद नाही. तरी जासुदा बरोबर एक माणुस घेऊन कासिद आपले दस्तक घेऊनगेले. त्याज पावेतो पाठवावे अथवा ते नच अटोपले तरी थेट लष्कर पावेतो दयावे. सरकारचे नाजुक काम आहे.

रखमाबाई होळकर यांनी दुसरा जासुद पाठवून यापूर्वी मार्गस्थ झालेल्या जासुदापर्यंत ही पत्रे पाठविली जात होती. तर पुढच्या व मागच्याच्या जासूदाची भेट होऊ शकली नाही. तर त्यांनी लष्करापर्यंत जाऊन पत्रे दयावी लागत होती. अशा प्रकारची विनंती नारो हरी यांनी केलेली होती. तसेच अहिल्याबाईनी मोहिमेवर असणाऱ्या तुकोजी होळकरांस दररोज एक पत्र याप्रमाणे डाकेत पत्र लिहून दयावे अशी सक्त ताकीद त्यांनी आपल्या कारभाऱ्यांना दिलेली होती.म्हणजेच लष्करापासून थेट महेश्वरपर्यत दैनंदिन टपाल व्यवस्था चालत होती. यशवंतराव होळकर यांना दादो मैराळ यांनी पुण्याहून अनुरदारामार्फत पत्र पाठविलेले होते. अशा प्रकारचे कार्य करणाऱ्या अजूरदारास १५ रूपये देण्याचे स्पष्ट केलेले होते. तसेच कासिद,जासुदांना डोंगर, नदया, जंगले यातून प्रवास करावा लागत असल्याने शत्रू, चोर, लूटारु, यांच्याकडून त्रास होणार नाही याची खबरदारी सरकार घेत असे. तरीही काही संकट आल्यास किंवा कासिद आजारी पडल्यास एकाची दुसऱ्याला मदत व्हावी. एखादा जासूद शत्रूच्या हाती सापडल्यास निदान दुसरा तरी जासूद हा शेवटपर्यत पोहचवावा या उद्देशाने जासुदांची जोडी असे. जासुदांच्या राहण्याची सोय करण्याची आणि नदी, नाले, जंगल पार करुन देण्याची

जबाबदारी गावच्या पाटलांवर व इतर स्थानिक अधिकाऱ्यांवर होती. सरकारकडून कासिदांना काय सुविधा पुरविल्या जात होत्या हे समजण्यासाठी विठ्ठल शामराज याने महेश्वरहून पुण्यास ८ जून १७८३ रोजी पाठविलेल्या पत्रावरून स्पष्ट होते.

कासीद जोड्या ये प्रांती यांच्या तालुक्यांत जागां जागां आहेत. त्या गावोगांव कासीद जोडयांस दोघांस दळण व लाकुडफाटे व रातबिरात माणूस रहादारीस द्यावे, हा दस्तूर कोठही आहे. चालतच आहे. येथेही देववितांत, परंतु हा देश मवास,जांगा जागां भिल्लांची वस्ती,यामुळे दळाई व लांकडाचे रातबिरातच्या माणसांचे नित्य बोभाट येतात. यांसी कटकट येथे आले की, ज्या गावी जोडी आहे त्या गाववाल्यांस ताकिद करवून,छपर अगर आसरा पाहिजे. यास्तव कासीद येथे आले की,ज्या गावी जोडी आहे त्या गाववाल्यांस ताकिद करवून,छपर अगर असरा काही करुन द्यावे म्हणून कळविण्यात आले.[१०६]

त्यानुसार मातोश्री अहिल्याबाईकडे जाऊन विनंती केली जे,''हा पर्जन्यकाळ आहे. कासिदांस, गांववाल्यांस ताकीद करुन एक एक छपर करुन देवावे. इतके दिवस उन्हाळा होता. कशीही गुजराण केली.आतां आसरा पाहिजे. वास्तव एक एक छपर करुन देवावे आणि दुकानांत राहु देत नाहीत. कोठे चावडी देऊळ तेथे उतारकऱ्यांचा उपद्रवनिखालस असले म्हणजे बरे. म्हणून बोललो.ते रागे भरली, ''कोठवर उपद्रव सोसावे?वरसोंवरीस यांची डांक बसली तर आम्ही कोठवर यांस काय द्यावे? साफ आमच्याने देववत नाही. तुम्ही आपल्या धन्यास लिहून पाठवा.''[९९] मी उत्तर केले,''हा धाकटा बोभाट धन्यास काय लिहावा? आपण धनीच येथे आहेत. उभयपक्षी आम्ही चाकर पेशव्यांच्या कासिदांना सुविधा पुरविण्यास आहिल्याबाई तयार नाहीत असा आशव व्यक्त झाला असला तरी त्यानी इतरांच्या डाक यंत्रणे संदर्भात ही भुमिका घेतली होती. स्वत:च्या कासिदांची मात्र होळकरांकडून योग्य काळजी घेतली जात असल्याचा आणि पेशव्यांनी अहिल्याबाईसपत्र पाठविल्यास त्यांच्याकडून पेशव्यांच्या कासिदांचीही काळजी घेतली. सरकारांतून डांकेविषयी पत्र गंगाजलनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांस आले. त्यांत डाकेच्या कासदास पाणी व दोन दोन शेरदळून रातबिरात वाटाडया देत जाणे म्हणोन. त्यावरुन पत्र सरकारचे दिल्हे. पत्र ऐकून, डांकेचे प्रयोजन काय? कोठवर बेगारी गाववाल्यांनी कराव्या? चार डांका बसल्या, या डाकेचे कारण काय? जागा मात्र देऊ वरकड सरपण,पाणी व दळण देत नाही! साफ उत्तर दिले. जाबसाल रीतीभातीने केला असतानांही न ऐकत कारकून व फडनाईकासही बोलल्याप्रमाणे देईन अधिक देत नाही, अशी बोलली.उपरांत त्यास बिदा केले. मग कारभारी यांस सांगितले, हे रीत काय? तुम्ही प्रसंगी असोन सरकारचे आज्ञेस उजुर हे काय? आम्ही बाईशी बोलावे तर ऐकत नाही,आणि तुम्हीही बोलत नाहीत! पत्र माघारे जाईल, मग आम्हांकडे दोष नाही. असे बाजीजवळ व गोविंद रघुनाथ जवळ सांगितले त्यांच्याने निक्षून सांगवेना. मग हरकुबाई होळकर यांस वर्तमान सांगितले त्यांनी निषेध केल. हे चांगले नाही. मग सराकारचे दस्तकाप्रमाणे त्यांचे

तालुक्यांत गांवनगांव डांक आहेत तेथील कमाविसदारांस पत्रे घेऊन मागाहून सरकारचे कारकुनाकडे रवाना केली. ते उज्जनीस गेले डांकेच्या बंदोबस्त जाला. आहिल्याबाईनी पेशव्यांच्या कासिदांना सुविधा देण्यास नकार दर्शविल्याचे स्पष्ट होते. नकाराचे प्रमुख कारण असे की,या मार्गावर सध्या चार डंका बसलेल्या असताना, या डाकेची गरज नसतानाही पेशव्यांनी ही पाचवी डाक सुरु केली होती. आम्हाला व आमच्या गावकऱ्यांना सरकारचा हा नाहक त्रास कशासाठी? अशी अहिल्याबाईची भूमिका दिसते. तरीही हरकुबाईच्या मध्यस्थीमुळे अहिल्याबाईनी पेशव्यांच्या डाकेचा बंदोबस्त केला होता.

### ५.२ परगणा लष्करी प्रशासन:

परगणा पातळीवर लष्करी प्रशासन कमविसदार यांच्या अखत्यारीतील अधिकाऱ्याकडे जबावदारी होती. होळकर राज्यामध्ये परगण्याची सर्व संरक्षण व्यवस्था पाहण्याची जबाबदारी ही कमाविसदाराकडे सोपविलेली होती. त्यांच्या मदतीसाठी परगणा स्तरावर इतर मामलतदार, कानुनगो, मंडलोई, देशमुख, देशपांडे यासारखे अधिकारी कार्यरत होते. होळकरांच्या परगण्याचा मुख्य अधिकारी हा कमाविसदार होता. तो पूर्णत: होळकर शासकास जबाबदार असे. तसेच वेळोप्रसंगानुसार या कमाविसदारांना पेशवे ही आदेश देत असत. त्यानुसार ही त्यांना आदेशाची अंमलबजावणी करून होळकर शासकास यापुर्वीच कल्पना दिली जात होती.

प्रत्येक कमाविसदाराकडे परगण्याची संरक्षण करण्याची जबाबदारी होती. परगणा पातळीवरील अधिकारी मामलतदार कानुनगो, मंडलोई, देशमुख व देशपांडे हे संरक्षणाचे कार्य पार पाडीत असत. त्यासाठी परगण्याच्या सुरक्षिततेसाठी कमाविसदारांना पोलीस म्हणजे शिंबदी ठेवण्याचा अधिकार होता. त्यामध्ये काही घोडेस्वार व पायदळ अशा दोन प्रकारचे पोलीस होते. कमाविसदारांस होळकर व पेशवे शासकाच्या आदेशाच्या अधिन राहून परगण्याची संरक्षण व्यवस्था पहावी लागत होती. त्यासाठी शिबंदी तैनात केलेली असे त्यात घोडेस्वार व प्यादे अथवा पायदळ असे भाग केले जात होते. साधारणत: एका ठाण्यात १०० स्वार व १०० प्यादे असे मिळून २०० व्यक्तींचे शिबंदी दल मराठा राजवटीत ठेवले जात होते. स्वारास वार्षिक १५० रुपये तर प्याद्यांना त्यापेक्षा कमी वेतन दिले जात असे.[१००] पण सर्वच ठिकाणच्या पोलीस दलामध्ये घोडदळ व पायदळ यांची संख्या व त्यांना दिला जाणारा पगार यात थोडाफार प्रमाणात फरक होता. या पोलीसांना दिला जाणारा पगार हा त्या परगण्यातून वसूल होणारा महसूल यातून केला जात होता. प्रसंगानुसार पोलीसांची संख्या वाढविता येत असे. व कार्याचा भार कमी होताच ते कमीही केले जात होते. यासाठी सरकारची परवानगी घ्यावी लागत असे. या वाढलेल्या पोलीसांचा खर्च हा त्या त्या गावातून वा प्रदेशातून वसूल केला जात असे. होळकर राज्यात मोठ्या प्रमाणात असे वाढीव पोलीस दल नेहमी ठेवावे लागत होते. कारण या प्रदेशात मोठ्याप्रमाणात भिल्लांचा उपद्रव होत होता. या कारणामुळे वसूल केला जाणारा कर हा 'भिल्लभट्टी' या नावाने ओळखला जात होता. मल्हारराव

होळकर यांच्या निधनानंतर होळकर राज्य गिळकृत करण्याच्या उद्देशाने राघोबादादा नंदूरबार प्रदेशावर चालून आले होते. तेंव्हा संरक्षणासाठी वाढीव पोलीस दल उभारावे लागले होते. तेंव्हा त्या वाढत्या पोलीसांचा खर्च हा तेथील प्रदेशातून वसूल करुन भागवावा असे मातोश्री अहिल्याबाईनी २४ ऑगस्ट १७७६ ला नंदूरबारच्या कानुनगोस पत्र लिहिले होते की, परगणे नंदुरबार येथील श्रीमंताचे वगैरे फौजेच्या दंग्यामुळे शिबंदी खर्च लागला. त्याची पटी परगणे मजकुरी करुन खर्च परभारे करणे.[१०७] याशिवाय मातोश्रीनी कमाविसदार नानाजी भास्कर यास ही पत्र पाठवून सदर खर्चाची 'पट्टी वाणी, महाजन, जमीनदार यांच्यावर बसविण्याचे सादर केलेले होते.'

होळकर राज्यात अंतर्गत परिस्थितीचा अंदाज घेऊन तशा प्रकराचा गोंधळ, गुन्हे वा दंगे उदभवल्यास सुभेदार, कमाविसदार व मामलतदारांना मदतीसाठी सरकारी सैन्य बंदोबस्तासाठी पाठविले जात होते. यासाठी स्थानिक स्तरावरचा अधिकारी वा वतनदार मामलतदारांना, मालमतदार कमाविसदारांना, कमाविसदार सुभेदारांना व सुभेदार सरकारला तशी मदत मागून त्याचा बंदोबस्त केला जात होता. यावरुन असे स्पष्ट होते. तसेच अशा येणाऱ्या सरकारी सैन्यास मदत करण्यासाठी परगण्याचा कमाविसदार पुढे येत असे. इ.स. १७६४ मध्ये जगजीवनराव पवार व जीवनराव केशव या दोघांनी खानदेशात मोठा धुमाकूळ घातल्याने त्यांच्या बंदोबस्तासाठी सुभेदारांनी पेशव्यास कळविले होते. तेंव्हा पेशव्यानी अंबादास बल्लाळ यास सैन्य देऊन रवाना केले होते. त्यावेळी सुभेदार नारो कृष्णने पेशव्यास पत्र पाठवून कळविले होते की, आपल्या आज्ञे प्रमाणे मी खानदेशातील विविध कमाविसदारांना पत्रे पाठवून सर्वानी अंबादास बल्लाळ यांस सहकार्य करावे म्हणून कळविले आहे.[१०८] म्हणजेच बंदोबस्तासाठी आलेल्या सैन्याचा त्रास आपल्या परगण्यातील रयतेस होऊ नये. यासाठी ते अगोदरच काळजी घेत असत. त्यानुसार परगणे चाळीसगावचा अधिकारी निळकंठ महादेव अंबादास बल्लाळ यांना पत्र पाठवून अगोदरच दक्षता घेतली गेली होती. तसेच फौजेकडून चाळीसगाव परगण्यास उपद्रव लागू न देण्याची विनंती ही केलेली होती. यावरुन असे स्पष्ट होते की, होळकर राज्यात वा आपल्या प्रदेशातील कोणत्याही भागात सैन्याचा रयतेच्या मालमत्तेवर संकट येऊ नये. यासाठी अगोदरच पत्र पाठवून विनंती केली जात होती.

मालेराव होळकर यांनी १ एप्रिल १७६५ रोजी परगणे सुलतानपूरच्या कमाविसदार बाबाजी प्रल्हाद यांस पत्र पाठवून कळविले होते की, खानदेशप्रांती मोंगलाईतून फौज उतरावी म्हणोन कळलें...प्रगणेमजकुर वसूल तो तुह्मी घेतलाच असेल. आणखीही ताकीद करून ऐवज वसूलांत येतें करावें... बारूद शिशे प्रगणेमजकुरी नाही त्यास दारू व शिशे रू. १००० तुह्माकडून खरेदी करविली असे. तरी सदर्हु दारू व शिशें एक हजारांचे सामान पोक्त करून ठेवणें फौज आलियावर पायर उत्तम प्रकारें करून लक्ष राखणे.[१०९] म्हणजेच होळकर राजे आपल्या कमाविसदारांना रयतेच्या मालमत्तेचे नुकसान होऊ नये तसेच पुढील युद्धाची तयारी

करण्यासाठी जय्यत तयारी करण्यासाठी अगोदरच खबरदारी घेतली जात होती असे यावरून स्पष्ट होते.

व्यंकटराम शास्त्री यांनी परगणे कसरावद, धरणगाव व माळव्यातील मंडलेश्वर या प्रदेशातील गोसावी, भिल्ल व बजाजी मतकर यांचा उपद्रव मोठ्या प्रमाणात होत होता. तेंव्हा त्या प्रदेशाच्या संरक्षणाची सोडवणूक करण्यासाठी पेशव्यास पत्र पाठवून सविस्तर वृत्तांत कळविलेला होता. तेंव्हा पेशव्यांनी व्यंकटराम शास्त्री यांना त्यांचा बंदोबस्त करावा त्यासाठी लागणारा खर्च व शिंबदी वाढवून देण्याची सनद पाठवून दिलेली होती. ती अशी की दहा हजार, वीस हजार, पंचवीस हजार रुपये पर्यत शिबंदीस एकसाल खर्च करुन, शिबंदी ठेवून गोसावी व भिल्ल व मतकर यांचे परिपत्य उत्तम प्रकारे करुन सरकार लक्ष करुन राहणे. मतकराचे महालपैकी सदरहु पंचवीस हजार रुपये उगवणी करुन सरकारांत घ्यावी. परंतु शिबंदी ठेवून पारपत्य उत्तम प्रकारे करावे. शिबंदीच्या अखत्यार तुम्हांवरच आहे.[११०]

तसेच चिमणराव देशमुखाने सावदाणे, मुल्हेर व डांग मधील परिसरात इ.स. १७७४—७५ मध्ये त्रास देऊ लागला. तेंव्हा गोविंद हरी या स्थानिक अधिकाऱ्याने नारोपंत नानाकडे पत्र पाठवून होणाऱ्या अन्यायासाठी मुकाबला करण्यासाठी राऊत पाठवावेत असे कळविले हेते. तसेच होळकर राज्यातील विविध परगण्यांच्या अधिकाऱ्यांना भिल्ल पेंढारी व इतर काही उपद्रवी सरदाराकडून होणारा त्रास वा उपद्रव कमी करण्यासाठी किंवा त्यांचे उच्चाटन करण्यासाठी व त्या प्रदेशातील रयतेचे संरक्षण करण्यासाठी अतिरिक्त शिंबदी सरकारकडे वाढवून देण्याची मागणी पत्र येत होती. त्यांना यांच्या उपाय योजनासाठी वाढीव पथकांची, पागेची, राऊतची मागणी करणारे पत्र येत होती.

इ.स. १७६९—७० या काळात परगणे सुलतापूर येथील कुकरमुंडे या भागात भिल्ल जमातीच्या लोकांनी काही गावे जाळून खाक केली, त्यामुळे त्या परिसरात हाहाकार माजला. तेंव्हा कृष्णाजी विश्वनाथ या कामाविसदाराने त्या भिल्ल गुन्हेगारांच्या बायका मुलांना अटकेत ठेवावे. म्हणून पेशव्याने सुलतानपूरचा कमाविसदार धोंडो बल्लाळ, नंदुरबारचा कमाविसदार माधवराव रघुनाथ आणि तोरखेडयाच्या माधवराव कदमबांडे यांना त्यांच्या कडील शिंबदीस्वारांचा या कामी उपयोग करावा म्हणून सुचविले होते.[१११] या सुचनेप्रमाणे त्या परगण्यात येणारे देशमुख, देशपांडे, कानुनगो, मंडलोई व वतनदार यांनीही आपापल्या स्तरावर खबरदारी घेऊन सहाय्य केले. तसेच इतर भागातील भिल्लांच्या होणाऱ्या त्रासासाठी वेळीच आळा घालण्यासाठी सरमंडलोई रामचंद्र भुसकुटे यांनी बिज्जागड हांडियाच्या प्रदेशात कठोर धोरण राबवून गुन्हेगारीस आळा घातला. सरकारी नियम न पाळणाऱ्या भिल्लांना खरगोण येथे आनून एका चबुतऱ्यावर शिरच्छेदाची शिक्षा दिली जात असे.[११२] अठराव्या शतकात सततच्या युध्द मोहिमा मोठ्याप्रमाणात हाती घेतल्या जात होत्या. त्या त्या वेळी सरदारांनी वा सुभेदारांनी आपल्या सैन्याच्या हालचालीचा रयतेस कोणताही त्रास होणार नाही. याची खबरदारी अगोदरच

घेतली जात होती. त्यासाठी एकमेकांना पत्र व्यवहार पाठवून उपायत्मक सुधारणा केल्या जात होत्या.

राज्यातील प्रवाशाच्या सुरक्षिततेसाठी होळकर राज्यात विशेष खबरदारी घेतली जात होती. रस्त्यातील धोकादायक डोंगर पर्वत घनदाट जंगल या ठिकाणी होणाऱ्या लूटमारीपासून संरक्षण देण्यासाठी रस्त्यात ठिकठिकाणी ठाणी, चौक्या व घाटची शिबंदी ठेवली जाई. त्यामुळे त्या वाटसरुचा वा प्रवाशांचा प्रवास सुखरुप होण्यास मदत होई. होळकर दरबारात प्रवाशांनी त्यांची रितसर नोंद करुन त्यास सरंक्षण दिले जाई. त्यासाठी दरबारातून खास पत्र पाठवून त्या त्या प्रदेशातील अधिकाऱ्यांना कळविले जात होते. शिवशंकरदास देसाई राहणार नंदूरबार यांच्या प्रवासाबाबत अधिकाऱ्यांना पत्र पाठवून दिलेले होते. त्यात '...सरकार राजश्री तुकोजी होळकर. .. शिवशंकरदास देसाई व कानुनगो पे नंदुरबार यात्रे समवेत श्री कासी यात्रेहुन पे मारी जातात. यास मार्गी कोणेविसी मुजहिम न होता मुक्कामी चौकी पाहारा देऊन नदीनाला उतरुन आपापली हद्‌दपार करणे जाणिजे.[११३] म्हणजेच होळकर राज्यात प्रवाशांचा सरकारी दरबारात होणाऱ्या प्रवासाची नोंद करणे अवश्यक होते. अशा प्रवाशांचा प्रवास त्या त्या प्रदेशातून जातांना तो स्थानिक अधिकारी सुरक्षिततेची दक्षता घेतली जात होती. त्यासाठी दराबारातून स्थानिक अधिकाऱ्यांना वेळोवेळी पत्र पाठविली जात होती.

### ५.३ ग्राम लष्करी प्रशासनः

ग्राम पातळीवर लष्करी प्रशासन व्यवस्थेत गावचा पाटील हाच प्रमुख असे. गावचे संरक्षण करण्याची जबाबदारी त्याच्या होती. बाहय आक्रमणाच्या वेळी कमाविसदाराकडून जास्तीची कुमक मागविली जात होती. म्हणजेच स्थानिक लष्करी प्रशासनासाठी संभाव्य शत्रूच्या धोक्यापासून संरक्षण करण्यासाठी जास्तीची कुमक मागवून घेवून गरज पूर्ण केली जात होती.

लष्करी प्रशासन हे राज्यरथाची महत्वपूर्ण अंगे जाणून होळकर शासकानी सैन्याच्या आधारे राज्यामध्ये शाश्वतमय आणण्याचा महत्वपूर्ण कार्य हे होळकर लष्करी प्रशासनाने केले. सैन्याच्या आधारेच बलाढय शत्रूवर मात करून मराठयाचे वर्चस्व हे सुभेदार मल्हारराव होळकर यांनी प्रस्थापित केले. लष्करी व्यवस्था हे केंद्रबिंदु जाणूनच लष्कराचे घोडदळ, पायदळ व तोफखाना असे मुख्य तीन विभाग पाडण्यात आलेले होते. होळकर शासक हे आपल्या लष्करातील सैन्यास नियमित वेतन व इतर सुविधा तात्काळ पुरविण्यात येत होत्या. लष्करी व्यवस्थापनेत कडक शिस्त व पुर्वनियोजन हे खास वैशिष्टे होळकर शासकाचे लष्करी प्रशासनात आढळून आले.

## संदर्भ सूची


१ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक १९९२, वर्ष २४वे , वर्ष २८वे पुस्तक९५, पृ.४१

२ कित्ता, पृ.४३

३ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१७

४ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४००

५ अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट, अहिल्या स्मारिका, अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट इंदौर व्दारा प्रकाशित वर्ष १९७७, पृ.३५

६ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१३६

७ कित्ता, पृ.१३६

८ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.८८

९ कित्ता, पृ.२०७

१० सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१४३

११ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४३२

१२ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१४३

१३ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत इतिहास संशेधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२०, लेख—१७, पृ.३२

१४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ. ले.९७—९८,

१५ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१०२

१६ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४३०

१७ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१४४

१८ सेंदाणे आसाराम, किल्ले कुकरमुंडे, हिंगणे प्रकाशक, खुर्द सिंहगड रोड पुणे, २००४, पृ. ८३.९८

१९ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने, भाग—१२, दांडेकर ब्रदर्स इंदूर, १९२४, पृ. २

२० कित्ता, पृ.२

२१ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.४४

२२ जोशी मो.रा., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२७, (तात्या जोगांच्या चरित्राची साधने), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९५२, पृ.१६६

२३ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.७८

२४ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.१०४—११०

२५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१७७—१७८

२६ डॉ. होळकर मधुसूदन राव, होलकरों का इतिहास, अखिल भारतीय होलकर महासंघ प्रकाशन दिल्ली, द्वितीय संस्करण, २०००, पृ.३१०

२७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.३८०—३२२

२८ कित्ता, पृ.३०३—३०५

२९ खरे वा. वा., (संपा.), ऐतिहासिक लेखसंग्रह, खंड—१४, भाऊनाना छापखाना प्रकाशन, कुरुंदवाड, मिरज, १९३०, पृ.७४

३० जोशी मो.रा., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२७, (तात्या जोगांच्या चरित्राची साधने), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९५२, पृ.१८९

३१ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.९१

३२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१४८—१४९

३३ केळकर य. न., होळकरांची कैफियत, संशोधन व टीपा सदाशिव लक्ष्मण कोकाटे, हनुमान प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ति, १९५४,प१.२१—२५

३४ फाळके आनंदराव भाऊ, शिंदेशाही इतिहासाची साधने, भाग—३ आलीजाह दरबार प्रेस लष्कर ग्वाल्हेर १९३७, पृ.९३

३५ सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तरातून निवडलेले कागदपत्रे, खंड—३६, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस मुंबई, १९३२, पृ.३०६—३५७

३६ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ.६७६

३७ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.१७८

३८ कित्ता, पृ. १७६—१७७

३९ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१३५

४० केळकर य. न., होळकरांची कैफियत, संशोधन व टीपा सदाशिव लक्ष्मण कोकाटे, हनुमान प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ति, १९५४, पृ.१९

४१ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—२ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९११, पृ.४०—४६

४२ ब्रिगेडिअर पित्रे का. ग., मराठ्यांचा युद्धेतिहास, (१६००—१८१८), कॉन्टिमेन्टल प्रकाशन, पुणे, २००४, पृ.२७०

४३ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४२९.

४४ कित्ता, पृ.४१९

४५ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत इतिहास संशेधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२०, पृ.४५.४६

४६ शास्त्री अवधूत, संपा., धर्मभास्कर, देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, पृ. १०९

४७ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०, पृ.१६

४८ नाडकर्णी सी. ल., होळकरांच्या राज्याचे सामान्य वर्णन, दामोदर सावळाराम आणि मं. मुंबई, १९१९ , पृ.११०

४९ ब्रिगेडिअर पित्रे का. ग., मराठ्यांचा युद्धेतिहास, (१६००—१८१८), कॉन्टिमेन्टल प्रकाशन, पुणे, २००४, पृ.२०५.

५० कित्ता, पृ.२५०

५१ कित्ता, पृ.३०९

५२ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.२७८

५३ शास्त्री अवधूत, संपा., धर्मभास्कर, देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, पृ. १५६

५४ पुरुषोत्तम दास, देवी श्री अहिल्याबाई यांचे सचित्र चरित्र, अनंत आत्माराम मोरमकर, १९१३, पृ.१३३

५५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ.१०

५६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ. १२७—२८

५७ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१३५

५८ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४१८

५९ डॉ. भावे श्री.मा., त्रैमासिक, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, १९१६—१७ ४०.४१

६० ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ. १६—१७

६१ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ.५२—५३

६२ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.९४

६३ कित्ता, अनुं. ३५८ पृ. १५२

६४ कित्ता, पृ.१४५—१४६

६५ कित्ता, पृ.२०९—२१०

६६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२१२

६७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.७३—७४

६८ कित्ता, पृ.१७७

६९ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.२१७

७० भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४१७

७१ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. ३५८ पृ. अक्र १७९ २०४

७२ शास्त्री अवधूत, संपा., धर्मभास्कर, देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, पृ. १५६

७३ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२१६.२१७

७४ कित्ता, अनं.४५, पृ. १८३

७५ केळकर य. न., होळकरांची कैफियत, संशोधन व टीपा सदाशिव लक्ष्मण कोकाटे, हनुमान प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ति, १९५४ ,पृ.५७

७६ नाडकर्णी सी. ल., होळकरांच्या राज्याचे सामान्य वर्णन, दामोदर सावळाराम आणि मं. मुंबई, १९१९, पृ.४५

७७ शास्त्री अवधूत, संपा., धर्मभास्कर, देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, पृ. १५५—१५६

७८ नाडकर्णी सी. ल., होळकरांच्या राज्याचे सामान्य वर्णन, दामोदर सावळाराम आणि मं. मुंबई, १९१९, पृ.४४—४५

७९ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, १२७—२८

८० ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ१३१—१३२

८१ कित्ता, अनु.२२०, पृ.१३२

८२ कित्ता, पृ.१३६

८३ कित्ता, पृ.२२६—२२७

८४ कित्ता, पृ.१५०

८५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६, पृ.१५—१६

८६ ब्रिगेडिअर पित्रे का. ग., मराठ्यांचा युद्धेतिहास, (१६००—१८१८), कॉन्टिमेन्टल प्रकाशन, पुणे, २००४, पृ.२५८

८७ सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१३२

८८ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५, पृ.४४—४५

८९ कित्ता, पृ.९७—९८

९० ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनु. ३५८ पृ. अनं.६४,१९४

९१ कित्ता, अनु.६९, पृ. १९६

९२ कित्ता, अनु.६८, पृ. १९६

९३ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४१६—४१७

९४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२०८

९५ कुलकर्णी एम. आर., नाना फडणीस आणि मराठी राज्यप्रशासन, पुणे, २००४, पृ.१०२

९६ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.३७६

९७ कित्ता, पृ.२४४

९८ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.४०८

९९ भागवत अनंत नारायण, भवानी शंकर बख्शी यांची रोजनिशी, खंड—५ वा, होळकर स्टेट प्रेस, इंदौर, १९२६, पृ.५

१०० सावंत बी. एस., जाधव व्ही.के., मराठयांचा प्रशासकीय, सामाजिक व अर्थिक इतिहास, विद्या प्रकाशन, नागपूर, २००२, पृ.१२१

१०१ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.१७

१०२ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई द्वारे प्रकाशित भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, अंक १९९२, वर्ष २४वे , वर्ष—२८वे, पुस्तक—११२ पृ.४३

१०३ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१३८

१०४ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, खंड—१, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, पुणे. लेख.३२५, पृ.२९८

१०५ कित्ता, पृ.३०२—३०३

१०६ अहिल्या स्मारिका, अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रस्ट इंदौर व्दारा प्रकाशित वर्ष १९७८, पृ.४६

१०७ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.३३

**प्रस्तावना:**

'माझे कार्य प्रजेला सुखी करणे आहे. माझ्या प्रत्येक कृतिला मी स्वत: जबाबदार आहे. सत्तेच्या अधिकारामुळे मी येथे जे जे कांही करित आहे. त्या प्रत्येक कृत्याचा जाब मला परमेश्वरापुढे देणे आहे. परमेश्वराने ज्या जबाबदाऱ्या माझ्यावर सोपविल्या आहेत. त्या जबाबदाऱ्या मला पार पाडायच्या आहेत.'[१] अशी प्रतिज्ञा होळकर शासकांनी आपल्या राजवाड्यासमोर लावली आहे. होळकरांच्या राज्यात कायद्याचे राज्य होते. म्हणून होळकराचे राज्य हे न्यायप्रिय शासकांचे राज्य म्हणून संपूर्ण हिंदुस्थान भर प्रसिद्ध होते. मराठ्यांच्या राज्यात नियमबद्ध न्यायालयाची मुहूर्तमेढ रोवल गेली. त्यानुसार मराठा सरदारांनी इ.स. १७८० पासून केला. सामान्य प्रजेला रास्त न्याय मिळावा म्हणून आपापल्या राज्यात ठिकठिकाणी न्यायालयाची स्थापना करून त्यातून अत्यंत साधे, सरळ सोपे व स्वस्त होते... ह्या कामात अहिल्याबाई होळकर ह्या अग्रेसर होत्या.[२] होळकरांची न्याय व्यवस्था ही तत्कालीन शिंदे गायकवाड, पवार, भोसल व पेशवे यासर्वांच्या न्यायव्यवस्थेपेक्षा निश्चितच लोकप्रिय होती. होळकर राज्यात अहिल्याबाईच्या नि:पक्षपातीपणाबद्दल, नि:स्पृहतेबद्दल व न्यायीपणाबद्दल त्यांची ऐवढी ख्याती होती. त्यांना अन्यायाबद्दल प्रचंड चीड होती. सर्वांना समान न्याय मिळाला पाहिजे अशी त्यांची धारणा होती. अन्याय करणारी व्यक्ती कितीही मोठी असली तरी, त्याला शिक्षा देताना कधीही कोणाचाही मुलाहिजा बाळगला नाही. मल्हारावांच्या शासन काळात न्यायव्यवस्था आणि पंचायतीस महत्व जास्त होते. मंडलोई घराण्यातील वाटणीस न्यायनिवाडा होय.

पुण्यश्लोक अहिल्यादेवी म्हणजे त्या काळातील सर्वोच्य न्यायालय होते.[३] तत्कालीन राजे, राजवाडे, सरदार, दरबारी व अधिकारी वर्गात तंटे उपस्थित झाल्यास उभयपक्षी लवाद म्हणून निकाल देण्याचे कार्य दोन्ही पक्ष मोठ्या आनंदाने व विश्वासाने अहिल्याबाईकडे सोपवित असत. म्हणूनच पुणे दरबारी देखील त्यांच्या शब्दाला अत्यंत मान होता. एवढेच नव्हे तर इतर राज्यातील अन्यायग्रस्त व्यक्तीही अहिल्याबाईकडे न्याय मागण्यासाठी येत असत. इतका विश्वास दोन्ही पक्षाकडील लोकांचा अहिल्याबाईवर होता.

मराठा सरदार होळकरांची न्याय व्यवस्था अतिशय कडक होती. अपराध्यास कडक शिक्षा दिली जात होती. आणि त्यांनी पुन्हा गुन्हेगारीकडे वळू नये याची खबरदारी सुध्दा त्या घेत असत. त्यांच्यासाठी उपजीविकेचे साधन उपलब्ध करून दिले जात होते. भिल्लांचा बंदोबस्त करताना त्यांना प्रवाश्याच्या लुटीपासून परावृत्त करून त्यांच्यासाठी पडीक जमीन लागवडीखाली आणण्यासाठी प्रोत्साहन दिले. तसेच त्यांच्याकडे प्रवाशांच्या सूरक्षित प्रवासाची जबाबदारी सोपवून त्यांच्याकडे संरक्षण दिले. व त्यातून मिळणाऱ्या करातून त्यांचा उदरनिर्वाह चालत होता. दरबारात न्याय मागण्यासाठी येणाऱ्याला होळकरांच्या न्यायावर पूर्ण विश्वास

होता. त्यांच्या न्यायाची कीर्ती पेशवे दरबारात असल्यामुळे पेशवे दरबारात निकाली न निघालेली भांडणे होळकरांच्या न्यायालयात निकाली निघाल्याची अनेक उदाहरणे आहेत.

न्यायाच्या बाबतीत होळकर शासक अतिशय कठोर होत्या. होळकर शासक हे सर्वसामान्य प्रजेच्या हितासाठी सतत सतर्क असायचे, सामान्यतला सामान्य माणूसही थेट भेटून न्याय मागत होते. आणि आपल्या समस्यांचे निराकरण करून घेत असे. होळकर राज्याकर्त्यांकडे इतर राज्यातून न्याय निवाडा करुन देण्याची पत्र इतर राज्याची येत होती. त्यात विशेष करुन माळवा, रजपूतानातील संस्थानिकांचा प्रामुख्याने भाऊ बंदकीचे झगडयांचा समावेश होत होता. रजपूतांची अनेक तंटे मिटविण्याचे कार्य सुभेदार मल्हारराव होळकर, मातोश्री अहिल्याबाई व तुकोजीराव व यशवंतराव यांनी न्यायी भूमिकेतून सोडविण्याचा पूर्णपणे प्रयत्न केलेला होता. रजपूतांच्या वारसाहक्क वा गादीविषयी, सीमेविषयी, राज्यांच्या रीतीरिवाजाविषयी व इतर हक्काविरुद्धची प्रकरणे होळकर सत्ताधीशांकडे येत होती. त्यावेळी ती न्याय पद्धतीने मिटवली जात होती.

तसेच होळकर शासकाच्या न्यायनिवाड्यातून ज्यांच्यावर अन्याय झाला असेल, अशाना वा त्या संस्थानिकांना किंवा अपीलकर्त्यास पुणे दरबाराकडे योग्य न्याय मिळविण्याचा अधिकार होता. त्यासाठी होळकर राज्यकर्त्याकडून मदतही केली जात होती. त्यामुळे उत्तरेतील अनेक संस्थानिक मातोश्रीचे निरपेक्ष वर्तन पाहून सुखा समाधानाने जीवन जगत होते. मातोश्रीने आयोध्या, भरतपूर, जयपूर, सातारा, मारवाड, उदेपूर, कोठा, जयपूर, डूरंगपूर, दिल्ली, प्रतापगड, नागपूर, ग्वाल्हेर, पुणे, भोपाळ, लखनौ व हैद्राबाद इत्यादी ठिकाणी आपले वकील पाठविलेले होते. त्याचप्रमाणे या ही संस्थानचे वा राज्याचे वकील होळकर दरबारात होते. याचा परिणाम असा झाला की, त्यावेळी न्यायाचे वातावरण सर्वत्र निर्माण होण्यास मदत झाली. होळकर शासकासारखे न्यायी धोरण असे त्यावेळी इतर कोणत्याही राज्यात नव्हते.

### ६.१ केंद्रीय न्याय व्यवस्था:

पेशवे काळात न्याय निवाडा हा छत्रपती किंवा पेशव्यांच्या नावाने दिला जात होता. गरजेनुसार हिंदू धर्म पीडीतांना बोलावून त्याविषयीचे त्यांचे मन विचारात घेवून निर्णय दिला जात असे. एवढेच नव्हे तर खुद पेशवे त्यांचे कारभारी, वादी व प्रतिवादी यांची एकत्र पंचायत भरवून त्यावर निर्णय दिला जात असे. नारायणराव पेशव्यांचा भर दिवसा राघोबादादानी वध केला. त्यावेळी त्यास मराठा न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांनी पूर्णत: त्यास जबाबदार धरुन देहदंडाची शिक्षा राघोबादादास ठेठावली. तरी पंरतु होळकराशाहीत पेशव्यांसारखीच न्याय व्यवस्था होती, पण त्यात होळकर बाण्याप्रमाणे त्यात बदल करुन होळकर राज्यापूरतचे होळकर सत्ताधीश आपल्या अधिपत्याखालील प्रदेशाचे मुख्य न्यायाधीश होते. स्थानिक पातळीवर न्याय नाही मिळाल्यास त्यावादीस होळकर राज्यकर्त्याकडे न्याय मागता येत असे. पण इथेही त्याचे समाधान झाले नाही, तर त्यास पेशव्यांकडे न्याय मागता

येत होता. त्यावर होळकरांच्या राजवटीत असे काही प्रकरणे पेशव्यांकडे गेलेले होते. तरी ही होळकर राज्यातील प्रजा न्यायाच्या बाबतीत होळकर राज्यकर्त्यांकडून मिळणाऱ्या न्यायावर बहुतांशी वादी व प्रतिवादी दोघेही समाधानी असायचे असे स्पष्ट होते. तरी पण काही बाबतीत पेशव्याकडे ही जात होते म्हणजेच मराठा सरदार यांच्या सरंजामी प्रदेशात न्यायविषयक काही प्रकरणे पेशव्यांकडे जात होती. होळकर राज्यातील परगणे सुंलतानपूर केशरीसिंग राऊळ कस्बे सारंगखेडे यानी पेशव्यांकडे होळकर राज्यातील मिळालेल्या न्यायाविरूध्द न्याय मिळण्यासाठी विनंती केली. तेंव्हा १७ फेब्रुवारी १७६५ रोजी माधवराव बल्लळ प्रधान यांनी मल्हारराव होळकरांना पत्र पाठवून कळविले की, केशरीसिंग राऊळ कस्बे सारंगखेडे परगणे सुंलतानपूर यानी विदित केलें की आपली भावजई फत्तेसिंग राऊळाची स्त्री गृहकलहामुळे मालबाजवळ फिर्याद गेली. त्यास न्याय मनास न आणितां सरदारांनी आपले राऊळकीचें वतन जप्त केलें आहे. म्हणून. तरी याचा इन्साफ न पाहता परगणे मजकूरचे अंमलदाराही जप्त केले असेल याजकरिता पत्र लिहिलें असे. तरी आपण येविशीची ताकीद करुन इनसाफ करावा आणि वतनास वारीस असतां जप्त करावें ऐसं नाही, सुदामत मनास आणून वाजवी असेल तसें चालवावें व निवाडा करावा जाणिजे.[४]

पेशवे काळात सरंजामी सरदारांच्या प्रशासकीय क्षेत्रात अवश्यक त्यावेळी हस्तक्षेप करीत होते. या पत्रावरुन असे स्पष्ट होते की, मराठा सरदारांना त्यांच्या त्यांच्या प्रदेशात न्यायविषयक पूर्ण अधिकार असले तरी, त्यांना अंतिम अधिकारी नव्हते. तर पेशवे हे सपूर्ण मराठा राज्याचे अंतिम न्यायविषयक अधिकार होते.

पेशव्यानंतर न्याय व्यवस्थेत सुभ्याचा सुभेदार, मामलतदार, कमाविसदार व इतर सरकारी अधिकारी तसेच त्या त्या पातळीवर देशमुख, देशपाडे, शेटे, महाजन, पाटील, कुलकुर्णी इत्यादी वतनदार अधिकारी ही स्थानिक पातळीवर न्यायदानाचे कार्य करीत होते.

प्रांतीक न्याय पातळीवर सुभ्याचा सरसुभेदार हा न्यायदानाचे कार्य करणारा महत्वपूर्ण अधिकारी होता. त्या न्यायनिवाड्यावर त्याची सही व शिक्का उमटविण्यात येत असे. यावर वादीचे समाधान झाले नाही तर, त्यास पेशव्यांकडे न्याय मागता येत असे. तसेच एखाद्या अधिकाऱ्याविरुद्ध खटल्यात सरकारकडून चौकशीसाठी विश्वस्त अधिकारी पाठविला जात असे.

इ. स. १७५१ पासून पेशवे यांनी स्वतंत्र न्यायाधीश पद निर्माण केले. त्याचे पहिले न्यायाधीश म्हणून रामशाास्त्री प्रभुणे यांनी नेमणूक करण्यात आली. म्हणजेच पेशव्यानी न्यायदानासाठी स्वतंत्र व्यवस्था निर्माण केलेली होती. त्यासाठी पंचायत न्यायव्यवस्था ही कार्यरत होती. न्यायाधीशांचा वा पंचायतीचा निर्णय हा राजपत्र किंवा निवाडापत्र, अभयपत्र या स्वरुपात दिला जात असे. होळकर राज्यात न्यायदानाचे कार्य सुभा, परगणा व ग्राम पातळीवर चालत होता. अचूक न्यायदानासाठी विविध कायदे वा नियम बनविण्यात आलेले होते. तरी

ही होळकर राज्यात ज्यांना योग्य न्याय मिळाला नाही असे जर वाटत असेल तर त्यास पुण्याच्या पेशव्यांकडे अंतिम न्याय मिळत होता.

**६.१.१ न्यायदानाच्या प्रमुख आधार:**

२३६मध्ययुगीन काळखंडात न्यायदान व्यवस्थेमध्ये धार्मिक रूढीपरंपराव रितीरिवाजाचा आधार मानून न्यायदान केले जात होते. त्याचप्रमाणे लेखी पुराव्यासही आधारभूत मानून न्याय निवाडा केला जात होता. त्याचप्रमाणे मराठा राज्यात वा पेशवे काळात न्यायदानात कागदपत्रांचा पुरावा महत्वपूर्ण समजला जात होता.[५] म्हणजे आधुनिक काळात जसे प्रत्यक्षदक्षी व लेखी पुराव्यास महत्व आहे. तसे पेशवे काळातही देखील मराठा राज्यात कोणत्याही न्यायदान पातळीवर न्यायदानाचे पवित्र कार्य केले जात होते त्यास धार्मिक ग्रंथ, पुराणे, श्रुती, स्मृती यामध्ये सांगितलेली तत्वे आणि प्रचलित व्यवहार पद्धती, रुढी परंपरा विचारात घेऊन सद्सदविवेकबुद्धीनुसार न्यायाचा निवाडा केला जात होता. मानवी व्यवहारातील योग्य अयोग्यता पूर्वापार चालत आलेल्या प्रथा विचारात घेऊन निर्णय दिला जात होता.

आपल्या अखत्यारीतील जनतसे योग्य न्याय देणे हे राज्यकर्त्यांचे पहिले कार्य असते. मध्ययुगात तत्कालीन राजे महाराजे हे न्यायदान करताना धर्मशास्त्राचा आधार घेवून न्यायाचे पवित्र कार्य करीत असत.[६] छत्रपती शिवाजी महाराजांनी न्यायदानाच्या बाबतीत कठोर धोरणांचा अवलंब केलेला होता. त्याच न्यायपद्धतीचा स्विकार पुढे पेशव्यांनी अवलंब केलेला होता. पण या काळात लिखित स्वरुपाचे स्पष्ट असे कोणतेच कायदे अस्तित्वात नव्हते. विविध धार्मिक ग्रंथांच्या आधारावर न्यायनिवाडा केला जात असे. मराठयांच्या प्रशासनात, राज्यकारभारात व महसूल व्यवस्थेत जशी मुस्लीम सत्ताधीशांच्या यंत्रणेचा प्रभाव होता. त्याच प्रमाणे पेशव्यांच्याही काळात तेच प्रशासन थोडेफार बदल करून स्विकारलेले होते. हिंदू धर्म शास्त्रातील प्राचीन संकल्पना, नियम व इतर बाबीच्या आधारावर न्यायदान आढळून येते. हिंदू धर्मशास्त्रातील मनुस्मृती, मिताक्षरा, व्यवहारमयुख, दान कमलाकर, चतुर्वर्गचिंतामणी व पराशरमाधवीयम या धर्म ग्रंथांच्या आधारावर आधारलेली न्यायदान पद्धती रुढ होती.

**६.१.२ फडणविसाचे कायदे:**

होळकर शासकानी आपल्या राज्यात सर्व व्यवहार व्यवस्थीत पार पाडण्यासाठी व प्रजेचे कल्याण साधण्यासाठी इन्दौर संस्थानच्या अर्थ विभागात फडणीसांचे कायदे तयार करण्यात आलेले होते. त्यास 'फडणविसाचे कायदे' या नावाने ओळखले जाते. या कायद्याने होळकर दप्तरातील नोंदी व जमाखर्चाचा लेखाजोखा इतका अचूक व चोख ठेवण्यास मोलाची मदत झालेली होती. या कायद्यांची अमलबजावणी केली जात असल्याने कोणत्याही अधिकाऱ्यास कसल्याही प्रकारची अफरातफर करता येत नव्हती.

### ६.१.३ हुंडा कायदा:

होळकर शासक हे न्यायप्रिय होते. अहिल्याबाई सामान्य रयतेसाठी न्याय भूमिकेतून लोकांच्या कल्याणाकरिता राज्यकारभार करीत होत्या. एखाद्या राज्यकर्त्याप्रमाणे त्या ऐषआरामात व भोगविलासी आयुष्य जगू शकल्या असत्या. परंतु त्यांनी तसे केले नाही. त्या साध्या वेषामध्ये, साध्या आसनावर घोंगडी टाकून त्या बसून न्यायदान करीत असत. 'श्रीशंकर' आज्ञेवरून. हुकूम जारी करण्यात येतो की, कोणत्याही जाती किंवा जमातीत विवाहाच्या समयी कोणी कन्येचे द्रव्य घेईल त्याचेकडून जितके द्रव्य घेतले तितके व मध्यस्थाकडून त्यासी जेवढे द्रव्य मिळाले असेल, तेवढे द्रव्य सरकारकडून भरणा करून घेतले जाईल. याशिवाय दंडही भरावा लागेल. हे विदीय होय.' तसेच 'याच्या पन्नास नकला काढून प्रांतोप्रती पाठवून द्या.'[७] असे आदेश होळकर शासक अहिल्याबाई यांनी काढलेले होते. म्हणजेच होळकर राज्यात हुंडा बंदीचा कायदा करून सामान्य रयते विवाहसाठी मोठा हातभार लावलेला होता. हे मध्ययुगातील मोठे धाडसाचे कृत्य करून समाजा समोर मोठा आदर्श निर्माण केलेला होता.

### ६.१.४ सर्वांना समान न्याय:

होळकर राज्यात सर्वसामान्य रयते पासून ते राज्यकर्त्यापर्यंत वा नातेवाहीकांना ही सर्वसमान या तत्वाने सारखाच न्याय मिळत होता. म्हणजेच गुन्हेगारास एकाच न्यायाने न्याय दिला जात होता. अहिल्याबाईचा नातू मालेराव यांच्या गैरसमजूतीने एका कारगिराचा खून झाला. तेव्हा मातोश्री अहिल्याबाईने नि:पक्षपातीपणाने चौकशी सूरू केली असे जॉन माल्कन म्हणतात. अहिल्यादेवीना चौकशी अंती दासीचा व कारागिरांचा जरी कामानिमित्य नेहमी संबंध येत होता. त्यात चरित्र्यावर संशय घेण्यासारख काहीच नव्हतं. होळकर राज्यात सहज, जलद आणि योग्य न्याय मिळत असल्याने अहिल्याबाईच्या न्यायनिवाडयाचा सर्वजण आदर करीत.[८] होळकर राज्यकर्त्यांनी आवर्जून लक्षात घ्यावी अशी बाब म्हणजे राज्याच्या आर्थिक व्यवहारात त्यांनी कधीही नाती—गोती मानली नाहीत. अहिल्याबाईचे पती भर दरबारात येवून आगावू पैशाची मागणी दिवाणजीकडे करीत होते तेंव्हा अहिल्याबाईने अतिशय कणखरपणे म्हणाल्या की, 'आपला तनखा आपण संपविला. सबब पुन्हा आपणांस रुपयाही देता येणार नाही.'[९] असे स्पष्ट उत्तर दिले. तेंव्हा पती खंडेरावांनी रागाच्या भरात हातातील खतावणी वही दिवाणाच्या दिशेने भिरकावली. हे अहिल्याबाईंनी पाहून आदेश दिला की, 'तात्याबा खतावणीची बेअब्रू करणाऱ्यास पंचवीस मोहरा दंड ठोका' 'दिवाणजी! दरबाराचा रिवाज न पाळणाऱ्यास तसेच संस्थानाची पुजनीय अशी जमाखर्चाची वही भिरकावून देणाऱ्यास पंचेवीस मोहरा दंड करा. व तो दंड त्यांच्या वैयक्तिक उत्पन्नातून वसूल करावा.'[१०] असे फर्मावणाऱ्या त्या कठोर राज्यकर्त्या होत्या. स्वत:च्या पतीस तात्काळ दंड देणाऱ्या पहिल्या न्यायाधीश म्हणून अहिल्याबाई ओळखल्या जातात. अशा समान न्यायामुळे होळकर घराण्याचे प्रशासन हे तत्कालिन राज्यव्यवस्थेत आदर्श होते.

### ६.१.५ न्यायालयीन खटले:

होळकर राज्यात मिळणारा न्याय हा अचूक मिळतो यावर सर्वसामान्य रयतेचा फार मोठा विश्वास होता. त्यामुळे वादी व प्रतिवादी दोघेही पूर्ण विश्वासाने न्यायासाठी आपले संघर्ष वा तंटे घेवून येत. त्यावेळी होळकर न्याय व्यवस्थेत अनेक प्रकारचे खटले न्याय निवाड्यासाठी येत असत. त्याचे वर्गीकरण पुढील प्रकारे करण्यात येते. वतनासंबंधीचे खटले, विवाहाविषयीचे खटले, गावागावातील खटले, जहागिरीविषयीचे खटले, दत्तकविषयीचे खटले, राजकीय स्वरूपाचे खटले, चोरीविषयीचे खटले, कर्जाविषयीचे खटले व जातीविषयीचे खटले पेशेवे काळात मोठया प्रमाणात न्यायासाठी येत होती. होळकर राज्यातील न्यायालयीन खटल्याचे प्रकार पुढीलप्रमाणे आहेत.

#### ६.१.५.१ वतनासंबंधीचे खटले:

अनेक सरदारांना वतने, जहागीर बहाल केलेली होती त्याचे अनेक वाद वा संघर्ष होळकर शासकाकडे येत होते. त्यामुळे या वतनाच्या सनदेवरुन, वारसाहक्कावरुन, वतन बळकावल्याच्या कारणावरुन असे अनेक वाद निर्माण होऊन ते पिढयांन पिढया चालत होते. कारण वतनदारी ही सामाजिक व राजकीय प्रतिष्ठेची तसेच आर्थिक लाभाची बाब मानली जात होती.

##### ६.१.५.१.१ राऊळकीच्या वतनाचा वाद:

होळकर राज्यातील सुलतान परगण्यातील सारंगखेड गावामधील राऊळकीच्या वतनावरुन केसरसिंग राऊळ व त्यांची भावजय (फत्तेसिंग राऊळची पत्नी) यांच्यात वाद निर्माण झाला. त्यावेळी फत्तेसिंगाची विधवा पत्नीने मल्हाररावांकडे तक्रार केली. त्यावेळी मालेराव होळकरांनी या वादाची कोणतीही सखोल पुराव्याची शहानिशा वा चौकशी न करता सरळ केसरसिंगाचे वतन जप्त केले. त्यावेळी त्यांनी आपल्यावरील अन्यायास वाचा फोडण्यासाठी सरळ पेशव्यांकडे तक्रार करताच पेशव्यांनी मल्हाररावास पत्र पाठवून राऊळ यांना न्याय देण्याचे कळविले. मल्हारराव बुलंदेखंडात मोहिमेवर होते. तेव्हा नातू मालेराव यांनी केसरसिंग यांच्या वतनाच्या जप्तीचे आदेश दिल्याने तो केसरसिंग न्यायासाठी पेशव्याकडे गेला. तेंव्हा पेशव्यानी सुभेदारास हे पत्र पाठविल्याने सुभेदारांनी १९-०२-१७६१ रोजी मालेरावास पत्र पाठवून मौजे सारंगाखेडे परगणे सुलतानपूरची तात्काळ जप्ती उठविण्यासाठी कळविलेले होते. जप्ती उठविण्यासाठी पत्र पाठवून न्याय दिला ते पत्र- चिरंजीव विजयीभव राजश्री मालवा यांसी प्रती मल्हारजी होळकर आर्शीवाद उपरी मौजे सारंगखेडे प्रगणे सुलतानपूर येथील फतेसिंग राऊळ याची स्त्री अमरावतीनें तुम्हां पसी येऊन केसरीसिंग राऊळ फतेसिंगाचा भाऊ यांजला गावाकडून परांगदा करुन राऊलकीचे वतन जप्त करविले. त्यांस तेथील जप्ती तूर्त उठवून, देशास आलिया मनास आपले म्हणून मीराबान टोके यांनी सांगितलेवरुन तुम्हास लिहिले असे. तरी मौजे मजकुरचे राऊळकीची तुम्ही जप्ती करविली असेल ते सोडवून देणें

आम्ही देशास आलिया मनास आणून करणें ते केले जाईल. तूर्त केसरीसिंगास आणूस त्याचे हातें राऊळकीचें कामकाज...[११] यापत्रावरून हे स्पष्टपणे होते की, मल्हाररावाने आपल्या पूर्ण विश्वासाने माळव्यातील जबाबदारी मालेरावावर सोपवली होती. मल्हाररावानी नातु मालेरावास केलेली चुक सुधारण्याचे आदेश दिलेले होते. म्हणजेच ते बाहेर मोहिमेवर असताना त्यांची माळव्यातील समस्यांवर नजर ठेवीत होते हे दिसून येते.

**६.१.५.१.२ कुलकर्णी वतनाचा वादः**

तुकोजी होळकर यांच्याकाळात मौजे भातखंडी बुझुग येथील कुलकर्णी वतनाचा वाद निर्माण झाला. तेव्हा मौजे भातखंडी बुझुग प्रगणे उतराण येथील कुलकर्णी याच्या वतनाचा वाद होळकर सराकरकडे न्याय मागण्यासाठी आला. १४ ऑगस्ट १७७८ रोजी त्या वतनाचा वाद सोडविला तो असा होता. मौजे भातखंडी बुझुग येथील कुलकर्णाचा कजिया त्यामुळे मौजे मजकुरचे भागवत, व बाबाजी व दाजी पाटिल यानी महेश्वरचे मुक्कामी येउन फिर्याद केली की, कुलकर्णी आमचे निमे असतां लक्ष्मण जिवाणी दरोबस्त वतनावर भोगवटा घेतो. हयाणोन कुलकर्णी मजकुरास तलब करुन आणिलें. उभयतांचा इनसाफ पंचाइतीचे रुईनें जुने कागद पाहून मनास आणितां पाटील मजकुराचें वतन निमें ठरलें. त्याचे कागदपत्र उभयतांस करुन देखिले. त्याप्रमाणे उभयतां वर्ततील. फिरोन बोभाट येऊ न देणें.[१२] या न्यायावरून असे स्पष्ट होते की, या वतनाच्या वादामध्ये लेखी पुराव्यास महत्व होते त्यावरून निर्णय दिला जात होता.

**६.१.५.१.३ मंडलोई वतनाचा वादः**

सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या काळात इंदूर येथील मंडलोई घराण्यात असाच वाद उदभवलेला होता. इंदौर जमीनदार नंदलाल मंडलोई यांच्या निधनानंतर त्याच्या तीन मुलांत म्हणजेच न्याहलकर्ण, बालकर्ण व तेजकर्ण यात वाटणीवरुन संघर्ष सुरु झाला वारसा हक्कासाठी मंडलोई घराण्याच्या वतनाच्या वाटणीचा तंटा सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या काळात न्यायासाठी आले. तेंव्हा मल्हारराव होळकर स्वतः जाऊन त्यात वाटणी करुन वाद मिटविला. पण नंतर पुन्हा हाच वाद निर्माण झाला. व तो न्यायासाठी पुन्हा सुभेदारांकडे आला असता.

तेंव्हा मल्हाररावांना त्या वतनातील सावकार व इतर मातब्बरांना जमा करुन पंचायत भरविण्याचा आदेश कमाविसदार दत्ताजी गणेश यास दिले. त्यानुसार २५ एप्रिल १७५७ रोजी पंचायत बोलावून पाच पंडीतांच्या समक्ष म्हणजे पदमाकर उपाध्ये बाळभंट भसे, अंबादास पूराणिक, मल्हार भट पूराणिक व महादेव जोशी अंडवेकर या वैदिक ब्राह्मणासमक्ष न्याय निवाडा सुरु झाला.

सत्तावीस पंचायत सदस्यांच्या समक्ष उज्जैन येथे न्याय देण्याअगोदर तिन्ही भावांचे राजीनामे घेवून पूर्ण साक्षी पुरावेव सविस्तर चौकशी करून मंडलोई वतनाची पुढील अकरा

कलमात वाटणी केली... न्याहलकर्ण मंडलोई व कनिष्ठ बलकर्ण व जेतकर्ण मंडलोई, परगणे इंदूर सुभा उज्जैन... उभयंता बंधवाटा वतनाचा परस्परें मार्गो लागले. त्यामुळे कलह होउन बलकर्ण श्रीमंत राजश्री सुभेदार साहेबांपाशी गेले. तेथें जाउन वर्तमान सांगितले त्यावरुन श्रीमंतांनी एका बापाचे पुत्र जाणोन वाटा द्यावा हयाणोन पत्रें दिलीं. परंतु निहलकर्ण मंडलोई याजकडे वडीलपण व नंदलाल मंडलोई यांच्या स्त्रिया व तेजकर्ण यांच्या स्त्रिया व पुरातन सेवक ऐसा रुपयाचा ऐवज ठरावून हुजूरने द्यावा. त्यास एक बंधु बलकर्ण मजकूर हुजूर गेले...

| **पंडित व वैदिक, तपशीलवार,** | | **दरमहालचे वतनदार.** | |
|---|---|---|---|
| १ | वे. शा. सं. पद्माकर उपाध्ये | २ | निहालचंद ठाकूर संस्थान धार |
| | ज्योतिषी व धर्माधिकरी संगमेश्वर, | | मांडवा, खारा व गुमास्ते. |
| १ | वे म् रा. बालंभट भसे, सांप्रत | १ | देहसिंग मंडलोई सावेर. |
| | वास्तव्य पुणतांबे | १ | गजसिंग मंडलोई देपालपूर. |
| १ | वे शा. सं. अंबादास पुराणिक | २ | मंडलोई रजपूत हिसेदार, |
| | निस्वत गंगाभागिर्थी अहिल्याबाई. | | बिजेसिंग, हटेसिंग. |
| १ | वे. शा. सं. मल्हारभट पुराणिक | २ | कानगो |
| | निस्वत सौभाग्यवती गौतमाबाई. | | १ भगोतीदास. |
| १ | वे.राजश्री महादेव जोशी अडवेकर | | १ नाथूराम. |
| | प्रांत राजापूर. | | |
| **५** | **असामी** | | |
| | १ रणजीतगीर गोसावी. | १ | सायर कानगो दुर्गादास. |
| | १ धोंडो कृष्ण कोतवाल | ४ | पाटील.... |
| | १ नारो सिध्देश्वर | | १ कनाडेकर हरजी / १ फकीरचंद पाटील, |
| | १ कुंवरचंद व्यास. | | १ नरसिंग मंडलोई / १सुंदर पाटील भिचोली |
| | १ हजरत काजी हिदायतउल्ला. | ४ | साहुकार......... |
| | ......<br>५ | ... | १ गंभीरचंद १ रामरतन |
| | तेरीज पंचाईत इसम **२७** | **१७** | १ .सेखमहंमद. १ रणछोड जोशी. |

एकूण सत्तावीस असामी एकत्र करुन परस्पर उभयतां बंधूचे राजीनामे एकत्र घेऊन पंचाईत न्याये वाटे ठरावून दिले.

१ दामी परगणेमजकूरची होईल त्याचे पांच ५ करावे पैकी वजा सरदारी वडीलपणा व खर्च कुटुंब परिवार, रावनंदलाल यांच्या स्त्रिया व रावतेजकर्ज यांच्या स्त्रिया वगैरे यांस वाटण्या बलकर्णकडे, कलम

१ बाकी वाटें सुमारें चार ४ तपशील.

२ राव निहालकर्ण मंडलोई दोन वाटे. राव बलकर्ण व तेजकर्ण दोन वाटे मौजे केळोदगांव

सरकारांतून इनाम आहे. त्याचा वर्षास आकार करुन वाटें सुमारी

५ पाच करावें पैकी वजा निहालकर्ण मंडलोई याजकडे. वडीलपणा खर्च वगैरे वाटा

१ तपशील बाकी वाटे २ राव निहालकर्ण, व राव बलकर्ण व तेजकर्ण २

१ जिरायेता गांवगन्नाववार ज्या आहेत त्यांपैकी राव नंदलाल व राव तेजकर्ण आपल्याला स्त्रियांच्या व बहिणीस व कल्यास जी जमीन आपण दिली असेल...त्यांनी जिराता तूर्त वजाकरुन बाकी राहिल्या जिराता त्यांचे वाटे सुमारे

५ पांच करावे. पैकी वजा सरदारी खर्च वैगैरे निहालकर्णाकडे वाटा सुमारे

१, बाकी सुमारे जिराता ४ तपशील २ निहालकर्ण वाटे. २ बालकर्ण व तेजकर्ण वाटे एकूण दामी व जिरायता व इनामगांवचा वाटा सदर्हुप्रमाणे पंचाही करारकरुन दिले. येणें प्रमाणे उभयतांही उपभोग करावा. सिवाय कलम पित्याच्या वेळेस कर्ज देणें लोकांचे असेल त्यांचा काळ झाल्यावर आजवर निहालकर्ण यांनी वारले असेल त्याचा वाटा उभयंता कनिष्ट बंधू यांनी पंचादोई प्रमाणे वारावें.

| कलम | |
|---|---|
| १ | ३ वाटे निहालकर्ण यानीं बारावें.२ वाटे उभयतां बंधुंनी बारावे. बागबगीचे शिवाय असतील ते पंचादोई प्रमाणे वाटून घ्यावे. कलम—१ |
| २ | दप्तर निहालकर्ण बलकर्ण व तेजकर्ण मिळोन गुमास्ता एक—दप्तर निहालकर्णाकडे असावें कलम—१ |
| ३ | राणीपुरा येथे पैदास होईल ते सदर्हुप्रमाणे वाटून द्यावें. कलम—१ |
| ४ | तेल्याबाबत खुंट वगैरे सुतळीचा तोडा व उगाई सदर्हु पंचादोईप्रमाणे वाटून द्यावे |
| ५ | कलम—१ |
| ६ | पालखी सरकारांतून वेतन आहे. निहालकर्ण वडील बंधू याजकडे करार कलम—१ |
| ७ | पाटिलकीचा गांव, परसाईपणाचे गांव असतील ते सदर्हु पंचदोईप्रमाणे वाटून द्यावें |
| ८ | कलम—१ |
| ९ | हवेली वाडा दुकान वगैरे घरें पंचदोईप्रमाणे वाटे कलम—१ |
| | मानपान वडीलपणा दसकते वासलातीवर निहालकर्ण यांनी करावे कलम—१ |
| १० | वेतनसंबंधी परस्परें गुन्हेगारी वगैरने प्राप्त झाली तर सदर्हुप्रमाणे पंचदोईप्रमाणे द्यावें |
| ११ | कलम —१ |
| | सायरीवर प्राप्त होईल तें सदर्हू पंचदोई प्रमाणे घ्यावे कलम १ |
| | सदर्हु लिहिल्याप्रमाणे दामी व जिरायती व इनामी वगैरे करार करुन दिल्याप्रमाणे वाटून घ्यावें.[१३] |

एकूण अकरा कलमानुसार पंचायतासमक्ष न्यायदान करून हा इंदौर येथील भाऊबंदकीचा वाद मिटविला. म्हणजेच या निवाडा पत्रावरून असे स्पष्ट होते की, होळकर राज्याकडून अनेक मातबर पंचासमक्ष तंटा सोडविला जातो. हा सामुहिक निर्णय २७ पंचाकडून दिला गेलेला होता.

**६.१.५.१.४ पाटील शिंदे शेत मळें व घर जप्ती:**

३ डिसेंबर १७६२ रोजी मल्हारराव होळकर यांनी अहिल्याबाईंस पत्र पाठवून स्पष्ट कळविले की, चिरंजीव अहिल्याबाई प्रती मल्हारजी होळकर... कुसाजी पाटील जाणोन स्वकीय लिहिणें विशेष आपणांस पत्र श्रीमंतांचे की राजश्री कुसाजी पाटील शिंदे मौजे पिंपरखेड येथील संभूगीर गोसावी यानें कुसाजीमजकूर याचा पुतण्या व शेत मळें व घर जप्त केलें हयाणून कळलें ल्यास वाफगांवी व जेथें त्यांची मुलेंमाणसें असतील तेथें गोसावी यासी ताकीद उत्तम प्रकारें करुन इसममजकुराची जप्ती शेत मळे जे असतील ते ताकीद करुन सोडून देणें.[१४]

म्हणजे होळकर राज्यात एखाद्या व्यक्तीने कोणता गुन्हा केला तर त्याचा गुन्हा सिद्ध झाला तर त्यास शिक्षा केली जात होती. पण त्याच्या गुन्हयाची शिक्षा त्याच्या निष्पाप मुलाबाळाना व बायकामाणसांना भोगण्याची वेळ होळकर राज्यात येत नव्हती तर मुलाबाळाना व बायकामाणसांना होळकर शासकाकडून पूर्ण मदत व संरक्षण दिले जात होते. हे यावरून हे स्पष्ट दिसून येते

**६.१.५.१.५ गिरास वतनाचा वाद:**

मातोश्री अहिल्याबाई होळकर यांच्या काळात मौजे कुमरेज परगणे नंदुरबार येथील गिरास वतनाचा वाद सुरु झाला. तो न्याय मागण्यासाठी होळकर शासकाकडे आला. तेंव्हा होळकर शासकांनी त्या नंदूरबार परगण्याचा कमाविसदार नानाजी भास्कार याला संबंधीत व्यक्तीकडे पाठवून या वादाची सोडवणूक करण्यासाठी मुळ दस्तऐवज महेश्वर येथे पाठवून देण्याचा आदेश दिला.

त्याप्रमाणे कामविसदारानी जोरावरसिंग राऊळ कसबे सिंदखेड यास पत्र पाठवून कुमरेज कराविषयीच्या मूळ वाटणीचे दस्तऐवज आपल्या प्रतिनिधीच्या हस्ते पाठवून देण्याचे कळविले. तसेच दाखला पुरविल्याखेरीज तुम्हास सुटका नाही. टाळटाळ केल्यास मसाला येईल अशी तंबीही सदर पत्रात दिलेली दिसते.[१५]

अहिल्याबाई होळकर यांनी ७ जून १७७१ रोजी पत्र पाठवून रामजी अघाडे पागा सारंगखेडी प्रगणे सुलतानपूर यांस आदेश देवून ताकीद केले की ...मौजे कोठडी प्रगणे मजकुर येथील इनाम बिघे सुमार २५० खेरीज जमा आहे. त्याच्या सनदा पातशाही व पूर्वीपासून भागवठा चालत असतां हल्ली पंधरा वर्षें आमचा इनाम माधोंसिंग गिरासे व चंद्रा पाटील मौजे कोठळीकर हे उभयतों जबरदस्तीने खातात. तरी मशरनिल्हेची इनाम जमीन गिरासे मजकुर व

पाटील उभयतां खातात... ते दरोबस्त खालसा करुन पैकी निम्मे मशारनिल्हेकडे चतु:सीमा मामलेदार व जमीदाराचे विद्यमानें करुन देवणें, व निम्मे जमिनीची कीर्द मामलेदाराकडून करवून सरकार हिशेबी जमा करविणें,पेशजी पंधरा वर्षे उभयतांनी जमीन जबरदस्तीनें हाकूर खादली त्याचा ऐवज जमीदारास वगैरे पुसोन दरोबस्त बेमुलाजा बसूल करुन हुजूर पाठविणे.[१६]

म्हणजेच होळकर दरबारात व न्यायनिवाडयात साक्षी व पुराव्यास अत्यंत महत्व दिले जात होते. त्याच प्रमाणे सरकार देखील वतनासंबंधीच्या नाजूक व प्रतिष्ठेच्या वादावेळी पूराव्यास महत्व दिले जात होते. यावरून हेच स्पष्ट होते.

**६.१.५.१.६ मोकादम जब्बरखानच्या वतनाचा वाद:**

तसेच वतनासंबंधीच्या मौजे कुलावल तालूका सांरगखेड परगणे सुलतानपूर येथील वतनदार मोकादम जब्बरखान यांची दोनशे पन्नास बिघे अनेक वर्षापासून वतन मिळविली होती. पण मागील पंधरा वर्षापासून माधोसिंग गिरसे व चंद्रा पाटील राहणार कोठडीकर हे जबरदस्तीने जमीन खात असल्याने तक्रार करुन न्याय मागीतला तसेच यातील अर्धे वतन सरकारी जमा करुन घेण्याची विनंती केली. तेंव्हा अहिल्याबाईंनी सूलतानपूर दिनकर अनंत यास पत्र पाठवून सदरील बिघे जमीन जबारसिंगाच्या ताब्यात चर्तु:सिमा निश्चित करून बाकीची १२५ बिघे जमीन सराकरी दप्तरात जमा करुन दोषी असलेल्या माधोसिंग व चंद्रा यांच्याकडून वेडाची रक्कम वसूल करुन हा वाद मिटविला. या वादाचा न्याय निवाडा करताना वादीच्या इच्छेवरुन त्याचे अर्धे वतनाची जमीन सरकार खजिन्यात जमा करुन न्याय दिला. यावरुन असे स्पष्ट होते की एखाद्या वतनदाराच्या इच्छेनुसारच त्यांचे वतन सरकारात जमा केले जाई. अन्यथा त्याचे वतन त्यांनाच सुरक्षित ठेवले जात होते.

**६.१.५.१.७ जहागिरीच्या संदर्भातील वाद:**

मराठा साम्राज्यात वतनाप्रमाणेच जहागिरीवरुन ही वाद होत असे. असाच वाद खुद्द मराठयाचे दोन मातब्बर सरदार शिंदे व होळकर यांच्यात सुरु झाला. एकाच प्रदेशावर दोघाही सरदारांनी हक्क सांगावयास सुरुरवात केली. तेंव्हा तुकोजीराव होळकर व महादजी शिंदे यात या प्रदेशावरून मतभेद निर्माण होऊ लागले. तेंव्हा अहिल्याबाई होळकर या होळकर गादीच्या कारभारी होत्या. अशा वेळे महादजी शिंदेनी हे प्रकरण निकालात काढण्यासाठी अहिल्याबाईकडे विनंती केली. म्हणजेच यावरुन हे स्पष्ट होते की ज्याच्याशी शिंदेचा वाद आहे. त्यांच्या कारभारी असणाऱ्या अहिल्याबाईकडे या प्रकरणासंदर्भात न्याय निवडा करण्याची जबाबदारी सोपविले जाते. त्यांनी दिलेल्या निर्णयावर दोघेही समाधानी व सहमत होतात. त्याचा निर्णय अहिल्याबाईंनी असा दिला की, हा भू प्रदेश गोचरमुखी म्हणून दोन्ही पक्षांनी सोडून द्यावा. हा निर्णय दोन्ही पक्षांनी मान्य केला होता. आणि सदर भूप्रदेश भारत देशाच्या स्वातंत्र्यानंतर मध्यप्रदेश राज्याची निर्मिती होईपर्यत 'गोचरमुखी' म्हणूनच कायम होता.[१७]

होळकर राज्यात न्यायव्यवस्था ही नि:पक्ष व समसमान स्वरुपाची होती. ती यावादावरील निर्णयावरून प्रत्ययास येते. याबद्दल पुढील विचार सार्थ ठरताात ‘अहिल्याबाई काळात ज्या मणुष्यास न्याय हवा असेल. त्यास निकाल लावून घेण्यासाठी कोणताही खर्च करावा लागत नसे अहिल्याबाईच्या वेळी न्यायखाते ही उत्पन्नाची बाब नव्हती.[१८] होळकर राज्यात काही खटल्यांना मोफत चालविले जात होते पण काही न्यायदानाच्या कामात हरकी व गुन्हेगारी तसेच मसला खर्च घेतला जात होता.

**६.१.५.२ वतनदारीतील दत्तकासंबंधीचे खटले:**

वतनदारीतील दत्तकासंबंधीचे खटले एखादा वतनदार निपुत्रिक असेल तर त्यास दत्तक पुत्र घ्यावा लागत असे. अन्यथा त्याची जमीन व इतर मालमत्ता सरकारी खजिन्यात जमा होत होती. त्यामुळे निपुत्रिक वतनदार दत्तक पुत्र घेण्यासाठी प्रयत्न करीत असत. पण तो कोण दत्तक घ्यावा याविषयी नातलगात वाद निर्माण होत असत. दत्तक वारसा सरकारची मान्यता घ्यावी लागत होती. म्हणजेच दत्तक वारसा संदर्भात होळकर राज्यात काही खटले येत होते. त्यांचा न्यायनिवाडा होळकर सरकारकडून केला जात असे. खेमदास नावाचा श्रीमती व्यापारी सिंरोज येथील निपूत्रीक होता. त्यांच्या मृत्यूनंतर सरकारी अधिकाऱ्याने त्याच्या विधवा पत्नीवर दबाव आणून ती संपत्ती जप्त करण्याचा कांगावा सुरु केला. तेंव्हा त्या विधवा पत्नीने दत्तक पत्र घेण्यास मान्यता मागीतली. तेंव्हा त्या अधिकाऱ्यांने तीन लाख रुपयाची लाच मागीतली. त्यावेळी विधवा पत्नीने अहिल्याबाईकडे तक्रार करून त्यावर न्याय मागतीला.

सिंदखेड येथील राऊळ घराण्यात मोहनसिंग राऊळ हा वतनदार होता. त्यांस मुलबाळ नव्हते त्यांच्या पश्चात त्यांचे पुतणे नंथूसिंग राऊळ व जोरावंर सिंग राऊळ यांनी सरकारी दरबारी आपणच खरे मोहनसिंग राऊळचे वारस आहेत. यावरुन वाद सुरु झाला. तो वाद सरकाराकडे अहिल्याबाईच्या काळात न्याय प्रविष्ठ झाला. तेंव्हा मातोश्रीनी मोहिनसिंगाचा वारस म्हणून जोरावरसिंगाच्या बाजुनी निर्णय दिला. पण नथूसिंगाने फेरदावा करुन जोरावरसिंग हा मोहनसिंगाच्या खऱ्या नात्यातील नसून तो दत्तक घेतलेल्या पुत्राचा पुत्र असल्याने मीच या घराण्याचा खरा वारस आहे. तसेच या जोरावरसिंगने तुकोजीराव होळकर मोहिमेवर असतांना मातोश्रीने दिलेल्या न्यायाची पत्रे दाखवून तुकोजीरावांकडूनच तशी वतनाची पत्रे वा सनदपत्रे तयार करुन घेतलेली होती. त्यामुळे नथूसिंगाने न्यायासाठी सरकारची नजरेची रक्कम भरण्यासही तयार होता. तेंव्हा काशीराव होळकर सत्ताधीश असतांना नथुसिंगास दत्तक वारसा सोपविण्यात आला. त्यामुळे जोरावरसिंग विधवा राण्याकडे जाऊन मला न्याय द्यावा. अशी विनवणी करु लागला.

तेंव्हा इ.स. १८०१ यशवंतराव होळकर यांच्या काळात मोहनसिंगाची विधवा राणी अजबकुवर व दुसरी राणी फुलकुवर यांनी महेश्वर दरबारी जाऊन आपल्या पतीच्या संपतीची वाटणी जोरावरसिंग व नथुसिंग यात करावी अशी विनंती केली. इ.स. १८०८ मध्ये

यशवंतराव होळकरांनी जोरावरसिंगास पाठविलेल्या पत्रात, मागे वाटण्या झाल्याप्रमाणे कागदपत्रे करुन दिले आहेत. त्याप्रमाणे वहिवाट करावी. यापुढे बोभट आल्यास मालमत्ता सरकारजमा केली जाईल असा कडक हुकूम काढलेला दिसतो. यावरुन हे प्रकरण या वेळेपर्यंतही पूर्ण निकालात निघालेच नव्हते असे स्पष्ट होते.[१९]

**६.१.५.३ राजकीय संबंधी खटले:**

होळकर राज्यात अनेक राजद्रोह व फितुरीचे गुन्हे न्याय निवाडयासाठी येत असत. अहिल्याबाईच्या काळात इंदूर येथे राजद्रोहाचा गुन्हा केला. त्याचे नाव बंदेगान हिमतखान होते. त्यांनी मातोश्रीकडे विनंती अर्ज केला. तेंव्हा त्यावेळी मातोश्रीनी त्यांची ५ सप्टेंबर १७८० रोजी काही अटीवर सुटका केली ते पत्र: श्रीमंत महाराज मातोश्री बाई साहेब साहेबांचे सेवेसी मुचलका वंदेगान हिमतखान वल्द आजमतखान साकिन कसबे इंदूर कुर्णीसात अर्ज विनंती बापूजी होळकर यांचे लष्करचा वगैरे शहर संबंधी आरोप आला. म्हाणोन साहेबी शिक्षा करुन आज्ञा केली की, अत:पर काही ऐकिलें तर कार्यास येणार नाही. येविसी आज्ञा प्रमाणें सरकारांत मुचलका लिहून दिघला ऐसाजे की मागें अन्याय जाहला तो माफ केला. पुढें मजपासून काही लवाडी, लाताडी, फितवा, फातड, चुगली झाली तर साहेबी माझा मुलाजा न करितां हात पाय तोडावे, आणि शिक्षा करावी.[२०]

फत्तेसिंग गायकवाड हे पेशव्यांच्या विरोधात कारवाया करीत होता. यावेळी तो तळोद्यांच्या म्हाळोजी बारगळ यांच्याकडे चाकरीस गेल्याचे नाना फडणीसाना कळाले. तेंव्हा नाना फडणीसांनी बारगळच्या घराची जप्ती करुन म्हाळोजीस पकडून आणण्याचा आदेश सुभेदार बाजीराव मोरेश्वर यास केला. पण वास्तवात तो बारगळाकडे गेलाच नव्हता तो सौ. रखमाबाई होळकर यांच्याकडे चाकरीस प्रत्यक्षात गेलेला होता. तेंव्हा म्हळोजी बारगळची पत्नी सखूबाईने रखमाबाईस एक पत्र पाठवून नाना फडणीसांना खरे काय? ते सांगावे अशी विनंती केली. श्रीमंत सौभाग्यादेसंपन्न वज्रचुडे मंडित रखमाबाई यांसी सखूबाई बारगळ दंडवत... म्हालाजी बारगल फत्तेसिंग गायेकवाडाकडे चाारीव गेले येसे समजाविले त्यावरून त्यानी सरकारातून राजश्री बाबूराव माणकेश्वर यास आज्ञा केली म्हालोजी बारगल याचे ारची जप्ती कर्णे. त्याजवरून त्यानी स्वार आा असामी १० व कारकून पाठविला, आणि घरची बस्तवाणी मोजदाद करून जप्तीस ठेविलीए व मुला माणसासहित तसदी करू लागले...[२१]

होळकर सैन्यात काही इंग्रज अधिकारी प्रशिक्षणासाठी ठेवलेले होते. पण ते होळकरांच्या सेवेत कार्य करीत असतांना ते इंग्रजांशी आतून साहय करुन होळकरांची माहिती देत असल्याचे कळाले. तेंव्हा यशवंतराव होळकर यांनी त्यांचा शोध घेतला. त्यांनी इंग्रज सरकारला गुप्त पत्र व्यवहार केल्याचे पुराव्यानिशी सापडले. तेंव्हा त्यांच्या गोपनिय पत्रावरुन त्यात दोषी असलेल्या डॉड, रेयॉन व व्हायकर्स या इंग्रज अधिकाऱ्यांना पकडून त्यांचा

शिरच्छेद करण्याची शिक्षा दिली. त्यानंतर त्यांचे मुंडके काठीवर अडकावून आपल्या सैन्यात फिरविले. त्यामुळे होळकर सैन्यात फितूरी करणाऱ्याविषयी चांगलीच दहशत बसविली.

**६.१.५.४ आर्थिक सबंधीचे खटले:**

आर्थिक सबंधीचे खटल्यामध्ये खोटे नाणी पाडणे, कर्जासंबंधीचे खटले. संपत्तीच्या वाटणीचे, महसुल वसुलीत गोंधळ व सरकारी कामात भ्रष्टाचार अशा अनेक बाबीसंबंधीच खटले होळकर राज्यात न्यायासाठी येत होते. मध्ययुगीन काळातील लोक इमानइतबारे आपले आर्थिक व्यवहाराचे देणे घेणे चालत होते. पण त्यावेळी सुद्धा समाजातील काही लोक मात्र बेजबाबदार व दिलेल्या शब्दास जागत नसत. व आर्थिक व्यवहारात अफरातफर स्वहितासाठी करीत असत. त्यामुळे खऱ्या माणसावर तो अन्याय होत असे अशा वेळी तो न्याय मागण्यासाठी होळकर दरबाराकडे धाव घेत असे.

**६.१.५.४ .१ अनाधिकृत कब्जावर पाटील रोडगे न्याय:**

मौजे बदलापूर परगणे अंबड येथील रखमाजी पाटील रोडगे यांनी होळकर दरबाराकडे न्याय मागण्यासाठी विनंती केली की, उखाजी रोडगे हा माझा चुलत भाऊ निपुत्रिक होता. त्यांच्या मृत्यू नंतर आमच्याच गावातील होनाजी अर्गडा यांनी नरसिंग देशमुखाच्या पाठीब्यांने व मदतीने कोणताही नाते संबंध नसतानाही वस्तभाव तलवार, नगदी व मेंढरे जबरदस्तीने नेहली. तेंव्हा मातोश्री अहिल्याबाईने परगणे अंबाडच्या कमाविसदारास १८ नोव्हेंबर १७८८ रोजी आदेश देवून त्यास न्याय दिला तो असा राजश्री मार्तड खंडेराव कमाविसदार परगणे अंबाड... माझी वस्तभाव मजला देवविली पाहिजे हयाणेन त्यावरुन पत्र सादर केलें आहे तर तुम्ही ये विषयीचा मजकुर मनास आणोन उखाडी रोडा योचे वस्तुभावचा वारीसदार रखमाजी रोडगा असोन होनाजी अर्गडा यानें जबरदस्तीनें कैद मोडून वस्तभाव सुतळीच्या तोडयासुध्दा लाजकडून घेऊन याचे यास देवविणें. ये विशीचा फिरोन बोभाट येउ नये. राजश्री सदाशिव पाटील याये विद्यमानें फडशा करणे.[२२]

**६.१.५.४.२ दीर भारमलदादा होळकराविरूद्ध निकाल:**

होळकर राज्यात एखाद्या अधिकाऱ्यानेही केलेली रयतेस दंड तो जर चुकीचा असेल. तर तो तसा साक्षी पुराव्या निशी सिद्ध झाले. तर अधिकाऱ्यांनी वसूल केलेला दंड संबंधीतास परत करुन तो वसुल करणाऱ्या अधिकाऱ्यासही शिक्षा केली जात होती. जाखोजी जगताप यांनी होळकर दरबाराकडे आपल्यावर झालेल्या अन्यायास वाचा फोडण्यासाठी ता. १ सप्टेंबर १७९१ रोजी  विनंती केली. तेंव्हा अहिल्याबाईंने सर्वप्रकारची शहानिशा करून आदेश दिला की, जाखोजी जगताप मौजे वाघाडी परगणे थालनेर यांजकडील खार पेंढाऱ्यांत लुगारीस जातात, असा आरोप ठेवून जगताप मजकूरापासोन तुह्मी चारशें रूपये वसूल केले ते जमा आहेत. परंतु तपास करितां जगतापाकडे दोष नाहीं. सबब सदरहू चारशें रूपये माघारे देणें.[२३] यावरून असे स्पष्ट होते की, होळकर राज्याच्या प्रशासनात कितीही जवळच्या नात्यातील

व्यक्तिने गुन्हा वा गैरवर्तन केलेले असले तरी पण त्यास सामान्याप्रमाणेच दोषी धरून न्याय निवाडा केला जात होता. त्यामुळे त्यांनी अहिल्याबाईंकडे तक्रार करुन न्याय मागीतला साक्षी पुराव्या आधारे ते निर्दोष असल्याचे सिद्ध होताच त्यांचे चारशे रुपये परत करण्याचा आदेश दिला. त्यानुसार भारमलदादा होळकर हे मातोश्रीचे दीर होते. तरीही त्यास दोषी धरुन चारशे रुपये दंड करुन ते सरकारी खात्यात जमा केले.

**६.१.५.५ कर्जासंबंधी खटले:**

शेंदुर्णी परगण्यातील धनको महादजी रूद्र यांनी पेशव्याकडे आपल्यावरील अन्याय दूर करण्यासाठी न्याय मागितला की, आपल्या परगण्यातील गुलमंहमद आमिल राहणार शेंदुर्णी यास ६०० रुपये त्याच्या मागणीनुसार कर्ज दिलेले होते. पण त्यांनी घेतलेले कर्ज वा पैसे परत द्यावयास टाळाटाळ करीत होता असे प्रकरण पेशव्याकडे न्यायासाठी आले. यावरुन नानासाहेब पेशव्याने तेथील स्थानिक अधिकाऱ्यास आदेश दिला. गुलमंहमद आमिल परगणे शेंदुर्णी याने आपल्याकडून ६०० रुपये कर्ज घेतले व तो आता पैसे पर द्यावयास तयार नाही. यावरुन नानासाहेब पेशव्याने तेथील स्थानिक अधिकाऱ्यास आज्ञा देऊन महादजी रुद्र याचे पैसे वसुल करुन द्यावेत व त्यावरील अन्याय दूर करावा असे सांगितले होते.[२४]

१२ मे १७७३ रोजी अहिल्याबाई होळकर यांच्याकडे महादजी थिटे केंटूरकर यांचा नातू राणोजी थिठानी कर्जाची रक्कम मिळण्यासाठी विनंती केली. तेंव्हा मातोश्रीने त्याबद्दलची शहानिशी करून त्यास न्याय दिला. तो असा महादजी थिटे केंटूरकर यांजपासून कैलासववासी तीर्थरुप सुभेदार यांनी घोंडी खेरेदी करिता कर्जाउ ऐवज घेतला होता. त्यास थिटेमजकुर मृत्यू पावले. हल्ली त्यांचा नातू राणोजी थिठा महेश्वरचे मुक्कामी खात घेऊन आला. त्याचा फडशा करुन देणें.[२५]

**६.१.५.६ जाती संबंधीचे खटले:**

अठराव्या शतकात समाजात जाती व्यवस्था अतिशय कठोर होती. प्रत्येक जाती व उपजातीचे नियम, रुढी, पंरपरा व प्रथेचे समाज जीवनावर फार प्राबल्य होते. त्यामुळे त्त्कालीन राजकीय क्षेत्रातही त्याचे पडसाद उमटेलेले होते. ''प्रत्येक जातीने स्वधर्मपूर्वक वागावे, नवी चालू पाडू नये' अशी ताकीद मराठा सरकार देताना दिसते.[२६]

**६.१.५.६.१ जातीतील आहारावरुन वाद:**

जाती जातीतील व उपजातीमधील वाद होळकर न्यायालयात न्यायासाठी येत असत. अशा वेळी ते खटले संबंधीत जातीच्या सभेकडे पाठवून त्यावर न्यायनिवाडा दिला जात होता. प्रत्येक जातीचे विशिष्ट प्रकारची व स्वरुपाची बंधने, निती नियम वा संकेत असत. ती जर कायदद्याने जाणूनबुजून मोडली असतील किंवा जातीच्या परंपरेत छेद देणारे वा काळीमा फासविणारे कार्य करणाऱ्यांना सभेसमोर हजर करुन त्यास सौम्य स्वरुपाच्या शिक्षा दिल्या जात असत. डोंगराच्या प्रदक्षिणा घालावयास लावणे, भोजनाच्या पंगती देण्यास भाग पाडणे, एखाद्या

तीर्थक्षेत्रास जावून येण्यास सांगणे, किंवा आर्थिक दंड देणे अशा जातीतील वादावर शिक्षा देऊन समाजात न्यायाचे वातावरण निर्माण केले जाई. इ.स. १७६९ साली ब्राह्मण अभीर व माध्यंदिनी जातीतील आहारावरुन वाद निर्माण झाला. अभीर व माध्यंदिनी तो होळकर दरबारी न्यायासाठी आला. त्यावेळी सरकारने या वादावर आपला निर्णय याप्रमाणे दिला. आनंदराव जोशी याजवर विसाजी गणेश देशमुख परगणे चोपडे वगैरे ब्राहमण हुजूर फिर्याद जाहले जे आनंदराव जोशी प्रभुती ब्राह्मण हे अभीर असता पंक्तीचा आग्रह करितात. त्यांची आमची जात एक नव्हे. आम्ही माध्यांदिन ते अभीर आहेत. यांचा शरीर नाही. आमचे घरची आधिके जबरदस्तीने चालवीत होते. आम्ही प्राचीन गंगातीरकर या प्रांती बहुत दिवस आहे. आमचे वडिलास अभीर अपंक्त कळले नव्हते. याजकरिता पंक्तीस पुरातन बसत होते. आपणास अपंक्त ऐसे कळले त्याजवरुन आमची ज्ञात पंक्तीस घेत नाही. व त्यांचे घरी आम्ही जात नाही ते पहिल्यापासून आमच्या घरी भोजनास येतात. म्हणोन म्हणत होते. व आनंदराव जोशी म्हणत होते की, आम्ही प्रभुती समस्त प्राचीन खानदेशवासी ब्राह्मण व विसाजी गणेश व हरबाजी नाईक खाटीक कसबे सेंदूरपी व गोपाळभट वरणगांवकर वगैरे हे एक जात यजुवैदी मध्यांदीन आहो परस्पर शरीर संबंध व अन्नव्यवहार पूर्वीपासून चालत आला असता हे आम्हास अभीर म्हणून आमच्या पंक्ती व उपाध्यपणे मना केली. त्यास आम्ही अभीर नव्हते. त्याजवरुन येविशीची हुजूर मनसुबी पंचाईत मते मनास आणिता विसाजी गणेश यांजकडील गृहस्थांचे घरी आनंदराम जोशी यांजकडील वैदिक ब्राह्मणांची उपाध्यिके व त्यांच्या त्यांच्या पंक्ती पूर्वीपार चालत आल्या होत्या असे दाखले गुदरले याविशीचा संदेह राहिला नाही. हे अभीर अपंक्त असते तर त्यांच्या पंक्ती व पुरोहित पूर्वी कशी चालती विसाजी देशमुख प्रभुजी म्हणतात जे शरीर संबंध चुकोन जाहले, याचा अर्थ पाहता शरीर संबंध चुकोन कसे होतील खानदेश प्रांती अभीर नाहीत. माध्यंदीनांचे घरी यांची उपधिके व पंक्ती पुरातन चालत आहेत. त्याप्रमाणे पुढे चालतील. अन्न संबंध कोणी माध्यंदीनांनी केला तरी प्रत्यवाय नाही न केला तरी आग्रह करु नये. पंक्ती व उपाधिके चालवून सुखरुप राहणे.[२७]

**६.१.५.६.२ नरहरी रनाळकरास जाती बहिष्कृतः**

तसेच एखाद्याने धर्मातंर केलेले असेल अशाना पुन्हा आपल्या हिंदू धर्मात घ्यावयाचे असेल तर त्यास आपल्या हाताने परत घेण्यासाठी त्यास शुद्ध करुन वा प्रायश्चित देऊन घेण्याची पद्धत होती. छ. शिवाजी महाराजांनीही अशाना आपल्या धर्मात परत घेतलेले होते. पानिपतच्या रणमैदावरील पराभवानंतर अनेक हिंदूची मोठया प्रमाणात कत्तल केले. त्यापैकी काहीनी मुस्लीम धर्म स्विकारुन बरेच वर्ष त्यांच्याकडे राहिले. त्यापैकी नरहरी रनाळकर हा मुस्लीमांच्या हाती सापडल्याने त्यास धर्मांतर करुन स्वत:चा जीव वाचविला. पुढे एका दशकानंतर तो चुलत भाऊ नारो यशवंत रनाळकर यास येथील ब्राह्मणांनी जाती बहिष्कृत केलेले होते. त्यामुळे त्यांनी आपल्यावरील अन्याय थांबविण्यासाठी प्रकाशे येथील ब्राह्मणास

व यादवराव भागवत यास विनंती केली. पुन्हा महाराष्ट्रात आल्यावर पैठणच्या ब्राह्मणांनी त्यास प्रायश्चित देऊन पंक्तीव्यवहार केला. त्यामुळे या ब्राहमणांनाच जाती बहिस्कृत केल्याची आज्ञा पेशवे सरकारने दिली होती.[२८] त्यानुसार या ब्राह्मणांनी सरकारकडे शिफारस करुन शिक्षा रद्द करण्याची मागणी केली. त्यानुसार सरकारने निर्णय दिली की, 'नरहरीचा घटस्फोट करुन दायदास प्रायश्चित भोजन देउन शुद्ध करावे.' त्याप्रमाणे करण्यात आले आणि प्रायश्चित म्हणून .त्रंबकेश्वराच्या अकरा प्रदक्षिणा नारो यशवंत व त्याचा दुसरा एक चुलतभाऊ आनाजी वेंकाजी यांनी पूर्ण केल्या. सदर प्रदक्षिणा पूर्ण केल्याबद्दल धोंडी महादेव याचे साक्षपत्रही त्यांनी सादर केले होते. धर्मभ्रष्ट झालेल्या नरहरीच्या पत्नीला कृष्णातीरी वाईस नेवून तीचाही शास्त्रोक्त घटस्फोट करण्याची आज्ञा झाली होती.[२९]

**६.१.५.६.३ हरीराम व नंदराम फघडे ब्राह्मणांस जातीतून बहिष्कृतः**

तसेच एखाद्यास जातीने बहिष्कृत केलेले असेल किंवा त्यास शिक्षा दिलेली असेल अशा व्यक्तीस जर कोणी आपल्या जातीत घेतले असेल. किंवा त्यांच्याशी संबंध ठेवले किंवा त्यांस आपल्या पक्तीस घेतले असेल हा गंभीर गुन्हा समजून असे घेणाऱ्यांस सुद्धा शिक्षा केली जात होती. इ.स. १७६३ मध्ये खरगोणबत्तीसकंरानी हरीराम व नंदराम फघडे यांना एक शतकासाठी आपल्या जातीतून बहिष्कृत केलेले होते. तरीही कुकसीकर या ब्राह्मणांनी त्यास आपल्या पंक्तीत घेतले. शिवाय त्यांना कोणतेही शास्त्रोक्त प्रायश्चित न देता त्यामुळे ब्राम्हणांनी सरकारकडे तक्रार करुन न्याय मागीतला. तेंव्हा पेशवे दरबारकडून १२ मे १७६४ रोजी मल्हारराव होळकर यांना पत्र पाठवून न्याय दिला गेला तो असा की हरीराम व नंदराम फघडे वगैरे खरगोणबत्तीसीकर यांनी कुकसीकर दोघे ब्राहमण पिरजादे याचे शिष्य व त्यांचे मार्गाने चालत होते. हरीराम नंदराम यांनी आणीक पन्नासा घरांनी मिळोन त्यास पंसतीस घेतला. हरीराम नंदराम वगैरे पन्नास घरें तड जाला आहे त्यांस वव्रवणे. शास्त्रमार्गाने वर्तावयाचे न ऐकत त्यांस संख्येतपणें सांगोन शाखरीतीनें चालवणें.[३०]

**६.१.५.७ विवाह संबंधी खटले:**

विवाह संबंधी खटले ही होळकर दरबाराकडे न्याय मागण्यासाठी येत असत. त्यात पती—पत्नीचा वाद, घटस्फोटाची प्रकरणे, दुसरा विवाह किंवा पुनर्विवाहची प्रकरणे, सोयरीक जमविणे, झालेली सोयरीक मोडणे, नांदावयास न जाणे, विवाह मोडणे अशा स्वरुपाची अनेक प्रकरणे न्यायासाठी दाखल होत असत. पेशवेकाळात मराठा राज्यात अशा प्रकारचे कित्येक तंटे उद्‌भवल्याचे आणि त्यावर जातीसभा, पंचायतसभा, सरकारी अधिकारी व सरकार यांनी केलेले कामे न्यायनिवाडे केले याची उदाहरणे ऐतिहासिक कागदपत्रांमध्ये दृष्टीस पडतात.[३१]

**६.१.५.७.१ ठरलेला विवाह मोडल्याचा आरोपः**

२४७ वनमाळी शंकर दास बुऱ्हाणपूर यांच्या पुतण्याशी खुशालंचद गिरधरदास यांच्या मुलीचा विवाह ठरला त्यामुळे दोघा पाहुण्यात जाती भोजन घेऊन पुढे चार पाच वर्ष दोघेही

एकमेकांच्या घरी जाणे येणे चालू असतांना जैनाबाद येथील नथोदास किशोरदास यांनी खुशालचंदला फितवून येदलाबाद येथे नवरीसह जाऊन जातीतील कोणासही थांगपत्ता न लागू देता गुपचुप पद्धतीने विवाह लावून दिला. त्यामुळे वनमाळी यांनी विवाह जमला म्हणून मुलीच्या अंगावर काही दागिने व भेट वस्तू दिलेल्या होत्या. तसेच इतर खर्च ही केलेला होता. तो खुशालशिंगने परत देत नव्हता. त्यामुळे झालेल्या अन्यायसाठी होळकर दरबाराकडे धाव घेऊन न्याय मागीतला. त्यावेळी तुकोजीराव होळकर यांनी दि. १३ नोव्हेंबर १७७१ रोजी कमाविसदार कमलाकर भास्कर यांस पेशवे पत्राव्दारे कळवितात की, 'तुम्ही या गोष्टीची चौकशी करुन सदरहू प्रमाणे लबाडी जाहली असल्यास नवरीच्या बापापासून व नथोदास किशोरदास याजपासून मातब्बर गुन्हेगारी घेऊन हुजूर पाठविणे आणि वनमाळी शंकरदास यांस खर्चवेच जो लागला असेल तो चौकशी करुन त्यांस देणे.[३२]

### ६.१.५.७.२ नवरदेवास असाध्य रोगाची वधुपित्याची तक्रार:

पेशव्यांच्या या न्याय निवाड्यासारखाच वाद होळकर राज्यदराबारात आला इंदूर येथील माणिकचंद वाणी ओसवाल यांनी आपल्या कन्येचा विवाह नथुवाणी यांच्या ठरविला त्यानुसार सगाईचा विधीही पार पाडला. पण त्या नवरदेवास असाध्य रोग असल्याचे वधुपित्यास कळाले. तेंव्हा त्यांनी या झालेल्या अन्यायास वाचा फोडावी यासाठी तुकोजीराव होळकर यांच्याकडे ता. १ फेब्रुवारी १७७९ रोजी पत्र पाठवून दाद मागितली. खंडो बाबुराव कमाविसदार यांस तुकोजी होळकर याचं पत्र माणकचंद वाणी ओसवाल कसबे इंदूर यानें हुजूर विदित केलें की, माझे कन्येची सगाई नाथू वाणी यासी जाली. त्यास नाथूमजकुर पिन्नासाचे रोगानें बहुतच हैराण. याजकरिता त्याऐवजी सगाई रुपये घेतले असतील ते त्याचेल्यास देणें व वधू दुसरे जागा द्यावयाकरितां एक पत्र त्यावरुन हें पत्र सादर केलें असे. तरी नाथूमजकुर यास सगाईमुळे खर्च वसला असेल चौघाचे साक्षीनसी मनासआणून बाजवी ऐवजलागला असेल तो व वसतुभाव नगनगोठ असतील ते माणकचंदमजकुर याजकडोन देवून नाथूमजकुराची फारकती यास देववणें.[३३] म्हणजेच जमलेला विवाह मोडण्यासाठी व खर्च परत मिळविण्याठी लोक दाद मागत असत.

### ६.१.५.७.३ अनेक मुली पाहिल्याचा आरोप:

विवाहच्या वेळी वर मुलगा आपल्याशी अनुरूप वधु शोधण्याच्या नादात ते अनेक मुली पाहत असतात. अशाच प्रकारचा हा मोठा वाद निर्माण होवून तो न्यायासाठी होळकर दरबारात आला. मिठाराम सोनार बुऱ्हाणपूरकर याने हुजुर विदित केले की, आपल्या घरी लग्न होते. लग्नास दहाजण सोनार कुटुंबेसुद्धा आली होती. त्यास देवा चौधरीने मुकाटयाने गोपाळ मुजुमदार याजजवळ जाऊन सांगितले की, सोनाराच्या घरी मुली बहुत चांगल्या आहेत. त्यापाहण्यास आणवणे. त्याजवरुन धर्माजी गोपाळ याने आपले ढालाईत पाठविले मुली

दाखविल्या नाहीत. सबब आपणा जवळून सातशे रुपये जबरदस्तीने घेतले. म्हणोन विदीत केले.[३४] अशी तक्रार होळकर शासकाकडे करण्यात आली.

**६.१.५.७.४ पत्नीस नांदावयास पाठवित नसल्याची नवऱ्याची तक्रार:**

पत्नीच्या माहेरची मंडळी माझ्या पत्नीस नांदावयास पाठवित नाहीत म्हणून तक्रार होळकर शासकाकडे करण्यात आलेली होती. त्यावेळी अहिल्याबाईनी १३ जुलै १७८९ ला निर्णय दिला. अठराव्या शतकात आपल्या बरोबरच्या जातीतील योग्य मुलाशी वैवाहिक नाते जोडावे लागत होते. पण एखाद्या वरानी वा मुलाने वरच्या जातीतील मुलीशी विवाह केला; तर ते समाजासह घरातील व्यक्तींना सुद्धा मान्य होत नसे. तिमाजी नलावडे परगणे सुलतानपूर याने आपली पाहिली बायको वाईट मार्गाला लागलेली होती म्हणून खालच्या जातीतील स्त्रीशी मुहुर्त पद्धतीने विवाह केला होता. त्याबदल त्याच्याच घरातील मंडळींनी सरकारकडे तक्रार केलेली दिसून येते.[३५]

**६.१.५.८ अनैतिक संबंधाविषयीचे खटले:**

अनैतिक संबंधीचे खटले अठराव्या शतकामध्ये सुद्धा होळकर दरबारात येत होते. त्याचप्रमाणे अनैतिक संबंध, बलात्कार यासारखेचही गुन्हे काही प्रमाणात घडत होते.

**६.१.५.८.१ मोतीवाणीच मामीशी अनैतिक संबंध:**

इंदूर येथील चेनावणीचा मुलगा मोतीवाणी यांने आपल्या मामीशी अनैतिक संबंध ठेवले; ही बदकर्माची कहानी शहरात पसरली. तेंव्हा इंदूरचा कोतवाल कृष्णाजी धोंडदेव यांनी कमाविसदार खंडो बाबुराव ने मातोश्री अहिल्याबाईशी १५ ऑक्टोबर १७८९ रोजी पत्राद्वारे सर्ववृत्तात लिहितो. तो असा की, ...चेना वाणी याचा पुत्र मोती हा आपले मामीशी चुकला.. त्यानी मुददा कबूल केल्यावर रु १२० कोतवाल याचे विद्यमानें मोती वाणी पासून दंडाबदल घेऊन जमा केले.... वाणीमजकुराचे जातीत वर्तमान कळल्यावर त्यांनी निशेध करुन जातीबाहेर टाकिले...

तेव्हा त्यासंबंधी त्या मोतीवाणीने आपला गुन्हा मान्य केला. त्यावेळी त्यास एकशे वीस रुपये दंड ठोठावला. त्यानुसार वसूल करण्यात आला. पण काही दिवसानी मोतीवाणीने आपण निर्दोश असून आपल्यावर झालेला अन्याय दूर करावा. अशी तक्रार रखमाबाई होळकर यांच्याकडे केली. त्यावेळी कमाविसदार चौकशी करतो व मातोश्रीना कळवितो की, मामीसी बदकर्म केले. म्हणून जात म्हणजी कीं पंगत कर मग जातींत घेऊ. असे दंडाचे वर्तमान मोतीवाणीशी कळल्यावर त्यास त्याच्या जातीने त्याला जातीबाहेर टाकले आहे. म्हणजेच मामीशी बदकर्म केल्यामुळे जातीने त्यास शिक्षा म्हणून पंगत घालण्यास सांगितले आहे. पंगत घातली तरच जातीत घेऊ असे जातीचे मत होते. पण मोतीवाणीने खर्चाच्या धास्तीने उलट त्याने मुळ गुन्हाच मान्य नसल्याचा पवित्रा घेतल्यामुळे रखमाबाईकडे पुन्हा तक्रार आली. तेंव्हा त्यांनी परत पत्र लिहितात की, ध्यानास आणून वाटे लावणे. कमाविसदारांनी सखोल चौकशी

करुन रखमाबाई मासाहेबांना कळवितो की, गोष्ट मिथ्या आहे. त्यास आठ महिने गोष्ट मिथ्या झाली नाही; जातीने जेवणावळ मागितल्यावर आतां फितूर करून परत रूपये मागतात. आज्ञा आल्यास रूपये श्रीमंत राणीसाहेबांस रूपये देऊ..[३६] म्हणजेच मोतीवाणी आपला गुन्हा अमान्य करुन दंडाची रक्कम परत मागत आहे. आपण यासंदर्भात योग्य तो आदेश करण्याची विनंती केली. या खटल्यावरुन असे स्पष्ट होते की, अशा गुन्हेगारास सरकार तर शिक्षा देतेच शिवाय जातवाले ही त्यास शिक्षा देतात. म्हणजेच एका गुन्ह्यासाठी दोन्हीकडून शिक्षा भोगावी लागते.

**६.१.५.८.२ देशपांडेपणाचे वतन जप्तः**

मौजे चांगदेव परगणा एदलाबाद येथील शंकर पांडया गुजराथी यांच्या बायकोशी मल्हार दिनकर देशपांडे यांनी बदकर्म करून पांडयास ठार केले. अशा दुहेरी गुन्ह्यात सापडलेल्या मल्हार दिनकर देशपांडे यांचे देशपांडेपणाचे वतन जप्त केल्याचा निर्णय देण्यात आला होता. तसेच त्याला सहकार्य करणाऱ्या दतु चौधरी चांगदेवकर आणि शिवाजी कोळी याचा मुलगा या दोघांना अनुक्रमे १००० व ५०० रुपये दंड न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांनी ठोठावला होता.[३७] या खटल्यावरुन असे स्पष्ट होते की, होळकर शासकासह मराठे शासक सुध्दा बदकर्म व खूनाच्या गुन्हेगारास सरकारी पदावर ठेवत नसत.

**६.१.५.८.३ हरी आमईदासचे बदकर्माचे कृत्यः**

तसेच सुलतानपूरच्या हरी आमईदास यानीही असेच बदकर्माचे कृत्य केलेले होते. त्याची तक्रार होळकर शासकाकडे आली तेंव्हा त्यांनी गुन्हा मान्य केल्यामुळे त्यास १०५ रूपये दंडाची शिक्षा देण्यात आली.[३८] होळकर शासक हे गुन्हेगारास माफ न करता त्यास त्याच्या गुन्हयानुसार शिक्षा देत होते.

**६.१.५.८.४ रेवदास रतनजींच्या सुनेवर बदकर्माचा आरोप**:

नंदूरबार परगण्याचा कमाविसदार यांच्याकडे नंदूरबार येथील हरिदास नानाजी साकिले याने होळकर शासकाकडे तक्रार केली की, काही काळापूर्वी रेवदास रतनजी यांच्या सुनेवर बदकर्माचा आरोप आला होता. त्यावेळी अंदाजे दिडशे रुपयाचे दागिणे माझ्याकडे देऊन बदकार्माच्या गुन्हाचा फडशा करावयास सांगितला होता. असा आरोप देवदास आणि त्याचा मुलगा रणछोड यांनी माझ्यावर केला असून तशी तक्रार ही सरकारकडे केली आहे. म्हणून होळकर सरकारने माझ्याकडे चौकशी केली आहे. पण माझ्याजवळ एक पैशाचे देखील वस्तू दिलेली नाही. असे शपथपूर्वक सांगतो. जर देवदासचे म्हणणे खरे असेल, तर त्याने कचेरीत सर्वासमोर किंवा बालाजीच्या मंदिरात डोईवर तुळसी घेऊन सत्य स्मरुन सांगावे. दहा रात्रीत काही नुकसान देवदास याचे नाही झाले तर वस्तूंची किंमत देण्यास आपण तयार आहोत.[३९]

**६.१.५.९ गावा—गावातील संघर्षः**

मध्ययुगीन काळात होळकर राज्यकर्त्याकडे दोन किंवा तीन गावा—गावातील भांडणे, दोन गावातील हद्दीवरुन, पाणी वाटपावरुन किंवा इतर अनेक कारणावरुन संघर्ष होत असत.

अशा वेळी शेजारील गावाचे देशमुख, पाटील व इतर वतनदार यांची पंचायत किंवा गोतसभा भरवून साक्ष व लिखित पूरावे पाहून न्याय निवाडा केला जात असे. खटल्यात संबंधीत गावच्या महाराची साक्ष महत्वाची मानली जात होती.

**६.१.५.९.१ एरंडोल व जलोद गावाचा सिमावादः**

तसेच मौजे कटारी परगणे एरंडोल व मौजे साखरे परगणे जलोद या दोन गावात सिमा वाद सुरु झाला. त्यात साखरे गावातील लोकांनी कटारी गावच्या पाटलास ठार केले. अशी तक्रार होळकर दरबारात दाखल झाली. तेव्हा होळकर दरबाराकडून ३१ ऑक्टोंबर १७३४ रोजी त्यावर निर्णय दिला. ...तुम्ही हरदुवाद्यांस आणूस यांचा त्यांच्या करीना भोवरगाव जमीनदार दोन्ही महालचे मेळवून कोणहाची रुईयात न करीता वाजवी मनास आणून विल्हेस लावणे व खून केला आहे. याजकरीता गुन्हेगारी घेणे व मसाला सरकारचा जासुदास देऊन हुजूर पाठविणे.[४०]

**६.१.५.९.२ सेजवे परगण्याच्या सिमेजवळील पडीक जमिनीचा वादः**

मौजे सेजवे परगणे नंदूरबार गावातील शिवशंकरदास देसाई व कानुनगो यांच्या पाटीलकी होती. खाडदे गावाच्या सिमेजवळ सेजवे गावची पूर्वी पासून काही जमीन पडीक स्वरुपात होती. त्या सेजवे गावच्या जमीनीवर वेलावद व खाडदे या दोन गावच्या गावकऱ्यांनी ताबा घेतला. तेंव्हा सेजवे गावच्या शिवशंकर दासने होळकर सरकारकडे या जमीनीचा ताबा मिळावा यासाठी न्याय मागीतला. त्यावेळी सुभेदार तुकोजीरावांनी नंदूरबारचा कमाविसदार वामनजी पाटील यास १ जुलै १७८० ला पत्र पाठवून आदेश दिला की 'संबंधीत गावांचे व भोरगाव वगैरे ठिकाणचे पाटील आणि संबंधीत गावचे बारा बलुतेदार जमवून पंचाईत करावी व पंचायतीच्या मताने ज्याची सिव खरी होईल त्यांच्याकडे द्यावी. जर कोणी अडथळा आनला तर त्याला निक्षूण ताकिद करावी.[४१]

**६.१.५.९.३ मुलठाण गावच्या जमिनीचा संघर्षः**

गावा—गावातील संघर्ष वेगवेगळया स्वरुपात येत असत. तेंव्हा त्याच्यावरचा कायमचा उपाय करण्यासाठी इ.स. १७९३ मध्ये खामखेडा गावच्या तिलोकचंद कानुनगोने भारमल होळकर यांना एक पत्र पाठवून कळविले. मौजे मुलठाण वे हिरापूर प्र. कसरावदवाला ने आपना आठ गांव को काकड दाबो छे ! तेको झगडो श्रीमंत मातोश्री के अराबरे हुवो थो, यहा सरमण्डल वे सरकानूनगो सरकार बिजागडवाला येख हा हुआ था, पर मुलठाणवाला ना कोई बात मानी नाही. तब ये पंचोला सुधा हकीकत मेहेसर मों श्रीमंतजी ने कही की गउठाण रहण देवो. जब फडचा होवेगा तब खेडा जावेगा. तीस पर अपने यहाॅ बखेडा पडा, है तब से इन पडी जमीन हालकर पेरणे कु लगे मुलाठाण वाले बत हमने दो बखत साणे आदमी भेजकर दुहाई दे भेजी की जो जमीन पडी है उसमो आवत चलावोगे तो तुमकु दुहाई है सो दुहाई को मानी नही दुहाई तोडकर पेरणेकु लगे तव हमने आवत छोडय दिये है...[४२] यावरुन असे दिसून

येते की, या वादातील जमीन पडीत ठेवावे असे मातोश्री अहिल्याबाईंनी न्याय दिला असतांना सुद्धा मुलठाण गावकऱ्यानी बळजबरी ती जमीन केली. म्हणजेच यांना न्याय मान्य केलेला नव्हता.

**६.१.५.९.४ पाणी वाटपाचा प्रश्न:**

मध्ययुगीन काळात होळकर राज्यात दोन गावातील पाणी वाटपाच्या प्रश्नावरून संघर्ष होत असत. मौजे जापी परगणे सोजगीर सरकार अशरे आणि मौजे निंबखेड परगणे सोनगीर या गावात पांझरा नदीच्या पाटाच्या पाण्यावरुन वाद निर्माण झाला. त्यावेळी हे प्रकरण होळकर दरबारात न्यायालयात असताना परस्पर दोघेही श्री. एकवीरा भवानी वास्तव्य मौजे देवपूर परगणे लळींग येथे तिर्थस्थाने करुन देवालयात श्रीचा अंगारा लावून लेखी साक्ष घेण्यात आल्या होत्या त्याची सविस्तर तपशीलवार माहिती १३ जून १७७२ च्या नोंदीतून मिळते.[४३]

**६.१.५.१० चोरीसंबंधीचे खटले:**

अठराव्या शतकात ही होळकर राज्यात चोर राज्यातील रयतेची दागिने, अमुल्य वस्तू, धान्य व इतर साधन संपत्ती, बैल व इतर जनावरे चोरणे अशी गुन्हे वाढत जावून ते चोऱ्या करीत असतांना त्यांच्या हातून खून ही होऊ लागले. तेंव्हा त्यांना आळा घालण्यासाठी कठोर शासन करण्याची जबाबदारी स्थानिक अधिकाऱ्यांवर सोपविलेली होती.

**६.१.५.१०.१ शेतकऱ्याचे बारा बैल चोरी प्रकरण:**

२५२ इ. स. १७६३ मध्ये कसबे व पिंपळगाव बसवंत परगणे चांदवड येथील गंगाधर यशवंत शेतकऱ्याचे बारा बैल रात्रीच्या वेळी चोरी गेले. त्याचा तपास पिंपळगावच्या बाबाजी कोळी याने करुन त्यांचा माग काढून मौजे कुसुंबे गावचे बुधा व भिकारी कोळी यांनी चोरी केल्याचे निष्पन झाले. मालेराव होळकरांनी मौजे कुसुंबे येथील मोकादमास पत्र पाठविले. ‘कोलीयांसी ताकीद करुन सरकारचे खासबारदार व ढालायेत पाठविले आहेत. त्यांचे स्वाधीन बैल बारा करणे. ये वीशी फिरोन बोभाट आलिया तुमचे व कोळी याचे पारपत्य करुन बैलाचा निकाल करुन घेतला जाईल. बुधा व भिकारी हे दोघे गावावरुन गैर हजीर जाले तर तुम्हास जाब करावा लागेल. बैल तुम्हापासोन घेतले जातील. जाणीजे. असा सक्त आदेश देण्यात आला.[४४]

यावरुन असे स्पष्ट होते की, चोरास शिक्षा केलीच शिवाय त्या गावातील पाटलांना दक्ष राहण्याची ताकीद दिलेली होती.

**६.१.५.१०.२ होळकरांच्या पागेचा घोडा चोरीस:**

एका चोराने होळकरांच्या पागेचा घोडा चोरुन नेला. हा घोडा पागेत बांधलेला असताना ही चोरी केलेली होती. पण त्या घोड्यावरचे जीन, गाशा व सतरंजी सापडली या चोराचे सविस्तर वृत्तांत निळकंठ राघो व खंडेराव निळकंठ यांनी मातोश्री अहिल्याबाईंना पाठविलेल्या दोन्ही पत्र स्पष्ट होते. सरकारचे पत्र व जासूद जोडी कृपा करून पाठवू घोडा देवीतील तर

उत्तम आहे. घोडा त्यास जिरणार नाही सरकार हुजूर पागेचा घोडा आहे. व जिन्नस त्या घोडयाचा जिन त्याचे येंथे आहे व घोडा चोराही नेला म्हणतात...[४५]

**६.१.५.१०.३ शेतातील धान्याची रास चोरीस:**

परगणे नंदूरबार येथील विश्राम चोधरी मौजे दुधाले यांच्या शेतातील धान्याची रास चोरीस गेल्याची तक्रार करण्यात आली. तेथील अधिकारी हवलदाराचे म्हणने होते की, स्वत: विश्राम चौधरीनेच ते धान्य घरी नेले आहे. जर त्याच्या घरी धान्य सापडले तर त्याचा तोच गुन्हेगार ठरेल... माझ्याकडे दोष असल्यास मी गुन्हेगार आहे असे कबुल करीन.[४६]

मल्हारराव दुसरे यांच्या कारकिर्दीत त्यांचा माजी दिवाण तात्या जोग यावर गणपतरावांनी तुळसाबाईच्या काळात होळकरांच्या सरकारी जवाहरापैकी काही जवाहिर लंपास केले आहेत असा आरोप ठेवून त्यास कैदेत ठेवले. त्यास कैदेत दोघा पती—पत्नीचा छळ होत असल्याचे २७ मार्च १८१७ रोजी वेलस्ली या इंग्रज अधिकाऱ्याने मेटकाफला कळविलेले होते.

**६.१.५.११ मारामारीचे खटले:**

मध्ययुगीन काळात होळकर राज्यात काही प्रमाणात मारामारीचे प्रकरणे घडत होती. त्याही प्रकारच्या खटल्यावर होळकर शासकाकडून न्यायदान केले जात होते.

**६.१.५.११.१ महार जातीच्या इसमास हाणामारीचे प्रकरण:**

होळकरशाहीमध्ये मारहाण केलेल्या तक्रारी सोडविण्याची जबाबदारी स्थानिक अधिकाऱ्यांची असे. मौजे म्हसावाद परगणे सुलतानपूर गावातील मोकदमाने एक महारास खूप हाणामारी केली. तेंव्हा त्या महारानी त्या मोकदमाची तक्रार होळकर शासकाकडे केली. त्यावेळी या प्रकरणाचा न्यायनिवाडा करण्यात आला त्यानुसार त्या मोकदमास १० रुपये दंडाची शिक्षा करण्यात आली.[४७]

**६.१.५.११.२ शहादेकर गावातील बायकांचे भांडण:**

विष्णुराम ब्राह्मण शहादेकर यांनी गावातील काही बायकांशी भांडण करुन मारहान केली. त्या महिलांनी त्या ब्राह्मणाविरुद्ध तक्रार करुन न्याय मागीतला तेंव्हा त्या विष्णुराम ब्राह्मण शहादेकर याने बायकांशी भांडण करुन मारहाण केल्याबददल त्याच्याकडून ५० रुपये दंड घेण्यात आल्याची नोंद मिळते.[४८]

**६.१.५.११.३ हांडीया गावाच्या दोन बायकातील भांडण:**

हांडीया गावातील मुरारभट गुमास्ता यांची कुणबीण व केदार भट व्यास यांची बायको नदीवर पाणी आणण्यासाठी गेल्या असता दोघींच्या घागरीची अदलाबदल होवून भांडणे करुन घरी परतल्यावर केदार भटाचे पत्नी पुन्हा पाणी आणण्यासाठी नदीवर जात असतांना मुरारभवानी यांच्या बायकोने तिच्याशी भांडण करुन शिवीगाळ केली. त्यामुळे केदार भटाच्या

बायकोने स्वत:च्या कपाळास दगडाने इजा करुन घेतली व त्यानंतर तो देशमुखांकडे जाऊन वृत्तात सांगितली त्यावर देशमुख म्हणाले.'तु त्याचे घरी जावून चित्तास येईल ते करणे.'[४९]

तेंव्हा केंदार भटाच्या पत्नीने रागाच्या भरात मुरारभवानीच्या घरी जाऊन मी जीव देते म्हणून लागली. तेंव्हा मुरारभवानीच्या बायकोने व मुलाने केशरभटाच्या गरोदर पत्नीस काठी व पायपोसाने मारल्याने ती त्यात मृत्यू पावली. त्यामुळे केदारभट न्याय मागण्यासाठी कमाविसदार नोरो बल्लाळकडे गेले. तेंव्हा त्यास त्यांनी न्याय देण्यास टाळाटाळ करुन पेशव्याकडे जाण्याचे सुचविल्याने ते पेशव्याकडे न्यायासाठी असता पेशव्यांनी कमाविसदारास सक्त ताकीद दिली की, कोणताही पक्षपात न करता चौकशी करावी आणि मुरारभवानीकडे अपराध निघाल्यास मातबर पारपत्य करुन गुन्हेगारी घेऊन सरकारकडे पाठवावी. जर या प्रकरणाचा तेथे निकाल लागला नाही तर वादी—प्रतिवादीस जासुदाबरोबर दरबारात पाठवून द्यावे.[५०] या घटनाक्रमावरुन असे स्पष्ट होते की, अगदी किरकोळ कारणावरुन सुरु झालेल्या भांडणाचे पूनर्वसन खूनापर्यंत गेले. तसेच पेशव्यांचे अधिकारी ही जबाबदारी घेण्यास टाळाटाळ करत असल्याचे दिसून येते.

**६.१.६ न्याय व्यवस्थेत साक्षी पुराव्याचे महत्व:**

पेशवे काळात न्यायदानाची प्रक्रिया न्यायालयास मजलिस असे म्हणटले जाई. मजलिसच्या अध्यक्षाला 'सभानायक' असे म्हणत. ही मजलिस जर परगण्यात बोलावली गेली तर तिचा अध्यक्ष हा देशमुख असे. जर ही मजलिस खेड्यात बोलावली किंवा भरविली असेल तर त्यांच्या अध्यक्षास 'मोकादम' असे म्हणटले जाई. व जर ही मजलिस कसब्यात भरविली असेल तर त्याचा अध्यक्ष 'शेटे' हा असे. यातील न्यायदानाचे परिक्षण करण्यासाठी एक विशेष अधिकारी नेमला जाई. त्यावेळी पेशवे काळात पुणे, पैठण, नाशिक, सातारा व पाली इत्यादी ठिकाणीचे न्यायदान हे त्यावेळी प्रसिद्ध होते. येथे मिळालेला न्याय हा दोघेही मान्य करीत असत.

एखाद्या खटला दाखल झाल्यानंतर तो खटला कोणाच्या अखत्यारीतील आहे. ते तपासून त्या त्या सभेकडे पाठविला जाई. वादी—प्रतिवादी आपले म्हणने न्यायालयासमोर लेखी स्वरुपात मांडत असत. त्यास 'तकरीर' असे म्हणत असत. दोन्ही पक्ष एकमेकांच्या आरोप प्रत्यारोपास उत्तर देत असत. त्यास 'पुरसीस' म्हणटले जाई. दोन्ही पक्षाच्यांही बाजू ऐकूण न्यायालय आपला निर्णय महजरच्या स्वरुपात दिला जाई. त्या महजरवर सर्व न्यायादान करणाऱ्यांची नावे व पद यांचा उल्लेख असे.[५१]

स्वराज्यात न्यायादानाचे सर्वोच्च अधिकार छत्रपतीकडे होते. छत्रपतीची न्यायव्यवस्था ही छत्रपती शाहू महारांजापर्यंत बहुअंशी तशीच होती. पेशव्याच्या कारकिर्दीमध्ये न्यायदानासाठी स्वतंत्र न्यायाधीश नियुक्त केला जाई. हा न्यायाधीश न्यायदानाबाबत सर्वाधिक अधिकार असणारा न्यायदंडाधिकारी होता. ते दिवाणी व फौजदारी खटल्याचा न्याय निवाडा करण्याचे

अधिकारी होते. रामशास्त्री प्रभुने हे ख्यातनाम व कठोर दंड देणारे न्यायाधीश म्हणून प्रसिद्ध होते. पेशवे काळात न्याय पद्धतीची उत्तरंड होती.

फौजदारी गुन्ह्याचे निर्णय करण्याचे अधिकारी छत्रपतीकडून पेशव्यांना मिळालेले होते. पुण्यात जे हुजूर न्यायाधीश नेमले असत. त्यानाही फौजदारी खटल्यात निर्णय देण्याचे अधिकार देण्यात आलेले होते. तर फौजदारी मामले खेड्यात पाटील तर जिल्ह्यामध्ये मामलतदार व प्रातांत सरसुभेदारांकडे देण्यात आलेले होते. म्हणजेच पेशवे काळातमराठी साम्राजाचे पेशवे हेच न्याय क्षेत्रातील सर्वोच्च न्यायाधीश होते.

सुभेदारास जर मुतालिकचा शिक्का मिळालेला असेल तर त्यालाही न्यायदानाची अधिकार मिळत असत.[५२] पेशवेकाळात फौजदारी खटल्याचा निकाल हा तत्कालीन रुढी पंरपरा रितीरिवाज व चालीरीती यांचा सारासार विचार करुन न्याय निवाडा केला जात होता. पेशवाई मध्ये रामशास्त्री प्रभूणे, बाळकृष्ण गाडगीळ अयाशास्त्री, बाळशास्त्री दिक्षीत या सारखे महान न्यायाधीश होवून गेले. कारण यांचा नि:पक्षपातीपणा, नि:स्पृहपणा व उच्च दर्जाचे चारित्र हे गुण त्यांच्या अंगी होते. रामशास्त्री प्रभुणे यास दोन हजार वार्षिक तनखा व एक हजार पालीख तसेच एक हजार श्रावणमास दक्षिणा या सवलती दिल्या जात होत्या.[५३] सुभेदार मामलेदार, कमाविसदार, या ही अधिकाऱ्यांना आपापल्या स्तरावर न्यायदानाचे कामकाज सांभाळावे लागत होते. वादी व प्रतिवादी यापैकी कोणाचे जर समाधान झाले नाही तर, त्यास न्यायासाठी वरीष्ठ न्यायाधीशांकडे दाद मागता येत होता. त्यानुसार पेशवे माधवराव यांच्याकडे सारंगखेडचे केसरसिंग राऊळ यांच्यावर सुभेदार मल्हारराव होळकर यांचे नातु मालेराव यांनी या गावातील राऊळकीच्या वतनावर न्याय देताना अन्याय झाला म्हणून त्यांनी पेशाव्याकडे न्याय मागितला. तेंव्हा पेशवे माधवराव यांनी सुभेदार मल्हारराव होळकर यांना १७ नोव्हेंबर १७६५ रोजी पत्र पाठवून योग्य तो न्याय करण्याचे कळविले ते असे केशरीसिंग राऊळ कस्बे सारंगखेडे परगणे सुंलतानपूर यानी विदित केलें की आपली भावजई फत्तेसिंग राऊळाची स्त्री गृहकलहामुळे मालवाजवळ फिर्याद गेली. त्यास न्याय मनास न आणितां सरदारांनी आपले राऊळकीचें वतन जप्त केलें आहे हयाणून. तरी याचा इन्साफ न पाहता परगणे मजकूरचे अंमलदाराही जप्त केले असेल याजकरिता पत्र लिहिलें असे. तरी आपण येविशीची ताकीद करुन इनसाफ करावा आणि वतनास वारीस असतां जप्त करावें ऐसं नाही, सुदामत मनास आणून वाजवी असेल तसें चालवावें व निवाडा करावा जाणिजे.[५४] यावेळी मल्हारराव बुलंदेखंडात मोहिमेवर होते. तो राऊळीचा वाद नातू मालेराव यांनी सोडविला. पण तो अन्यायी केसरीसिंग राऊळने पेशव्याकडे न्याय मागितला. तेंव्हा पेशव्यानी योग्य तो न्याय देण्याचे कळविलेले होते. म्हणजेच मराठा राज्यात अठराव्या शतकात सरंजामी पध्दतीचा स्विकार करून अनेक सुभेदार व सरंजामी सरदार उदयास आले. त्यांना त्यांच्या स्तराव

न्यायदानाचा अधिकार देण्यात आलेला होता. पण अंतिम न्याय मात्र पुण्याचे पेशवे यांच्याकडे मागण्याचा अधिकार होता हे यातून स्पष्ट होते.

वतनसंबंधीच्या खटल्यात तर मागील अस्सल सनदापत्रे, आज्ञापत्रे, निवाडापत्रे सादर केल्याशिवाय पानही हालत नसे. काही प्रसंगी अस्सल कागदपत्रे न मिळाल्यास नकलांनाही पुरावा म्हणून गृहीत धरले जात होते. साक्ष ही गावातील प्रतिष्ठीत नागरीक, जुने बुजूर्ग व्यक्ती, अलुतेदार व बलुतेदार याचा समावेश होता. साक्षीदार हे देवळासमोर, नदीच्या पात्रात हातात पाणी घेऊन किंवा बेलपत्र, तुळशी पात्र, धान्य हाती घेऊन शपथपर्वक साथ देत असे. [५५]

एखादी व्यक्ती पवित्र नदीत उभे राहून, देवावरील भंडारा, गुलाल, फुले, बेलपत्र, वगैरे हाती घेऊन सत्यच बोलतो यावर मध्ययुगीन समाजाचा त्यावर पूर्ण विश्वास होता. खोटी साक्ष दिल्यास आपल्या पूर्वजांच्या कित्येक पिढ्या नरकात जातील अशी साक्षीदाराची भावना होती. जर साक्षी पुरावे नसतील तर दिव्य करण्याचा प्रघात होता. ते कोणते, कुठे, केंव्हा, कोणी व करावे हे सर्वानुमते ठरविले जाई. रात्री पाण्यात उभे राहणे, देवळात कासवावर उभे राहून सत्य सांगणे, तापलेल्या तेलातून नाणे किंवा अंगठी काढणे, तप्त सळईवरुन हात फिरवणे, दिवा हातात धरुन न विझता नेणे, लोखंडाचा तप्त गोळा हातात घेऊन मंदिराभोवती प्रदक्षिणा घालणे इत्यादी प्रकारची दिव्य केली जात असत.[५६]

**६.१.७ प्रत्यक्ष न्यायदान व्यवस्थाः**

आपल्या अखत्यारीतील जनतसे योग्य न्याय देणे हे मध्ययुगात तत्कालीन राजे महाराजे व राज्यकर्त्यांचे पहिले कार्य असते. अठराव्या शतकात राजे महाराजे हे न्यायदान करताना धर्मशास्त्राचा आधार घेवून न्यायाचे पवित्र कार्य करीत असत. छ. शिवाजी महाराजांनी न्यायदानाच्या बाबतीत कठोर धोरणांचा अवलंब केलेला होता. त्याच न्यायपद्धतीचा स्विकार पुढे पेशव्यांनी अवलंबविलेला होता. पण या काळात लिखित स्वरुपाचे स्पष्ट असे कोणतेच कायदे अस्तित्वात नव्हते. विविध धार्मिक ग्रंथांच्या आधारावर न्यायनिवाडा केला जात असे. मराठयांच्या प्रशासनात, राज्यकारभारात व महसूल व्यवस्थेत जशी मुस्लीम सत्ताधीशांच्या यंत्रणेचा प्रभाव होता. त्याच प्रमाणे पेशव्यांच्याही काळात तेच प्रशासन थोडेफार बदल करून स्विकारलेले होते. हिंदू धर्म शास्त्रातील संकल्पना, नियम व इतर बाबीच्या आधारावर न्यायदान आढळून येते. हिंदू धर्मशास्त्रातील मनुस्मृती, मिताक्षरा, व्यवहारमुख, दान कमलाकर, चतुर्वर्गचिंतामणी व पराशरमाधवीयम या धर्म ग्रंथांच्या आधारावर आधारलेली न्यायदान पद्धती रुढ होती.

स्वराज्यात न्यायादानाचे सर्वोच्च अधिकार छत्रपतीकडे हेते. छत्रपतीची न्याय व्यवस्था ही छ. शाहू महारांजापर्यंत बहुअंशी तशीच होती. पेशव्याच्या कारकिर्दीमध्ये न्यायदानासाठी स्वतंत्र न्यायाधीश नियुक्त केला जाई. हा न्यायाधीश न्यायदानाबाबत सर्वाधिक असणारा

न्यायदंडाधिकारी होता. ते दिवाणी व फौजदारी खटल्याचा न्याय निवाडा करण्याचे अधिकारी होते. रामशास्त्री प्रभुने हे ख्यातनाम व कठोर दंड देणारे न्यायाधीश म्हणून प्रसिद्ध होते. पेशवे काळात न्यायपद्धतीची उत्तरंड होती.

**६.१.७.१ सामुहिक निवाडा:**

शिवकाळ व पेशवे काळात मराठा न्यायव्यवस्थेत सामुहिक निवाड्यास महत्व होते. त्यासाठी शिवकाळापासून छ. शाहू महाराजांपर्यंत गोत सभेस महत्वपूर्ण स्थान होते. गोत सभेचे तीन विभाग पडतात.

**६.१.७.१.१ पंचायत:**

पंचायत पद्धती ही अठराव्या शतकात मोठया प्रमाणात सर्वत्र वापरली जाणारी व सर्वात प्रभावी असणारी पंचायत न्यायव्यवस्था होती. मराठा राज्यात सर्व सरदाराच्या राज्यात मोठया प्रमाणात वापरली जायची त्याप्रमाणे ती होळकर राज्यात ही मोठी प्रचलित पद्धत होती. या पंचायत न्याय पद्धतीचा विकास खऱ्या अर्थाने नाना साहेबांच्या काळात मोठया प्रमाणात झाला. ती पद्धत इंग्रजांची सत्ता येई पर्यंत चालू होती.

कै. वासुदवे खरे नाना फडणीसांच्या चरित्रात लिहिले आहे की, पेशवाईमध्ये अत्यंत महत्वाची संस्था म्हणजे पंचायत ही होय. पेशवे काळात गाव पातळीवर पंचायती पासून पुणेराजदरबारातील सर्वोच्च पातळीपर्यंत न्यायदानाची व्यवस्था चालत होती. पेशवाई काळात स्थानिक पातळीवर न्यायादानाचे काम करणाऱ्या संस्था म्हणजे पंचायत, गोतसभा ब्राह्मणसभा व जाती सभा या होत्या.[५७]

या पंचायतीची सभा गावातील पारावर मंदिरात किंवा सार्वजनिक ठिकाणी बोलावली जायची या पंचायतीच्या सुनावणी अगोदर राजीनामे दोन्ही पक्षाकडून लिहून घेतले जायचे म्हणजेच पंचायचा जो निर्णय असेल तो मला मान्य आहे असे लेखी घेतले जाई तसेच त्यानंतर पचांयत दोन्ही बाजूचे वादी प्रतिवादीचे म्हणणे ऐकूण घेवून साक्षीपूरावे तपासून त्यांच्या जबान्या होवून सारासार विचार करुन पंचायत आपला निर्णय देत असे. त्यावर सरकारी अधिकाऱ्याची सही घेतली जायची.[५८]

यात गावातील प्रतिष्ठीत लोकांचा समावेश होत होता यात पाच पेक्षा अधिक पंच म्हणून काम पाहत यांच्या निर्णयावर अंतिम सही करण्याचा अधिकार स्वत: छत्रपती पेशवा / सुभेदार / कमाविसदार / इतर अधिकारी पाच अधिकार होता. परगणा गोतसभा या सभेस किती सदस्य असावेत याचा निश्चित नसली तरी येथे येणाऱ्या खटल्याच्या स्वरुपावरुन त्यांची संख्या ठरविली जात होती. ही सभा चावडी वेस अशा सार्वजनिक ठिकाणी बोलावली जात होती.

### ६.१.७.१.२ ब्राह्मसभाः

ब्राह्मसभा ही प्रामुख्याने धार्मिक कार्यातील वादावर न्यायदान देणारी संस्था होती. ब्रम्हणसभा म्हणजे विदवान ब्राम्हणांची सभा म्हणून ओळखली जाते. या सभेचे सदस्यत्व हे वैदिक शास्त्राचे सखोल ज्ञान असणाऱ्या ब्राम्हणांचा समावेश होता. या सभेत विद्‌वान ब्राह्मणाचा समावेश होत होता. यातील प्रमुखास धार्मधिकारी म्हणत असत. या अधिकाऱ्यास पेशव्याकडून धर्माधिकारी पदाचे वतन दिले जात असे. या ब्राह्मसभेतील सर्व सभासद तज्ञ, प्रामाणिक व निःस्वार्थी वृत्तीचे असत. ते संबंधित व्यक्तीचा आचार, व्यवहार व धर्म यांचा मागोवा घेवून न्यायदान करीत या कार्यात मिमांसक, जोशी, पूराणीक व धर्म शास्त्रात तज्ञ असणारे विद्‌वान ब्राह्मणांचा समावेश असे.

ब्राह्मणसभा या खास करुन तीर्थक्षेत्री न्यायदानाचे कार्य करीत होत्या. नाशिक, पैठण, कोल्हापूर, पुनतांबे, वाई महाबळेश्वर व पंढरपूर अशा ठिकाणी अस्तित्वात होत्या.[५९]
त्या अशा सार्वजनिक ठिकाणी म्हणजे भरविली जात होती.

### ६.१.७.१.३ जातीसभाः

भारतातील प्रत्येक जातीची स्वतःची विशिष्ट असे नियम वा बंधने असतात ते जातीचे नियम पाळले गेले नसतील तर अशा एखाद्या गुन्ह्यासाठी जात सभा भरविली जावून त्यात परंपरागत नियमाचा व धर्मशास्त्राच्या आधारावर आपल्या जातीतील वादावर न्याय निवाडा करण्योच कार्य करीत असत.

जाती सभा ही जाती जातीतील वाद मिटविण्यासाठी सोडविण्यासाठी निर्माण झाल्या. प्रत्येक जातीसाठी स्वतंत्र जात सभा होती. आपल्या जातीचे नियम अलिखित व वेगवेगळ्या स्वरुपाचे होते. ते नियम रुढी परंपरेने चालत आलेल्या प्रथेप्रमाणे चालतात की नाही हे पाहण्याचे कार्य करते. जो व्यक्ती वा समुह हा बंधने तोडण्याचा प्रयत्न केल्यास त्यास दोषी असेल तर त्यास शिक्षा देण्याचे कार्य ही सभा करते आजही अशा जात सभा महाराष्ट्रात सोनारी जेजुरी, मठी अशा यात्रेच्या ठिकाणी भरविल्या जात होत्या त्यावर या जातसभेचे स्वरुप समजून येते.

### ६.१.७.१.४ गोतसभाः

परगण्याच्या न्यायदान व्यसस्थेमधील गोतसभेत देशमुख, देशपांडे, शेटे, महाजन, मोकादम, पाटील, मिरासदार, उपरी यांचा समावेश असे. आर्थिक प्रकरणे, सार्वजनिक शांततेची प्रकरणे, महसूल वसुलीसंबंधीचे वाद, वतन सबंधीच्या तक्रारी व अन्य न्यायालयीन खटल्यांचा न्याय हा परगणा गोतसभेमार्फत निकाल दिला जात होता. गोतसभेत परगणा, कसबा व खेडेगाव यास्तरावर न्यायदान केले जात होते.[६०]

कसबा किंवा पेठ गोतसभेत देशमुख, देशपांडे, शेटे, महाजन, पाटील, चौगुला, बलुतेदार व इतर काही मंडळीचा कसब्याच्या गावातील न्यायनिवाडयात सहभाग असे. तर

पेठेच्या गावात महाजन, सोनार, शिंपी, ठाकूर, आवटी, माळी, जीनगर, तेली, सुतार, लोहार, ज्योतिषी, न्हावी, गुरव वगैरेंचा गोतसभेच्या सदस्यात समावेश असे.

**६.१.८ शिक्षेचे प्रकार:**

न्यायालयामुळे साक्षीपुरावे द्यावे लागत असत. लिखित कागदपत्रे, भोगवटा प्रमाणपत्र, वतन, इनाम दिल्याचे पत्र व प्रत्यक्ष साक्ष यांचाही जवाब नोंदविला जाई. एखाद्या घटनेत प्रत्यक्षदर्शी वा कोणताही पूरावा नसेल, तर त्यास दिव्याचा आधार घेतला जाई त्यासाठी गुन्हयाच्या स्वरुपावरुन गुन्हेगारास शिक्षा दिली जात होती. वतन जप्ती, अर्थिक दंड, कैद, वेगवेगळी प्रायश्चिते, धिंड काढणे, जाती बहिष्कृत करणे, हातपाय तोडणे, घाण्याला जुंपणे, तोफेच्या तोंडी देणे, हत्तीच्या पायी देणे आणि शिरच्छेद करणे अशा सर्व प्रकारच्या शिक्षा मराठा राज्यात दिल्या जात होत्या.

दंडाचे राजदंड, ब्रह्मदंड, गतिदंड प्रकार पडत होते. पेशवे काळामध्ये गुन्हेगारांना अत्यंत कडक शिक्षा दिली जात असे. त्यात गंभीर गुन्ह्यासाठी हातपाय तोडणे, हत्तीच्या पायी देणे, फासावर लटकाविणे यासारख्या शिक्षा होत्या. सरकार विरुद्ध केलेल्या गुन्ह्यासाठी फितुरी करणाऱ्यासाठी देहान्त शिक्षा दिली जाई. ही शिक्षा ठोठावण्याचा अधिकार फक्त पेशव्यांनाच होता. होळकर राज्यातही गुन्हेगारास गुन्ह्याचे स्वरुप लक्षात घेऊन न्याय दिला जात असे. त्यानुसार शिक्षाही तेवढीच कठोर दिली जात होती. पण मराठी सत्तेच्या अस्तानंतर शेवटी होळकरांचे राज्यही इंग्रजांनी जिंकून जवळपास ७५ टक्के भाग ताब्यात घेवून केवळ २५ टक्के उत्पन्नाचा प्रदेश होळकरांकडे ठेवल्याने होळकरांच्या राज्याचे विघटन होवून इंदूर संस्थान बनले.

सर्व ठिकाणी दिलेले होळकर दरबारात असणारा इंग्रज रेसिडंट अगन्यु याने सर जॉन मालकन यास १४ ऑक्टोबर १८१८ रोजी पाठवलेल्या पत्रात पूर्वी होळकर राज्यामध्ये गुन्हगारांना कठोर शिक्षा दिल्या जात होत्या. पण आता अशा क्रूर शिक्षा देण्याचे प्रमाण खूपच कमी झाले आहे असे कळविले होते.[६१]

**६.१.८.१ रवा दिव्य**

रवा दिव्य म्हणजे उकळत्या तेलातील एखादा धातूचा तुकडा टाकला जाई तो हाताने बाहेर काढणे होय.

**६.१.८.२ अग्नी दिव्य:**

अग्नी दिव्य म्हणजे लोहाराच्या भट्टीत रससशीत तापलेली लोखंडी गोळा हाताने उचलने होय.

**६.१.८.३ ऐरणी दिव्य:**

ऐरणी दिव्य म्हणजे अत्यंत तप्त असा ऐरणी हातात घेणे होय.

**६.१.८.४ फाळ दिव्य**

फाळ दिव्य म्हणजे नांगराचा लोखंडी फाळ लालबुंद होईपर्यंत तापविल्यावर त्या दिव्य करणाऱ्या व्यक्तीने तो तप्त फाळ आपल्या जिभेने चाटावयास लावणे होय.[६८]

**६.१.८.५ क्रिया दिव्याचे उपप्रकार:**

**६.१.८.५.१ नदीची क्रिया दिव्य:**

नदीची क्रिया दिव्य म्हणजे नदीच्या पाण्यात उभा राहून दोघांनाही आपली सत्यता पटवून द्यावी लागत असे.

**६.१.८.५.२ वालीची क्रिया दिव्य:**

वालीची क्रिया दिव्य म्हणजे कापसाची वात ज्याची जास्त पेटलेली असे त्यास वात क्रिया म्हणत. ही क्रिया दोघानाही करावी लागत असे.

**६.१.८.५.३ बेलभंडार क्रिया:**

बेलभंडार क्रिया म्हणजे शंकराच्या मंदिरातील पिंडीवरील बेल उचलण्यास / ठेवण्यास सांगीतले जाई.

**६.१.८.५.४ शपथ क्रिया**

शपथ क्रिया म्हणजे त्या त्या धर्मानुसार तुळस, कुराण, आदर्श बाबी स्पर्श करत शपथ घेतली जाई.[६२]

**६.१.९ शहराची न्यायव्यवस्था:**

होळकर राज्यातील ही मोठया शहरासाठी विशेषत: इंदौर शहरासाठी कोतवालाचे पद निर्माण करण्यात आले होते. त्याच्यामार्फत हेरगिरी करणे, गुन्हेगारांना आर्थिक दंड देणे ही कामे सोपविली. कोतवालापुढे चोरी, बदफैली, जारकर्म, मद्यपानवगैरे मुख्य गुन्हे येत असत. तसेच कोतवालाकडे फौजदारी व दिवाणी असे अधिकार देण्यात आल्यामुळे ते रयतेस आपल्या स्तरावरून न्यायदानाचे कार्य करीत असत. त्यामुळे त्यांचा शहरात मोठा दरारा होता.

**६.२ परगणा न्यायव्यवस्था:**

होळकर संस्थानात सुभेदारांकडे एकवटलेली होती. होळकर राज्याच्या प्रत्येक परगण्यात कमाविसदार न्यायदानाचे काम करीत होते. या स्तरावर जनतेचे समाधान नाही झाले तर तो सरळ होळकर सत्ताधीशांकडे न्याय मागत येत होता.

६ ऑक्टोबर १७६५ रोजी झाबवे परगण्याचे कमाविसदार राजश्री रामचंद्र महादेव यांनी पत्र पाठवून अहिल्याबाईंस कळविले की, तुह्मास झाबवे येथील जप्तीस सनद देऊन पाठविले होते त्यास लष्करातील श्रीमंत तीर्थरूप सुभेदारानी राजश्री गोविंदराव बुळे यांजकडून महालची जप्ती मोकळी केली.त्यावरून महालाची जप्ती मोकळी केल्याचे कळविले... तसेच ६ ऑक्टोबर १७६५ रोजी कमाविसदार राजश्री राघो अनंत यांस कोठेडे (चिखलदे) महालाची जप्ती करण्याचे आदेश अहिल्याबाईंनी पाठविलेले होते. राजश्री गोविंदराव बुळे यांजकडील महालचे जप्तीस सनद देऊन पाठविले होते. त्यास लष्करातील श्रीमंत तीर्थरूप सुभेदारानी

राजश्री गोविंदराव बुळ्याकडील महालची जप्ती मोकळी केली. त्यावरून हल्ली येथून महालाची जप्ती मोकळी करून पत्र सादर केले... पण ६ नोव्हेंबर १७६५ रोजी सुभेदारांनी पुन्हा अहिल्याबाईंस व मालेरावास पत्र पाठवून  गोविंदराव बुळे यांच्या सरंजामाची जप्ती मोकळी करावयास अगोदर पत्रें दिलीं होती, फिरुन मोकळी न करणें म्हाणून लिहिलें होतें. त्यास हल्ली त्यांनी बोलीप्रमाणे राऊत आणवयाचें कबूल केले.[६३] या तिन्ही पत्रावरून असे स्पष्ट होते की, सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या आदेशानुसार गोविंदराव बुळे यांच्या महालाच्या जप्तीचे आदेश दिलेले होते. पण नंतर तात्काळ ते आदेश रदद करण्याचे कळविलेले दिसून येते.

१७ फेब्रुवारी १७६५ रोजी माधवराव बल्लळ प्रधान यांनी मल्हारराव होळकरांना पत्र पाठवून कळविले की, केशरीसिंग राऊळ कस्बे सारंगखेडे परगणे सुंलतानपूर यानी विदित केलें की आपली भावजई फत्तेसिंग राऊळाची स्त्री गृहकलहामुळे मालबाजवळ फिर्याद गेली. त्यास न्याय मनास न आणितां सरदारांनी आपले राऊळकीचें वतन जप्त केलें आहे. म्हणून. तरी याचा इन्साफ न पाहता परगणे मजकूरचे अंमलदाराही जप्त केले असेल याजकरिता पत्र लिहिलें असे. तरी आपण येविशीची ताकीद करुन इनसाफ करावा आणि वतनास वारीस असतां जप्त करावें ऐसं नाही, सुदामत मनास आणून वाजवी असेल तसें चालवावें व निवाडा करावा जाणिजे.[६४] १९ फेब्रुवारी १७६१ रोजी सुभेदार मल्हारराव होळकर यांनी तुर्त न्याय दिला तो असा चिरंजीव विजयीभव राजश्री मालवा यांसी प्रती मल्हारजी होळकर आर्शीवाद उपरी मौजे सारंगखेडे प्रगणे सुलतानपूर येथील फतेसिंग राऊळ याची स्त्री अमरावतीनें तुह्मां पसी येऊन केसरीसिंग राऊळ फतेसिंगाचा भाऊ यांजला गावाकडून परांगदा करुन राऊलकीचे वतन जप्त करविले. त्यांस तेथील जप्ती तूर्त उठवून, देशास आलिया मनास आपले म्हणून मीराबान टोके यांनी सांगितलेवरुन तुम्हास लिहिले असे. तरी मौजेमजकुरचे राऊळकीची तुह्मी जप्ती करविली असेल ते सोडवून देणें आम्ही देशास आलिया मनास आणून करणें ते केले जाईल. तूर्त केसरीसिंगास आणूस त्याचे हातें राऊळकीचें कामकाज...[६५]

### ६.३ ग्राम न्यायव्यवस्था:

होळकरांची स्थानिक न्यायव्यवस्था म्हणजे गाव पातळीवर गावचे पाटील हे न्यायदानाचे काम करीत होते. ग्राम पातळीवर पंचायतीची स्थापना केली. व प्रजेला विनाविलंब न्याय मिळवण्याची व्यवस्था होळकर शासकांनी केलेली होती. न्याय व्यवस्था अत्यंत साधी व सोप्या भाषेत चालत असे. होळकर राज्यातील न्याय व्यवस्थेत स्थानिक पातळीवर एखाद्या गुन्हयाचा न्याय निवाडा झालेला असेल. पण त्यास आणखीन अन्यायच झाला आहे असे वाटत असेल, किंवा खरा न्याय मिळालाच नाही असे वाटले, तर तो सरळ होळकर राज्यकर्त्याकडे जावून अंतिम न्याय मागता येत असे. 'प्रजेच्या हितासाठीच राज्याची निर्मिती आहे. राजा आणि प्रजेचा संबंध म्हणजेच आईपुत्राच्या संबंधाप्रमाणे असतो.'[६६]

होळकर राज्यामध्ये लोकमातेने सुख–शांतीचे बंधुभावाचे, न्याय प्रिय राज्य निर्माण केलं होते. प्रसिद्ध पंडित कवी मोरोपंत यांनी अहिल्याबाईच्या न्यायाविषयी म्हटले आहे.

'देवी अहिल्याबाई झाालीस जगत्रयात तू धन्या
न न्याय–धर्म–निरता अन्या, कलिमाजी ऐकली कन्या.'[६७]

पुण्यश्लोक राजमाता अहिल्याबाई होळकर यांची रामशास्त्री प्रभुणे यांच्या सारखीच न्यायबुद्धी जागृत व निस्पृह होती. या दोघांच्याही न्यायबुद्धीला मानवतेची बैठक होती. ती अशी की, निपुत्रिक विधवांच्या मिळकती जप्त न करता दत्तक विधानान्वये त्यांची विल्हेवाट करता यावी असे निवाडे अहिल्यादेवीने दिलेले आहेत. म्हणून जॉन माल्कन यांनी अहिल्याबाई बद्दल म्हणटले आहे की, 'अहिल्यादेवी सारख्या न्यायाधीश पुन्हा होणे मुस्कील'.[६७]

न्यायीक प्रशासन हे होळकर प्रशासनाचा आत्मा होता. त्याच्या न्यायादानातून त्वरीत न्याय देण्याची व्यवस्था होती. त्यांच्या न्यायदानाचे वैशिष्टे म्हणजे न्यायदान हे पक्षपाती नसून ते नातेगोते, सरदार वा सामान्य रयतेला न्यायदान करताना कोणत्याही स्वरूपाचा पक्षपात केला जात नव्हता. याविषयी शत्रूपक्षाना देखील कमालीचा विश्वास होता. हे होळकर शासकाचे न्यायबाबतचे खास वैशिष्टे होते. म्हणूनच होळकर शाासकाचे शत्रू देखील होळकर घराण्याविरूद्ध देखील ते पेशव्याकडे न जाता तो न्यायनिवाडा होळकर शासकाकडे मोठया विश्वासाने सोपविला जात होता. तत्कालीन काळामध्ये होळकर घराण्याची न्यायदान प्रणालीचा समावेश होणे ही काळाची गरज दिसून येते.

## संदर्भ सूची


१ कोळेकर हरीभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१३, पृ.१

२ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९, पृ. ६९७—९८

३ गायकवाड चंद्रशेखर, पुरोगामी विचारांची जीवनधारा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, ओम प्रकाशन, अकलुज, २०१०, पृ.२७

४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. २३९, पृ.१४२—४३

५ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, ले२, पृ.१४

६ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.६४

७ कोळेकर हरीभाऊ, स्त्री स्वातंत्र्याचा ललकार पुरोगामी अहिल्यादेवी, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.११

८ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.६४

९ प्रा. बेडदे धनंजय प्रभाकर, परिवर्तनाची गौरवगाथा: लोकमाता अहिल्याबाई होळकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती, १९९६, पृ.७७

१० जहागिरदार विजया, लोकमाता, मोरया प्रकाशन, डोबिवली, प्रथमावृत्ती, १९९६, पृ.१२

११ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनु.१५६, पृ.९६—९७

१२ कित्ता, अनुं.१०३, पृ.२२१

१३ कित्ता, पृ. ७७—८०

१४ कित्ता, पृ. १०८

१५ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, ले.२, पृ.१३

१६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४,अनुं.४३, पृ.१८२

१७ पाटील सु. आ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, अहिल्यादेवी प्रगती मंडळ प्रकाशक, जळगांव, २०००, पृ.७३

१८ पुरुषोत्तम दास, देवी श्री अहिल्याबाई यांचे सचित्र चरित्र, अनंत आत्माराम मोरमकर, १९१३, पृ.१७१

१९ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.२०—३१

२० ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२३१—२३२

२१ भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकर सरकार पुस्तकमाला, पुस्तक १६वे, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनेः पत्र व्यवहार पूर्वार्ध खंड—१ला, इतिहास लेखक व संशोधक फॉरेन ऑफिस, इंदूर, १९२४, पृ.३.४

२२ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.२८७—८८

२३ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.**२३९**

२४ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८,पत्र १६,४९, पृ.५१,६४

२५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनं.५८, पृ.१९१

२६ कुलकर्णी एम. आर., नाना फडणीस आणि मराठी राज्यप्रशासन, पुणे, २००४, पृ.३७

२७ डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन महाराष्ट्र, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद, प्रथमावृत्ती, २०००, पृ.२२६—२२७

२८ कित्ता, पृ.२५९

२९ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, बाळाजी बाजीराव, भाग—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, मुंबई, १९०६, ले—३१६, पृ.३३३

३० ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१२०

३१ ओतूरकर रा.वि., (संपा.), पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार, चिटणीस भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९५०, ८७—८८,पृ.९१—९३.

३२ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, थोरले माधवराव भाग—१,खंड—७, इंदिरा प्रेस, पुणे, १९११ लेख ५६४, पृ.१८१— १८२

३३ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनं.१०९, पृ. २२५

३४ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, बाळाजी बाजीराव, भाग—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर

ट्रांसलेशन सोसायटी, मुंबई, १९०६, ले—३१६, पृ.३३३

३५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, पृ.१२०

३६ ओतूरकर रा.वि., (संपा.), पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे, १९५०, पृ.९१—९३.

३७ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, थोरले माधवराव भाग—१,खंड—७, इंदिरा प्रेस, पुणे, १९११ लेख ५६४, पृ.१८१— १८२

३८ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनं.१०९, पृ. २२५

३९ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, थोरले माधवराव भाग—१,खंड—७, इंदिरा प्रेस, पुणे, १९११ लेख ६५५, पृ.२४९

४० डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन महाराष्ट्र, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद, प्रथमावृत्ती, २०००, पृ.९७

४१ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३— १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. २४८, पृ.३१०

४२ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, थोरले माधवराव भाग—१,खंड—७, इंदिरा प्रेस, पुणे, १९११ लेख५९१, पृ.१९७

४३ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड—२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.८१

४४ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८,पत्र १६,४९, पत्र ६८ पृ.२

४५ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, बाळाजी बाजीराव, भाग—२, खंड—२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, मुंबई, १९०६, लेख५८८, पृ.१९५

४६ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड—१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.५५

४७ अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रूस्ट, अहिल्या स्मारिका, अहिल्याबाई होळकर चॅरीटेबल ट्रूस्ट इंदौर व्दारा प्रकाशित वर्ष १९७५, पृ.४२

४८ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, थोरले माधवराव भाग—१,खंड—७, इंदिरा प्रेस, पुणे, १९११ लेख१८३, पृ.५६८

४९ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत इतिहास संशेधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२०, लेख ७५, पृ.७३

५० भागवत अनंत नारायण, (संपा.), होळकर सरकार पुस्तकमाला, पुस्तक १६वे,

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधने: पत्र व्यवहार पूर्वार्ध खंड–१ला, इतिहास लेखक व संशोधक फॅारेन ऑफिस, इंदूर, १९२४, पृ.१४५–१४७

५१ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड–१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ.६७

५२ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड–२३, आर्यभूषण छापखाना पुणे, १९३९, पृ.८१

५३ कित्ता, पृ.८१

५४ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग–१, (१६९३– १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनू२३९, पृ.१४२.४३

५५ वाड ग. चि. पेशवे रोजनिशी, बाळाजी बाजीराव, भाग–२, खंड–२, डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रांसलेशन सोसायटी, मुंबई, १९०६, लेख५९९ पृ.२००–२०१

५६ भावे वासुदेव कृष्ण, पेशवेकालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद, दिल्ली, १९७६, पृ.२९५

५७ कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास खंड-२, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, १९८५, पृ.३०–३१

५८ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२६५

५९ कित्ता, पृ.२६६

६० कित्ता, पृ.२६७

६१ जोशी मो.रा., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड–२७, (तात्या जोगांच्या चरित्राची साधने), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९५२, पृ२१५

६२ प्रा. मोरे अरूणा, डॉ. नवधर भारती, डॉ. काळभोरे स्वाती, मराठयाचा इतिहास, अथर्व प्रकाशन, पुणे, २०१०, पृ.२७०–२७२

६३ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग–१, (१६९३– १७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४, अनुं. २३४–२३६,, पृ.१४०–१४१

६४ कित्ता, अनं. २३९, पृ. १४२.४३

६५ कित्ता, अनं. १५६, पृ. ९६–९७

६६ शूरनर गोविंदराव, लोकमाता राजमाता महाराणी अहिल्याबाई होळकर, प्रबोधन प्रकाशन, नांदेड, तृतीयावृत्ती, २०१५, पृ.३६

६७ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५, पृ.२७

६८ प्रा. बेडदे धनंजय प्रभाकर, परिवर्तनाची गौरवगाथा: लोकमाता अहिल्याबाई होळकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती, १९९६, पृ.११६

**प्रस्तावना:**

भारताच्या इतिहासात अठराव्या शतकाच्या मध्यकाळ हा राजकीय अस्थिरतेचा व प्रशासकीय अव्यवस्थेचा म्हणून ओळखला जातो. तत्कालीन प्रशासनात अस्थिरता ही सामान्य बाब होती. त्यामागील कारणेही मागील साम्राज्याचे विघटन व अन्य सत्तांचा स्थिर होऊ घातलेला प्रभाव हे होते. परंतु या अस्थिर प्रशासनाला कलाटनी देण्याचे काम हे मराठी सत्ताधीशानी व होळकर शासकानी अभूतपूर्व केले. प्रस्थापित राज्य व्यवस्थेत अंमलात बदल घडवून नवीन उत्कृष्ट प्रशासनाचा नमूना हा जगासमोर मांडला. होळकर शासकानी प्रशासन हे शासन व्यवस्थेचा कणा असतो हे जाणिले होते. याधर्तीवरच त्यांना तत्कालीन प्रशासन हे समाजाभिमूख व जनकल्याणाकरीता निर्माण केले. प्रशासनातील प्रत्येक अंगाना म्हणजेच न्याय, लष्करी, राजकीय, मुलकी व्यवस्थेला तेवढाच दर्जा देवून राज्यांच्या प्रगतीचा सूवर्णमध्य साधलेला होता.

पेशवे कालीन केंद्रीय प्रशासन व्यवस्थेत न्यायदानासाठी एखादे स्वतंत्र व सुसंघटीत असे खाते निर्माण झाल्याचे दिसत नाही. सातारचे छत्रपती, धर्मसभा, राजमंडळ आणि पेशवा, न्यायाधीश, प्रमुख सरदार हे आपापल्या सोयीने न्यायव्यवस्था सांभाळता होते. मामलतदार, कमाविसदार यांनाही त्यांच्या कार्यक्षेत्रात न्यायविषयक व्यापक अधिकार होते. काही किरकोळ न्यायविषयक कामे हे अधिकारी पंचाची मदत न घेताच पार पाडत असत. पण महत्वाच्या खटल्यामध्ये त्यांना पंचायती भरवाव्या लागत असत. गोतसभा, जातीसभा, धर्मसभा व पंचायत या संस्था उदयास आल्या व विकसित झाल्या. न्यायव्यवस्थेवर या संस्थाचा विलक्षण प्रभाव होता. त्यांचे निर्णय व्यक्तिला, समाजाला तसेच शासनालाही बंधनकारक होते.

प्रस्तुत संशोधनाचे निष्कर्ष काढण्यासाठी संशोधनाचे उद्‌दिष्टे व गृहितके यांचा पडताळा करून पुढील निष्कर्ष काढण्यात आलेले आहेत. राज्याच्या उत्कृष्ट प्रशासनासाठी सूचनाही सुचविलेल्या आहेत. सदरील संशोधनामध्ये तत्कालीन व इतर संस्थानिकांच्या प्रशासनाची ही तुलना करून होळकर संस्थनाचे प्रशासन हे खरेच एक आदर्श प्रशासन पेशवाईत होत काय? हे शोधलेले आहे.

आधुनिक काळातील प्रशासनामध्ये सुशासनाबाबत केवळ चर्चासत्र आयोजित करून अथवा कायदा तथा कार्यक्रम तयार करून सुशासन निर्माण होणार नाही. मानवी जीवनच्या सर्वच अंगाना स्पर्श केल्याशिवाय आणि लोकांच्या एकूणच मानसिकतेत बदल घडवून आणल्याशिवाय सुशासनाचे स्वप्न पूर्ण होणार नाही. यांची पूर्णपणे खबरदारी होळकर शासकांनी घेतलेली होती.

अठराव्या शतकात छत्रपती शाहू महाराजांना मराठी राज्याच्या स्थापनेत बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, नानासाहेब या निष्ठावान व कर्तबगार पेशव्यांचे साहय मिळाले. त्याचप्रमाणे या पेशव्यांना देखील अनेक मातबर व धाडसी सरदारांचे साहय लाभले. म्हणूनच

त्यांनी आपल्या अचाट पराक्रमाच्या जोरावर विजयाची पताका अटकेपार फडकाविले. तसेच संपूर्ण उत्तर भारतात व दिल्लीच्या बादशहावरही आपले वर्चस्व व नियंत्रण प्रस्थापित केले. त्या शूरवीर सरदारामध्ये मल्हारराव होळकरांचे साहय अतिशय मोलाचे ठरले. तीन पेशव्यांच्या कारकिर्दीत प्रचंड शौर्य गाजवून मराठी राज्याच्या सिमा उतर भारतात पसरविल्या.

सुभेदार मल्हरराव होळकर यांनी स्थापन केलेल्या होळकर राज्यांचे ते स्वत: बेचाळीस वर्ष आपली सत्ता सांभाळून मराठी राज्यासही मोठा हातभार लावला. त्यांचवेळी त्यांचा मुलगा खंडेराव कुंभेरीच्या युध्दात मारला गेल्याने खंडेरावाचा मुलगा मालेराव होळकर हा गादीवर आला. पण तो ही अल्पशा आजाराने निधन पावला. त्यानंतर होळकर राज्यांच्या गादीवर स्वत: अहिल्याबाईने राज्याचा कारभार हाती घेतला. व मुलूखगीरीचे कामे तुकोजीराव यांच्यावर सोपविले. तेंव्हा अहिल्याबाईने अष्ठावीस वर्ष राज्यकारभार सांभाळला. त्याकाळात त्यानी एक आदर्श प्रशासनाची चौकट निर्माण करून मुलकी, लष्करी व न्यायविषयक प्रशासन सुस्थिरपणा आणला. त्यांनी स्वत:चे आभाळाऐवढे दु:ख बाजूला ठेवून मुबलक धनसाठा असताना देखील एका वैराग्यासारखे जीवन जगून केवळ सामान्य रयतेसाठी राज्यकारभार केला. हे करताना त्यांनी केवळ समाजभिमुख जणकल्याणाचे कार्य हाती घेवून ती पूर्णत्वास नेली. त्यांच्यानंतर तुकोजीराव होळकर गादीवर आले. पण त्यांच्या उतरत्या वयाने फार काही प्रशासकीय सुधारणा करता आले नाहीत. ना ही त्यांना पराक्रम गाजविता आले नाहीत. त्यांच्या पश्चात थोरला मुलगा काशीराव हा होळकर गादीवर आला पण त्यास शिंदेच्या डावपेचाने व बंधुच्या सततच्या युध्दामुळे त्यांनाही फार काळ पदावर राहता आले नाही. नाही त्याना प्रशासन करता आले नाही. त्यानंतर यशवंतराव होळकर यांनी शिंदे, पेशवे व इंग्रज याना निकराचा लढा देवून आपली प्रशासनावर मजबूत पकड निर्माण केली. वीस वर्ष राज्य करुन इंग्रजाना चांगलाच शह दिला. त्यानंतर त्यांचा मुलगा मल्हारराव दुसरे यांनी गादीवर येवून इंग्रजांशी वाटाघाटी करीत होळकरांचे राज्य सांभाळले. पण मंदसौदच्या तहानुसार होळकरांच्या राज्याचे एका छोटया संस्थानात रुपांतर झाले. त्यामुळे त्यांना केवळ आपल्या संस्थानाअंतर्गत राज्यकारभार करावा लागला.

त्यानंतर मार्तण्डराव होळकर गादीवर आले. पण त्यांना काही महिन्यातच गादीवर दूर व्हावे लागले. त्याठिकाणी हरिराव हा यशंवतरावाचा मुलगा गादीवर आला. पण तोही अल्पआयुष्यी ठरला. त्यांच्यानंतर खंडेराव यांना दत्त्क घेण्यात आल्याने ते गादीवर केवळ काही महिण्यासाठी गादीवर आले. यांच्यानंतर तुकोजीराव दुसरे (दत्तक) हे होळकरांच्या गादीवर आला. त्याच्यापश्चात त्यांचा मुलगा शिवाजीराव होळकर हे गादीवर आले. त्यानंतर त्यांचा मुलगा यशवंतराव दुसरे हे गादीवर आले. शेवटी होळकर संस्थान हे भारतात विलीन झाले.

होळकर संस्थानाच्या शासकांचे धोरण हे 'जगा आणि जगु द्या' या तत्वावर अधारीत होते. पुणे सरकार हे सर्वांचेच आहे. इतर सत्ताधीशासारखे पेशवे पद हे बळकावण्याचा विचार होळकर शासकात कधीही आलेला नव्हता. या होळकर घराण्याच्या शासनकर्त्यांनी कधीही पेशवे व नानाच्या अंतर्गत वादात किंवा नाते संबंधात कधीही ढवळढवळ केली नाही. स्वत: एवढाच अधिकार व हक्क सर्वांचाच असतो. हे तत्व होळकर शासकांनी अंगिकारलेले होते. यावरुन होळकर शासक हे लोकशाहीचे उदगाते व संरक्षण करणारे होते. हे यावरून स्पष्ट होते. पुण्याचे पेशवे पद हे नागपूरचे भोसले व इतर अनेकांना हवे होते. त्याबदल जराशीही लालसा होळकर शासकांना कधीही वाटलेली नव्हती. महादजी शिंदेनी स्वहित समोर ठेवून पुण्याच्या पेशव्यांना व होळकर राज्यावर डोळा ठेवून पेशव्यांच्या व होळकर शासकांच्या उपकराची जाणीव, थोडही ठेवलेली नव्हती. म्हणजेच शिंदेनी संधी साधू धोरणाचा स्विकार केलेला होता. तसा होळकर शासकांनी कधीही केलेला नव्हता. आपल्या शेजारी असलेल्या शिंदे, भोसले, पवार, गायकवाड, व उत्तरेतील काही राज्याचे शासक तसेच पुण्याचे पेशवे यांच्या बिकट प्रसंगी होळकर शासक मदतीस धावून गेलेले होते. तसे शिंदेनी कधीही न करता उलट त्यांच्या बिकट प्रसंगाचा स्वहितासाठी फायदा घेण्याचा सपाटा सुरु केलेला होता.

छत्रपती शिवरायांच्या राज्यात कोणत्याही धर्माची, जातीची, वंशाची, पथांची वा कोणाचीही स्त्री असो तिला मान सन्मान दर्जा देवून तिचा सन्मान करत तिला सुखरुप परत पाठविले जाई. तसेच होळकर शासकांच्या राज्यात ही पर स्त्रियांना सन्मान पूर्वक वागणूक दिली जात होती. पण शिंदे राज्यातील शासकांनी तर निच पातळी गाठलेली होती. महादजी शिंदेनी दत्तक घेतलेल्या दौलतरावांनी आपल्या मातेसमान असलेल्या महादजी शिंदेच्या पश्चात नऊ पैकी तीन लक्ष्मीबाई, यमुनाबाई व भागीरथाबाई जिवंत होत्या. बाकीच्या अगोदरच निधन पावलेल्या होत्या. दौलतरावंनी तिसरा विवाह सर्जेराव घाडगेच्या बायजाबाईशी केल्याने सर्जेरवाचे आपल्या मुलीच्या घरी ये—जा सुरु राहिले. तेंव्हा त्यांची भागीरथीबाई या विधवेवर वाईट नजर ठेवून तिच्यावर अत्याच्यार करीत होता. दौलतरावांच्या सासऱ्यांच्या वाईट कृतीस कोणीही अटकाव करु शकले नाहीत. म्हणजेच राज कुटूंबातील राजपत्नींचा असा अवमान कोणत्याच शासकांनी केलेला नव्हता. दौलतराव व सर्जेरावास स्वराज्य म्हणजे स्वैराचार असे वाटत होते.

लोककल्याणाच्या हेतूने राज्यसंस्थेकडून जी कार्ये केली जातात ती कार्य प्रशासकीय स्वरुपाची असतात. होळकरांचे प्रशासन अभ्यासत असताना तत्कालीन महसूल व्यवस्था, न्याय व्यवस्था व लष्करी व्यवस्था या घटकावर प्रकाश टाकलेला आहे. प्रशासन या शब्दाची व्याप्ती खूप मोठी आहे तत्कालीन मोगलांचे, शिवाजी महाराजाचे, पेशव्यांचे, शिंदेचे व निजामाचे प्रशासन चालत असतांना होळकरांचे प्रशासन हे यापेक्षा न्यायी व तात्काळ प्रशासन म्हणून इतिहासात प्रसिध्द होते.

## ७.१ निष्कर्ष:

प्रस्तुत संशोधनामध्ये तत्कालीन व इतर राज्याची वा संस्थानिकांच्या प्रशासनाची तुलना करीत असताना होळकर राज्याचे वा संस्थानाचे प्रशासन हे एक आदर्श प्रशासन होते. त्या प्रशासनाने सध्याच्या युगातही प्रशासन कर्त्यांना प्रोत्साहन देणारे व उपयोगी ठरणारे प्रशासन होते. सदरील प्रशासनामधील निष्कर्ष हे पुढील प्रमाणे आहेत.

१ होळकर राज्यात एखाद्या अधिकाऱ्यानेही केलेली रयतेस दंड तो जर चुकीचा असेल. तर तो तसा साक्षी पुराव्या निशी सिद्ध झाले. तर अधिकाऱ्यांनी वसूल केलेला दंड संबंधीतास परत करुन तो वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यासही शिक्षा केली जात होती. जाखोजी जगताप यांनी होळकर दरबाराकडे आपल्यावर झालेल्या अन्यायास वाचा फोडण्यासाठी ता. १ सप्टेंबर १७९१ रोजी विनंती केली. तेंव्हा अहिल्याबाईंने सर्वप्रकारची शहानिशा करून आदेश दिलेला होता. की, ...तुह्मी चारशें रूपये वसूल केले ते जमा आहेत. परंतु तपास करितां जगतापाकडे दोष नाहीं. सबब सदरहू चारशें रूपये माघारे देणें. यावरून असे स्पष्ट होते की, होळकर राज्याच्या प्रशासनात कितीही जवळच्या नात्यातील व्यक्तिने गुन्हा वा गैरवर्तन केलेले असले तरी त्याचा कोणताही मुलाहिजा न ठेवता त्यास तात्काळ तक्रारीची शहानिशा करून दोषीना शिक्षा व नुकसान भरपाई करून घेतली जात होती. त्यानुसार भारमलदादा होळकर हे मातोश्रीचे दीर असल्याने त्यांच्याकडून चारशे रुपये दंड करुन ते सरकारी खात्यात जमा केले. आपल्या अधिकाऱ्यांकडून वा नातेवाईकाकडून सामान्य रयतेस थोडाही त्रास होणार नाही याची खबरदारी घेवून मुलकी व लष्करी प्रशासनातून लोककल्याण होळकर शासकानी साधले होते.

२ होळकर शासकाच्या न्यायावर शत्रूंचा ही मोठा विश्वास होता. होळकर राज्यातील शासकांच्या उत्कृष्ट न्यायाचा व कुशल प्रशासकांचा उत्तम आदर्श म्हणून शत्रू देखील विश्वास ठेवत असे. मराठ्यांचे दोन मातब्बर सरदार शिंदे व होळकर यांच्यात एकाच प्रदेशावर दोघा सरदारामध्ये वाद सुरु झाल्याने महादजी शिंदेनी हे प्रकरण निकालात काढण्यासाठी अहिल्याबाईनाच विनंती केली. म्हणजेच ज्याच्याशी शिंदेचा वाद आहे. त्यांच्या कारभारी असणाऱ्या अहिल्याबाईकडे या प्रकरणासंदर्भात न्याय निवडा करण्याची जबाबदारी सोपविले जाते. अहिल्याबाईंनी दिलेल्या निर्णयावर दोघेही समाधानी व सहमत झालेले होते. यावरून असे स्पष्ट होते की, होळकरांची न्यायव्यवस्था ही नि:पक्ष व समसमान स्वरुपाची होती.

३ मध्ययुगीन काळात होळकर राज्याच्या शासकांच्या प्रशासनाचा मुळ आधार स्तंभ हा लोककल्याणकारी योजना हाच होता. या योजनांची काटेकोरपणे अमंलबजाणी केली जाते की, त्यात काही गैरप्रकार होतो का? ते स्वत: जातीने पाहणी करून, कोणी दोषी

आढळून आले, तर त्यास तात्काळ शिक्षा व झालेली हानी भरपाई करून घेतली जाई त्यामुळे अधिकाऱ्यात कमालीचा वचक होता.

१ ३ डिसेंबर १७६२ रोजी मल्हारराव होळकर यांनी अहिल्याबाईस पत्र पाठवून स्पष्ट कळविले की, ...कुसाजी पाटील शिंदे मौजे पिंपरखेड येथील संभूगीर गोसावी यानें कुसाजीमजकूर याचा पुतण्या व शेत मळें व घर जप्त केलें म्हणून कळलें... जप्ती शेत मळे जे असतील ते ताकीद करुन सोडून देणे. म्हणजे होळकर राज्यात एखाद्या व्यक्तीने कोणता गुन्हा केला तर त्याचा गुन्हा सिद्ध झाला तर त्यास शिक्षा केली जात होती. पण त्याच्या गुन्हयाची शिक्षा त्याच्या निष्पाप मुलाबाळाना व बायकामाणसांना भोगण्याची वेळ होळकर राज्यात येत नव्हती. कालिकादेवीच्या मेळयात गो हत्या करणारे मुस्लीमांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी हल्ला करतेवेळी मल्हारराव होळकरांनी आपल्या सर्व सरदारांस व फौजेस मोठी गर्जना करून सक्त ताकीद दिली की 'बायका, मुलें, व अशस्त्र लोक शिवायकरून जेवढे म्हणून मुसलमानांच्या पक्षाचे सापडतील तेवढ़यांची, एकदम हल्ला करून कत्तल करून टाकावी!' तसेच धारातीर्थ पडलेल्यांच्या बायका मुलास जहागिरी इनामे देऊन त्यांची सोय केली जात होती. यातून मुलाबाळाना व बायकामाणसांना होळकर शासकाकडून पूर्ण मदत व संरक्षण दिले जात होते. हे यावरून हे स्पष्ट दिसून येते.

२ होळकर राज्याच्या प्रशासनाची न्याय व्यवस्था ही सर्वासाठी समान न्याय या तत्वावर मध्ययुगीन काळातसुध्दा आधारलेली होती. भर दरबारात अहिल्याबाईचे पती खंडेराव येवून

३ होळकर शासकाकडे होळकर राज्यातील न्याय प्रशासन व्यवस्थेत स्त्रियांना सरळ न्याय मागण्याचा अधिकार होता. ते ही चोवीस तास न्यायदानाची सोय उपल्बध करून दिलेली होती. त्यामुळे अनेक विधवा, निराधार व अन्यायग्रस्त स्त्रिदेखील कोणासही न घाबरता थेट दरबारात येवून न्याय मागत होत्या. कारण तसा विश्वास होळकर शासकानी निर्माण केला होता.

४ मध्ययुगीन काळात होळकर राज्याच्या राज्यातील न्याय व्यवस्था ही नि:पक्षपाती व जलद स्वरूपाची होती. म्हणून न्यायदानासाठी संपूर्ण भारतात होळकर घराणे प्रसिध्द होते. त्यामुळे अनेक परराज्यातील लोक व वतनदार तसेच छोटे संस्थानिक न्याय मागण्यासाठी येत असत. अन्याय झालेल्या व्यक्तीना विलंबाने न्याय देणे. म्हणजे त्याच्यावर दुसरा अन्याय करण्यासारखे असते असे मानून होळकर राज्यात न्याय दिला जात होता. सध्याच्या शासनकर्त्यानी हे तत्व स्विकाररून न्याय व्यवस्थेत बदल करून न्याय दिला तर सामान्य रयतेस न्याय मिळेल.

५ एखाद्या वतनदाराच्या इच्छेनुसारच त्यांचे वतन सरकारात जमा केले जाई. अन्यथा त्याचे वतन त्यांनाच सुरक्षित ठेवले जात होते. मौजे कुलावलचे वतनदार मोकादम जब्बारखान

यांची दोनशे पन्नास बिघे अनेक वर्षापासून वतन मिळालेले होते. पण माधोसिंग गिरसे व चंद्रा पाटील राहणार कोठडीकर यांनी जबरदस्तीने जमीनीचा कब्जा करून खात असल्याने जब्बारखनाने माझे अर्धे वतन सरकारी जमा करुन घेण्याची त्यांनी विनंती केली. त्यानुसार होळकर शासकांनी दिनकर अनंत यास पत्र पाठवून सदरील बिघे जमीन जबारसिंगाच्या ताब्यात चर्तु:सिमा निश्चित करून बाकीची १२५ बिघे जमीन सराकरी दप्तरात जमा करुन दोषी शिक्षा करुन हा वाद मिटविला. असे या न्याय निवाडयावरून स्पष्ट होते. .

६ होळकर राज्यातील डोंगराळव जंगल भागात चोर, डाकूनी डोके वर काढून मोठया प्रमाणात धुमाकुळ घातला. तेव्हा त्यांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी भर होळकर शासकाकडून दरबारात घोषणा केली. रयतेच्या हितासाठी स्वत:ची मुलगी पणाला लावून आपले पुरोगामी विचार करून इतर शासकापुढे एक आदर्श निर्माण केला. त्या शूरवीरची जात पात किंवा घराणे याचा काहीही विचार न करता त्याच्याशी विवाह लावून दिला.

७ यशवंतराव फणसे या वीरांनी ठग पेंढाऱ्याचा बंदोबस्त यशस्वी करून दाखविला. तेव्हा त्याचा धर्म जात पंथ वंश कुळ याची कोणतीही तमा न बाळगता त्यांनी आपल्या मुलीचा विवाह लावून देवून त्याच्या पराक्रमाचा उचित गौरव केला. म्हणजेच अहिल्याबाईनी त्याकाळच्या सनातनी पार्श्वभूमीच्या विरोधात उचलेले हे एक पुरोगामी पावूल होते. अहिल्याबाई होळकर यांनी जातीपातींच्या पलिकडे पोचणारी लोकसेवेची विशाल दृष्टी होती. असे यातून स्पष्ट दिसून येते. .

८ होळकर राज्याच्या शासकांनी आपापसातील वादास थारा न देता देशहितास प्रधान्य देवून ब्रिटीश सत्तेविरूध्द आवाज उठविणारे भारतातील पहिले घराणे होते. ब्रिटीश सत्तेविरूद्ध संपूर्ण भारतातील सर्व जाती धर्माचे राजे महाराजे व बादशहा यांचा एकसंघ लढा उभारण्याची योजना होळकर राज्याच्या शासकांनी प्रथमत: प्रयत्न केला. यशवंतरावांनी संपूर्ण भारतातील राजे महाराजे यांना एकत्र येवून त्यां ब्रिटिशाचे उच्चाटन करण्याचे ध्यैय समोर ठेवून आपल्या राज्याच्या व कुटुंबाच्या खूनाचा बदला बाजूला ठेवून दौलतराव व पेशवे यांचे गुन्हे माफ केले पण शेवटी एकटयानेच इंग्रजाविरोधात लढा पूकारून सर्वात शेवटी तह करावा लागला.

९ होळकर राज्याच्या शासकांनी इतर मराठा सरदार व संस्थानास वेळप्रसंगी सर्वोतोपरी मदत देवून आपल्या बरोबरीने घेवून जाण्याचा प्रयत्न केलेला आहे.

१० होळकर शासकानी सामान्य रयतेसाठी राज्यात वा राज्याबाहेर जावून जाती व धर्माचा विचार न करता अनेक सोयी व सुधारणा घडवून आणल्या. स्वत:च्या राज्यातील रस्ते विकासाबरोबर इतर राज्यातील शासकांच्या राज्यात जावून ही रस्ते विकासाची अनेक प्रकारची कामे केली. त्यातून सर्वधर्म समभावाचा उदात्त हेतू ठेवून समाजापुढे उत्तम

प्रशासनाचा आदर्श निर्माण केला. सध्याच्या शासकानी या धोरणाचा स्विकार करून सामान्य रयतेसाठी सुधारणा घडवून आणण्यासाठी होळकरशासकाकडून प्रेरणा मिळते.

११ होळकर संस्थानांच्या शासकांनी प्रशासन करताना शेतकऱ्यासाठी विविध योजना राबवून शेतीस व शेती उत्पादन वाढीस प्रेरणा दिलेली आहे.

१२ होळकर राज्याच्या शासकांनी युद्ध मोहिमात घोडदळाच्या जोरावर अति जलद हालचालीस प्राधान्य देवून शत्रूंना अंदाज बांधण्याची संधीसुध्दा न देता मोहिमा फत्ते करण्यावर भर देण्यात आलेला होता. म्हणूनच मराठ्याना दिल्लीच्या तख्तावर व अटकेपर्यंत वर्चस्व निर्माण करता आले.

१३ होळकर शासक हे आपल्या सहकाऱ्यासोबत मित्रत्वाने व समान भावनेतून हित संबंध ठेवून प्रशासन व्यवस्था भक्कम केली. बादशहाच्या लूटीत शिंदे नसतांना देखील शिंध्यांचा हिस्सा, पेशव्यांचा हिस्सा पुण्यास रवाना केले. म्हणजेच युध्द मोहिमातील मिळालेली लूट व खंडणी आपापसात काटेकोरपणे ठरलेल्या प्रमाणात वाटणी करून मैत्रीपूर्ण संबंध निर्माण केले. तसेच परधर्माविषयी सहिष्णूता बाळगणाऱ्या अहिल्याबाईनी परराज्याशी सलोख्याचे संबंध निर्माण केले. त्यामुळेच निजाम, हैदर, नवाब, अहिल्याबाईविषयी आदर बाळगत असत.

१४ अठराव्या शतकातील होळकर शासकातील सुभेदाराकडून एका राजाची पत्नी असो वा बादशहाची बेगम असो किंवा सर्वसामान्य कुटुंबातील स्त्रीस मातेसमान मानून तिचा आदर केला जात होता. म्हणजेच होळकर शासक स्त्रीदाक्षिण्य शासक म्हणून ओळखले जात होते. होळकर राज्याच्या शासकांनी लष्करी हालचालीत स्त्रियांना इजा न करता उलट त्यांचा सन्मान करून त्यांना परत सुखरूप पोचती केले जात होते हा गुण केवळ छत्रपती शिवाजी महाराजांच्या प्रशासनामध्ये दिसून येतो तसाच गुण पुढे एकमेव होळकर घराण्यातच दिसून येतो. असा गुण शिंदे वा इतरांकडे दिसून येत नाही.

१५ पुणे दरबाराचे सदाशिवभाऊ कारभारी यांने अटक मोहिमेचा झालेला राज्याचा जमा खर्च वा कर्ज सांगता क्षणी मल्हाररावांनी विनाविलंब त्याची शिंदे व होळकरात वाटणी केली. सुभेदारांनी पुण्यातील सावकार विठ्ठल महादेव गद्रे यांस बोलावून साठ लाख कर्ज भाऊसाहेबांकडे जमा केले. म्हणजेच मल्हाररावांनी कर्ज एका ठिकाणी उभे राहूनच चूकते केले. तर त्या साठ लक्ष रुपयांची भरपाई म्हणून त्यांना महाल निहाय साठ लाख रुपयांची वराती करुन दिली. यावरून होळकर शासक हे आर्थिक देवाणघेवाणीच्या व्यवहारात अतिशय चोख होते. शिवाय तेवढेच ते आर्थिक सधन होते. म्हणजेच दुसऱ्यांचे देणे वेळेच्या वेळी पूर्ण करणारे होते. अहिल्याबाईने सासरे सुभेदार मल्हारराव होळकर यांना पेशव्याचे देणे वेळीच देण्याचे स्पष्ट केलेले होते.

१६ छत्रपती शिवाजी महाराजांनंतर गनिमीकाव्याचा मोठा अंगिकार करणारे होळकर शासक मल्हारराव, अहिल्याबाई व यशवंतराव होते. त्यांनी आपल्या लष्करी प्रशासन व्यवस्थेत गनिमी काव्यास प्राधान्य देवून मोठमोठया शत्रूंवर अभुतपूर्व यश संपादन केलेले आहे.

१७ मध्ययुगीन काळात होळकर राज्याच्या शासकांनी प्रशासन करीत असताना विविध कार्यातून जनकल्याण साधण्यासाठी विविध लोकाभिमुख कार्य केले. याची साक्ष आजतागायत उपलब्ध आहेत. 'राज्य हे केवळ वसुलीसाठी, युद्धांसाठी आणि वैभवासाठी नसते तर, राज्याचा उपयोग समाज कल्याणासाठी असतो.' असे होळकर शासक मानून आपला राज्यकारभार करीत होते.

१८ मध्ययुगीन काळात होळकर राज्याच्या शासका प्रशासन करीत असताना शरण आलेल्यांना माफ करून एक वेळ सुधारण्याची संधी त्यास दिली जात होती. म्हणजेच होळकर शासक हे उदार स्वभावाचे होते हे दिसून येते.

१९ होळकर शासकानी सामान्य रयतेची सेवा करीत असताना जे काही सामर्थ्याच्या व सत्तेच्या बळावर करीत आहे त्याचा जाब मला परमेश्वरापाशी द्यावा लागेल. ही सुस्पष्ट धारणा डोळयांसमोर ठेवून स्वत: अत्यंत विरक्त राहून विश्वस्त वृत्तीने राज्य चालविले. त्यांनी आपल्या रयतेसाठी स्वत:ची खाजगी संपत्ती खर्च करून अनेक सुधारणा करणारे होळकर शासक होते. असे तत्व समोर ठेवून आजच्या शासन कर्त्यानी कार्य केले तर भष्टाचार व संपत्तीचे केंद्रिकरण होण्यास प्रतिबंध होण्यास मोलाची मदत ठरते. या कृतीमुळे होळकर शासक हे 'प्रजेची सेवा हीच मार्तन्डाची सेवा' त्यांच्या प्रशासकीय व्यवस्थेचा अभ्यास करताना हे स्पष्ट दिसून येते.

२० होळकर राज्याच्या शासकांनी आपल्या तलवारीच्या जोरावर दिल्लीच्या तख्तावर कोण बसावे? हे ठरविण्यात त्यांचा मोठा सहभाग होता. सुभेदार मल्हारराव होळकरांच्या व शिंदेच्या बळावर दिल्लीच्या बादशहानी मराठयाकडे संरक्षणाचा करार केला. त्यामुळे दिल्लीवर आपले वर्चस्व निर्माण केलेले होते.

२१ मध्ययुगीन काळात होळकर राज्यामध्ये विधवा स्त्रियांना पतीच्या संपत्तीत वारसा हक्क देवून त्याना सन्मानाने जीवन जगता येवू लागले असे हक्क देणारे एकमेव होळकर घराणे होते. सामान्य स्त्रियाना सन्मानाने जीवन जगण्याचा अधिकार मिळवून दिला.

२२ सामान्य जनतेला वेळेवर न्याय मिळावा म्हणून राज्यात न्यायालयाची स्थापना केली. म्हणजेच वेळेवर न्याय देणे हे होळकर राज्याच्या न्याय व्यवस्थेचे खास वैशिष्टे होते.

२३ होळकर घराण्यातील शासकांनी प्रजेच्या सुखास प्रथम क्रमांकाचे स्थान देवून आपली प्रशासन यंत्रणा राबविली. म्हणून नाना फडणिसांनी म्हणटले होते 'पुण्याचा दरवाजा म्हणजे माहेश्मती नर्मदातीरची' यावरून मराठी साम्राज्यांत नानासारखे मुत्सुध्दी महेश्वरचे महत्व मानीत होते.

२४ होळकरशाहीत स्त्रिया समानतेचा दर्जा मिळवून देण्यासाठी होळकर घराण्याचे एकमेव महिला शासक बनून महिलाना प्रशासन व्यवस्थेत स्थान मिळवून सनातनी विचारांना तिलांजली देवून समाजापुढे एक आदर्श निर्माण केला.

२५ प्रशासन व्यवस्थेत समाजापुढे आंतरजातीय तिढा निर्माण होवून नये म्हणून उत्कृष्ट प्रशासक या नात्याने स्वत:च्या घरापासून जातीनिर्मुलनाचे कार्य स्वत:च्या मुलीचा आंतर जातीय विवाह करून सिध्द केले. अशा प्रकारचा आधुनिक विचार स्विकारून विवाह लावून आंतरजातीय विवाहाची मुहूर्तमेढ रोवली.

२६ मराठा सुभेदारांनी बादशहाकडून दक्षिणेच्या सुभेदारी गाजीउद्दीनची नेमणूक करून औरंगाबादच्या मुक्कामी असताना निजामअलीच्या आईने गाजीउद्दीनला विष घालून ठार केले. त्यावेळी त्याच्याजवळ पाच कोटीची रोकड होती. ती पेशव्याना कोणीतरी लुटण्याचा सल्ला दिला मल्हारराव होळकर यांनी नानासाहेबांना विनंती करुन गाजीउद्दीनच्या प्रेतासोबत त्याची सर्व संपत्ती सटवाजी राजोळेकडे पाच हजार फौजेनिशी इ. स. १७५२ ला दिल्लीस रवांना केले. यातून होळकर शासकानी राज्यविस्तार करीत असताना दिलेल्या शब्दाला पाळण्याचे धाडस, नि:स्पृहवृत्ती व दिलेल्या शब्दास जपण्याची वृत्ती स्पष्ट दिसून येते.

२७ जयाप्पा शिंदेनी आपल्या जिवलग मित्राच्या दु:खाचा मागचा पुढचा विचार न करता जयाप्पानी जाटास अभय देऊन मोठी घोडचूक केली. असे दुटप्पी वागणे होळकर शासकाना कधीही केलेले नाही.

२८ होळकर राज्यातील न्याय प्रशासन व्यवस्थेत न्याय मागण्यासाठी सर्वसामान्याना कोणतीही प्रकारचे शुल्क आकारले जात नव्हते. न्यायदान हे राज्याच्या उत्पन्नाचे साधन नसते असे मानून सर्वाना मोफत न्याय देणारे होळकर एकमेव राज्य होते. न्यायदान व्यवस्था सरळ व सुलभ व्हावी हा त्यामागचा उद्देश होता. सर्वांना त्वरित विनामोबदला न्याय मिळण्यासाठी सदरचे न्यायदान अधिक सुलभ व जलद होणे करीता ‘वहीवारदार’, ‘विसरदार’ असे अधिकारी नेमलेले होते. तसेच नि:पक्षपाती व निर्भीड न्यायदान करण्यावर होळकर शासकाचा भर होता. यावरून होळकर शासक हे न्यायासाठी तत्पर असत हे स्पष्ट होते.

२९ गावोगावी न्याय देणारे पंचधिकारी नेमले. पाटील—कुलकर्णीच्या हक्कांचे तिने संरक्षण केले. ‘फडणविसांचे कायदे’ या नावाने तिने अनेक नियम घालून दिले होते. जमाखर्चाचा लेखा-जोखा इतका अचूक व चोख होता की अतिखर्च व पैशांचा अपव्यय थांबला.

३० होळकर शासकानी आपल्या व्यक्तिगत जीवनात अनेक आपत्तींना तोंड देत सामान्य रयतेसाठी राज्यकारभार केला. या काळात, सैन्याचे आधुनिकीकरण, रयतेसाठी कल्याणकारी योजना, नि:पक्षपाती न्याय यंत्रणा, धार्मिक व सांस्कृतिक सुधारणा, पर्यावरण

रक्षण अशा विविध क्षेत्राात त्यांनी अत्यंत कुशलपणे धोरणे आखून त्यांची प्रभावीपणे अंमलबजावणी केली.

३१ राज्यातील शेतकरी, कष्टकरी, सामान्य माणूस हा केंद्रबिंदू मानून त्यांनी आपले आर्थिक धोरण राबविले. भिल्ल, आदिवासी व भूमीहीन शेतमजुरांना माळरान, पडीक जमीन कसावयास देऊन रोजगार निर्मिती व अन्नधान्य उत्पादन वाढीस प्रेरणा दिली. सरकारने कसावयास दिलेल्या जमिनीत शेतकऱ्यांनी फळझाडे लावण्यासाठी व शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढीसाठी मदत झाली.

३२ जलसंवर्धनासाठी विहिरी व तलाव खोदले. नदी, तलावांना बंधारे घालून शेतीसाठी जलसिंचनाच्या सोई उपलब्ध करून दिल्या. माझ्या राज्यातील गरिबातल्या गरीब माणसाला सुख आणि स्थैर्य मिळाले पाहिजे. 'कल्याणकारी राज्य संकल्पना' सर्वच क्षेत्रातील कामगारांना उदरनिर्वाह योग्य पगार व तोही वेळेवर दिला जात असे. कामगारांना निवास सुविधा, मुलांच्या शिक्षणासाठी पंतोजींची नेमणूक, मजुर मुलांच्या औषधपाण्याची सोय, विशिष्ट व्यवसायातील कामगारांना प्रशिक्षण सुविधा, गरोदर स्त्री कामगारांना कमी काम, महिला कामगारांच्या तान्हुल्यांना सांभाळण्याची व्यवस्था (आताची पाळणागृहे) इत्यादी कामगार कल्याणकारी व कामगार कार्यक्षमता वृध्दीसाठी अनुकूल असे कामगार धोरण राबविले. आमची नोकरी गेली, उपाशी रहावे लागले तरी चालेल, पण आम्ही मातु:श्रीशी लढणार नाही. असे प्रभावी आदर्श सामान्य जनतेत होळकर शासकानी निर्माण केले.

३३ अहिल्याबाईंची विश्वस्ताची भूमिकेतूप सर्वसामान्य जनतेला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये. म्हणून यांनी ग्रामव्यवस्थेची घडी अतिशय चांगली बसवली होती. पुढे हाच विचार महात्मा गांधीजीनी मांडले. असे होळकर शासक हे दूरदृष्टी बाळगणारे होते.

३४ होळकर शासकानी आपल्या राजकारणाचे अध्यात्मिकरण करून राज्य हे जनतेसाठी चालविले पाहिजे. त्यासाठी सामान्य रयतेच्या हिताचे धोरण आखूण अनेक कल्याणकारी कामे हाती घेतले. जनहितार्थ सेवा ही संकल्पना उराशी बाळगून २२० वर्षे त्यांनी राज्यकारभार केला. राजकारणाचे अध्यात्मिकरण ही संकल्पना २५० वर्षापूर्वी प्रत्यक्षात आणणारे होळकर शासक होते.

३५ लोककल्याकारी राज्यहोळकरांचे कार्य राज्यकारभार सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक आणि आर्थिक क्षेत्रामध्ये उल्लेखनीय आहे. त्यांचे हे सर्व कार्य परस्परपूरक आहे, त्यांच्या सर्व कार्याचा केंद्रबिंदू समाज होता. त्यामुळे त्यांचे शासन लोककल्याकारी होते. होळकरांचे राज्य हे जनतेसाठी चालविलेले कल्याणकारी राज्य होते.

३६ लोककल्याणार्थ अहिल्यादेवीनी स्वत:च्या खाजगी खर्चातून धर्मशाळा, तलाव, विहीरी, पाणपोया उघडल्या. वाटसरूंच्या सोयीसाठी मोठे रस्ते तयार करून दुतर्फा झाडे लावली. नद्यावर घाट बांधले. अन्नछत्र उघडली. अपंग, वंचित, उपेक्षित लोकांचे पुनर्वसनही केले.

३७ आद्य पर्यावरणवादी ही पशुपालनासाठी कुरणे सुरक्षित ठेवून निसग र्संवर्धन करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे त्या भारतातील आद्य पर्यावरणवादीही ठरतात.

३८ राज्य आर्थिकदृष्टया मजबूत होण्यासाठी त्यांनी विविध भागांतले विद्वान, पंडित, कलाकार, तंत्रज्ञ, ज्ञानी लोकांना त्या सन्मान्नाने आपल्या राज्यात बोलावत. त्यांचा आदर-सत्कार केला.

३९ शाहीर अनंत फंदी, शाहीर प्रभाकर, मोरोपंत इ. अनेक कलावंतांना त्यांनी राजाश्रय दिला. पुण्यश्लोक अहिल्यादेवींच्या कर्तृत्वाला मल्हाररावांच्या कर्तबगारीची, मार्गदर्शनाची आणि मायेची पार्श्वभूमी होती.

४० विविध करागीरांना राजाश्रय समाजापुढे कारागिरीच्या कलेला प्रोत्साहन देऊन त्यांना राजाश्रय मिळवून दिला. वस्त्राद्योगाची कला टिकावी म्हणून महेश्वर येथे वस्त्रोद्योग सुरू केला. अनेक विषयांचे विद्वान, शास्त्री, पंडित, जागरणकार, किर्तनकार, ज्योतिषी, पुजारी, वैद्य, हकीम यांनाही त्या मुद्याम बोलावून घेत असत. त्यांना राजाश्रय देत असत.

४१ विद्वानाना राजाश्रय राजधानीत महेश्वराला होळकर शासकांनी अनेक विद्वान, कलावंत यांना आमंत्रण दिले. त्यात शास्त्री—पंडितांबरोबरच मुल्ला—मौलवीसुध्दा असत. मूर्तिकार, कवी, लेखक, वैद्य, पंडित, ज्योतिषी असे हे लोक अनेक जाती—जमाती व धर्मांमधील होते. त्यांनी कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता साऱ्यानाच सारखी व सन्मान वागणूक दिली. राजकारण, समाजकारण, अर्थकारण, धर्मकारण यांचा सुरेख संगम. होळकर शासकानी राजकारणाला पवित्र धर्मकारणाची जोड देऊन कल्याणकारी राज्याची निर्मिती केली. म्हणूनच अहिल्याबाई आदर्श राज्यकर्त्या होत्या.

४२ स्वधर्मनिष्ठ राहून होळकर शासकानी परधर्माविषयी सहिष्णूता भाव ठेवला, मुस्लिमांसाठीही त्यांनी मशिदी, दर्गे बांधून दिले. सर्वच धर्मांबद्दल त्यांना अपार प्रेम होते. अहिल्याबाईंची कारकीर्द शांततामय, दुष्काळविरहीत होती. राज्याची उपभोग शून्य स्वामिनी असाच जीवनकार्य तरूणांना चिरंतन प्रेरणादायी आणि दिशादर्शक आहे. होळकर शासकांचा आत्मविश्वास, धाडस, दूरदृष्टी, समयसूचकता, कर्तबगारी, सर्वधर्म समभाव, त्यागीवृत्ती, निष्ठा, आपुलकी आदि गुणामुळे चा अंतर्भाव त्यांच्या होता. स्त्री असून पुरूषाला लाजवेल अशा प्रकारचे अप्रतिम कार्य अहिल्याबाईंनी त्या काळी त्यांनी केले.

४३ होळकर शासकामध्ये लोकाभिमुख निर्णय घेण्याची सचोटी, कार्यक्षमता, धाडसी नेतृत्व, कर्तबगार, दूरदृष्टीपणा आदि गुणवैशिष्टयांमुळेच त्यांनी २२० वर्षे राज्याचा राज्यकारभार

योग्य दिशेने व उत्तम पध्दतीने पार पाडला. त्यांनी केलेल्या प्रशासनातून समाजातील संपूर्ण मानवजातीच्या समाजसुधारण आजतागायत स्पष्ट दिसून येतात.

## ७.२ सूचनाः

. प्रस्तुत विषयाच्या संदर्भाने संशोधन केल्यानंतर संशोधनकर्त्यास सध्याच्या प्रशासन व्यवस्थेत बदल करण्याची आवश्यकता आहे. सकारात्क प्रशासन व्यवस्थेत बदल करावयाचा असल्यास पुढील बाबींचा अवलंब केला पाहिजे.

१ सध्याच्या न्याय प्रणाली ही अतिशय क्लिष्ट व वेळ काढू स्वरूपाची आहे. त्यात होळकरशाही सारखी न्यायालयीन प्रशासन व्यवस्था स्विकाल्यास अन्यायग्रस्ताना अन्याय झाल्यासारखे वाटणार नाही.

२ सामान्य रयतेस काडीचाही त्रास होणार नाही. अशी कर रचना निर्माण करून सामान्य रयतेस दिलासा मिळू शकतो.

३ शेतकऱ्यासाठी शेती उत्पादन वाढीस पुरक बाबींचा पुरवठा करून शेतीस उत्पादित मालास योग्य किंमत व बाजारपेठ दळणवळणाच्या सोयीत वाढ केल्यास होळकरशाहीकालीन शेतकऱ्याप्रमाणे सुखी व समृध्द जीवन बनण्यास निश्चितच आजच्या शेतकऱ्याना मदत होईल.

४ आधुनिक काळातील शासकांच्या प्रशासनाचा मुळ आधारस्तंभ लोककल्याणकारी योजना हा जरी असले तरी, या योजनाची काटेकोरपणे अमंलबजाणी करण्यास त्यातील दिरंगाई व दुर्लक्षितपणा, प्रत्येकांची प्रत्येक स्तराव होणारा लालफितीचा कारभार हा मोठ्या प्रमाणात फोफावलेला आहे. शासनाकडून राबविलेल्या योजनातील गैरप्रकार स्वतः जातीने किंवा खास यंत्रणेकडून पाहणी करून, जो कोणी दोषी आढळून आले, तर त्यास तात्काळ कठोर शिक्षा व झालेली नुकसान भरपाई करून घेतली तरच अधिकारी यंत्रणेत कमालीचा वचक निर्माण होवून सामान्य रयतेचे संपूर्ण विकास साधण्यास निश्चितच मदत होते.

५ होळकर राज्यात विधवांना त्यांचे नवऱ्याची इस्टेट वा संपत्ती सांभाळणे करीता मदत चालू केली आणि विधवांना स्वतंत्रपणे दत्तक घेण्याची मुभा वा परवानगी दिली जात होती. वास्तविक अशा तरतूदीची आजच्या काळाची गरज आहे.

६ होळकर शासकानी आपल्या राज्यातीलच नाही, तर देशातील बहुजन समाजाची, दीन, दु:खी, दुबळ्यांची, प्राणिमात्रांची, सेवा करणे म्हणजे मोक्ष असे मानून ते प्रशासन करीत होत. होळकर शासकांनी केलेले कार्य सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक, आर्थिक आणि साहित्यिक क्षेत्रामध्ये उल्लेखनीय आहे. त्यांचे हे सर्व कार्य परस्परपूरक आहे. त्यांच्या सर्व कार्याचा केंद्रबिंदू समाज होता. होळकर शासकाचा सामाजिकता हा गुण आजच्या शासन कर्त्यांना अंगिकारण्याची खरी गरज आहे. होळकर शासकाच्या

कार्याचा ठसा बद्रिनाथपासून ते रामेश्वरपर्यंत आणि द्वारकेपासून ते जगन्नाथपर्यंत संपूर्ण भारतात त्यांच्या लौकिक—अलौकिक उमटला आहे. होळकर राज्यात अंधश्रध्देला अजिबात थारा नव्हता, म्हणजे होळकरांचे प्रशासन हे पुरोगामी विचारसरणीचे होते. असे पुरोगामी विचार कृतीत आणणे हे आजच्या एकेवीसाव्या शतकाची खरी गरज आहे असे या संशोधनावरून स्पष्ट होते.

सदरील संशोधनाचा सखोल अभ्यास करीत असताना हे प्रकर्षाने आढळून आले की, होळकर घराणे हे मराठी सत्तेचा विस्तार करणाऱ्या अनेक घराण्यापैकी एकमेव प्रमुख घराणे होते. मराठा सरदार घराण्यात अनेक सरंजामी सरदार होते. तरी पण श्रीमंत पेशव्यानी केवळ सुभेदार मल्हारराव होळकर यांची निष्ठा व पराक्रम पाहून खाजगीचा अधिकार होळकर घराण्यास देवून त्यांचे वेगळेपण दाखवून दिले. इतर घराण्यात केवळ सरंजामी सरकारी दौलत होती. तर होळकर घराण्यात मात्र सरंजामी सरकारी दौलत व खाजगी दौलत अशा दोन स्वरूपाचा राजकीय कोश स्वतंत्ररित्या अस्तित्वात होता. हे या घराण्याचे मराठेशाहीतील खास वैशिष्टये होते. या घराण्यात एकूण चौदा शासक होवून गेले. त्यापैकी सुभेदार मल्हारराव, मातोश्री अहिल्याबाई, यशवंतराव, तुकोजीराव दुसरे, शिवाजीराव, तुकोजीराव तिसरे व यशवंतराव दुसरे यांची कारकिर्द महत्वपूर्ण ठरली. ह्या होळकर शासकांनी उत्कृष्ट प्रशासन हे समाज व्यवस्थेचे मुलभूत अंग मानून आपला राज्यकारभार केला. काळाची पावले ओळखूण प्रशासनाची अभूतपूर्व घडी बसविली. अलौकीक मराठी साम्राज्य विस्तार व जनकल्याणकारी प्रशासनाची सांगड भल्याभल्या सम्राटाना चकीत करणारी ठरली. अठराव्या युगात कट्टर सनातनी विचारांचा पगडा असताना त्यास तिलांजली देवून आपल्या राज्यात वा संस्थानात नवनवीन समाजकल्याणकारी योजना राबविल्या. अश्या या अभूतपूर्व उत्कृष्ट प्रशासनाची दखल व प्रेरणा ही इतिहासाच्या अभ्यासकारानीच नव्हे तर समकालीन प्रशासकानी घ्यावी ही काळाची गरज आहे. भारतीय राज्यघटनेतील कल्याणकारी राज्याची संकल्पना होळकर शासकांनी आपल्या शासनातून व प्रशासनातून प्रत्यक्षात उतरविली. लोकाभिमुख कार्यपध्दती राबवून अद्वितीय वैचारिक प्रतिभेने काळाच्याही पुढे विचार करण्याचे दुरदुर्शित्व त्यांनी आपल्या कर्तृत्वाने सिद्ध केले.

# संदर्भ साधने

## अ) (मराठी)


१ अत्रे मुरलीधर मल्हार, सुभेदार थोरले मल्हारराव होळकर यांचे चरित्र, अर्धविजय छापखाना, पुणे, १८६७.

२ अरनोदकर कृष्णराव, देवी अहिल्याबाई टी.पी.शेटये प्रकाशक, मुंबई, प्रथमावृत्ती, १९३०

३ आठवले सदाशिव (संपा.), गद्रे सावकरांसंबंधिचे कागद, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे, २०००.

४ आठवले सदाशिव, ऐतिहासिक लेख संग्रह भाग—६, भाग—७, भाग—८, भाग—९ नानाभाऊ छापखाना, मुंबई, १९०८

५ आठवले सदाशिव, हिंगणे दप्तर खंड—३, ऐतिहासिक लेख संग्रह भा—५ नानाभाऊ छापखाना १९०८

६ आपटे विजय, शोध महाराष्ट्राचा, राजहंस प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती, २०१६.

७ आपटे द. वि., (संपा.), दत्तोपंत आपटे लेखसंग्रह, स्मारक मंडळ प्रकाशन, पुणे, वि.ग. केतकर लोकसंग्रह छापखाना, १९४५,

८ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर (कलारली) गंगोबा तात्याची कारकीर्द, प्रस्तावना पोतदार व गं. ना. मुजुमदार. भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे शके १८४२

९ आपटे द. वि., (संपा.), चंद्रचुड दप्तर, (गंगोबा तात्याची कारकीर्द), कला—१, भारत इतिहास संशेधन मंडळप्रकाशक, पुणे, १९२० .

१० आपटे द. वि., ओतूरकर. रा. वि., महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे, प्रथमावृत्ती, १९४१.

११ आपटे दत्तात्रय विष्णू, महाराष्ट्र इतिहास, मंजरी चित्रशाळा प्रेस, पुणे, १९२३.

१२ ओक प्र.ग., (संपा.), पेशवे घराण्याचा इतिहास, केसरी प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती, १९९२.

१३ ओक जनार्दन, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, राजश्री प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती २००२,

१४ ओतुरकर रा. वी., मराठ्यांचे साम्राज्य, लोकसंग्रह छापखाना, पुणे, १९४७.

१५ ओतूरकर रा. वि., (संपा.), पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे, १९५०.

१६ आयुक्त, पुरातत्व एवं संग्रहालय मध्यप्रदेश, इन्दौर, भण्डारी ऑफसेट प्रिंटर्स, भोपाळ १९९२

१७ इंगळे राम, मावळते मल्हारराव, उदयोन्मुख महादजी, विश्वभारती प्रकाशन, नागपूर,

१९८६.

१८ इनामदार ना. सं., झुंज, कॉन्टिनन्टल प्रकाशन, पुणे, पुनर्मुद्रण, २०१३.

१९ इतिहासाचार्य राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहास साधने, खंड—१, मोदवृत्त छापखाना वाई, १८९८, खंड—२—१९३१, खंड—४—१९००, खंड—५—खंड—६—२००६, खंड—७,—२००६, खंड—८—१९०२, खंड—९—१९०९

२० क्याप्टन डेविड केपन साहेब, मराठ्यांची बखर: क्याप्टन ग्रांट डफ साहेब, तुकाराम जावजीचा छापखाना, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९१६.

२१ कामत श्रीराम पांडुरंग, मराठी विश्व कोश, खंड—१, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा, प्रथम प्रकाशन, २०००.व खंड—२, २००३, खंड—३ २००५.

२२ काळे यादव माधव, नागपूरच्या भोसल्यांचा इतिहास, म. रा. साहित्य व संस्कृती मंडळ पुरस्कृत, विदर्भ संशोधन मंडळ, ग्रंथमाला, नागपूर, १९७९.

२३ कापे सा. ना., माधवराव बल्लाळ ऊर्फ थोरले माधवराव पेशवे यांची रोजनिशी, भाग—१, १९११.

२४ किर गिरिजा, पुण्यश्लोक अहिल्याबाई, मधुराज पब्लिकेशन्स, पुणे, २००६.

२५ कुलकर्णी र. कृ., (अनु.), देशमुख वतनदार छत्रपती पेशवा: डॉ. स्टुअर्ट गॉर्डन (१६००—१८१८) डायमंड पब्लिकेशन मुंबई, प्रथम आवृत्ती, २०१६.

२६ कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास खंड–२, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, १९८५, खंड–३— १९८६,

२७ कै. तिवारी दु. आ., मराठ्यांची संग्रामगीते, चिंतामणी प्रेस, कोल्हापूर, आवृत्ती आठवी, १९५४

२८ कै. जोशी शं. ना, भाऊसाहेबाची बखर, भारत इतिहास संशोधक मंडळ, लोकसंग्रह छापखाना पुणे, आवृती आठवी, १९६५.

२९ केळकर य. न., ऐतिहासिक शब्दकोश, भाग—१, भाग—२, ठोकळ प्रकाशन, पुणे, पहिली आवृती, १९६२

३० केळकर य. न., होळकरांची कैफियत, संशोधन व टीपा सदाशिव लक्ष्मण कोकाटे, हनुमान प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ति, १९५४.

३१ केळकर नरसिंह चिंतामणी, मराठे व इंग्रज संबंध, मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे, पहिली आवृती, १९१६.

३२ कविश्वर ग. वा., अहिल्यागीत, क्षत्रिय धनगर सेवा संघ प्रकाशक, इंदोर, १९७७

३३ काळे बी. आर., लोकमाता पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, संदर्भ प्रकाशन औरंगाबाद, प्रथमावृत्ती, २०१४.

३४ काळे गोविंद, अहिल्यागाथा, अक्षरमानव प्रकाशन, पुणे, द्वितीयावृती, २०१४

३५ कारंडे य. ल., अहिल्या, आर्यता प्रकाशन पुणे, १९९७.

३६ कौशिक अशोक, भारत के प्रमुख तीर्थ, डायमंड पॉकेट बुक्स प्रकाशक, नवी दिल्ली, १९९२

३७ कोळेकर हरीभाऊ भ., होळकर राजघराण्यातील होळकर स्त्री रत्ने, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, प्रथम आवृत्ती, २०१५.

३८ कोळेकर हरीभाऊ भ., प्रति शिवाजी यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, प्रथम आवृत्ती, २०१५.

३९ कोळेकर हरीभाऊ, होळकर कोण होते?, अहिल्या प्रकाशन, सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१३.

४० कोळेकर हरीभाऊ, होळकर राज्य संस्थापक मल्हारराव होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५.

४१ कोळेकर हरीभाऊ, स्त्री स्वातंत्र्याचा ललकार पुरोगामी अहिल्यादेवी, अहिल्या प्रकाशन, बार्शी सोलापूर, आवृत्ती पहिली, २०१५,

४२ कोळेकर हरीभाऊ, लोकमाता पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, अहिल्या प्रकाशन, बार्शी, आवृत्ती पहिली, २०१५.

४३ कानडे मु. श्री. (संपा.), भाऊसाहेबांची बखर, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस पुणे, प्रथामावृती १९९३

४४ कुलकर्णी एम. आर., नाना फडणीस आणि मराठी राज्यप्रशासन, पुणे, २००४.

४५ केणेकर मुक्ता, लोकराज्ञी अहिल्याबाई होळकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृती, २०१३.

४६ खरे ग. ह., कुलकर्णी, अ. रा. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड—२, (१७६१ —१८१८) कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृती, १९८६, खंड—३—१८९९.

४७ खरे ग. ह., दुर्ग, सह्याद्री विहार मंडळ मुंबई, प्रथमावृती, १९०२.

४८ खरे ग. ह., जोशी शं.ना., (संपा.) ऐतिहासिक मराठी साधने, भारत सरकारच्या केंद्रीय (दिल्ली) दप्तरखान्यातील, प्रकाशक चिटणीस भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९८३.

४९ खरे ग. स., जंत्री (शिवकालीन संपूर्ण शकावली १६२९—१७२८), ओरिएंटल बुक सप्लाई कंपनी पुणे, १९२३.

५० खडपेकर विनया, ज्ञात—अज्ञात अहिल्याबाई होळकर, राजहंस प्रकाशन, पुणे, लोकावृत्ती चौथी २०१४.

५१ खेडेकर पुरुषोत्त्तम, लोकमाता अहिल्यादेवी होळकर, जिजाई प्रकाशन पुणे, पुनर्मुद्रण २०१२,

५२ गाडगीळ ह.र., विंचुरकर घराण्याचा इतिहास, वैभव छापखाना, पुणे, १८८३

५३ गावडे शं.बा., (संपा.), देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, हूजुर, खाजगी स्टेट इंदैर, होळकर सरदार प्रेस, इंदैर, १९२३.

५४ गोखले वा. द., अहिल्याबाई होळकर चरित्र, ग. ल. ठोकळ प्रकाशक, पुणे, गोखले वा. दा., १९४९

५५ गोगटे चिं. गं., छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, नवीन किताबखाना, पुणे, १८९३.

५६ गुप्त शिवकुमार, (संपा.), उत्तरी भारत का इतिहास, पंचशिल प्रकाशन, जयपूर, १९९९.

५७ गुजर मा. वि., संस्थान देवास थोरली पाती, पवार घराण्याच्या इतिहासाची साधने पुणे १९४०

५८ गुजर मा.वि., करवीर रियासतीची कागदपत्रे भाग ०१ ते ०३, कोल्हापूर १९६२

५९ गायकवाड चंद्रशेखर, पुरोगामी विचारांची जीवनधारा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, ओम प्रकाशन, अकलुज, २०१०.

६० गोखले वा.दा. अहिल्याबाई होळकर, ठोकळ प्रकाशन, पुणे, प्रथमावृती, १९८९

६१ गोखले, गिरीश, (संपा.), लोकराज्य अहिल्याबाई होळकर व्दिशताब्दी पुण्यतिथी विशेषांक, मुंबई, १९९५

६२ गोपाळराव देशमुख, सुभेदार मल्हारराव होळकर एक राष्ट्रपुरुष, कौशल्य पब्लिकेशन, सोलापूर, २०१७.

६३ गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, नागपूर, प्रथमावृत्ती, १९९१.

६४ गर्गे स. मा., (प्रमुख संपादक), मराठी रियासतः गोविंद सखाराम सरदेसाई, खंड—३, व खंड—४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, नवीन संदर्भासहित संपादित आवृत्ती, १९८९ खंड—५, ६ व ७, खंड—८, —२०११,

६५ चितळे वि. सि., (संपा.), पेठे दप्तर, भाग–१, चिटणीस भारत इतिहास संशेधन मंडळ, पुणे. १९४८, भाग–२—१९५०

६६ चिटणीस एम.आर., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, पुणे, आवृत्ती तिसरी, १९२४

६७ चापेकर ना. गो., (संपा.) पेशवाईच्या सावलीत, आर्य संस्कृति मुद्रणालय, पुणे, १९३७.

६८ चौसाळकर अशोक, न्याय आणि धर्म, प्रतिमा प्रकाशन, पुणे, जुलै, २००५

६९ जहागिरदार विजया, कर्मयोगिनी, मेहता पब्लिशिंग हाऊस पुणे, तृतीयावृत्ती, २००४.

७० जहागिरदार विजया, महाराष्ट्राचे शिल्पकार तेजस्विनी अहिल्याबाई होळकर, महाराष्ट्

राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई, २००३.

७१ जहागिरदार विजया, लोकमाता, मोरया प्रकाशन, डोबिवली, प्रथमावृत्ती, १९९६

७२ जवळेकर अरविंद, लोकमाता अहिल्याबाई, प्रभात प्रकाशन दिल्ली, प्रथमावृत्ती, २००२.

७३ जगधने विद्या, (संपा.), अहिल्यादेवी होळकर लौकिक—अलैकीक, संध्या साहित्य सदन, दिल्ली, प्रथमावृत्ती २०१२.

७४ जोशी ए. आर., अहिल्याबाई, व्ही.जी. केतकर प्रकाशक, पुणे, १९४५

७५ जोशी शं. ना. (संपा.), सेनापती दाभाडे दप्तर भाग १ चिटणीस भारत इतिहास संशोधक मंडळ प्रकाशक.

७६ जोशी शं. ना., शिंगारे ल. म., अमात्य रामचंद्रपंत— आज्ञापत्र आणि राजनिती, कॉन्टीनेंटल प्रकाशन, पुणे, १९६०.

७७ जोशी शंकर नारायण, अर्वाचीन महाराष्ट्र इतिहास काळातील राज्यकारभाराचा अभ्यास, भाग—१ पुणे विद्यापीठ, पुणे, १९५९.

७८ जोशी श.ना., भाऊसाहेबांची बखर, आपटे स्मारक मंडळ प्रकाशन, भारत इतिहास संशोधन मंडळ पुस्तक चौथे पुणे १९५९

७९ जोशी बा. पू., माधवराव बल्लाळ उर्फ थोरले माधवराव पेशवे यांची रोजनिशी, भाग—२, डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणे, १९११.

८० जोशी मो.रा., (संपा.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—२७, (तात्या जोगांच्या चरित्राची साधने), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९५२.

८१ जोशी मोरेश्वर रामचंद्र, (संपा.), राजवाडे संशोधन मंडळ, ग्रंथमाला ग्रंथ—२३ वा, ग्रंथ—२७ वा, राजवाडे संशोधन मंडळ धुळे, शके १८७४

८२ जोशी मोरेश्वर रामचंद्र, तात्या जोगांच्या चरित्रांची साधनें, राजवाडे संशोधन मंडळ धुळे, शके १८७४

८३ जोशी र. म., बारा ज्योतिलिंग, आदर्श विद्यार्थी, प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, १९८५

८४ जोशी रघुनाथ मुरलीधर, (संपा.), पानिपतची बखर, मराठवाड साहित्य परिषद प्रकाशन इसाममिया बाजार हैद्राबाद, प्रथम आवृत्ती, १९५५.

८६ जोशी द.पं. (प्रमुख संपादक), डॉ. उषा जोशी, समग्र सेतुमाधवराव पगडी, खंड—३ रा, डॉ. विद्या देवधर, कार्यवाहक मराठी साहित्य परिषद आं.प्र. इसाममिया बाजार हैद्राबाद, २०१०.

८८ जोशी तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री, मराठी विश्व कोश खंड—६ व खंड—७ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, प्रथम प्रकाशन, १९७७, खंड—९—१९७६, खंड—१३—१९८७.

८९ जोशी श. ना., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, डॉ. गं. श्री. कोशे प्रकाशन, पुणे, आठवी

आवृती, १९६५.

९० जदुनाथ सरकार, (अनुवादक), मुघल साम्राज्याचा ऱ्हास, भाग—१, ग. श्री. देशपांडे प्रकाशन, म. रा. सा. सं.मंडळ, मुंबई, १९९०.

९१ टकले अभिमन्यू, राणी अहिल्याबाई होळकर, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००६.

९२ टिकेकर सुजाता गानू, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे, २०१३, पुनर्मुद्रण.

९४ ठाकूर वा. वा. (संपा.) होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४५.

९५ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४.

९६ ठाकूर वा. वा. (संपा.), होळकरशाहीचा इतिहास, भाग—२, (१७९७—१८८६), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४६.

९७ ठाकूर वा. वा., (संपा.), होळकरशाहीचा इतिहास भाग—१, (१६९३—१७९७), होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इन्दूर, १९४४.

९८ डांगे अण्णासाहेब, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, यशवंत प्रकाशन, इस्लामपूर, प्रथमावृत्ती, २०१५,

९९ डिस्कळकर द. बा., शिंदेशाहीची राजकारणे, भाग—१, सातारा इतिहास संशोधन मंडळ, सातारा, १९३४, भाग—२—१९४०.

१०० डोंगरे के. ब., दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे, भाग—१, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९१३, भाग—२— १९१४

१०१ डोंगरे के. ब., चंद्रचूड दप्तरापैकी निवडक उतारे, ग्वाल्हेर सीक्रेयट प्रेस, १९३४.

१०३ डॉ. खाबेरेकर वि. गो., मराठा अंमलाचे स्वरुप, शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९८८.

१०४ डॉ. खोबरेकर वि.गो., मराठा कालखंड, (भाग—२), १७०७ ते १८१८, महाराष्ट्र राज्य सहित्य आणि संस्कृती मंडळ, नवीन प्रकाशन भवन, मुंबई, १९८९.

१०५ डॉ. खोबरेकर वि. गो., मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम, मराठी ग्रंथसंग्राहालय, दादर, प्रथमावृत्ती, १९७७.

१०६ डॉ. खोबरेकर विठ्ठल गोपाळ, (संपा.), गुजरातेंतील मराठी राजवट, १६४ — १८२०, राजहंस प्रकाशन, पुणे.

१०७ डॉ. शहा मु. ब., (संपा.), इतिहासाचार्य वि. का. राजवाडे समग्र साहित्य, खंड—१० वा, प्रस्तावना डॉ. सदानंद मोरे, राजवाडे संशोधन मंडळ, पुणे, १९७८.खंड—११—१९९८

१०८ डॉ. मतकर गणेश, यशवंतराव होळकर द्वितीय धारीवाल, एल.सी. इन्दौर स्टेट गजेटियर, भाग—१, १९३१

१०९ डॉ. मतकर गणेश, भारतीय स्त्रीरत्न पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, शिवाकाश प्रकाशन, इन्दौर, १९८७

११० डॉ. भट्टाचार्य ध्रुव, (अनुवादक), राज्यशासन का पुरातत्व एवं इतिहास, खंड—३ क. जेम्स टॉड, राजस्थानी ग्रंथागार प्रकाशक, जोधपूर, सन २०१५ प्र २१९.

१११ डॉ. पोतदार प्र.न. व मुजुमदार गं. ना., (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—९, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, भा. इ. सं. मं., पुणे, शके १८४२.

११२ डॉ. खरात महेश, लोकराज्ञी राजमाता अहिल्याबाई होळकर, कैलास पब्लिकेशनः औरंगाबाद. प्रथमावृत्ती, २०१४.

११३ डॉ. इंगळे राम, मावळते मल्हारराव उदयोन्मुख महादजी, विश्वभारती प्रकाशन नागपूर, प्रथमावृत्ती, १९८५

११४ डॉ. कोलारकर श. गो., मराठ्याचा इतिहास, (१६००—१८१८), श्रीमंगेश प्रकाशन, नागपूर

११५ डॉ. माशाळकर धम्मपाल रेवण, लोकमाता अहिल्यादेवी, चिन्मय प्रकाशनः औरंगाबाद, २०१६.

११६ डॉ. शिवदे सदाशिव, (अनुवाद), मराठ्यांची लष्करी व्यवस्था, (एस. एन. सेन) डायमंड पब्लिकेशन, पुणे, २०११.

११७ डॉ. भोगले शांताराम, लोकप्रशासन सिध्दांत व कार्य पध्दती, कैलास पब्लिकेशन औरंगाबाद, २०१६.

११८ डॉ. भगवान अंजणीकर, निवडक महापुरुष, निमित्य प्रकाशन, नांदेड, २०१४.

११९ डॉ. पठाण यु. म., (संपा.), भाऊसाहेबांची बखर, अंबादास प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, १९७५.

१२० डॉ. रोहित राजीव कुमार, इतिहास कोश डिस्कवरी पब्लिशिंग हाऊस प्राईवेट लिमिटेड नई दिल्ली, प्रथम संस्करण, २००९

१२१ डॉ सदाशिव शिवदे, मराठ्यांची लष्करी व्यवस्थाः सेन, डायमंड पब्लिकेशन, पुणे, २०११.

१२२ डॉ. देशपांडे प्र. न. व प्राचार्य डॉ. भामरे सर्जेराव ज., (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड—९, इ. वि.का. राजवाडे श्री संजय मुंदरा प्रकाशन. धुळे. २००९,

१२३ डॉ. देशपांडे प्र.न, मराठ्यांचा उदय, व्यक्ति उत्कृष्ट स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, १९७४.

१२४ डॉ. देशपांडे सु. र., मराठेशाहीतील मनस्विनी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०१३.

१२५ डॉ. तांबोळी एन. एस., पेशवेकालीन न्यायीक प्रशासनाचा पत्ररुप इतिहास, भाग–१ इनसाईट प्रकाशन, नाशिक, २००६.

१२६ डॉ अंजनीकर भगवान, निवडक महापुरूष, विश्वभारती प्रकाशन, नांदेड, प्रथमावृत्ती, २०१४.

१२७ डॉ. गोहित राजीव कुमार, इतिहास कोश, डिस्कवरी पब्लिशिंग हाउस प्राईवेट लिमिटेड नई दिल्ली, प्रथम संस्करण, २००९.

१२८ डॉ. गद प्रभाकर, खानदेश माळव्याच्या इतिहासाची साधने, राजवाडे संशोधन मंडळ धुळे, २०१३.

१२९ डॉ. गवळी पी. ए., मराठ्यांचा इतिहास, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद, १९९९.

१३० डॉ. गवळी पी. ए., पेशवेकालीन महाराष्ट्र, कैलास पब्लिकेशन्स, औरंगाबाद, प्रथमावृत्ती, २०००.

१३१ डॉ. गुजर यादव, मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, नागपूर, १९९०

१३२ डॉ. धाये राजेंद्र, डॉ. मुटकुळे, मराठ्यांचा इतिहास: शिवकाळ ते पेशवाई इ.स. १६३० ते १८१८, चिन्मय प्रकाशन, औरंगाबाद, २०१३.

१३३ डॉ. बंडे शारदा गोविंदराव, मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००९.

१३४ डॉ. कठारे अनिल, डॉ. कदम वसंत, पेशवेकालीन महाराष्ट्र, पुनम प्रकाशन, कंधार, प्रथम आवृत्ती, २०१०.

१३५ डॉ. देवधर विद्या, समग्र सेतुमाधवराव पगडी, खंड–३. इसामिया बाजार प्रकाशन, हैद्राबाद, २०१०.

१३६ दीक्षीत नी. सी., मराठ्यांचा इतिहास, इ.स. १६०० ते १८१८, पिंपळापुरे ॲन्ड कंपनी पब्लिशर्स, नागपूर, १९९७.

१३७ दीक्षित स. का. (संपा.), अहिल्या स्मरणिका, खाजगी देवी अहिल्यादेवी होळकर चॅरिटीज ट्रस्ट प्रकाशक, इंदोर, १९७०

१३८ देशपांडे विजया, नेहेते उज्जला, (संपा.), नंदुरबार दप्तर, खंड–१, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८

१३९ दीक्षित म.श्री., पुण्यश्लोक अहिल्याबाई, गजानन क्षीरसागर प्रकाशक, पुणे, तृतीयावृती, १९८४

१४० दीक्षित म.श्री., प्रतापी बाजीराव, गजानन क्षीरसागर प्रकाशक, पुणे, १९९९,नवीन आवृत्ती.

१४४ देशपांडे पारस, पेशवेकालीन पुणे, डायमंड पब्लिकेशन, पुणे, २००७.

१४५ देशपांडे प्र. न. (संपा.), शोधनिबंध संग्रह, अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद नागपूर,

१९९५.

१४६ देव ग.चि., इंदूरच्या अहिल्याबाई होळकर यांचे चरित्र, आर.व्ही.चितळे प्रकाशन, पुणे, १९४९

१४७ दिघे वि.गो., मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा, भाग—१, चिटणीस भारत इतिहास संशोधक मंडळ प्रकाशक, पुणे, १९३३

१४८ धनुर्धारी टिकेकर रामभाऊ, देवी अहिल्याबाई होळकरीण, जनार्दन महादेव गुर्जर प्रकाशक, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८१५.

१४९ धनुर्धारी टिकेकर रामभाऊ, जवानमर्द मराठे गडी सुभेदार मल्हारराव होळकर, निर्णसागर छापखाना, मुंबई, १८१५.

१५० न्या. रानडे महादेव गोविंद, मराठे सत्तेचा उत्कर्ष, वरद बुकस, पुणे, १९९५.

१५१ नातू पद्‌मजा, संन्यशत स्वामिनी शुभोदय प्रकाशन, इंदूर, प्रथमावृती, २००८

१५२ नागतोडे किरण, कर्मयोगिनी अहिल्याबाई होळकर, सुधीर प्रकाशन, वर्धा, प्रथमावृत्ती, २००७.

१५३ नजन ओमप्रकाश वसंत, अहिल्याबाई होळकर, साकेत प्रकाशनः पुणे, पाचवी आवृत्ती, २०१६.

१५४ निकम गौतम, तेजस्विनी अहिल्याबाई होळकर, विमल किर्ती प्रकाशन, चाळीसगांव, द्वितीय आवृती २०१२

१५५ निसळ स. शि., (संपा.), दिवाण पळशीकर, दप्तर भाग—१, अहमदनगर जिल्हा वस्तू संग्रहालय, अहमदनगर, १९७२.

१५६ नाडकर्णी सी. ल., होळकरांच्या राज्याचे सामान्य वर्णन, दामोदर सावळाराम आणि मं. मुंबई, १९१९

१५७ पठाण यू.म., (संपा.), सभासद बखर, स्नेहवर्धन पब्लिशींग हाऊस पुणे, २०००

१५८ पोतदार अनंत, अहिल्यागीत, श्री क्षत्रिय धनगर सेवा संघ प्रकाशन, इंदोर, १९९०

१५९ पोटे देवीदास, (संपा.), होळकर रियासतीचा सांस्कृतिक इतिहासः डॉ. गणेश मतकर, अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४.

१६० पोटे देवीदास, (संपा.), अ.. अहिल्याबाईचा अहिल्याबाई होळकर स्मारक समिती, मुंबई, प्रथमावृत्ती, २०१४.

१६१ पानट प्रभाकर, अष्टावधानी, मनोरमा प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती, १९९४.

१६२ पाटील सु. आ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, अहिल्यादेवी प्रगती मंडळ प्रकाशक, जळगांव, २०००

१६३ पवार जयसिंगराव भाऊसाहेब, मराठी साम्राज्याचा उदय आणि अस्त, मेहता पब्लिकेशन पुणे, पुर्णमुद्रण, १९९३.

१६४ परिहार जी. आर., मराठा मारवाड संबंध, (१७२४ १८४३), राजस्थान हिंन्दी ग्रंथ अकादमी, नागपूर, १९७७.

१६५ पांडे बाबुराम, सैन्य अध्ययन, खंड—२, प्रकाश बुक डेपो बरेली, १९९३.

१६६ पारसनिस द.ब. (संपा.), पेशवे दप्तरातील सनदपत्रातील माहिती, तुकाराम जावजी आणि रामचंद्र शिंदे प्रकाशक, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९९३

१६७ पारसनिस द.ब. (संपा.), वतनपत्रे, निवाडापत्रे वगैरे पु.वि.मावजी प्रकाशक, पुणे, १९०९

१६८ पारसनिस द.ब., (संपा.), दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे, पु. वि.मावजी प्रकाशक, पुणे, १९०८

१६९ पारसनिस द.ब., वाड ग.चि. संपा., पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्रे: फौज सरंजामसंबंधी माहिती, तुकाराम जावजी प्रकाशक, मुंबई, १९९७

१७० पारसनीस द. ब., (संपा.), महापुरुष ब्रम्हेद्र स्वामीचा पत्रव्यवहार, बाबाजी सखाराम आणि कंपनी प्रकाशन, मुंबई, १९००.

१७१ पारसनीस द.ब., दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे, भाग—१, निर्णयसागर छापखाना मुंबई, १९१३, भाग—२—१९१४

१७२ पारसनिस द.ब., (संपा.), दिल्ली येथील पेशव्यांचे वकिल हिंगणे हयांचा पत्रव्यवहार, तुकाराम मावजी मुंबई, १९९३

१७३ पारसनीस दत्तात्रय बळवंत, (संपा.), होळकर दरबारांतील हिंगण्यांची वकिली, निर्णयसागर प्रकाशन, मुंबई, १९११.

१७४ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी, डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणे, १९०७.

१७५ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, (संपा.), महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग—१ला, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९१०. भाग—२ला—१९११.

१७६ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, इतिहास संग्रह, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९०८.

१७७ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, ब्रम्हेंद्रस्वामी धवडशीकर चरित्र व पत्रव्यवहार, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९००.

१७८ पारसनीस दत्तात्र्य बळवंत, मराठ्यांचे पराक्रम, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८९५.

१७९ पुरुषोत्तम दास, देवी श्री अहिल्याबाई यांचे सचित्र चरित्र, अनंत आत्माराम मोरमकर, १९१३.

१८० पुरंदरे कृ. वा., चिमणाजी बल्हाळ ऊर्फ चिमाजी अप्पा, भा. इ. सं. म. प्रकाशक, पुणे, शके १८७०,

१८१ पगडी सेतु माधवराव, महाराष्ट्र आणि मराठे, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६३

